

# कृतघ्न प्राणी

एकदा एक शिकारी जंगलात शिकारीला गेला होता. एका जागी त्याला खड्ड्यातून निरनिराळ्या प्रकारचे आवाज ऐकू आले. शिकाऱ्याने खड्ड्यात डोकावून पाहिले.

"दादा! आम्हांला वांचवा हो! देव तुम्हांला सुखी करील." आवाज ऐकू आले.

त्या खड्ड्यात शिकाऱ्याला एक मनुष्य, एक चित्ता, एक साप व एक उंदीर दिसला. खड्ड्याची भिंत सरळ उभी होती. म्हणून एका ही प्राण्याला चढून येणे शक्य नव्हते.

"तुम्हाला मी मदत कशाला करू रे? उंदीर आमचे धान्य खाऊन टाकतो. साप चावून आमचाजीव घेतो. चित्ते आमच्या गाईंची वासरे उचलून नेतात मनुष्य आमच्या जातीचा आहे. मी त्याला एकट्याला वांचवीन." शिकारी म्हणाला.

परंतु इतर प्राण्यांनी गयावया करून वांचवायला विनंती केली. तेव्हां शिकाऱ्याला त्यांची कीव आली व त्याने लांब लांब वेलीचे दोरखंड वळून ते खड्ड्यात सोडले व त्यांच्या आधारे सर्व प्राण्यांना वांचविले.

"आम्ही या उपकाराची फेड म्हणून कोणती तरी उपयोगी वस्तु आणून देतो." असे सांगून उंदीर, साप व चित्ता निघून गेले. परंतु मनुष्य म्हणाला—"दादा! मी फार गरीब आहे. खायलादेखील मला मिळत नाही. म्हणून मी आपल्याला कोणती ही वस्तू भेट म्हणून आणून देऊ शकणार नाही."

ते ऐकून शिकारी त्या गरीब माणसाला आपल्या झोपडीत बोलावून घेऊन गेला आणि त्याला पोटभर खायला घातले.

दुसऱ्या दिवशी चित्त्याने शिकार करून एक हरण शिकाऱ्याला प्रेमाची भेट म्हणून दिले आणि म्हणाला—"आज पासून तुला शिकार करण्याची गरज नाही. मी रोज शिकार करून तुला लागणारे मांस पुरवीन." असे सांगून चित्ता निघून गेला.

त्यानंतर साप आला आणि म्हणाला—"मी तुझ्यासाठी एक चूर्ण आणले आहे. हे चूर्ण एकाद्या कृतघ्नाच्या रक्तात भिजवून ते साप चावेल त्या जागेवर चोळलेस तर विष उतरेल." असे सांगून एक तऱ्हेचे चूर्ण शिकाऱ्याच्या हातात देऊन साप निघून गेला.

त्यानंतर उंदीर कसले तरी लहानसे गाठोडे ओढीत घेऊन आला आणि म्हणाला—"यात पुष्कळ दागिने आहेत. मी कित्येक दिवसांपासून हे जमवून ठेवले आहेत. हे विकून आयुष्यभर तुला आनंदाने घालविता येतील." असे सांगून उंदीरपण निघून गेला. त्या गाठोड्यात सोन्याचांदीचे दागिने होते.

हे दागिने मिळाल्यामुळे मी केवढा श्रीमंत झालो आहे. आतां मी या खोपटात कशाला रहायचे? असा विचार करून शिकाऱ्याने सर्व दागिने विकले आणि जे पैसे मिळाले ते खर्च करून त्याने एक चांगलेसे घर बांधले आणि त्यात राहू लागला. तो गरीब मनुष्य शिकाऱ्या बरोबरच रहात होता. शिकाऱ्याचे वैभव पाहून त्याच्या पोटात गोळा उभा राहिला.



तो शिकाऱ्याचे वाईट कसे व केव्हां होते याची वाट पाहू लागला.

त्याच सुमारास शहराच्या एका अधिकाऱ्याच्या घरी चोरी झाली. पैसे व दागिने चोरीस गेले. त्याने दवंडी पिटविली की जो कोणी चोराला पकडवून देईल त्याला मोठे बक्षिस दिले जाईल.

शिकाऱ्याच्या घरी राहणाऱ्या त्या गरीब माणसाने अधिकाऱ्याला जाऊन चोरीचा माल शिकाऱ्याकडे असल्याचे कळविले. म्हणाला—"मी त्या माणसाला ओळखतो. त्याने आपल्या घरातले दागिने चोरून विकले व एक मोठे घर बांधून त्यात रहात

कु. शोभा स. कुलकर्णी

आहे. पाहिजे तर आऊन आपण ते घर पाहून घ्यावे."

अधिकाऱ्याने आपल्या नोकरांना पाठवून शिकाऱ्याला बोलाविले आणि विचारले– "काय रे, तू हे एवढे मोठे घर कसे काय बांधलेस? कोठून आले इतके पैसे?"

शिकाऱ्याने खोल खड्डयात पडलेल्या चार प्राण्यांना त्याने कसे वांचविले होते ते सांगितले.

अधिकारी ते सर्व ऐकून म्हणाला–"तू कपोलकल्पित गोष्टी सांगू लागलास तर त्यांवर कोणाचा विश्वास बसणार? मला तर तू अट्टल चोर दिसतो आहेस." नंतर तो आपल्या शिपायांना म्हणाला–"या माणसाला धरून तुरुंगात नेऊन टाका. नंतर सर्व चवकशी करू."

थोड्या वेळाने घरातून नोकरांनी धावत येऊन मुलीला सांप चावल्याचे अधिकाऱ्याला सांगितले. मुलगी बेशुद्ध होऊन पडली होती. काय करावे, अधिकाऱ्याला सुचेना.

"आपण काळजी करू नका, सापाचे विष उतरविण्यास माझ्याकडे औषध आहे. मी आपल्याला थोड्या वेळा पूर्वीच नव्हते का सांगितले की मी ज्या सापाला वांचविले होते त्यानेच एक औषध मला देऊन ठेवले होते. या कृतघ्न माणसाच्या रक्तात भिजवून साप चावलेल्या जागी हे औषध लावले तर विष उतरेल." शिकारी म्हणाला.

अधिकाऱ्याने त्याप्रमाणे मुलीला साप चावला होता त्या जागी ते औषध चोळून लावले. मुलीला शुद्ध आली व ती उठून बसली.

अशातऱ्हेने शेवटी शिकारी म्हणाला होता ते सर्व खरे असल्याची अधिकाऱ्याची खात्री पटली आणि त्याने त्या कृतघ्न माणसाला शिक्षा केली आणि शिकाऱ्याची माफी मागितली.





# पैशाची हाव

**हारून अल रशीद बगदादचे खलीफा होते तेव्हां घडलेली ही गोष्ट आहे.** त्यांच्या दरबारी हसन नावाचा एक अधिकारी रहात असे. त्याच्या बायकोचे नाव फातिमा असे होते. दोघांना पैशाचा इतका मोह होता की दोघे पोटभर जेवत देखील नसत. हसनला जो पगार येई तो सर्वच्या सर्व ती दोघं राखून ठेवीत. कुत्रंसुद्धा तोंड लावणार नाही असले पदार्थ ती दोघं खात. ज्या घरात दोघं रहात त्यात भिकारी सुद्धा राहायला तयार झाले नसते. अशातऱ्हेने त्यांनी इतके सोने जमविले की दोन थैल्या भरल्या. दोघं रात्री अपरात्री उठून एकदा ते सोने पहात व ते पाहून त्यांना स्वर्ग मिळाल्याचा आनंद होई.

धन वाढत गेलं तसातसा धनाचा लोभ पण वाढत गेला. एकदा फातिमाच्या मनात एकदम पुष्कळसे धन मिळविण्याची इच्छा उत्पन्न झाली. ती ज्या दुकानात नेहमी सर्व पदार्थ खरेदी करीत असे त्या दुकानदाराकडे जाऊन ती एकदम रडू लागली आणि म्हणाली–"अहो बडे मियां! तुमच्या भावाला (म्हणजे तिच्या नवऱ्याला) खलीफांनी एकाएकी धरून तुरुंगात टाकलं आहे हो. मी बाई माणूस कोणाकडे जाऊन सांगू. जवळ एक फुटकी कवडी सुद्धा नाही. काय खाऊ आणि काय पिऊ?"

दुकानदाराला तिची कीव आली व त्याने तिला सर्व किराणा माल पैसे घेतल्याशिवाय फुकट दिला. पण इतक्या न्यायपरायण खलीफांनी त्या बिचाऱ्याला तुरुंगात कां डांबून ठेवावे हे दुकानदाराच्या लक्षात येईना. त्या रात्रीचे जेवण दोघांना अमृतासारखे गोड लागले. कारण एक पै देखील खर्च केल्या शिवाय त्यांना पोटभर जेवायला मिळालं होतं.




अशातऱ्हेने काही दिवस अनेक दुकानदाराकडून फातिमाला फुकटात सर्व वस्तू मिळत राहल्या. परंतु एक दिवशी एका दुकानदाराने विचारलेच. म्हणाला–"फातिमा! असे किती दिवस चालणार? तुझ्या नवऱ्याला तुरुंगात कां घातलं खलीफांनी? कारण सांगितलंस तर सोडविण्याचा प्रयत्न तरी करता येईल."

फातिमा घाबरली. पण स्वतःला सावरून म्हणाली–"तुम्हांला पुण्य लागेल, ही गोष्ट खलीफांना जाऊन विचारू नका. आम्हां दोघांना एकदम फाशी मिळेल."

"तरमग तू आपल्या नातेवाइकांची मदत अशा वेळी कां घेत नाहीस?" दुकानदाराने विचारले. यापुढे दुकानदारांकडून फुकट समान मिळणार नाही व त्यांच्याकडे अशा मदतीसाठी ती जात राहली तर त्यांना संशय देखील येईल हे फातिमाने ओळखले.

गावात हसन व फातिमा दोघांचे पुष्कळ नातेवाईक होते. पण जाणे येणे ठेवले तर उगीच व्यर्थ खर्च होईल या भीतीने त्यांनी सर्व नातेवाइकांशी संबंध तोडल्यासारखेच होते. तरी फातिमा आपल्या माहेरच्या नातेवाइकांकडे जाऊन तिच्या नवऱ्याला खलीफांनी तुरुंगात टाकले असल्याचे सांगितले. तिच्यावर दया येऊन त्यांनी यथाशक्ती तिला मदत केली. परंतु त्यांना देखील ते एक आश्चर्यच वाटले, खलीफांनी असा अन्याय कां बरे केला असेल?

तुरुंगवासाचे सोंग चालू रहावे यासाठी हसनला दिवसा घराबाहेर पडणे कठीण झाले. उजाडण्याच्या आधी तो घराबाहेर पडे व चांगला काळोख पडल्यावरच घरी येई.

फातिमाचे ते सोंग पण फार दिवस चालले नाही. नातेवाइकांनी तिला, तिच्या नवऱ्याला खलीफांनी तुरुंगात का टाकले हे विचारायला सुरवात केली. ते म्हणाले–"खलीफा दयाळू आहेत: तू त्यांचे पाय धरून माफ करायला सांग. ते माफ करतील."

"नको नको, ते मुळीच नको. खलीफांकडे मी गेले तर मला पण ते तुरुंगात टाकतील व त्यांना (तिच्या नवऱ्याला) फाशीच होईल." फातिमा म्हणाली.

आतां नातेवाईकांवर अवलंबून राहणे अशक्य झाले. तेव्हां दोघांनी चोरी करून पैसे मिळवायचे ठरविले.

खलीफांच्या कचेरीत हिरे माणकांची देखरेख करण्याचे काम हसनला करावे लागे. त्याने दुसऱ्या दिवशी एक हिरा तोंडात ठेवून घरी आणून बायकोला दिला. बायकोने तो स्वतःचा म्हणून सांगून आपल्या एका माहेरच्या ओळखीच्या जव्हेऱ्याकडे मोठी किंमत घेऊन विकला. दुकानदाराने फातिमाला हिऱ्याची किंमत देऊन पाठवून दिले व खलीफांकडे जाऊन तो हिरा त्यांच्या खजिन्यांतला तर नाही याची चवकशी केली. कारण त्या जव्हेऱ्याला खलीफांच्या खजिन्यातल्या हिऱ्यांची चांगली माहिती होती.

चोरी पकडली गेली. हसनच्या घरी जाऊन खलीफांच्या शिपायांनी त्याला कैद



केले आणि त्याच्या घराची झडती घेतली तेव्हां दोन थैल्या सोने निघाले. हसन व फातिमा यांना धरून शिपायांनी खलीफांसमोर हजर केले.

खलीफा हसनला म्हणाले–"हसन! तू खजिन्यात जी चोरी केलीस त्याबद्दल तुला फाशीची शिक्षा देखील देता येईल. परंतु तुझ्या बायकोने खोटे बोलून दुकानदारांना व आपल्या नातेवाइकांना खोटे सांगून त्यांना फसवून त्यांच्याकडून पैसे उकळले आहेत. तुमच्या घरी एवढे सोने होते तरी तुम्ही भिकाऱ्यासारखे परक्यांसमोर तोंड वेंगाडायला गेलात. म्हणून तुम्हांला दोघांना

फाशीची किंवा दुसरी एखादी कडक शिक्षा द्यावी असा माझा विचार होता. परंतु मी तुम्हांला निराळ्याच तऱ्हेची शिक्षा देणार आहे. सोन्याच्या दोन्ही थैल्या तुमच्या गळ्यात अडकवून मी तुमची धिंड काढणार आहे."

हसन व फातिमा दोघांना वाटले की ही शिक्षा काय मजेत भोगता येईल. राजाच्या शिपायांनी एकेक सोन्याची थैली दोघांच्या गळ्यात बांधली. थैलीचे वजन इतके होते की दोघांच्या माना दुखू लागल्या व घरी पोचेपर्यंत मान मोडून जाते काय असे झाले त्यांना.

दोघांना घरी पाठवून देऊन खलीफाने त्या दोघांकडून कोणी सोने विकत घेऊ नये व धान्य आणि इतर खाण्यापिण्याचे पदार्थ त्यांना विकू नये असा सक्त हुकूम काढला. त्यांच्यावर सतत पाहारा ठेवण्यासाठी चार शिपाई नेमले.

हसन व फातिमा दुकानात सोने घेऊन जात पण कोणी त्यांच्याकडून सोने घेईना व त्यांना काही विकेना. शेवटी दोघांना रस्त्यात पडलेल्या केळ्याच्या व फळांच्या साली खाऊन स्वतःचे पोट भरावे लागले.

अशातऱ्हेने नरकयातना दोन दिवस भोगल्यानंतर तिसऱ्या दिवशी दोघांनी खलीफांच्या पायांवर लोटांगण घालून विनंती केली—"हुजूर, हे सारें सोने ठेवून घ्यावे, याने माझे पोट भरणार नाही आम्हांला दोघांना अन्नवस्त्र मिळाले की पुरे, आणखी काही नको."

"तुम्ही दोघं जाऊन दुकानदारांकडून जे फुकटाचे धान्य विकत घेतलं होतं त्याचे पैसे देऊन टाका. त्यासाठी एक थैली सोने खर्च झाले तरी चालेल." खलीफाने आज्ञा केली.

त्यानंतर खलीफाने दोघांना राहण्यासाठी चांगले घर देवविले आणि हसनला पुन्हा नोकरीवर ठेवून घेतले.





# पडकें देऊळ

[२३]

[शिखीमुखने जांगलाला एका खेचराच्या लगामाला बांधून पुढे पुढे चलायला सांगितले. दुपारच्या सुमारास ते एका नदी काठी येऊन पोचले. तेथे एका चित्त्याने त्याच्या अंगावर उडी मारली. चित्त्याबरोबर जांगला मगरी व सुसरी यांनी भरलेल्या नदीत पडला. त्याच वेळी नदीच्या पलीकडल्या काठावरून बाणांचा वर्षाव सुरू झाला. पुढे—]

पलीकडच्या काठावरून एकाएकी बाणांचा वर्षाव होऊ लागलेला पाहून शिखीमुखने चकित होऊन विक्रमला सावध केले. त्याला एका गोष्टीची शंका आली, बाण सोडणारे लोक जांगलाचे मित्र तर नसतील? आणि हे मित्र पुजाऱ्याच्या टोळीतल्या लोकां-शिवाय आणखी कोण असणार? त्यांनीच आपल्याला पकडण्यासाठी हे जाळे टाकले नसेल कशावरून?

"विक्रम! मला वाटते, आपण नदी-काठापासून थोडे मागे जाणे बरं होईल. नदीपलीकडून बाण सोडणारे त्या पुजाऱ्याच्या टोळीतलेच आहेत, मला तरी शंका नाही. त्यांचे बाण आपल्या पर्यंत नक्कीच पोचू शकतील." शिखीमुख म्हणाला.

शिखीमुखने सावध केल्याबरोबर विक्रम-केसरी, अजित आणि वीरभद्र नदीच्या काठा पासून दूर मागे सरकले.



नदीचा ओघ इतका जोराचा होता की चित्ता व जांगला दोघे आपोआप परस्परांची सुटका झाल्यासारखे निरनिराळे वाहू लागले. जांगला पोहोत पलीकडच्या काठावर जाण्याचा प्रयत्न करू लागला. चित्ता गटांगळ्या खात पाण्याच्या ओघाबरोबर वाहात जाऊ लागला. बाणाच्या वर्षावाला भिऊन मगरी व सुसरी पळू लागल्या. त्या गडबडीत एक उंच व दणकट अंगकाठीचा मनुष्य एक होडकं घेऊन आला आणि त्याने ते नदीत सोडले. त्याच्या पाठी-मागून दोघे धावत पुढे आले आणि होडक्यात बसून जांगला होता त्या बाजूला होडके वल्हवीत निघाले. होडके ओढून आणणाऱ्या माणसाला शिखीमुखने ओळखले. त्याने विक्रमकेसरीला खुणावून विचारले–"तो कोण, हे ओळखले नाहीस का? तो नागगिधाड आहे–पुजाऱ्याचा नोकर. तू बरोबर नेम धरून त्याला बाटेला लाव."

विक्रमकेसरी धनुष्य बाण घेऊन नेम धरू लागला. तेवढ्यात नागगिधाड एक ढाल उचलून तिच्या आडून शिखीमुखकडे पहात म्हणाला–"ओ......हो......! कोण, शिखीमुख वाटते? शबरनायक जिवाजीचा पोरगा! अरे, कोठे शबरांची वस्ती आणि कोठे ब्रह्मपुत्र नदीचे खोरे! मरायचेच होते तर इतके दूर येण्याची गरजच काय होती? मरणासाठी फुकटाची धडपड कशाला एवढी."

नागगिधाड बोलतच होता आणि तेवढ्यात विक्रमकेसरीचा बाण येऊन त्याच्या ढालीवर आदळला आणि जमिनीवर खाली पडला. त्याच्या हबक्याने नागगिधाड पण खाली पडला. पण पडता पडता म्हणाला–"अरे, मी बोलतो आहे ते तुम्हांला ऐकू येत नाही का? ही ढाल म्हणजे अगदीच सामान्य वाटली का तुम्हांला? मंतरलेली आहे ही, पुजारी धन्याने, हिच्या मीच काय, आणखी आठ दोघे सुरक्षित उभे राहू शकतील, लक्षात ठेवा!"



विक्रमकेसरी आणखी एक बाण सोडणार तितक्यात पडक्या देवळाचा पुजारी नाग-गिधाडाजवळ आला.

पुजाऱ्याला पाहताच शिखीमुख विक्रमला म्हणाला–"विक्रम! अरे तो पहा, पुजारी! तू त्याला लोळव, आम्ही इतरांना पाहून घेतो."

लगेच शिखीमुख, अजित व वीरभद्र तिघांनी धनुष्य बाण घेतले. सर्व गुडघे टेकून बाण सोडायच्या तयारीत होते. त्यांना पाहून पुजारी चार पावले मागे सरकला व म्हणाला–"अरे, मूर्ख हो! तुमचे बाण येथवर येतील असे वाटले होय तुम्हांला? चालू द्या, तुम्हांला काय वाटेल ते करा."

नंतर त्याच्या बरोबर आलेल्या काही रानटी लुटेऱ्यांना त्याने बाण सोडायला सांगितले. शिखीमुख व त्याच्या साथीदारांनी या काठावरून आणि लुटेऱ्यांनी त्या काठावरून बाणांचा मारा सुरू केला. परंतु दोन्ही बाजूचे बाण नदीत पडत होते. थोडा वेळ बाण पाण्यापलीकडे जात नाहीत



हे दोघांच्या लक्षात आल्यावर दोघांनी बाणांचा मारा बंद केला.

शिखीमुख आपल्या अनुयायांना बाण सोडायचे थांबवायला सांगून म्हणाला–"आपल्याला वाटले होते तसा पुजारी आपला पाठलाग करतो आहे. तो आपल्या आधी नदी पलीकडे गेला आहे. याचा अर्थ असा की आपल्या आधी गोलभरा गावाला जाऊन पडक्या देवळासंबंधीची बरीचशी माहिती त्याला मिळाली असावी."

"असेच वाटू लागलं आहे. वस्ताद आहे खरा. लबाडाने जांगलाला वाटाड्या म्हणून आपल्याबरोबर पाठविले आणि



आपल्याकडची माहिती मिळवून पुढे गेला." विक्रमकेसरी म्हणाला.

"आता पडक्या देवळापर्यंत आधी कोण पोचतो हाच मुख्य प्रश्न आहे. गोलभरा गावात पडक्या देवळाविषयी माहिती मिळविता येईल. परंतु तोच आधी पोचला. आता पडक्या देवळाजवळ पोचण्यापूर्वी त्याला यमसदनास पाठविले पाहिजे म्हणजे झाले. तेवढे मात्र झालेच पाहिजे." शिखीमुख म्हणाला.

नदीपलीकडे पुजारी व त्याचे अनुयायी आणि नदीच्या या काठावर शिखीमुख व त्याचे अनुयायी परस्परांकडे रागाने डोळे वटारून पहात उभे होते. आपल्या जागेवर उभे राहून कोणी आपल्या शत्रूचे नुकसान कोणत्याही प्रकारे करणे शक्य नाही हे दोघांनाही पक्के समजले होते. शिखीमुख काही वेळ विचार करून म्हणाला–"विक्रम! आपल्याला जांगला म्हणाला होता तसे खोऱ्याच्या वरच्या बाजूला जाऊन, थोडासा वळसा पडला तरी चालेल, आपण गोलभरा गावाला पोचू. दुसरा उपायच दिसत नाही. मगरीसुसरींनी भरलेली नदी पार करून जाणे धोक्याचे आहे व शत्रू पलीकडे लपून बसला आहे."

शिखीमुखने सुचविल्याप्रमाणे सर्व पुढे निघण्याच्या तयारीला लागले. आपले सर्व सामान खेचरांच्या पाठीवर टाकून ते नदीच्या काठाकाठाने निघाले आणि सूर्यास्ताच्या सुमारास खोऱ्याच्या टोकाला पोचले. तेथे त्यांना डोंगराच्या पायथ्या जवळ एक अरुंद पाऊलवाट दिसली.

विक्रम व शिखीमुख दोघांनी परस्पर विचार करून ठरविले की या रात्रीच्या काळोखात त्या वाटेने जाण्यात धोका आहे. पुजाऱ्याचे अनुयायी झाडकाआड लपून बसले नसतील कशावरून? अचानक त्यांनी छापा मारला तर त्यांना तोंड देणे आपल्याला जड जाईल.



दोन प्रहर रात्र होईपर्यंत त्यांनी खाऊन पिऊन घेतले. त्यांनी शेकोटी वगैरे पेटवून ठेवली नाही. कारण त्यांनी विचार केला की शेकोटीचा उजेड पाहून आपण कोठे आहो हे शत्रूला कळेल. परंतु त्यांनी एका ऐवजी दोघांनी पाहारा देण्याचे ठरविले.

मध्य रात्र उलटून जाईपर्यंत जंगली जनावरांचे ओरडणे ऐकू येत होते, परंतु माणसांची हालचाल कोठे नजरेस आली नाही. त्यानंतर नदीच्या बाजूने विचित्र आवाज ऐकू येऊ लागले. अजित व वीरभद्र पाहारा देत होते. त्यांना वाटले, मगरी सुसरींची आपसातली लढाई असेल व तोच आवाज असेल. परंतु हळूहळू तो आवाज जवळ येऊ लागला. म्हणून अजित व वीरभद्र तलवारी उपसून नदीच्या बाजूला गेले.

काळोखातच मधून मधून चांदण्याच्या उजेडात त्यांना माणसांची हालचाल दिसली. होडक्यात शत्रू नदी ओलांडून येत असल्याचा भास झाला. मधून मधून हळूच पाण्यात वल्हवण्याचा आवाज पण ऐकू येत होता. नकळत नदी पार करून जाण्याचा शत्रूचा बेत असावा.



अजित व वीरभद्र दोघांना धोका वाढत असल्याची स्पष्ट चिन्हे दिसू लागली. म्हणून विक्रम व शिखी दोघांना सावध करण्यासाठी दोघे मागे पळत निघाले. इतक्यात त्यांच्यावर कोणी तरी जाळे फेकले. जाळ्यातून स्वतःची सुटका करून घेण्याच्या प्रयत्नात ते जाळ्यात जास्त जास्त अडकत होते. हरणांना पकडण्यासाठी तसली जाळी रानटी लोक वापरतात हे दोघांना माहीत होते.

अजित आणि वीरभद्र त्या स्थितीत जाळ्यात तडफडत ओरडून आपल्या मालकांना सावध करण्याच्या विचारात



होते. परंतु तेवढ्यात कोणी तरी त्यांचा गळा दाबला व त्यांना ओरडून सांगणे अशक्य झाले.

"ओरडण्याचा प्रयत्न फुकट आहे. तुमच्या दोघां धन्यांना आम्ही या आधीच धरून बांधून ठेवले आहे." एक आवाज त्यांना ऐकू आला. इतक्यात आणखी दोघे रानटी लोक त्यांच्या जवळ येऊन पोचले.

अजित व वीरभद्रला, त्यांना धरणाऱ्या लोकांच्या अंगात हत्तीच्या कातड्याचे कपडे दिसले. याचा अर्थ हे लोक पडक्या देवळाच्या पुजाऱ्याचे अनुयायी नसावेत. नंतर ते रानटी लोक म्हणाले तसे त्यांनी शिखीमुखला व विक्रमला कैद केले असेल का? ही गोष्ट खरी असू शकेल का? त्यांना ते सर्व विचित्रच वाटले.

इतक्यात त्यांना शिखीमुख व विक्रम उतरले होते त्या बाजूने कुत्र्याच्या भुंकण्याचा आवाज आणि आणखी काही लोकांच्या ओरडण्याचा आवाज ऐकू आला. त्यामुळे त्यांच्या मनातली शंका वाढली. थोडा वेळ त्या बाजूने आवाज ऐकू येत होता. त्यानंतर सर्व शांत झाले. तोपर्यंत त्या आवाजाच्या बाजूला पहात उभा असलेला रानटी लोकांचा नायक म्हणाला—"या दोघांना पण घेऊन या तिकडेच." असे सांगून तो शिखीमुख व विक्रम होते त्या बाजूला निघून गेला.

रानटी लोक अजित व वीरभद्र दोघांना, जाळ्यासकट एका लांब काठीला बांधून जाळ्यात पकडलेल्या हरणाला खांद्यावर उचलून घेऊन जातात तसे उचलून घेऊन शिखीमुख व विक्रमचे दोन्ही हात बांधून काही रानटी लोक उभे होते तेथे आले. कुत्रे पण जाळ्यात सापडले होते.

"त्या दोघांना पण बाहेर काढून दोघांचे हात बांधून ठेवा. कुत्रे राहू द्या जाळ्यात आणि जाळ्यासकट त्याला काठीच्या टोकाला टांगून घेऊन चला. सर्व सावध रहा. त्या कुत्र्याने आतापर्यंत दोघांचा जीव घेतला आहे." रानटी लोकांचा नायक म्हणाला.

"मालक! या खेचरांना घेऊन यायचे की सोडून द्यायचे?" एका रानटी माणसाने आपल्या नायकाला विचारले.

"त्यांना धरून घेऊन जाऊ या! आपल्या वस्तीच्या नायकाला नजराणा म्हणून देऊ या. या प्रदेशात या जातीची कोठे म्हणून चला घेऊन?" रानटी लोकांचा नायक म्हणाला.

शिखीमुख त्यांचे बोलणे शांतपणे ऐकत होता. पण एकाएकी मोठ्या आवाजात म्हणाला—"तुम्ही कोण हे नाही आम्हांला माहीत. आम्ही आपल्या महाराजांचा शोध काढीत येथवर आलो आहो. तुम्ही एकाएकी चोरांसारखा छापा मारून आम्हांला कैद केलेत. याचे फळ तुम्हांला भोगावे लागेल. बजावून ठेवतो."

"अरे! या सर्व धमक्या तू आमच्या वस्तीच्या नायकासमोर गेल्यावर दे. काली मातेसमोर तुम्हांला बळी देण्यासाठी आम्ही धरून घेऊन जात आहो तुम्हांला. बळी देण्यापूर्वी तुम्हांला जे बोलायचे असेल ते



बोलायला संधी मिळेल." ते सांगताना नायक मोठ्याने हसला.

"आमचे महोद्भाग्य की आम्हांला तुम्ही कोठे जात आहां हे आधीच कळले. तुम्ही व तुमची कामे किती भयंकर असतात हे देखील आम्हांला कळले. आम्ही दस्यु जातीचे लोक आहो. आता तुम्ही मुकाट्याने आमच्या मागून या." असे सांगून दस्यु जातीच्या नायकाने आपल्या अनुयायांना जास्त सावधगिरी बाळगायला बजावून सांगितले.

सर्व नदीकाठी आले. तेथे पुष्कळ होडकी तयार असलेली दिसली. सर्व नदी पार



करून सूर्योदयाच्या सुमारास गोलभरा गावाला येऊन पोचले. इम्यु जातीचे गावकरी पुरुष, बायका व मुले गल्ल्यांतून उभे राहून शिखीमुख व त्याच्या अनुयायांकडे चकित होऊन पाहू लागले. गावाच्या मधोमध एक गोल झोपडी होती. तेथे पोचल्यावर नायकाने आपल्या अनुयायांना बाहेर थांबायला सांगितले व शिखीमुख व त्याच्या अनुयायांना बरोबर घेऊन झोपडीत गेला.

झोपडीत एका उच्च आसनावर इम्यु जातीचा कुलप्रमुख बसला होता. तो पुष्कळ म्हातारा होता. त्याचे कपाळ उंच होते, मोठमोठे डोळे व लांब मिशा होत्या. त्याचे रूप एकंदरीत भयंकरच होते. त्याच्या पाठीमागे इम्यु जातीचा मांत्रिक उभा होता. खाली एका तिवईवर पडक्या देवळाचा पुजारी बसला होता.

"तो पुजारी कुत्रा येथे आहे, आश्चर्य आहे!" शिखीमुख चकित होऊन म्हणाला.

"तुम्हांला शिथिलेश्वरी समोर बळी देण्यासाठी धरून आणले आहे. म्हणून मी येथे आलो आहे." पुजारी दात ओठ चावून म्हणाला.

"पहिल्याने कालीमातेसमोर यांना बळी देऊन टाकू या. त्यानंतर त्या उष्ट्या प्रसादाचे तुला काय वाटेल ते कर. समजले!" असे सांगून इम्यु जातीच्या मांत्रिकाने एकदा क्रुद्ध नजरेने पुजाऱ्याकडे पाहिले.

"शांति! शांति!" असे म्हणत कुलप्रमुखाने त्याला गप्प राहायला सांगितले. नंतर आपली करडी नजर शिखीमुख व त्याच्या अनुयायांकडे वळवून त्यांना विचारू लागला—"तुम्हांला सर्वांना देवीसमोर बळी देण्याची इच्छा माझ्या मनात मुळीच नाही. तुमचा नायक कोण आहे हे तुम्ही प्रथम सांगा. मी त्यालाच बळी देईन. बाकी सर्वांना सोडायला मी तयार आहे."

(पुढील गोष्ट पुढील अंकी)





# पादत्राणांचा प्रताप

विक्रमादित्याने हट्ट सोडला नाही. तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि स्मशानाच्या दिशेने नेहमीप्रमाणे मौनपणे चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा! तुझ्यात साहस आहे त्याचा शतांश जरी रविपूरचा युवराज कुमारवर्मा याच्या अंगात असता तर त्याला त्याच्या लग्नाच्या बाबतीत एका चांभाराशी चढाओढ करण्याची गरज पडली नसती. मी त्याची गोष्ट सांगतो, लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

रविपूरचा राजा भास्करवर्मा याला कुमारवर्मा नावाचा एकुलता एक मुलगा होता. तो दिसायला सुंदर होता व हुशारपण होता. सर्व विद्या व शास्त्रात तो पारंगत होता. परंतु स्वभावाने थोडा भितरा होता. थट्टे थट्टेतच कोणाशी खड्ग-



युद्ध, गदायुद्ध अगर मल्लयुद्ध करण्याचा प्रसंग आला की त्याचे सर्वांग थरथर कापू लागे.

भास्करवर्मा स्वत: शूर व पराक्रमी होता व त्याचे सर्व पूर्वज शूर व साहसी म्हणून प्रसिद्ध होते. म्हणून आपला मुलगा भित्रा आहे हे जेव्हां राजाला कळले तेव्हां त्याला फार वाईट वाटले. निर-निराळ्या राजकन्यांच्या स्वयंवरासाठी भास्करवर्माकडे निमंत्रणे येत. युवराजाने त्या स्वयंवराच्यावेळी हजर राहून शस्त्रा-स्त्रांच्या स्पर्धेत त्याने भाग घ्यावा असे राजाला वाटे. कुमारवर्मा बापाच्या आग्रहाने या स्पर्धांच्यावेळी हजर राही. परंतु त्यांत भाग घेत नसे.

त्याच सुमारास भद्रदेशाच्या राजाने आपली मुलगी भद्रावती हिचे स्वयंवर रचले. त्याने शस्त्रास्त्र विद्येच्या स्पर्धा ठेवून त्यांत प्राविण्य दाखविणारास आपली मुलगी देण्याचे जाहीर केले होते.

भास्करवर्माने आपल्या मुलाला या स्वयंवराला पाठविले. जाताना त्याने त्याला बजावून सांगितले की राजकन्येला जिंकल्या-शिवाय परत येता कामा नये. स्पर्धेत भाग घेतल्याने जिवावर प्रसंग आला तरी हरकत नाही. माझ्यामुलाला वीरगती मिळाली असे मानून मी मनाचे समाधान करून घेईन.

बाप म्हणाला ते ऐकून कुमारवर्मा दु:खी झाला. या अपमानापेक्षा मरण बरे असे त्याला वाटले व तो तसा निश्चय करून भद्र देशाच्या राजधानीकडे निघाला.

भद्रदेशाला पोचल्यावर अनेक देशांचे राजकुमार स्वयंवराला आले असल्याचे कुमारवर्माला कळले. द्वंद्वयुद्धात कोण कोण जिंकणार व कोण कोण मरणार याची चर्चा सुरू होती. त्याला हे कळेना की हे सर्व स्वयंवराला आलेच कशाला? हे स्वयंवर नव्हे, युद्धच आहे. कित्येक राजकुमारांचा बळी घेणारी ही राजकन्या नसून दुर्गा चंडीच आहे. हिच्याशी लग्न करणारास सुख ते काय मिळणार?

त्या दिवशी संध्याकाळी कुमारवर्मा नदी काठी काही तरी निश्चय करून गेला. अशा राजकन्येशी लग्न न करण्याचेच त्याने ठरविले. आपण स्पर्धेत भाग घेतला व आपल्या हाती काही अशक्त व दुर्बळ राजकुमारांचा वध झाला तर त्याचे पाप आपल्या माथी येईल. त्यानंतर आपल्याहून शूर अशा राजकुमाराच्या हाती आपले मरण निश्चित आहे. यापेक्षा आपण आत्महत्या करून घेतली तर इतर कोणाचा वध आपल्या हातून न घडल्याचे समाधान तरी मनाला राहील. असा विचार करून त्याने नदीत उडी मारली. थोड्या अंतरावर एका चांभाराने नदीत वाहात येणाऱ्या राजकुमाराला पाहिले व नदीत उडी मारून त्याने राजकुमाराला काठावर ओढून आणले आणि विचारले—"तू राजघराण्यातला कोणीतरी राजपुरुष दिसतो आहेस, नदीत कसा काय पडलास?"

"मी पाय घसरून नदीत पडलो नव्हतो. मीच नदीत उडी मारली. मला जिवाचा कंटाळा आला आहे. मला तू



वांचविलेस याबद्दल मी तुला काही इनाम किंवा बक्षिस देईन असे तुला वाटले असावे. पण तू मला माझ्या इच्छेविरुद्ध वांचविलेस याचा मला रागच आला आहे."

चांभार हुशार होता. त्याने राज-कुमाराला धीर देऊन जगाचा एवढा वाईट येण्याचे कारण विचारून घेतले आणि म्हणाला—"एवढ्या लहानशी गोष्टीसाठी तू आपल्या जिवाचे बरेवाईट करायला निघालास? माझ्याजवळ जादूची पादत्राणे आहेत. तू ती पादत्राणे घालून गेलास तर तुझ्या अंगात हजार हत्तींचे बळ आणि हजार सिंहांचे साहस येईल. सर्व स्पर्धक



फक्त तुझ्याकडे पाहूनच पळून जातील' तुझ्या कडून मला काही तरी इनाम मिळेल ही अपेक्षा ठेवूनच मी ही मदत करीत आहे. हे बक्षिस तू आज देऊ नकोस, उद्या राजकुमारी वरमाळा घालायला येईल त्यावेळी दे."

"तुला कोणत्या इनामाची अपेक्षा आहे?" कुमारवर्माने त्याला विचारले.

"मी मागेन ती वस्तू मला दे. तुझी स्वतःची अशीच वस्तू मी तुझ्याजवळ मागेन." चांभार म्हणाला. त्यानंतर चांभाराने आपल्या पिशवीतून एक पादत्राणाचा जोडा काढून दिला. "दुसऱ्यादिवशी स्वयंवर समयी स्पर्धांच्या वेळी येऊन भेटतो," असे सांगून चांभार निघून गेला.

चांभाराने दिलेली पादत्राणे घातल्यानंतर कुमारवर्माने विचार केला की आपण स्वतः जीव दिला तरी देवाने आपल्याला वांचविले. याचा अर्थ दैवच आपल्या पाठीशी आहे. आपण नदीत बुडून मेलो असतो तर त्यात वडिलांचा अपमानच झाला असता. त्यांनी तरी माझे वाईट इच्छिले नव्हते. मी स्पर्धेत जिंकावे व एका सुंदर राजकन्येशी विवाह व्हावा, हीच त्यांची इच्छा होती. या प्रयत्नात द्वंद्वयुद्ध करीत असतां मरण आले असते तर त्याचे दुःख बाबांना वाटले नसते. या उलट मी बुडून मेल्याचे ऐकून त्यांना फार दुःख झाले असते. म्हणून त्याने निश्चय केला की आपण दुसऱ्याचा जीव घ्यायचा नाही व दुसऱ्याशी युद्ध करीत असतां मरण आले तर ते आनंदाने स्वीकारावयाचे.

दुसऱ्या दिवशी कुमारवर्मा स्वयंवरात भाग घेण्यासाठी निघाला. जिवावर उदार होऊन युद्ध केल्यामुळे प्रत्येक स्पर्धेत तो विजयी होत गेला. स्पर्धक राजकुमार द्वंद्वयुद्धात स्वतःची हार मानून बाजूला होत गेले. प्रत्येक विजयाबरोबर साहस व उत्साह वाढत गेला. कुमारवर्माला सर्व शस्त्रास्त्रविद्येत प्राविण्य प्राप्त होते तसे इतर राजकुमारांस नव्हते. म्हणून सर्व एका मागून एक हार मानून बाजूला सरकले. सूर्यास्ताच्या सुमारास सर्व राजकुमारांवर विजय मिळवून तोच सर्व शस्त्रास्त्रविद्येत समर्थ असल्याचे सिद्ध झाले.

राजकन्या वरमाळा घेऊन समोर आली. आपल्या होणाऱ्या पतीचे शौर्य व पराक्रम पाहून ती थक्कच झाली होती. त्याचे सौंदर्य पाहून तिने मनातल्या मनात देवाचे आभार मानले.



राजकन्या कुमारवर्माच्या गळयात वरमाळा घालणार एवढयात गर्दी बाजूला सारीत चांभार समोर आला व कुमारवर्माला म्हणाला—"वरमाळा गळयात पडण्यापूर्वी मला दिलेले वचन पुरे करावे राजकुमार!"

कुमारवर्माने कृतज्ञतापूर्वक त्याला 'काय वाटेल ते मागून घे' असे म्हटले.

"राजकुमारीला सांगा की ही वरमाळा तिने माझ्या गळयात घालावी. आपण तिला जिंकले आहे. ती आपली स्वतःची वस्तू झाली आहे."

ते उत्तर ऐकून कुमारवर्माचा चेहरा एकदम उतरला आणि राजकुमारी किंकर्तव्यविमूढ होऊन कुमारवर्माकडे व इतर लोकांकडे पाहू लागली. जवळ उभे असलेले लोक चांभाराला मारायला धावले. पण कुमारवर्माने त्याचे रक्षण केले.

भद्रावतीच्या वडिलांनी पुढे येऊन विचारले—"ही काय भानगड आहे?"

कुमारवर्माने, नदीत त्याने उडी कां टाकली व चांभाराने त्याला कसे वांचविले वगैरे वृत्त, घडले तसे सांगितले.

सर्व ऐकून घेऊन राजा मोठयाने हंसला व चांभाराला म्हणाला—"लबाडा! लक्षात ठेव, तू एक क्षणभर देखील येथे उभा राहलास तर तुझी चामडी लोळवीन आणि

तुझ्या अंगाच्या ठिकऱ्या काढून कुत्र्यामांजरांना खायला घालीन."

"सरकार! मला मी दिलेली पादत्राणे परत द्यावी." असे सांगून चांभाराने कुमारवर्माच्या पायातला पादत्राणांचा जोड काढून घेतला आणि निघून गेला.

त्यानंतर भद्रावती व कुमारवर्मा यांचे लग्न थाटामाटाने पार पडले. भास्करवर्मा त्याच्या मुलाने स्पर्धा जिंकून स्वयंवरात विजय मिळविल्या बद्दल खूष झाला.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला— "राजा! भद्रपुरच्या राजाने त्या चांभारावर असा अन्याय कां केला? कुमारवर्मा प्रत्येक स्पर्धेत यशस्वी झाला हा त्याने दिलेल्या पादत्राणांचाच प्रताप नव्हता का? तो चांभार तरी त्या अन्यायासमोर आपली मान वाकवून काही बोलल्याशिवाय निघून कसा काय गेला? या प्रश्नांची उत्तरे माहीत असून तू दिली नाहीस तर त्याचा परिणाम तुला माहीत आहेच, तुझ्या डोक्याची शंभर छकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील."

विक्रमादित्य म्हणाला—"पादत्राणांचा प्रताप किंवा पराक्रम काहीच नाही. त्यांचाच प्रताप असता तर स्वत: चांभाराला सुद्धा शौर्य व साहस दाखवून स्वयंवरात जय मिळविता आला असता. भद्रदेशाच्या राजाने त्याला नकार दिला नसता. कुमारवर्माला त्या दिवशी जे यश मिळाले त्याचे मुख्य कारण त्याची त्या दिवसाची मन:स्थिती. तो आत्मविश्वासाने लढला नसता तर त्याला कदापि यश मिळाले नसते."

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेताबरोबर अदृश्य झाला व जाऊन झाडाच्या फांदीला लोंबकळू लागला.

(कल्पित)





# ❋ भावंडें ❋

## [ २ ]

कल्याणी व शाळिग्राम त्या फळीबरोबर वाहू लागले. शाळिग्राम शुद्धीवर आला तेव्हां आपल्या चारी बाजूला पाणीच पाणी असल्याचे त्याच्या लक्षात आले. त्याने कल्याणीच्या तोंडावर पाणी शिंपडून तिला शुद्धीवर आणले. कल्याणी घाबरून रडू लागली.

"रडू नकोस. देवाच्या कृपेने आपण बुडलो नाही." शाळिग्राम म्हणाला.

थोड्या वेळाने ती फळी आपोआप काठाला जाऊन लागली. दोघे काठावर आले. समोर एक झोपडी दिसली. ते निवाऱ्यासाठी झोपडीत गेले.

दोघांना जोराची भूक लागली होती.

झोपडीत काळोख होता. एक विचित्र रूप असलेली म्हातारी आत बसली होती. तिला शाळिग्रामने विचारले—"आजी, खायला आहे का काही? खूप भूक लागली आहे."

"मला ही खाट सोडून हिंडतां फिरतां येत नाही. ते कोपऱ्यात ताट आहे. त्यात आहे ते दोघं खाऊन घ्या. मला भूक नाही." म्हातारी म्हणाली.

ते दोघे त्या ताटाकडे जाऊ लागले तेव्हां अचानक त्यांच्या पाठीमागे छपरातून कोणी तरी टाकल्यासारखी एक तलवार येऊन पडली. "तुम्ही दोघे भाग्यवान दिसता. तुमच्या अंगावर तलवार पडली असती तर दोघे मेला असता." म्हातारी म्हणाली.

"अशी तलवार तुम्ही छपराला टांगून ठेवलीतच कशाला?" शाळिग्रामने विचारले.

"मी कशाला जाऊ टांगून ठेवायला? मी या खाटेला खिळले आहे. मला कोण

श्री म. ना. पाटील



सोडवतो, याची वाट पहात बसले आहे मी." म्हातारी म्हणाली.

"आजी! आम्ही ताटातले सर्व अन्न खाऊन टाकले. तुम्हांला काही उरविलं नाही." शाळिग्राम म्हणाला.

"हरकत नाही, पण तुम्ही लहानलहान मुलं आहां. मला कसे काय सोडवणार? मला हीच काळजी वाटते. तुम्ही थोडे मोठे असतां तर किती बरे झाले असते." म्हातारी म्हणाली.

"मी लहान असलो तरी मोठ्या माणसाची शक्ती माझ्या अंगात आहे, आजी!" शाळिग्राम म्हणाला.

"ती तलवार घेऊन माझे डोके छाटून टाकण्याची हिंमत आहे तुझ्या अंगात?" म्हातारीने विचारले.

"त्यात काय? मी करीन." शाळिग्राम म्हणाला.

"मुला! निदान माझ्या खातर तू हे काम कर. कोणी माझे डोके उडविले तरच माझी ही खाट सुटेल आणि येथे जे नगर अदृश्य झाले आहे ते दृष्टीस पडेल. माझे डोके उडविण्याची शक्ती तुझ्या अंगात असेल तर तू या नगराचा राजा होशील." ती म्हातारी म्हणाली.

"कल्याणीच्या मदतीने मी तुमचे डोके कापू शकेन, आजी!" शाळिग्राम म्हणाला.

शाळिग्रामने अनेक प्रकारे समजावून सांगितल्यावर कल्याणी त्या म्हातारीचे डोके कापण्यासाठी तलवार उचलायला तयार झाली. दोघांनी मिळून तलवार उचलली आणि म्हातारीच्या मानेवर टाकली. त्या क्षणी म्हातारीचे डोके जमिनीवर लोळू लागले. आणि चारी बाजूला गलबला ऐकू येऊ लागला. "महाराज की जय!" असा जयघोष त्यांना ऐकू आला. दोघांना तो जयघोष ऐकून व जिकडे पहावे तिकडे मोठे वाडे व इमारती



आणि त्यात राहणारे व रस्त्यावर हिंडणारे लोक पाहून आश्चर्य वाटले. ते ज्या झोपडीत होते ती झोपडी अदृश्य होऊन तेथे एक मोठा महाल झाला होता.

प्रजेने येऊन शाळिग्रामला आपला राजा व कल्याणीला आपली राणी मानून त्यांना आपल्या खांद्यावर उचलून घेऊन गेले. "तुम्ही दोघांनी आमचा उद्धार केला, आम्ही शापमुक्त झालो. तुम्हीच आमचे महाराज व महाराणी." लोक म्हणाले.

मोठ्या थाटामाटाने दोघांचा राज्याभिषेक झाला. ते दोघे अजून मुलेच होती, पण त्यांनी राज्यकारभार संभाळला.

आणखी पांच वर्षे लोटली. दोघांचे वय सतर होते. दोघांनी लग्न करून घेण्याचे ठरविले. ते ऐकून प्रजेला पण आनंद झाला. विवाह मुहूर्त ठरला.

विवाहापूर्वी काही दिवस कल्याणी शाळिग्रामला म्हणाली—"आमच्या विवाहाला मी आपल्या आईवडिलांना व बहिणींना निमंत्रण करावे, म्हणते."

"त्यांच्या बरोबर माझे भाऊ पण येतील. त्यांनी मला ठार करण्यासाठी निरनिराळे उपाय केले, तुला ते माहीत आहेत. तुझ्या बाबांनी आपल्याला नदीत फेकविले. त्याला कारणदेखील माझेच भाऊ." शाळिग्राम





म्हणाला. दूत कल्याणीच्या वडिलांकडे गेले आणि कल्याणीचा निरोप सांगून म्हणाले–“आमच्या महाराजांनी आपल्या विवाहप्रसंगी आपणां सर्वांना सकुटुंब सपरिवार येण्याची आग्रहाची विनंती केली आहे.”

“मी इतकी वर्षे राज्य करतो आहे, पण तुमच्या राज्याचे नाव कधी ऐकलं नाही. तुमच्या राजधानीचे नाव?” राजाने विचारले. आपल्याच मुलीचे लग्न असेल या गोष्टीची त्याला कल्पनादेखील नव्हती.

“आपल्याला आमच्या राजधानीची माहिती नसेल. कारण शापग्रस्त होऊन आमची राजधानी पाच वर्षांपूर्वीपर्यंत भूगर्भात पडून होती. सुमारे शंभर वर्षे झाली असे राज्य कोठे होते किंवा असेल हे देखील कोणाला माहीत नव्हते.” दूत म्हणाले.

“ठीक, तरमग आम्ही तुमची ती राजधानी पाहण्यास अवश्य येऊ.” असे सांगून कल्याणीच्या वडिलांनी प्रवासाची तयारी सुरू केली.

दूतांबरोबर कल्याणीचे बाबा, तिच्या तिघी बहिणी त्यांची मुलं व राजाचे तिघे जावई म्हणजे त्यांचेच तिघे भाऊ सर्वांचे शाळिग्रामने स्वागत केले. शाळिग्रामला कोणीच ओळखले नाही. कारण त्या पाच वर्षांच्या अवधीत तो आपल्या तिघा भावांहून उंच झाला होता. म्हातारीचे डोके त्याने ज्या तलवारीने उडविले होते ती तलवार सतत त्याच्या कमरेला असे.

कल्याणीच्या रूपरंगात बदल झाला होता. ती आपल्या तिघां बहिणींहून जास्त सुंदर दिसत होती. तिला कोणीच ओळखले नाही. ती आपल्या आईला व बहिणींना प्रेमाने भेटली, परंतु तिने स्वतःची ओळख दिली नाही, मनाला आवरून ठेवले.

लग्न प्रसंगी मोठी मेजवानी झाली. त्यावेळी शाळिग्राम आपल्या सासऱ्याच्या शेजारी बसून म्हणाला–“मी आपणांला सकुटुंब सपरिवार येण्याची विनंती केली होती. आपल्या कुटुंबातील सर्व हजर आहेत ना?”

राजाने एकदां सर्वांना पाहिले व म्हणाला–“होय, आम्ही सर्व हजर आहो!”

“मी ऐकलं होते की आपल्याला चार मुली आहेत. पण तिघीच दिसत आहेत आलेल्या?” शाळिग्रामने विचारले.

“होय, मला चार मुली होत्या. पण पाच वर्षांपूर्वी एक मुलगी देवाघरी गेली.” राजा म्हणाला.

“कशी काय?” कल्याणीने विचारले.

“पाण्यात बुडून!” राजा म्हणाला.

“तिच्या रक्षणार्थ कोणी पाहरेकरी नव्हते वाटते?” कल्याणीने विचारले.

“तो एक अपघात झाला. त्याच्या विषयी काही बोलणे माझ्या मनाला आवडत नाही.”

“अपघात! तर मग सांगा शकाल का तो कसा घडला?” कल्याणी म्हणाली.

राजाने खरे ते सांगितले आणि दुःखामुळे डोळे मिटून स्वस्थ बसून राहाला.

“म्हणजे तुम्ही त्या दोघांना पाण्यात बुडवून त्यांचा वध केलात. त्याबद्दल तुमच्या मनाला दुःख, पश्चात्ताप काहीच वाटला नाही का?” शाळिग्रामने विचारले.















"होय, मला फार वाईट वाटले व मी दुसऱ्याच दिवशी त्यांना शोधून आणण्यासाठी नाव पाठविली होती. परंतु माझ्या नोकरांना ती मुलं झोपली होती, फक्त ती फळीच मिळाली. बहुतेक ती दोघं पाण्यात बुडून मेली." राजा म्हणाला.

इतका वेळ कल्याणी स्वतःच्या मनाला आवरून बसली होती. पण त्यानंतर ती स्वतःला आवरू शकली नाही. ती काही बोलणार होती, पण शाळिग्रामने तिचा हात धरून तिला आणखी काही वेळ स्वतःला आवरून धरण्यास खूण केली. नंतर राजाला म्हणाला–"तुम्ही ती चूक केलीत त्याबद्दल तुम्हांला दुःख व पश्चात्ताप वाटणे साहाजिक आहे. कारण त्या मुलांची काही चूक नव्हती. कोणी त्यांना गुंगी येणारे औषध अन्नात कालवून दिलं होतं."

राजाने चकित होऊन विचारले–"पण हे सर्व तुम्हांला कसं काय कळले?"

"कारण आपण ज्या भिल्ल बालकाला पाण्यात फेकून द्यायला सांगितले होते तोच मी." शाळिग्राम म्हणाला.

"मीच आपली मुलगी कल्याणी! मला तुम्ही नाही का ओळखलं, बाबा?" असे म्हणत कल्याणी उठून उभी राहली.

त्याच वेळी शाळिग्रामच्या तिघा भावांचा हात तलवारीवर गेला.

"खोटे! आमचा भाऊ केव्हांच मेला!" तिघे म्हणाले.

"नाही, मी जिवंत आहे. मला ठार करण्यासाठी तुम्ही सिंहाच्या आवारात फेकले होते. आणखी काय काय केलेत कोण जाणे? पण मी मेलो नाही. ती गोष्ट विसरा. पण मी तुमचा भाऊ आहे, हे मी कधी आपल्या तोंडाने म्हणालो का? तुम्ही भिल्ल जातीचे आहा, हे आता तुम्हीच म्हणता आहां ही गोष्ट लपवून ठेवण्यासाठीच नाही का तुम्ही मला ठार करण्याचा प्रयत्न केला होता?" शाळिग्राम आपल्या भावांना म्हणाला.

ते ऐकताच राजाच्या तिघी मुली उभ्या राहून आपापल्या नवऱ्यांना म्हणाल्या–"म्हणजे! तुम्ही भिल्ल का?"

"खोटे! सपशेल खोटे!" असे म्हणत तिघे भाऊ आपापल्या तलवारी उपसून शाळिग्रामवर धावले. परंतु शाळिग्रामने आपल्या मोठ्या तलवारीच्या एकाच वाराने तिघांच्या तलवारी खाली पाडल्या आणि म्हणाला–"खरे कधी लपत नाही आणि आता ते लपविण्याचा प्रयत्न केलात तर परिणाम उलटाच होईल. आतां मी लहान कुकुलं-बाळ नाही. तुम्ही सर्वांनी जी चूक केलीत त्याबद्दल तुम्ही महाराजांच्या व आपापल्या पत्नीच्या पायां पडून त्यांची माफी मागा. तुम्ही सर्वांना फसविलेत."

कल्याणीच्या बहिणींनी परस्परांशी सल्ला करून शेवटी ठरविले की इतकी वर्षे ज्यांच्यावरोबर सुखाने संसार केला इतकी मुले झाली त्यांच्या बरोबरच पुढील आयुष्य घालविण्यात शहाणपण आहे. पण आपल्या धाकट्या भावाचा वध करण्यास ते कसे तयार झाले हे त्यांना कळले नाही. तो एक अक्षम्य अपराध वाटला त्यांना. त्यांच्या धाकट्या बहिणीचा वध करविण्यात त्यांच्या पतींचा हात आहे हे कळल्यावर त्यांना मनस्वी राग आला.

"मी व कल्याणी दोघं आपल्या भावांना क्षमा करतो आणि तुम्ही पण त्यांना क्षमा करावी अशी आमची विनंती आहे." शाळिग्राम म्हणाला.

शाळिग्रामच्या तिघां भावांनी त्याची, कल्याणीची, राजाची व राजकन्यांची क्षमा मागितली. न त्यानंतर शाळिग्राम व कल्याणी दोघांचा विवाह समारंभ थाटामाटाने पार पडला. त्यानंतर सर्वांचे पुढले दिवस सुखासमाधानाने गेले.



# विचित्र विजय

शिवदुर्गाच्या राजाने गमतीखातर एकदा आपल्या राज्याच्या पश्चिमेकडील हद्दीला लागून असलेल्या महेंद्रदुर्गावर स्वारी केली. ठीक त्याच वेळी शिवदुर्गाच्या पूर्वेकडील हद्दीला लागून असलेल्या विजयदुर्गाच्या राजाने शिवदुर्गावर स्वारी केली.

विजयदुर्गाच्या राजाने शिवदुर्गावर स्वारी केल्याची गोष्ट कळताच शिवदुर्ग राजधानीत खळबळ उडून गेली. कारण त्यावेळी शिवदुर्गाच्या रक्षणार्थ फौज नव्हती. एक सेवानिवृत्त वृद्ध सेनापती आणि तीनचार योद्धेच काय ते शिवदुर्गात होते. वृद्ध सेनापती शक्तिसिंह हा एक नावाजलेला शूर योद्धा होता. त्याने एक युक्ति योजली आणि किल्लयातल्या सर्व लोकांना आज्ञा केली–"किल्लयाचे फाटक उघडा. त्यापूर्वी तोरण बांधा आणि चौघडे व वाजंत्री वाजवा." नंतर त्याने उत्तम पोशाख केला. अंगावर शाल टाकून किल्लयाच्या फाटकाबाहेर आऊन उभा राहला. त्याच्या बाजूला किल्लयातले दोघे योद्धे येऊन उभे राहले.

शत्रूसैन्य समोर येताच शक्तिसिंहाने सिंहगर्जना केली–"विजयदुर्गाच्या महाराजांचा जयजयकार असो! महाराजांचे स्वागत!" त्याच्या बरोबर इतर योद्धांनी पण जयघोष केला.

विजयदुर्गाच्या महाराजांनी आपला रथ थांबविला. त्याच्या पाठीमागे त्याचे सैन्य पण उभे राहले. राजा म्हणाला–"लबाडा! तुला ओळखतो आम्ही! तू मुरलेला बस्ताद आहेस! किल्लयात आम्ही प्रवेश केल्यावर आमच्यावर एकदम हल्ला करुन आमची कत्तल उडविण्याचा तुझा बेत दिसतो आहे. पण तुझी लबाडी न समजण्या इतके आम्ही दुधखुळे नाही, लक्षात ठेव." असे सांगून राजाने आपला रथ मागे फिरविला आणि त्याच्या पाठोपाठ त्याचे सैन्य पण निघून गेले.





# हुशार मुलगी

एक राजा होता. त्याला बुद्धिबळे खेळायचा नाद होता. त्याच्या दरबारात बुद्धिबळाच्या खेळात पटाईत असे अनेक दरबारी होते. स्वत: राजा त्या खेळात पटाईत होता.

एकदा त्या राजाच्या दरबारात काही हुशार खेळाडू बुद्धिबळे खेळायला आले. ते राजाला म्हणाले–"महाराज! आजपर्यंत आम्ही या खेळात कधी हारलो नाही. आपल्या दरबारात बुद्धिबळे खेळणारे पटाईत खेळाडू आहेत हे ऐकून आलो आहो."

राजाने त्या हुशार खेळाडूंबरोबर खेळण्यास आपल्या दरबारी खेळाडूंस सांगून बुद्धिबळाचा डाव मांडविला.

नव्या आगंतुक खेळाडूंनी दरबारी खेळाडूंवर थोड्याच वेळात मात केली. त्यांनी डाव जिंकून अभिमानाने एकदा सर्व दरबाऱ्यांवर नजर फिरविली, जणु काही, कोणाला शंका असेल तर त्याने पुढे येऊन खेळावे. ते आव्हानच होते. त्यांच्या पैकी एकजण म्हणाला–"कोणी आमच्या बरोबर बुद्धिबळे खेळून आमचे अजिंक्यपद हिरावून घेण्यास तयार असेल तर त्याने पुढे यावे."

तेव्हां प्रेक्षकांमधून आठदहा वर्षांची एक मुलगी पुढे येऊन म्हणाली–"महाराज! या दोघांबरोबर बुद्धिबळे खेळण्यास मला आपली परवानगी असावी!"

आपल्या दरबारातल्या एकाहून एक पटाईत खेळाडूंना जिंकणाऱ्या खेळाडूंशी ही मुलगी काय खेळणार? असे राजाला वाटले. परंतु ते घमेंडखोर धंदेवाईक खेळाडू त्या मुलीच्या लहान वयाकडे दुर्लक्ष करुन म्हणाले–"ये मुली, आम्ही तुझ्या बरोबर बुद्धिबळे खेळायला तयार आहो."

त्यानंतर त्यामुलीने त्या दोघांना निर-निराळ्या दोन खोल्यात बसविले आणि

त्यांच्या समोर खेळाचा डाव मांडला. पहिल्याने पहिल्या खेळाडूला खेळायला सांगून दुसऱ्या खेळाडूकडे आपली मोहरी पुढे सारण्यासाठी गेली. आळी पाळीने दोघांच्या खोल्यांतून जाऊन तिने आपली मोहरी पुढे सरकविली व हळूहळू त्यांना शह देऊ लागली. दोघे पटाईत खेळाडू मुलीवर एका मिनिटात मात करण्याची स्वप्न पहात होते. पण मुलगी अशी चाल खेळे की आपण हारतो की काय अशी भीती दोघांना वाटू लागली. खेळ पुरा व्हायच्या आधीच दोघे राजाला म्हणाले—"या मुलीला जिंकणे आम्हांला शक्य नाही." राजाला आश्चर्यच वाटले. त्यामुलीचा बाप प्रेक्षक वर्गात बसलेला होता. राजाने त्याला जवळ बोलावून विचारले—"काय हो! तुमच्या मुलीला बुद्धिबळे चांगली खेळता येतात हे तुम्ही कधी या पूर्वी सांगितले नाही?"

"महाराज! दोनच दिवसांपूर्वी मी खेळ मांडून खेळायला बसलो असतां हिने माझ्या बुद्धिबळातली मोहरी कशी चालतात हे विचारले होते व माझ्याबरोबर खेळली होती." मुलीचा बाप म्हणाला.

त्यावर राजाने मुलीला जवळ बोलावून विचारले—"मुली! तू हा खेळ इतक्या लवकर कस ग शिकून घेतलीस?"

"महाराज! या दोघांनी परस्परांना हारविले आहे. मी एकाला पांढरी मोहरी व दुसऱ्याला काळी मोहरी दिली. पांढऱ्या मोहरी असलेल्याची चाल पाहून मी काळी मोहरी असलेल्याविरुद्ध ती चाल चालले. स्वतःच्या बुद्धीने मी काहीच खेळले नाही." मुलगी म्हणाली.

मुलीची ती हुशारी पाहून सर्व चकित झाले. राजाने त्या नवीन दोघां खेळाडू बरोबर त्या मुलीला पण उचित इनाम देऊन त्यांचा सत्कार केला.





# सिंदबादच्या सफरी

बगदाद येथे एक मोठा व्यापारी रहात असे. तो मोठा दानी होता. त्या व्यापाऱ्याला सिंदबाद नावाचा एक मुलगा होता.

सिंदबाद वयात आल्यावर काही दिवसांनी त्याचा बाप वारला. बापाची सर्व इस्टेट त्यालाच मिळाली. समवयस्क तरुण मंडळींच्या संगतीत त्याने पाण्यासारखा पैसा उडविला आणि थोड्याच दिवसात त्याची सर्व इस्टेट संपुष्टात आली. तेव्हां त्याचे डोळे उघडले. तरी त्याला एका गोष्टीचा फायदा झाला. त्याने निश्चय केला की बापाने जेवढी इस्टेट त्याच्या साठी ठेवली होती तेवढी तरी स्वतःच्या मेहनतीने मिळवायची.

त्याने जो थोडा जमीन जुमला उरला होता तो विकला व थोडे पैसे भांडवलासाठी उभे केले. त्या भांडवलाच्या आधारे त्याने निरनिराळ्या देशाशी संबंध जोडून व्यापार करण्याचे ठरविले. त्याने परदेशात व्यापार करण्यालायक माल घेतला आणि एका व्यापारी जहाजात तो माल घेऊन निघाला. ते जहाज नदीच्या काठाकाठाने बसऱ्याला जात होते. त्यात सिंदबादसारखेच दुसरे व्यापारी पण होते.

बसऱ्याहून समुद्राची सफर सुरु झाली. वाटेत अनेक बेटांवर ते जहाज थांबले. व्यापाऱ्यांनी पुष्कळसा माल प्रत्येक बंदरात उतरून विकला व तेथून नवा माल घेऊन पुढे निघाले. पुढे लागोपाठ काही दिवस जहाजातच समुद्रावर काढावे लागले.

बरेच दिवस सफर केल्यावर त्यांना एक हिरवेगार बेट दिसले. त्या बेटाच्या किनाऱ्याला जहाजाने नांगर टाकला व सर्व व्यापारी शिडी लावून उतरले. काही जणांनी तीन दगड मांडून चूल पेटविली व सैंपाकाला लागले. काही लोक कपडे धुवायला गेले.



काही लोक गप्पा गोष्टीत रंगले. सिंदबादने सैंपाक केला व काही वेळ हिंडून परत आला.

एकाएकी ते बेट हालू लागले. जे लोक उभे होते ते खाली पडले. ते घाबरून गेले एकाएकी जणुकाही भूकंप झाला. इतक्यात जहाजातला एक खलाशी मोठमोठ्याने ओरडून सांगू लागला—"आपण धोक्यात सांपडलो आहो. लवकर जहाजावर या. हे बेट नसून एक देवमासा आहे. चुली पेटवल्यावर विस्तवाचा ताप लागताच तो हालू लागला. केव्हां बुडी मारील सांगता येत नाही. लवकर चढा जहाजात."

ते ऐकून पुष्कळ व्यापारी त्या देवमाशाच्या पाठीवर उतरवलेले सामान होते तसेच टाकून स्वतःचा जीव वांचविण्यासाठी जहाजावर धावले. लगेच जहाजाच्या कप्तानाने नांगर काढून घेतला आणि आपले जहाज तेथून दूर घेऊन गेला. जे लोक वेळेवर जहाजावर पोचू शकले ते वांचले व कित्येक देवमाशाच्या पाठीवरच राहून गेले. त्यांत सिंदबाद एक होता. देवमाशाने बुडी मारल्याबरोबर सिंदबाद व त्याच्या बरोबरचे देवमाशाच्या पाठीवर राहिलेले लोक पाण्यात बुडले.

इतर लोकांचे काय झाले, कळले नाही. पण सिंदबाद मात्र वांचला. 'देवतारी त्याला कोण मारी?' त्याचे दैव बलवत्तर होते. त्याच्या हाताला ओणके वजा एक मोठे लाकडी भांडे लागले. त्यात व्यापाऱ्यांनी आपले कपडे धुतले होते. त्या लाकडी भांड्याच्या सहाय्याने तरंगत सिंदबाद ते भांडे वाहात जाईल तिकडे जात होता. त्याचे जहाज दूर निघून गेले होते. जहाजाचे शीड मात्र दिसत होते. म्हणून किती हात पाय मारले तरी जहाजापर्यंत पोचणे अशक्य होते. हळूहळू काळोख पडू लागला.

आपला जीव त्या संकटातून वाचेल असे सिंदबादला वाटत नव्हते. रात्रभर पाण्यात डुंबत राहून दुसऱ्या दिवशी चांगले उजाडल्यावर तो एका बेटाला लागला. ते बेट समुद्र काठी होते. परंतु डोंगराचा कडा कापून समुद्राने बेटाच्या काठाला जणुकाही एक भितच उभी केली होती. त्या डोंगरावरून खाली पाण्यापर्यंत काही रानटी वेल लोंबत होते. सिंदबादने अंगात होती नव्हती ती सर्व शक्ती एकवटून एक वेल धरला व त्या कड्याच्या टोकाला चढून वर गेला.

वर पोचल्यावर त्याला सर्व अंग दुखत असल्याचे कळले. माशांनी त्याच्या पायाचे लचके तोडून घेतले होते. म्हणून पाय फार दुखत होते. असह्य कळांमुळे तो बेशुद्ध होऊन जमिनीवर पडून राहिला. रात्रभर तो बेशुद्धावस्थेतच पडून होता. सकाळी उजाडल्यावर त्याची झोप मोडली तेव्हां त्याच्या तोंडावर सूर्याची कोवळी किरणे पडू लागली होती. त्याने उठून उभे राहण्याचा प्रयत्न करून पाहिला, पण उभेच राहता येईना. तोल जाऊन पुन्हा खाली पडला. पुन्हा एकदा स्वतःला संभाळीत धीर धरून तो रांगत रांगत एका सपाट जागेवर येऊन पोचला.

तेव्हां कोठे त्याला हायसे जिवातजीव आल्यासारखे वाटले. तेथे काही फळझाडे





त्याला दिसली. एका जागी स्वच्छ पाण्याचा झरा पण त्याला दिसला. त्याने हातपाय धुऊन घेतले आणि थोडे पाणी प्याल्यावर त्याला थोडी हुशारी वाटली. त्याने झाडाची फळे सहजी हाताला आली ती तोडून घेतली आणि आपली भूक भागविली. असेच काही दिवस राहल्यावर त्याच्या अंगाला लागलेल्या जखमा भरू लागल्या. दोन कुबड्या तयार करून घेऊन तो त्यांच्या मदतीने थोडा फार हिंडू फिरू लागला. काय पण आपले भाग्य? आपण कोठे येऊन पडलो आहो? पुन्हां स्वदेशी जाऊन] बायका मुलांना भेटू शकू की नाही असे निरनिराळे विचार त्याच्या मनात येत.

समुद्र काठी हिंडत असता एकाएकी त्याला एक घोडा दिसला. तो घोडा साधा घोडा दिसत नव्हता. सिंदबाद घोड्या-जवळ जाऊ लागला. तितक्यात झाडीतून एका मनुष्याने पुढे येऊन विचारले–"कोण रे तू? कोठून आलास? येथवर कसा आलास?"

"अहो, मी व माझे साथी बगदादहून एका जहाजात बसून निघालो होतो. एका जागी आम्ही देवमाशाच्या पाठीला बेट समजून त्यावर उतरलो. परंतु देवमासा बुडाल्यावर आम्ही सर्व बुडालो. नशिबाने मी एकटा वांचलो. माझे इतर साथी बुडून मेले की वांचले मला माहीत नाही. माझे नाव सिंदबाद." सिंदबाद म्हणाला.

तो मनुष्य सिंदबादला बरोबर घेऊन एका गुहेत गेला. तेथे एका घरात त्याने सिंदबादला बसायला एक उच्च आसन दिले आणि त्याला खायला प्यायला दिले.

पोट भरल्या नंतर सिंदबादने आपली जीवन कथा त्याला सांगितली. तो मन लावून ती ऐकू लागला. नंतर सिंदबादने त्याला तो कोण व त्या देशाचे नाव काय विचारले. त्याने ते सर्व आनंदाने सांगितले.

सिंदबाद एका बेटावर गेला होता. त्याचे स्वागत करणारा एक हुषार घोडेस्वार होता. त्याच्यासारखे घोडेस्वार त्या बेटावर पुष्कळ होते. ते सर्व मीरजान नावाच्या सुलतानाचे नोकर होते. दर अमावास्येला समुद्रातुन विचित्र घोडे समुद्र किनाऱ्याला लागत. त्या घोड्यांना पकडण्याचे काम हे घोडेस्वार करीत.

"बरं झालं, तुझी व माझी गाठ पडली, नाहीतर तुला अन्नपाण्याशिवाय उपाशी मरावं लागलं असतं. तू घोडे चोरून न्यायला आलेला कोणी परदेशी आहेस असे समजून आमच्या राजाचे नोकर तुला धरून घेऊन गेले असते." ते घोडेस्वार म्हणाला.

ते बोलत बसले होते तेथे आणखी काही घोडेस्वार काही वेळाने आले. नंतर सगळे मिळून सिंदबादला घेऊन आपल्या राजाकडे निघाले. ते सिंदबादला एका घोड्यावर बसवून घेऊन निघाले.

घोडेस्वारांनी मीरजान सुलतानाला सिंदबादचा वृत्तांत सांगितला. सुलतानाने त्याला आदरपूर्वक बोलावून सर्व प्रकारे त्याचे स्वागत केले. नंतर त्याने सिंदबादला आपला सर्व वृत्तांत सांगायला सांगितले





तो वृत्तांत ऐकून सुलतान म्हणाला–"सिंदबाद, तू खरोखरच फार नशीबवान दिसतोस. अल्लाने तुला फार मोठी उमर दिली आहे. नाहीतर इतक्या संकटांतून तू वांचला नसतास." असे सांगून सुलतानाने त्याला आपला खास हितैषी व सल्लागार म्हणून नेमले. बंदरांची देखरेख व जहाजाने परदेशांशी होणाऱ्या व्यापारावर नजर राखण्याची जबाबदारी सुलतानाने त्याच्यावर टाकली.

सिंदबादला हे काम तर फारच सोपे वाटले. त्याला पुष्कळ वेळ मिळत असे. म्हणून तो आपले काम संभाळून फावल्या वेळेत सुलतानाला आपल्या सफरीचा वृत्तांत व आपल्या देशातले लोक व त्यांच्या चालीरीतींचे वर्णन सांगत असे. सिंदबादला सुलतान आपला मित्र मानू लागला. त्याच्या सल्ल्याशिवाय सुलतान एक ही काम करीत नसे.

सिंदबादला तशी कोणत्याही वस्तूची उणीव नव्हती. आपण जगाच्या पाठीवर कोठे तरी स्वदेशापासून दूर आहो, एवढेच दुःख होते. त्याला नेहमी आपण स्वदेशी केव्हां कसे पोचू या गोष्टीची चिंता असे. बंदरात निरनिराळ्या देशांची जहाजे लागत जहाजांवरच्या खलाशांना तो विचारी, बगदाद शहर किती दूर व कोणत्या दिशेला आहे. परंतु त्याला कोणाकडून ही ठीक ठीक उत्तर मिळत नसे. कारण त्यांनी बगदाद शहराचे नाव देखील कधी ऐकले नव्हते. त्याच्या मनात स्वदेशी जाण्याची उत्सुकता वाढत गेली तसतशी यापुढे आपण कधी स्वदेशी पोचू शकणार नाही याबद्दल त्याला जास्त जास्त निराशापण वाटू लागली.

एकदा सिंदबाद बंदरात उभा राहून येणाऱ्या जहाजांची वाट पहात होता. एक मोठे जहाज बंदरात आले व नांगर टाकून उभे राहले. खलाशांनी दोरखंडांची शिडी खाली सोडली. तिच्यावर चढून सिंदबाद जहाजावर चढून गेला. खलाशाच्या मदतीने सिंदबादने जहाजावरच्या मालाची चांचणी घेतली. खलाशी एकेक करून माल दाखवीत त्याचे विशेष सांगू लागला. सिंदबादने मालाची यादी तयार केली.

मालाची यादी लिहून झाल्यावर सिंदबादने जहाजाच्या मालकाला विचारले–"सर्व मालाची यादी झाली का? काही माल राहला तर नाही?"

"आहे थोडा माल. पण तो उरलेला माल आमचा नाही. म्हणून मी तो माल जहाजाच्या तळघरात ठेवला आहे. त्या मालाचा मालक समुद्रात बुडून मेला. मी तो माल त्याच्या नातेवाइकांकडे पोंचविणार आहे. तो बगदादचा राहणारा होता." जहाजाचा मालक म्हणाला.

ते ऐकून सिंदबादला काय बोलावे व काय बोलू नये, सुचेना. तरी त्याने स्वतःला सावरून विचारले–"त्या बुडून मेलेल्या माणसाचे नाव तुम्हांला माहीत आहे का?"

"सिंदबाद!" मालक म्हणाला.

"अरे, फुटक्या नशिबाचा तो सिंदबाद मीच!" सिंदबाद म्हणाला.



त्यानंतर सिंदबादने त्यांचे जहाज देवमाशाच्या पाठीला बेट समजून त्याच्या काठाला कसे लागले व त्यानंतर त्यांच्यावर कोणकोणते प्रसंग ओढवले व तो देवाच्या कृपेने कसा वांचला हे थोडक्यात सांगितले. परंतु जहाजाच्या मालकाचा त्याच्या बोलण्यावर विश्वासच बसेना. तो त्याला म्हणाला–"तू लुच्चा व लबाड दिसतोस की रे! तुझ्या सारख्या कित्येक भामट्यांना मी पाहिले आहे, आमच्या डोळ्यासमोर सिंदबाद बुडाला आम्हांला माहीत आहे. स्वतःला सिंदबाद म्हणताना तुला लाज नाही वाटत."

"पण मला खोटे बोलण्याची गरजच काय?" असे सांगून त्याने देवमाशाच्या पाठीवरून ते पाण्यात कसे गडप झाले, हे सविस्तार वर्णन करून सांगितले. तेव्हां कोठे जहाजाच्या मालकाचा त्याच्या बोलण्यावर विश्वास बसला. त्याने त्या जहाजात आलेल्या इतर व्यापाऱ्यांना बोलावून सिदबादची त्यांच्याशी ओळख करून दिली. सिदबादने त्या सर्वांना आपला विचित्र जीवन वृत्तांत सांगितला. तो ऐकून सर्व चकित झाले. सिदबाद मृत्यूच्या दाढेतून वाचला होता. अर्थातच सर्वांनी त्याचे अभिनंदन केले.

सिदबादने आपला सर्व माल पाहिला. पोत्यात व पेट्यांत भरलेला सर्व माल सुरक्षित पाहून सिदबादच्या डोळ्यात आनंदाश्रू आले. सिदबादने मीरजान सुल्तानाला देण्यासाठी मुख्यमुख्य वस्तू निवडून बाजूला ठेवल्या व बाकी माल बाजार पेठेत नेऊन दुप्पट किमतीला विकला. नंतर त्याने सुलतानाला नजराणा म्हणून राखून ठेवलेला माल दिला. सिदबादला निरोप देताना सुल्तानाने त्यांच्या देशातली अत्तरे, कापूर, धूप वगैरे वस्तू प्रेमाची भेट म्हणून दिल्या. सर्वांचा निरोप घेऊन सिदबाद स्वदेशी निघाला. कित्येक दिवस प्रवास केल्यावर सिदबाद बसऱ्याला आला व तेथून बगदादला सुखरूप येऊन पोचला.

ईश्वर कृपेने त्याच्या घरी सर्व सुखी होते. तो बरोबर अलोट धन घेऊन आला होता. त्याने आपला वाडा व जमीन जुमला पुन्हां खरेदी केला आणि पुढे आपली इस्टेट वाढविली. बापाने त्याच्या साठी जी इस्टेट ठेवली होती त्यात त्याने दुपटीने भर टाकली. मुलाबाळांबरोबर आनंदात दिवसामागून दिवस जात होते. हळूहळू तो आपल्या पहिल्या सफरीचे सर्व कष्ट विसरून गेला. (पुढे चालू)





# मुकी राजकन्या

एकदां एका सुंदर राजकन्येची तसबीर पाहून एक राजकुमार तिच्यावर इतका भाळला की त्याने तिच्याशीच लग्न करण्याची शपथ घेतली. त्याच्या मित्र-मंडळींनी तसला वेडेपणा करू नकोस असे अनेक प्रकारे त्याला समजावून सांगितले. कारण त्या राजकन्येशी लग्न करण्याच्या हेतूने जो जो राजकुमार गेला त्यांच्यापैकी एकजणदेखील परत आला नाही.

परंतु राजकुमाराने त्यांच्या बोलण्याकडे दुर्लक्ष केले. त्याने तिच्याशीच लग्न करण्याचा पक्का निश्चय केला आणि तो त्या राजकन्येच्या राजधानीकडे निघाला.

राजकुमाराने त्या राजकन्येच्या देशात पाऊल टाकले तेव्हां त्याला एका जागी गर्दीत मधोमध एक मनुष्य हातात एका पक्ष्याचा पिंजरा घेऊन त्या पक्ष्याचा लिलाव करीत असलेला दिसला. राजकुमाराने तो पक्षी सर्वांत जास्त बोली बोलून लिलावात घेतला. त्याने पिंजरा उघडून पाहिला तर ती एक चिमणी होती.

"मला कसे फसविलं पहा!" राजकुमार चिमणीकडे पहात म्हणाला.

"तू फसला नाहीस, तुला माझ्यापासून फायदाच होईल." चिमणी म्हणाली.

"म्हणजे तू आमच्या भाषेत बोलतेस पण का?" राजकुमाराने तिला चकित होऊन विचारले.

"तू मला पिंजऱ्यातून काढून खिशात ठेवून घे." चिमणी म्हणाली.

राजकुमाराने त्या प्रमाणे चिमणीला पिंजऱ्यातून काढून खिशात ठेवून घेतले. राजवाड्यात जाऊन तो राजाला म्हणाला—"महाराज! मी आपल्या राजकन्येला मागणी घालण्यासाठी आलो आहे."

ते ऐकून राजा म्हणाला–"माझी मुलगी गेली सात वर्षे कोणाशी एक शब्ददेखील बोलली नाही. त्याचे कारण मोठमोठ्या वैद्यांनादेखील कळले नाही. माझ्या मुलीचा मुकेपणा जो दूर करील त्याच्याशी मी आपल्या मुलीचा विवाह करून देईन. मी तुला तिच्याकडे पाठवून देतो. संध्याकाळपर्यंत ती बोलली नाही तर मी तुझे डोके उडवीन."

राजकुमारीशी विवाह करण्याच्या हेतूने आलेले राजकुमार कां परतले नाहीत हे आतां त्याला कळले. त्याला धीर देत खिशात बसलेली चिमणी म्हणाली–"तू घाबरू नकोस, मी आहे बरोबर, बेफिकीर रहा."

"मी तिला बोलायला लावू शकेन. मला राजकुमारीकडे पाठविण्याची व्यवस्था करावी." राजकुमार राजाला म्हणाला.

अंतःपुरात राजकन्येच्या सेवेला एक म्हातारी दासी नेहमी हजर असे. राजा राजकुमाराला राजकन्येच्या महालात घेऊन गेला आणि म्हणाला–"सूर्यास्तापूर्वी तू राजकन्येला बोलायला लावले नाहीस तर रात्रभर तुला तुरुंगात ठेवण्यात येईल आणि उद्या सकाळी तुझे डोके उडविण्यात येईल." असे सांगून राजा निघून गेला.

राजकुमारी खुर्चीवर पाठमोरी बसून खिडकीतून बाहेर पहात होती. राजकुमाराने



तिला विचारले–"राजकन्या! कसं काय प्रकृति बरी आहे ना?"

राजकुमारीने काहीच उत्तर लेदि नाही व पाठीमागे वळूनसुद्धा पाहिले नाही.

"मला एका कोनाड्यात ठेवून दे आणि तू त्या कोनाड्याशी बोलू लाग. तू त्या कोनाड्याला एखादी गोष्ट सांगायला सांग. मी काही प्रश्न विचारला तर तू काही तरी वाकडे तिकडे उत्तर दे." चिमणीने हे सर्व राजकुमाराला गुप्तपणे सांगितले.

"मग काय राजकन्या, मी आपल्यालाच विचारले होते, प्रकृति बरी आहे ना?" असे बोलत राजकुमार तिच्या शेजारून पुढे गेला आणि एका कोनाड्यात त्याने चिमणीला लपवून ठेवले. राजकन्या त्यावेळी खिडकीतून बाहेर पहात होती.

"राजकन्या! मी पुन्हां विचारतो, तू माझ्याशी बोलली नाहीस तर मी कोनाड्याशींच बोलेन, सांगून ठेवतो."

कोणी वेडा दिसतो, राजकन्या मनातल्या मनात स्मित करून बाहेर पहात होती.

"काय रे कोनाड्या, मग तूच उत्तर देतोस का माझ्या प्रश्नाचे? कारण राजकुमारी तर बोलत नाही!" राजकुमाराने विचारले.



"हो, देईन! राजकुमारी वेडी आहे. तिच्याशी कशाला बोलायला जातोस? तुला बोलायचंच असेल तर माझ्याशी कां नाही बोलत?" कोनाड्यात बसलेली चिमणी म्हणाली.

राजकुमारी चकित होऊन तिकडे पाहू लागली. तिला भयंकर राग आला. रागाच्या भरात तिच्या तोंडात "मी वेडी नाही" असे शब्द आले. पण तिने स्वतःला आवरून तोंडावाटे ते शब्द बाहेर येऊ दिले नाहीत.

राजकुमाराबरोबर हा कोनाड्या कसा काय बोलतो आहे? तिला काही कळेना. ती











दोघांचे संभाषण ध्यान देऊन ऐकत होती. थोड्या वेळाने राजकुमार कोनाड्याला म्हणाला–"मला कंटाळा येऊ लागला आहे बुवा! कोनाड्या एखादी गोष्ट सांगतोस का?"

चिमणी गोष्ट सांगू लागली–"एका गावी तिघे भाऊ रहात होते. मोठा सुतारकामात हुशार होता. दुसरा विणकामात प्रवीण होता. तिसऱ्याला काहीच येत नव्हते. पण त्याचा देवावर अढळ विश्वास होता. तिघे भाऊ स्वतःचे पोट भरण्यासाठी आपल्या गावाहून निघाले. ते एका डोंगराजवळ पोचले तेव्हां संध्याकाळ झाली होती. त्यांना ती रात्र एका गुहेत काढावी लागली. रानटी श्वापदांपासून आपले रक्षण करण्याच्या हेतूने त्यांनी गुहेच्या तोंडाजवळ लाकडे पेटवून एक शेकोटी तयार केली. पाळी पाळीने एक प्रहरभर पाहरा देण्याचे तिघांनी ठरविले. सगळ्यात मोठ्या भावाची पाळी सर्वात प्रथम होती. त्याने लाकडाची एक बाहुली तयार केली. त्यानंतर दुसऱ्या भावाची पाळी आली. त्याने कापड विणून त्या बाहुलीला लुगडे चोळी तयार करून घातली. नंतर तिसऱ्याची पाळी होती. त्याने ती बाहुली पाहिली व तिला खरी मुलगी समजून तो तिच्यावर भाळला.



त्याने देवाजवळ प्रार्थना केली की देवा या बाहुलीच्या शरिरात प्राण ओत, आणि आश्चर्य म्हणजे खरोखरच ती बाहुली जागची हालली. राजकुमार, आतां तू सांग, या तिघां पैकी कोणाशी त्या मुलीचे लग्न करून देणे योग्य होईल?"

चिमणीचा तो प्रश्न ऐकून राजकुमार म्हणाला–"लाकडी बाहुली तयार करणाऱ्या मोठ्या भावाशी तिचे लग्न झाले पाहिजे."

"राजकुमार तू चुकतो आहेस. तिला वस्त्रे नेसवणाऱ्या भावांशी हा अन्याय नाही का होणार?" चिमणीने विचारले.

"तुमच्या टाळक्यात काही अक्कल आहे का? प्राण ओतणाऱ्या तिसऱ्या भावाशीच नको का तिचे लग्न व्हायला?" राजकुमारी मोठ्याने ओरडून म्हणाली.

दुसऱ्या क्षणाला राजकुमारीने आपल्या हाताने आपले तोंड बंद केले. परंतु काय उपयोग? ती तर बोलली होती.

"अगबाई! आपली राजकन्या बोलू लागली का?" म्हातारी दासी असे म्हणत बाहेर आली.

त्याच वेळी राजाने राजकन्येच्या दालनात प्रवेश करून राजकुमाराला विचारले–"सूर्यास्त झाला. माझी मुलगी बोलली का?"

"होय महाराज! राजकन्या बोलली." राजकुमार म्हणाला.

"खोटे! मी नाही त्याच्याशी बोलले!" राजकुमारीच्या तोंडून नकळत हे शब्द बाहेर पडले.

राजा खदखदा हसून म्हणाला–"छान!" त्याने सात वर्षानंतर राजकन्येच्या तोंडचे शब्द स्वतःच्या कानाने ऐकले होते. दासीने पण राजकन्येला बोलताना ऐकल्याचे सांगितले.

तेव्हां राजाने राजकन्येचा विवाह राजकुमाराशी करून दिला.



# दोन मूर्ख

एका गावी एक मूर्ख गरीब मनुष्य रहात असे. त्याला एक दिवशी दहा रुपये मिळाले. बराच विचार करून त्याने आपल्या घराच्या मातीच्या भिंतीत एक भोक केले. त्यात रुपये ठेवून त्याने पुन्हा ओल्या मातीने ते भोक बुजवून टाकले. ती ओली माती वाळेपर्यंत त्या मूर्ख माणसाने आपल्या घरात कोणाला पाऊल ठेवू दिले नाही. ओली माती चांगली वाळून गेल्यावर त्याच्या मनाचे समाधान झाले. त्याने नंतर त्या भिंतीवर "या भिंतीत रुपये लपवून ठेवलेले नाहीत." असे लिहून ठेवले. स्वतःच्या बुद्धिमत्तेबद्दल त्याने स्वतःच स्वतःची स्तुती करून घेतली.

काही दिवसांनी त्याचा एक मित्र त्याच्या घरी आला. तेव्हां घरचा धनी घरात नव्हता. परंतु त्याला भिंतीवर त्याने जे लिहून ठेवले होते ते दिसले. या भिंतीत रुपये लपवून ठेवलेले नाहीत असे याने कां बरे लिहून ठेवले आहे, हे भिंत खणूनच पहावे असे ठरवून त्याने भिंत खणून पाहिली आणि त्याला भोकात पैसे मिळाले.

रुपये मिळाल्याबद्दल अर्थातच त्याला परमानंद झाला. परंतु आपण चोरी केल्याचे कळले तर आपल्याला मार खावा लागेल अशी भीती पण त्याला वाटू लागली. म्हणून त्याने दरवाज्यावर लिहून ठेवले—"अमक्या माणसाच्या घरात मी चोरी केली नव्हती."





# फिर्याद

एका गावी लक्ष्मण नावाचा एक शेतकरी रहात असे. त्याच्या एकुलत्या एका मुलाचे नाव श्रीधर होते. तो वयात आल्यावर एक चांगलीशी मुलगी पाहून त्याने मुलाचे लग्न करून देण्याचे ठरविले.

लक्ष्मणने दोन्ही घरच्या श्रीमंतीला शोभेल अशा थाटाने लग्न करण्याचे ठरविले. हत्तीवर वरात निघाली पाहिजे. त्याचा मित्र गोपाळ याच्याकडे हत्ती होता. म्हणून लक्ष्मण त्याला म्हणाला—"मित्रा, माझ्या मुलाचे लग्न ठरले आहे. लग्न थाटाने करायचे आहे. तू आपला हत्ती दिलास तर हत्तीवर वरात काढायचा विचार आहे."

गोपाळ होकार देत म्हणाला—"हा हत्ती माझ्या आजोबांच्या वेळेपासून आमच्या घरी आहे. सुख रूप घरी पोचता झाला पाहिजे." लक्ष्मणाने ते सर्व मान्य केले. लग्न सामारंभ आनंदाने पार पडला.

लग्न झाल्यावर लक्ष्मण आपल्या गावी निघाला तेव्हां वाटेत हत्ती एकाएकी खाली बसला व त्याने अंग टाकले. तो कां व कसा मेला, कळले नाही.

लक्ष्मण गोपाळाच्या घरी गेला आणि म्हणाला—"गोपाळ! अरे, मी तोंड दाखविण्यालायक सुद्धा राहलो नाही. काय सांगू, तुझा हत्ती परत येत असतां वाटेत एकाएकी खाली बसला आणि पुन्हां उठला नाही. मी त्याची किंमत द्यायला तयार आहे. आता तूच सांग तुला हत्तीची किंमत हवी की दुसरा हत्ती?"

"मला तो माझा हत्तीच पाहिजे. तू लाख हत्ती आणून उभे केलेस म्हणून ते माझ्या हत्तीची बरोबरी करू शकतील का? मला माझा हत्ती आणून दे." गोपाळ म्हणाला.

"अरे, पण मेलेला हत्ती जिवंत करून कसा आणून देऊ?" लक्ष्मणने विचारले.

गोपाळने नारायणराव न्यायाधिशांच्या न्यायालयात लक्ष्मणच्या विरुद्ध फिर्याद केली. नारायणरावांनी दोघांचे म्हणणे ऐकून घेतले. हत्ती म्हातारा होता हे दोघांच्या म्हणण्यावरून स्पष्ट झाले. लक्ष्मणच्या निष्काळजीपणामुळे तो मेला नव्हता हे पण स्पष्ट झाले. गोपाळने जो हट्ट धरला होता तो त्या हत्तीसाठी नव्हताच. लक्ष्मणला दंड किंवा शिक्षा व्हावी यासाठी होता. हे लक्षात आल्यावरून नारायणराव म्हणाले–"मी उद्या निकाल सांगतो."

नारायणरावांनी दोघांना पाठवून दिले. त्यानंतर त्यांनी लक्ष्मणच्या नावी एक गुप्त पत्र लिहिले. दुसऱ्या दिवशी गोपाळ कोर्टात हजर झाला. पण लक्ष्मण आला नव्हता.

नारायणराव म्हणाले–"लक्ष्मण अजून कसा काय आला नाही: न कळे. तू जाऊन त्याला बोलावून घेऊन ये."

गोपाळने लक्ष्मणच्या घरी जाऊन पहिल्याने दाराची कडी वाजविली व नंतर दार ढकलून पाहण्यासाठी हात लावला. त्याबरोबर दार उघडले व दाराला लागून काही बरण्या व मडकी होती ती फुटली.

"हे काय रे गोपाळा? माझ्या वाड-वडिलांपासून मी जपून ठेवलेली भांडी तू एका धक्क्यात फोडून टाकलीस की रे?" लक्ष्मणने बाहेर येऊन गोपाळला विचारले. गोपाळ त्यांची किमत द्यायला तयार झाला. पण लक्ष्मण म्हणाला–"ते नाही चालायचे. मला माझी भांडीच हवीत."

दोघे नारायणरावांच्या न्यायालयात गेले. या खेपेस लक्ष्मणने गोपाळच्या विरुद्ध फिर्याद केली. नारायणरावांनी निकाल सांगितला तो असा–"गोपाळ, तू लक्ष्मणची भांडी परत दे. मी तुझा तो हत्ती परत देववितो." गोपाळचा चेहरा खाडकन उतरला. आपलेसे तोंड करून तो निघून गेला.





# महाभारत

"अर्जुनाबरोबर द्वंद्वयुद्ध एक राजा किंवा राजपुत्र यांच्यापैकी कोणी एक करू शकेल." कृपाचार्यांच्या तोंडचे ते वाक्य ऐकून कर्णाची मान खाली झाली. कारण त्याला आपल्या आई बापाचे नाव सांगायला लाज वाटली. दुर्योधन कर्णाला आपल्या बाजूला वळवून घ्यायला चांगली संधी चालून आलेली पाहून कृपाचार्यांना म्हणाला–

"गुरुवर्य! शास्त्राप्रमाणे उत्तम क्षत्रिय-कुळात जन्मलेला, एक शूर पुरुष व मोठे सैन्य ज्याच्या जवळ आहे अशांना राजा म्हणता येईल. कर्ण राजा नाही एवढ्या एकाच कारणामुळे त्याला अर्जुनाशी द्वंद्व-युद्धाला हरकत असेल तर मी अंगराज्याचा राजा म्हणून त्याचा राज्याभिषेक करतो."

दुर्योधनाने आज्ञा केल्याप्रमाणे अभिषेक करण्यासाठी वेदपाठी ब्राह्मण आले. एक सुवर्णसिंहासन आणण्यात आले. स्वर्णकलश पात्रे भरून पाणी आणण्यात आले. फुले, फळे व अक्षता आल्या. दुर्योधनाने कर्णाला सिंहासनावर बसवून त्याच्यावर छत्रचामर धरायला दोघां राजकुमारांना उभे केले आणि कर्णाचा शास्त्रोक्त विधीने राज्या-भिषेक झाला.

राज्याभिषेक संपल्यावर कर्ण दुर्योधनाला म्हणाला–"महाराज! मला आपल्याकडून राज्य दान म्हणून मिळाले. या बद्दल मी आपली कोणती सेवा करू?"

"कर्णा! मला फक्त तुझ्या सारख्या मित्रांची मैत्री पाहिजे." दुर्योधन म्हणाला.



कर्णाचा पिता सूत म्हणजे सारथी तो दुरून राज्याभिषेक विधि इतका वेळ पहात होता. तो रथातून उतरून खाली आला व त्याने अंगदेशाचा राजा कर्ण याचे अभिनंदन केले. कर्णाने आपल्या पित्याला प्रणाम केला. सूताने कर्णाला पुत्रप्रेमाने आलिंगन करून आशीर्वाद दिला. दोघांच्या डोळ्यातून आनंदाश्रू वाहू लागले.

कर्ण सूतपुत्र आहे ही गोष्ट प्रगट सर्वांना कळली. ते पाहून भीम कर्णाला म्हणाला–"सूतपुत्रा! सारथ्याचे काम करायचे सोडून अर्जुनाशी द्वन्द्व युद्ध करण्याची महत्वाकांक्षा तुझ्या मनात उत्पन्न झाली अं? तुला रे कशाला अंग देशाचे सिंहासन?"

कर्णाचे सर्वांग क्रोधाने थरथर कांपू लागले. पण त्याला आपला राग मनातल्या मनात गिळावा लागला. तो आकाशातल्या सूर्याकडे पहात उभा राहिला. दुर्योधन निमूट-पणे ते सर्व ऐकत आपल्या भावंडाबरोबर बसला होता. तो भीमाला म्हणाला–"भीमा! जो राजा असेल, क्षत्रिय असेल त्याने कोणाही पराक्रमी वीर पुरुषाने आव्हान केल्यास द्वंद्वयुद्धास तयार झाले पाहिजे. अर्जुन शूर क्षत्रिय असेल तर त्याने ते आव्हान स्वीकारलेच पाहिजे. आणखी हे सांगून ठेवतो, गाठीला बांधून ठेव, शूर क्षत्रिय आणि नद्या यांचा उगम किंवा जन्म कोठे झाला हे कोणी सांगू शकेल का? ते कोणी विचारू नये. दिव्य लक्षणे असलेला व कवच-कुंडल धारण करूनच जन्मलेला कर्ण सामान्य मनुष्य असूच शकत नाही. तो अंगराज्यावर काय, पण सर्व पृथ्वीवर राज्य करण्यास योग्य असा पराक्रमी थोर योद्धा आहे. मी त्याला अंगराज्याचा अधिपती म्हणून नेमला आहे. ज्या कोणाला ही गोष्ट मान्य नसेल त्याने समोर येऊन माझ्याशी द्वंद्वयुद्धास तयार असावे."



दुर्योधनाच्या तोंडचे ते वाक्य ऐकून सर्व प्रेक्षक वर्गात हाहाकार उडून गेला.

द्वंद्वयुद्ध होण्यापूर्वीच सूर्यास्त झाला. काही लोक अर्जुनाच्या धनुर्विद्येची तर काही कर्णाच्या शौर्य व पराक्रमाची आणि इतर काही दुर्योधनाची स्तुती करीत आपापल्या घरी निघून गेले. दुर्योधनाला तो दिवस एक पर्व दिवसा सारखा पवित्र वाटला. आजपर्यंत अर्जुनाचा शौर्य व पराक्रम त्याच्या डोळ्यात कुसळासारखा सलत होता. परंतु यापुढे त्याला अर्जुनाला भिण्याचे कारण नाही. त्याची बरोबरी करू शकणारा शूर कर्ण त्याचा मित्र झाला होता.

आणखी काही काळ लोटला. एकदा गुरु द्रोणाचार्यांनी आपल्या सर्व शिष्यांना एकत्र करून विचारले–"तुम्ही मला गुरुदक्षिणा काय देणार?" सर्व म्हणाले–"गुरुवर्य! आपण आज्ञा करावी आम्ही ती गुरुदक्षिणा हजर करतो."

द्रोणाचार्य म्हणाले–"ऐश्वर्यमदाने पांचाल देशाचा द्रुपद राजा मदोन्मत्त झाला आहे. त्याला जिवंत पकडून घेऊन या."

आपल्या गुरुच्या आज्ञेला मान देऊन सर्व शिष्यांनी आपापले रथ सज्ज केले. कवच धारण करून खड्ग व धनुष्य बाण घेऊन द्रुपदाच्या राज्यावर चालून जाण्यास





सर्व तयार झाले. त्यानंतर द्रोणाचार्य पुढे निघाले व त्यांच्या मागे सर्व राजकुमार निघाले.

पांचालदेशाच्या राजधानीजवळ पोचल्यावर अर्जुन द्रोणाचार्यांना म्हणाला–"यांच्यापैकी एकही द्रुपदाला धरून आणू शकणार नाही. हे हार मानून परत येईपर्यंत आम्ही पांडुपुत्र येथेच थांबतो. त्यानंतर जाऊन द्रुपदाला धरून घेऊन येतो."

दुर्योधनाचे सर्व बंधू व कर्ण ससैन्य पांचाल नगरावर चालून गेले. आपल्याच घमेंडीत कौरव नगरात शिरल्याची बातमी द्रुपदाला समजली. तो आपल्या भावांना मदतीला बोलावून कौरव सैन्याला तोंड देण्यासाठी ससैन्य धावून आला. सुरवातीला कौरव व कर्ण यांची सरशी होत राहिली, परंतु थोड्याच वेळाने द्रुपदाने आपली बाजू सावरली व कौरव सैन्याला पिटाळून लावले. कौरव खाली माना घालून परतले.

तेव्हां अर्जुनाने गुरु द्रोणाचार्यांना नमस्कार केला आणि वडील बंधू युधिष्ठिर याचा आशीर्वाद घेऊन आणि भीमाला आपला सेनापती म्हणून आणि नकुल सहदेवांना रथाच्या चाकांच्या रक्षणार्थ नेमून द्रुपदाला जिवंत धरून आणण्याची प्रतिज्ञा करून निघाला.

भीमार्जुनांच्या हल्ल्यासमोर द्रुपदाच्या सैन्याची धुळदाण उडून गेली. अर्जुनाचा रथ पांचाल सैन्याला पांगवीत सरळ द्रुपदाच्या रथाला जाऊन भिडला. द्रुपदाने रागाने अर्जुनाच्या सैन्यावर आणि रथावर प्रत्याक्रमण केले. लढाईच्या गडबडीत एकाएकी द्रुपद अदृश्य झालेला पाहून त्याच्या सैन्याचा धीर खचला. अर्जुनाने बाणांचा पाऊस पाडून द्रुपदाचा रथ मोडून टाकला आणि घोड्यांना ठार केले. नंतर तो तलवार उपसून द्रुपदावर धावून गेला. द्रुपद त्यानंतर थोड्याच वेळाने कैद झाला.

तिकडे भीमाने व नकुल सहदेवांनी द्रुपदाचे सैन्य पळू लागलेले पाहून त्यांच्यावर निकराचा हल्ला केला. अर्जुनाने त्यांना आवरून द्रुपद कैद झाल्याचे सांगितले. म्हणाला–"द्रुपद आपला नातेवाईक आहे. त्याच्या सैन्याचा किंवा राजधानीचा नाश करणे बरोबर नाही."

त्यानंतर अर्जुनाने द्रुपदाला धरून गुरुदक्षिणा म्हणून गुरु द्रोणाचार्यांसमोर उभे केले. द्रोणाचार्य द्रुपदाला पाहून व्यंगहास्य करीत म्हणाले–"द्रुपदा! तुझे राज्य व राजधानी आम्ही जिंकली आहे. बोल आतातरी मला बालपणीचा मित्र म्हणून ओळखशील की नाही? तुला भिण्याचे मुळीच कारण नाही. मी ब्राह्मण आहे. क्षमा करणे ब्राह्मणाला शोभते. मी आपली बालपणची मैत्री विसरलो नाही. तुझ्या मैत्रीची आठवण करून देण्यासाठीच मी तुला येथवर आणविले. सिंहासनावर बसलेल्या राजाची मैत्री पण मला आवडते. तू आपले राज्य व सिंहासन घालवून बसला आहेस. तुझी मैत्री कायम ठेवण्यासाठी मी तुझे अर्धे राज्य तुला परत देतो. गंगेच्या दक्षिणेकडील सर्व राज्य तुझे आणि उत्तरेकडील माझे. आपण आपापल्या राज्यात परस्पर मैत्रीचे संबंध ठेवून राज्य करू या."





द्रुपदाचा गर्वभंग झाला. त्याने आपल्या चुकीची माफी मागून आजन्म मैत्रीचे वचन दिल्यावर द्रोणाचार्यांनी त्याला सोडून दिले.

त्या दिवसापासून द्रुपद फक्त दक्षिण पांचाल देशाचा राजा झाला. सैन्य बळ दाखवून द्रोणाचार्यांना जिंकणे यापुढे अशक्य आहे याची जाणीव द्रुपदाला झाली. तो अर्धे राज्य गमावून बसला होता व त्याला मूल बाळ पण नव्हते. म्हणून तो देशाटनास निघाला आणि ऋषीमुनींच्या सहवासात राहून घोर तपश्चर्या करू लागला.

द्रोणाचार्यांनी अहिच्छत्र येथे आपली राजधानी कायम केली आणि राज्य करू लागले.

एक वर्ष लोटले. धृतराष्ट्राने युधिष्ठिराला युवराजपद देण्याचा निश्चय केला. युधिष्ठिर सर्वांत मोठा भाऊ होता. सद्‌गुणी, सुशील व धर्मपरायण होता. युवराजपदी त्याची नेमणूक झाल्यानंतर त्याने आपल्या काकांना राज्यकारभारात पुष्कळच मदत केली.

भीमाने बलरामाजवळ गदायुद्धाचे शिक्षण घेऊन त्यात प्राविण्य संपादन केले.

अर्जुनाने धनुर्विद्येत प्राविण्य मिळविले. त्याला दोन्ही हातांनी धनुष्यावर बाण चढवून युद्ध करता येत होते. म्हणून त्याला सव्यसाची हे नाव मिळाले. द्रोण अर्जुनाला आपला पट्टशिष्य मानत. त्यांनी त्याला सर्व शस्त्रास्त्रे उत्तम प्रकारे शिकवून दिली.

द्रोणाचार्यांनी अर्जुनाला उपदेश केला की युद्ध करणे हे मुळात चांगले नाही. अगदी आवश्यक तेव्हांच युद्ध करावे. सुडाच्या भावनेने हिंसा करू नये. एकाद्या आदरणीय व्यक्तीशी युद्ध करावेच लागले तर माघार न घेता युद्ध करावे व त्या व्यक्तीच्या विषयी सर्वदा मनात आदर भाव राखावा.

अर्जुनाने कौरव राज्याचे शत्रू व त्याचे वडील पांडू यांच्याशी वैर करून त्यांचा अपमान करणाऱ्या सौवीर, त्रिसल व दत्तमित्र आणि त्याचे बंधू यांना युद्धात ठार केले. त्याने एकट्याने पूर्वेकडील सर्व राज्ये एकामागून एक जिंकली. कित्येक राजांना कौरवांचे मांडलिक करून घेतले आणि त्यांच्याकडून खंडणी वसूल करून कौरवांच्या राज्याचे ऐश्वर्य वाढविले.

नकुल सहदेवांनी पण अनेक राज्ये जिंकून कौरवांच्या राज्याची त्यांना दहशत बसविली.

अशा तऱ्हेने पांडवांची वाढती कीर्ति धृतराष्ट्राला पाहवेना. परंतु त्यांना प्रोत्साहन द्यावे की त्यांचा तेजोवध करावा हे त्याला कळेना. म्हणून त्याने कणक नावाच्या आपल्या एका ब्राह्मण मंत्र्याचा सल्ला विचारला. शत्रूचा नाश कोणत्याही प्रकारे केल्यास त्यात दोष नाही असा कणकाने सल्ला दिला.

धृतराष्ट्राप्रमाणे दुर्योधनाने पण कर्ण, शकुनी, दुःशासन वगैरेंच्या सल्ल्याने पांडवांचा काटा दूर करण्याचे ठरविले. त्याने धृतराष्ट्राची परवानगी मागितली व अर्थातच ती त्याला मिळाली. सर्व एकत्र जमले व पांडवांचा शेवट कसा करता येईल या गोष्टीचा विचार करून सर्वांनी मिळून वारणावतात लाक्षागृहात पांडवांना जाळून टाकण्याचा एक गुप्त बेत केला.





धृतराष्ट्राच्या आज्ञेप्रमाणे त्याचे मंत्री एकेक करून पांडवांकडे आले आणि त्यांच्या-समोर वारणावताच्या नैसर्गिक सौंदर्याचे वर्णन करू लागले. वारणावत येथे काही दिवस गमतीखातर पर्यटणास त्यांनी जाऊन यावे असे देखील त्यांनी सुचविले.

त्यानंतर एकदा धृतराष्ट्राने पांडवांना बोलावून वारणावताचे खूप वर्णन केले व म्हणाला–"वारणावताचे सौंदर्य डोळे भरून पाहण्यास दोन डोळे पुरत नाहीत. हजार डोळ्यांनी पाहण्यासारखे ते सुंदर शहर आहे. तेथे तुमची जाण्याची इच्छा असेल तर एकदा आपल्या मातेसह जाऊन शंकराचे दर्शन करून या. तुमच्या राहण्याची मी उत्तम व्यवस्था करून देतो. काही दिवस हवापालट केल्यासारखे पण होईल. कंटाळा आला म्हणजे परत हस्तिनापुरी या." आपल्याला हस्तिनापुरा-बाहेर पाठविण्यात काकांचा काही दुरुद्देश असावा याची युधिष्ठिराला कल्पनादेखील नव्हती.

दुर्योधनाने पुरोचन नावाच्या आपल्या नोकराला एकांतात बोलावून म्हटले–"माझे वडील, पांडवांना वारणावत येथे पाठवीत आहेत. तू त्यांच्या आधी तेथे जाऊन तेथे एक लाक्षागृह तयार कर. त्यात पांडवांचा सर्वनाश करण्याची जबाबदारी मी तुझ्यावर टाकतो. घर सुंदर मजबूत व सुरक्षित दिसले पाहिजे. कोणाला संशय येता कामा नये. पांडव त्यात जाऊन निश्चितपणे राहू लागले म्हणजे मध्यरात्रीच्या सुमारास संधी साधून त्या लाक्षागृहाला आग लाव. पांडव भस्म झाल्यावर तुला मी एका राज्याचा राजा करीन."

पुरोचन त्या कामगिरीवर निघाला. दुर्योधनाने एक सर्वोत्तम रथ देऊन त्याला निरोप दिला. पुरोचन तेथे पोचतांच आपल्या कामाला लागला.





# गांधीचे चरित्र

[ ९ ]

ट्रान्सव्हालच्या विधान मंडळात आशिया वासियांच्या रजिस्ट्रेशन संबंधी जे बिल पास झाले त्याचे भारतवासियांनी खंडन केले. त्यांच्या वतीने गांधीजी व श्री एच. ओ. अली हे इंग्लंड देशात गेले. गांधीजी तेथे सहा आठवडे राहले व दादाभाई नवरोजी व भारतीयांविषयी ज्यांच्या मनात स्नेह व सहानुभूती होती अशा पार्लमेंटच्या सभासदांना व पत्रकारांना भेटले. ब्रिटीश कॉलोनिअल सेक्रेटरीला भेटून त्यांच्या समोर आपली बाजू मांडली. परंतु काही फायदा झाला नाही. उलट १ जुलै १९०७ पासून ते बिल अमलात येईल असे जाहीर करण्यात आले. त्या बिलाचा विरोध करण्याचे गांधीजींनी पूर्वीच ठरविले होते. ती चळवळ सुरु करण्याची वेळ पण येऊन ठेपली.

१९०६ च्या सेप्टेंबर महिन्यात एंपायर थिएटर मध्ये इतिहासात नमूद होण्यालायक एक सभा झाली. या सभेत भारतीयांकडून या कायद्याचा विरोध करण्यासाठी गांधीजींनी प्रतिज्ञा घेवविली.

जोहॅन्सबर्ग येथे एक जाहीर सभा झाली. सरकारतर्फे या सभेला श्री व्युलियम हॉस्केन हे हजर होते. ते आपल्या भाषणात म्हणाले–"तुमची ही चळवळ चालू शकणार नाही. ट्रान्सव्हालचा प्रत्येक श्वेतवर्णी या कायद्याचा समर्थक आहे. सरकारचा विरोध करणे म्हणजे भिंतीवर स्वतःचे डोके आपटून कपाळमोक्ष करून घेण्यासारखा मूर्खपणा आहे." या भाषणाचे भाषांतर गांधीजींनी केले होते.

त्या भाषणाचे उत्तर लगेच मिळाले. महंमद कछालिया नामक व्यापारी म्हणाला–



# मातीतून सोने

एका गावी एक शेतकरी रहात असे. त्याला एक मुलगा होता. मुलगा लहान असतांनाच त्याची आई वारली. पुढे काही दिवसांनी शेतकरी सुद्धा आजारी पडला. त्याला वाटले की त्या आजारातून तो उठणार नाही. म्हणून त्याने मुलाला जवळ बोलावून म्हटले–"बाळ, मी गरीब आहे. म्हणून तुझ्या साठी मी जमीन जुमला काही ठेवू शकलो नाही. परंतु मी तुला आशीर्वाद देतो की तुझ्या हातात माती देखील सोने होईल. बाप वारल्यावर मुलाने श्रद्धा व भक्तिपूर्वक बापाचे स्मरण करून पुष्कळ परिश्रम केले आणि शेतीभाती केली. त्याला आपल्या प्रयत्नात पुष्कळ यश मिळाले व इतके पैसे त्याच्याजवळ जमा झाले की त्याने द्राक्षाचा एक मळा विकत घेतला. त्याने आपल्या मळ्यात देखील पुष्कळ मेहनत केली अन् खूप द्राक्षे लागली.

हळूहळू त्याने फळांच्या आणखी काही बाग विकत घेतल्या. मासे धरण्यासाठी एक होडीपण विकत घेतली आणि तेलघाणीत तेल काढण्याचे काम पण सुरु केले. तेलाच्या व्यापारात व मासे धरण्याच्या धंद्यात त्याला पुष्कळ फायदा होऊ लागला हळूहळू त्या गांवच्या श्रीमंतात त्याची गणना होऊ लागली. तो जे काम करी त्यात त्याला फायदाच फायदा होई. आता तो थोड्या आरामात राहू लागला. त्याच्याकडे पैसे असल्यामुळे एका श्रीमंताच्या मुलीशी त्याचे लग्न झाले.

एकदा त्याला आपल्या नशिबावर शंका आली. तो आपल्या एका जीवश्च कंठश्च मित्राला म्हणाला–"मित्रा! माझ्या शक्ती बाहेर नशिबाने मला दिले आहे. कारण इतके सहज एवढे मोठे ऐश्वर्य मिळाले आहे की ते पाहून केव्हां केव्हां असे वाटते की ते तितकेच सहजी माझ्या हातून निसटून पण जाईल. म्हणून माझे नुकसान होईल असे काही तरी करून पहावेसे वाटू लागले आहे. नुकसानच नुकसान होईल असे काही सुचव, म्हणजे फालतू पैसे निघून तरी जातील."



मित्राने त्याला विचारले–"खजूर कोठे मिळतो?"

"कैरोहून येतो, तुला माहीत नाही का?" तो तरुण म्हणाला.

"मग असे कर, खजूर आपल्या बाजारात विकत घे आणि तो कैरोला घेऊन जाऊन वीक म्हणजे तुला पाहिजे आहे ते होईल. येथे जास्त किमतीवर विकत घेऊन कैरोच्या बाजारात स्वस्त विकावे लागले म्हणजे नुकसान होईल." मित्राने सल्ला दिला.

त्या तरुणाला मित्राचा सल्ला आवडला. त्याने बाजारात कैरोहून आलेला जेवढा खजूर होता तो सर्व विकत घेतला. कित्येक उंट भाड्याने मागून घेऊन त्यांच्या पाठीवर तो खजूर लादून कैरोला निघाला.

कित्येक दिवस वाळवंटातून प्रवास करीत करीत तो पिरामिडच्या त्या प्रसिद्ध देशात सुमारे एका महिन्याने पोचला. तेथे पोचल्यावर त्याला आश्चर्याचा धक्काच बसला. समोरून इजिप्त देशाचा सुलतान घोड्यावर बसून येत होता. त्याच्या बरोबर कित्येक नोकर होते आणि प्रत्येकाच्या हातात एकेक चाळणी होती.

त्या तरुणाने सुलतानाला नम्रपणे कोनिश करून विचारले–"जहापनाह, आपल्या बरोबर आलेल्या या नोकरांच्या हातात या चाळण्या कशा काय?"

सुलतान म्हणाला–"काय सांगू, आज मी याच घोड्यावर या बाजूने फिरायला निघालो होतो. तेव्हां माझ्या बोटातली अंगठी खाली पडली. ही अंगठी आमच्या

      



लग्नाच्या वेळी प्रेमाची खूण म्हणून आमच्या बेगमने आमच्या बोटात घातली होती. ती अंगठी मला स्वतःच्या प्राणापेक्षा जास्त मोलाची वाटते. म्हणून ती मिळेपर्यंत मी सर्व वाळवंट चाळून पाहण्याचे ठरविले आहे."

नंतर राजाने त्या तरुणाला विचारले—"पण हे सांग, तू कैरोला कशासाठी जातो आहेस?"

"मी हा खजूर विकायला घेऊन जातो आहे!" तो तरुण म्हणाला.

राजाने चकित होऊन विचारले—"अरे खुळ्या, व्यापारी कैरोहून परगावला खजूर विकायला घेऊन जातात. जरा खजुरांची झाडे तर पहा, खजुराचे घोस लोंबताहेत प्रत्येक झाडाला. हा खजूर विकून तुला काय मिळणार? एक छदाम तरी मिळेल का?" सुलतान व त्याचे सर्व शिपाई त्या तरुणाच्या मूर्खपणावर हसू लागले.

तो तरुण स्मित करून म्हणाला—"माझं नुकसान होईल म्हणता? अशक्य! कारण माझ्या वडिलांनी मला आशीर्वाद दिला आहे की मी मातीला हात लावला तर मातीचे सोने होईल." असे बोलत असता त्याने सहज वाळूत हात घालून मूठभर वाळू उचलली आणि आश्चर्य म्हणजे त्याच्या हातातली वाळू गळून पडली आणि त्याच्या हातात अंगठी मात्र उरली.

"हीच मी शोधत असलेली अंगठी!" सुलतान आनंदाच्या भरात ओरडून म्हणाला.

सुलतान म्हणाला—"तुझा बाप म्हणाला ते खरे आहे बाबा! तुझ्या हातातल्या वाळूतून सोन्याची अंगठी निघाली बघ." असे म्हणत सुलतानाने त्या तरुणाचा सगळा खजूर दुप्पट दाम देऊन विकत घेतला आणि त्याला मोठे इनाम दिले.

नुकसान सोसण्यासाठी कैरोला गेलेला तरुण भरपूर फायदा घेऊन घरी परतला.





# कृतज्ञ गाढव

मोरोक्को देशातल्या एका गावी एक विहीर होती. विहीर गावाबाहेर होती. गावकरी त्याच विहिरीचे पाणी काढून आपल्या घरी वाहून नेत.

एक दिवशी मंसूर नावाचा एक तरुण युवक त्या विहिरीवर पाणी भरायला आला. तो शेजारच्या खजुराच्या झाडाखाली बसून पाणी भरायला येणाराजाणारांकडे पहात होता. तो या जगात एकटाच होता. एक चुलता होता, तो दुसऱ्या एका गावी रहात होता.

मंसूर खजुराच्या झाडाखाली बसला असता एका तरुण मुलीने विहिरीचे पाणी काढले व बुरखा बाजूला सारून पोटभर पाणी पिऊन घेतले. तेव्हां त्या मुलीचे रूप पाहून मंसूर चकितच झाला. त्याने, लग्न करायचे तर तिच्याशीच, असे मनाशी ठरविले. ती मुलगी पाणी भरून घरी निघाली तेव्हां मंसूर तिच्या पाठोपाठ गेला. त्या मुलीचे नाव अमीना असे होते. मंसूर अमीनाच्या बापाला जाऊन म्हणाला—"तुमच्या मुलीशी माझे लग्न करून द्याल का?"

अमीनाचा बाप एक व्यापारी होता. तो म्हणाला—"हे पहा मुला, माझ्या मुलीला आणखी पुष्कळ चांगली चांगली स्थळे सांगून आली आहेत. तुझ्याशी तिचे लग्न करून द्यायला मला मुळीच हरकत नाही. पण एक अट आहे, पांचशे तोळे चांदी तू दिली पाहिजेस."

मंसूर जवळ फक्त तीस तोळेच चांदी होती.

"पांचशे तोळे चांदी म्हणजे थोडी जास्तच नाही का? पण मला काही दिवसांचा अवधी द्या." मंसूर अमीनाच्या बापाला म्हणाला.

श्री प्रदीप सु. मांजरेकर



"मी फक्त दहा दिवस थांबायला तयार आहे. तोंपर्यंत तू पांचशे तोळे चांदी आणू शकला नाहीस तर येथपर्यंत येण्याची तसदी घेऊ नकोस." अमीनाचा बाप म्हणाला.

मंसूर दहा दिवसांच्या आत परत येण्याचे वचन देऊन घरी परत आला. त्याच्या गल्लीत किंवा गावात त्याला चारशे सत्तर तोळे चांदी कोण देणार?

मंसूरला त्यावेळी त्याच्या चुलत्याची आठवण झाली. तो दूरच्या एका गावी रहात असे. त्याला मंसूरने कधी पाहिले नव्हते की त्याच्या चुलत्याने मंसूरला कधी पाहिले नव्हते. परंतु कदाचित आपली गरज पाहून तो कर्ज देईल ही आशा धरून मंसूर चुलत्याच्या गावी निघाला. गाव दूर होते. वाटेत एका जागी संध्याकाळ झाली तेव्हां झाडा खालीच मंसूर उजाडेपर्यंत पडून राहला. उजाडल्यावर तो आपल्या चुलत्याच्या गावी येऊन पोचला. गावात पाऊल टाकतांच समोर एक मनुष्य दिसला. त्याला मंसूरने आपल्या चुलत्याचे नाव सांगून तो कोठे राहतो हे विचारले.

त्या माणसाने एका गल्लीकडे बोट दाखविले व म्हणाला—"त्या गल्लीत पुढे गेलास की एका घराच्या आवाराची पडकी भिंत दिसेल. घर सुद्धा पडकेच आहे." त्या माणसाने घराची खूण मंसूरला छान समजावून सांगितली.

मंसूरला पहिल्याने वाटले होते की त्याचा चुलता चांगला श्रीमंत असेल. परंतु घराचे वर्णन ऐकले त्यावरून तो थोडासा निराश झाला. त्याने प्रत्यक्ष जाऊन घर पाहिले तेव्हां त्याचा उरला सुरला उत्साह पण थंड पडला. घर नुसते पडकेच नव्हते तर दगड गोटे व कचऱ्याचा ढीग घराच्या चारी बाजूला पडला होता. घरासमोर एक पांढरे मरतुकडे गाढव बांधलेले होते. गाढवाने मंसूरकडे पाहिले. त्याची केविलवाणी दृष्टी जणू विचारीत होती—"मला खायला काही घालशील का?"

मंसूरला त्या गाढवाची दया आली. खायला न मिळाल्यामुळे तो अशक्य दिसत होता. मंसूर बाजारात जाऊन थोडेसे गवत विकत घेऊन आला आणि त्याने ते गाढवा समोर टाकले. गाढव मान हलवून उतावीळ पणाने ते गवत खाऊ लागला. नंतर मंसूर घरात जाऊन आपल्या चुलत्याला भेटला व सलाम करून आपली ओळख दिली. मंसूरला भेटून त्याच्या चुलत्याला आनंद झाल्याचे दिसले नाही. तो स्वतःच्या खाण्यासाठी बाजारातून पावरोटी घेऊन आला होता. त्याचा एक लहानसा तुकडा तोडून मंसूरला खायला देत म्हणाला—"मी गरीबीत दिवस कंठित आहे, बाळ!"

"काका मला थोड्या पैशाची गरज आहे, म्हणून आलो होतो, तुमच्याकडे कर्ज मागायला." मंसूर म्हणाला.

"माझ्याकडे आहेत कोठे पैसे कर्ज द्यायला? उरलेले दिवस अल्लाच्या कृपेने कसे जातात हे पाहतो आहे." चुलता म्हणाला.

दुसऱ्या दिवशी मंसूर निराश होऊन परत निघाला. तेव्हां त्याचा चुलता म्हणाला—"तू माझ्या बरोबर चल बाजारापर्यंत.



मी हे गाढव विकावे, म्हणतो. फुकटाचे खाते आहे. कामधाम काही नाही आणि गवताचा खर्च मात्र चालू आहे."

दोघे गाढवाला घेऊन बाजारात गेले. दहा तोळे चांदी देऊन लोक ते गाढव विकत घ्यायला तयार होते. पण ते गाढव मंसूरकडे सारखे पहात होते. जणुकाही ते त्याला सांगत होते—"तूच का नाही मला विकत घेत?"

म्हणून मंसूर चुलत्याला म्हणाला—"काका! मीच घेतो हे गाढव विकत."

"ठीक आहे, मग घे तेच! मी तुला फक्त वीस तोळे चांदी घेऊन गाढव द्यायला तयार आहे." चुलता म्हणाला.

चुलत्याजवळ घासघीस काय घालायची असा विचार करून मंसूर चुलत्याला म्हणाला–"काका, मला कबूल आहे. मग माझ्या घरी चला, वीस तोळे चांदी देतो."

चुलत्याने विचार केला, बरं झालं, काही दिवस फुकट खायला मिळेल, काय बिघडले? मंसूरने वीस तोळे चांदी आपल्या चुलत्याला दिली. आतां त्याच्याकडे फक्त दहा तोळेच चांदी उरली, म्हणजे त्याची गरज कमी होण्या ऐवजी वाढली.

मंसूरचा चुलता वीस तोळे चांदी घेऊन आपल्या गावी परतत असता चोरांनी त्याला लुटले व त्याला ठार केले.

चुलता मेल्याचे कळल्यावर मंसूर गाढवावर बसून चुलत्याच्या गावी आला. चुलत्याची अंत्येष्टी क्रिया करण्याची जबाबदारी त्याच्यावरच येऊन पडली. सर्व अंत्येष्टी क्रिया संपल्यावर मंसूरने सर्व घर हुडकून पाहिले. घरात काही मिळाले नाही.

तो घरी परतण्यासाठी तयारी करू लागला तेव्हां गाढव घराच्या भिंतीजवळ जाऊन एका जागी पायांनी जमीन उकरू लागले. ते पाहून मंसूरला वाटले कदाचित तेथे काही तरी असेल. म्हणून तो शेजारच्या घरी जाऊन कुदळ फावडे घेऊन आला आणि जमीन खणू लागला. एक फुटभर खणल्यावर जमिनीत पुरलेली एक पेटी त्याला दिसली. पेटीत पाच हजार तोळे तरी चांदी ठेवलेली दिसली. मंसूर आनंदाने उड्या मारू लागला. तो ती पेटी गाढवावर ठेवून आपल्या गावी परत आला. पाचशे तोळे चांदी काढून घेऊन त्याने प्रथम अमीनाच्या बापाला नेऊन दिली.

"ही सर्व त्या अल्लाची मेहरबानी आहे!" असे म्हणत अमीनाच्या बापाने चांदी ठेवून घेतली आणि अमीना बरोबर मंसूरने लग्न करून दिले.







# पडकें देऊळ

[ २४ ]

[पडक्या देवळाच्या पुजाऱ्याने व त्याच्या साथीदारांनी जांगलाला विरुपाच्या मगर-मिठीतून सोडविले. त्या दिवशी रात्री डोंगराच्या पायथ्याजवळ झोपत असलेल्या शिखीमुखला व त्याच्या अनुयायांना डम्बु जातीच्या लोकांनी धरून आपल्या गावात नेले. त्यांच्या नायकाने त्यांना पुजारी कोण असे शिखीमुख वगैरेंना विचारले. पुढे–]

डम्बु जातीच्या नायकाने शिखीमुख वगैरेंना जो प्रश्न विचारला तो ऐकून पडक्या देवळाच्या पुजाऱ्याला फार आनंद झाला. आता कालीमातेसमोर शिखीमुखाचे मुंडके वाहले जाणार आणि त्यानंतर विक्रमकेसरी व इतर दोघांना सहजी वाटेला लावता येईल, असा त्याने विचार केला. विचारल्या शिवायच मध्येच चोंबड्यासारखा तो म्हणाला–

"डम्बु कुलप्रमुखा! या लोकांना तो प्रश्न विचारण्याची गरजच काय? त्यांचा नायक कोण आहे हे दिसतेच आहे. शिखीमुख पडक्या देवळाचे नाव सांगून पैशाचा लोभ दाखवून या सर्वांना येथवर घेऊन आला आहे."

पुजारी जे म्हणाला ते डम्बु कुलप्रमुखाला आवडले नाही. त्याने फक्त एकदाच रागाने त्याच्याकडे पाहिले. डम्बु जातीच्या मांत्रिकाने



हातातल्या मंत्रदंडाने पुजाऱ्याला सावध केले व म्हणाला–"तुला मध्ये चोंबडेपणा करण्याची गरज नाही. आपली पायरी सोडून बोलण्याचे धाडस तू करू नकोस."

मांत्रिकाने मंत्रदंडाचे टोक पुजाऱ्याच्या पाठीत टोचून त्याला सावध केले होते. त्यामुळे जी थोडी कळ आली तीमुळे पुजाऱ्याचे हात सरळ पाठीवर गेले. इम्यु कुलप्रमुखाने शिखीमुख व विक्रमकेसरी दोघां कडे पुन्हा एकदा करड्या नजरेने पाहून तोच प्रश्न विचारला. विक्रमकेसरी काही बोलणार इतक्यात शिखीमुख त्याला मध्येच अडवून म्हणाला–"पुजारी म्हणाला तसा मीच यांचा नायक आहे. पण मी यांना पैशाचा लोभ दाखवून येथवर आणले, हे खोटे. आम्ही महाराज विक्रमकेसरींच्या शोधार्थ येथवर आलो आहो. ते इकडच्या मुलखात कोठे तरी आहेत असे आम्हाला कळले."

विक्रमकेसरी हे नाव ऐकताच इम्यु कुलप्रमुख थोडा दचकल्यासारखा चकित होऊन शिखीमुखकडे पाहू लागला. ते ओळखून पुजारी पुन्हा मध्ये तोंड खुपसून म्हणाला–"इम्यु कुलप्रमुखा! मी आपल्या परवानगीने बोलू इच्छितो. महाराज विक्रम-केसरींची गोष्ट आता इतिहासजमा झाली आहे. या लोकांनी त्यांचे नाव कोठे तरी ऐकले. त्यांच्या नावाचा उपयोग करून दुसऱ्यांना फसवायचा डाव आहे या लोकांचा. पडक्या देवळाचा सोन्याचांदीवर यांची नजर आहे."

इम्यु नायक दोन एक मिनिटे काहीच बोलला नाही. नंतर शिखीमुखला म्हणाला–"तुम्ही कोण काय हे मला सर्व काही माहीत आहे. तोंडाची बडबड थांबव आणि तुमचा नायक कोण आहे, बोल."

"मी नायक आहे, मी नाही का सांगितले. माझे नाव शिखीमुख." असे म्हणत शिखीमुख एक पाऊल पुढे गेला.



विक्रमकेसरी शिखीमुखचा खांदा हलवून थोडा रागातच म्हणाला–"मी क्षत्रिय कुळात जन्मलो आहे. हा रानटी जातीचा मनुष्य आमचा नायक कसा काय होणार? या तिघांचा नायक मी आहे. माझे नाव विक्रमकेसरी. कालीमातेच्या चरणी माझा बळी द्यावा. परंतु मी बळी जाण्यापूर्वी तुमच्यापैकी दोघांतिघांचा बळी देऊनच बळी जाईन."

पुजारी मोठ्याने हसला–"कसली भामटेगिरी आहे ही! स्वतःला विक्रमकेसरी म्हणून साफ खोटे बोलतो आहे, आणि वर इम्यु जातीच्या दोघांतिघांचा बळी घेईन म्हणतो आहे!"

विक्रमकेसरी जे म्हणाला ते ऐकून इम्यु जातीचा नायक संतापला. त्याने आपल्या अनुयायांना सावध केले व म्हणाला–"हे दोघेही लबाड दिसताहेत. दोघांचा बळी कालीमातेच्या चरणी वाहून टाका. नंतर बाकी दोघांच्याविषयी काय ते ठरवू. चला कालीच्या देवळात." असे सांगून इम्यु जातीचा नायक आपल्या आसनावरून उठून निघून गेला.

शिखीमुख व विक्रमकेसरी दोघांना परस्परांकडे पाहिले. आता या इम्यु नायकाशी बोलत राहण्यात काही अर्थ नाही असे दोघांना वाटले. आपण मरणार हे निश्चितच आहे. परंतु आपल्या बरोबर अजित व वीरभद्र दोघांचा जीव फुकटात जाणार याचे त्यांना दुःख वाटले.

इम्यु नायकाबरोबर इतर सर्व लोक गोल झोपडीच्या बाहेर आले आणि एका मोठ्या रस्त्याने चालत गावाबाहेर एका उंचवटप्यावर बांधलेल्या कालीमातेच्या देवळात आले.

इम्यु मांत्रिक अपल्या हातात तलवार घेऊन कालीमातेच्या भयंकर मूर्तीसमोर जाऊन उभा राहिला आणि मोठमोठ्याने



मंत्र म्हणू लागला. नंतर शिखीमुख व विक्रमकेसरी दोघांचे हात सोडून त्यांना देवीसमोर उभे करायला त्याने पहारेकऱ्यांना सांगितले.

मांत्रिकाची आज्ञा होताच पडक्या देवळाचा पुजारी आनंदाने नाचू लागला. त्याने इम्यु नायकाजवळ जाऊन त्याला सल्ला दिला की शिखी व विक्रम दोघ्या बरोबर त्यांच्या दोघां साथीदारांना सुद्धा बळी दिल्यास देवी जास्त खुष होईल. इम्यु नायकाने होकारार्थी फक्त मान हलविली. त्याची नजर विक्रमकेसरीवर खिळली होती. त्याच्या चेहऱ्यात कोणत्या तरी ओळखीच्या माणसाचे साम्य असल्याचा त्याला भास झाला.

डोंगराच्या पायथ्याजवळ ज्या इम्यु नायकाने शिखी व विक्रम दोघांना जाळ्यात पकडून कैद केले होते त्याने दोघांना खांद्याला हात घालून समोर ढकलले. हात मोकळे होताच संधी साधून त्याच वेळी विक्रमने त्या इम्यु कुल नायकाच्या तोंडावर एक जोराने ठोसा दिला.

ठोसा लागल्याने तो इम्यु नायक पाठी-मागे जमिनीवर आदळला. त्या वेळी शिखीमुखने मांत्रिकाला जोराने लाथ मारली. मांत्रिक 'ओय' 'ओय' असा ओरडत जमिनीवर पडला. त्याच्या हातातली तलवार एका बाजूला जाऊन पडली. शिखीमुख चटकन पुढे होऊन ती तलवार हातात घेणार इतक्यात दोघां इम्यु जातीच्या नोकरांनी व पुजाऱ्यांनी शिखीमुखचे दोन्ही हात घट्ट धरून ठेवले. विक्रम त्याच्या मदतीला पुढे जाण्याच्या विचारातच होता तेव्हां तिघां चौघां इम्यु नोकरांनी त्याला जाऊन धरले.

हे सर्व पाहून इम्यु कुलनायकाला भयंकर आश्चर्य वाटले व राग पण आला. तो तावातावाने मीशांवर ताव देत शिखीमुखच्या जवळ गेला आणि त्याची मान धरून ओरडला—"कालीमातेसमोर तू जो अपराध केला आहेस त्याबद्दल तुझ्या डोक्याच्या ठिकऱ्या उडवून तिला वाहतो पहा आणि या विक्रमकेसरीला पण......"

इम्यु कुल नायकाने असे म्हणत शिखी-मुखच्या मानेवर हात ठेवला. तेव्हां शिखीमुखने एका हिसक्यात आपली मान सोडवून घेतली. ओढाताण करीत असता शिखीमुखच्या गळ्यात बांधलेले ताईतवजा पदक तुटले आणि इम्यु कुलनायकाच्या हातात आले. त्या पदकावर कालीची मूर्ती कोरलेली पाहून इम्यु कुलनायक चकित होऊन पदकाकडे पहात म्हणाला—"या दोघांच्या केसालादेखील धक्का लावू नका. मी हे काही विचित्रच पहातो आहे." असे म्हणत त्याने ते पदक मागून पुढून छान तपासून न्याहाळून पाहिले.

पडक्या देवळाचा पुजारी कालीमातेसमोर कुठेतर शिखीमुख व विक्रमची मुंडकी केव्हां व कशी लोळतात हे पाहण्यासाठी उतावीळ झाला होता आणि इम्यु कुलनायकाने त्याच्या आशेवर पाणीच फिरविले पुजारी मागेपुढे भीत भीत करीत इम्यु कुलनायका जवळ येऊन पाठीमागून ते पदक पर्यंत दात ओठ चावून मोठ्याने ओरडून म्हणाला—





"इम्यु कुल नायका! यात काहीतरी लबाडी आहे. देवीचा हा घोर अपमान आहे. या देवळातल्या देवीची फक्त नक्कलच या नास्कांनी केली नाहीं तर ती गळयात बांधून तिचे भक्त म्हणून मिरवीत पण आहेत." इतके म्हणून पुजाऱ्याने शिखीमुख-वर झडप मारली.

इम्यु कुलनायकाने त्याला दूर ढकलले व म्हणाला—"आपल्या तोंडाची बडबड बंद कर रे!" नंतर शिखीमुखकडे वळून विचारले—"तुला हे पदक कोठे मिळाले रे?"

शिखीमुख चिडला होता. म्हणून रागा-रागातच म्हणाला—"तुला काय ते करायचे? या तांब्याच्या तुकड्यासंबंधी तू समजण्या-उमजण्यासारखे काही नाही."

"लबाड नास्तिका! याला तांब्याचा तुकडा म्हणतोस? तू देवीचा अपमान करतो आहेस. अरे, पाहता काय? याचे डोके उडवा." पडक्या देवळाचा पुजारी गरजला.

इम्यु कुलयायकाने डोळे वटारून पुजाऱ्याकडे एकदाच पाहिले व म्हणाला—"इम्यु जातीचा आहेस. परंतु तू क्षुद्र देवी देवतांची आराधना करून क्षुद्र मांत्रिक शक्ती मिळविली आहेस. म्हणूनच मी तुला जातीबाहेर काढले होते आणि आतां तू आमच्यावरच आपला अधिकार गाजवू इच्छितोस? थांब, कालीमातेच्या पायावर प्रथम तुझेच मुंडके वाहतो."

पुजारी चपापला. त्याने मागे वळून आपल्या अनुयायांना खूण केली. त्याच्या रक्षणार्थ सर्व त्याच्या चारीबाजूला येऊन उभे राहले.

शिखीमुखला एकदम झालेला हा बदल प्रथम कळला नाही. इम्यु कुलनायक पदक न्याहाळून पहात होता. तेवढ्यात शिखी-मुखला आठवले, ते पदक विक्रमकेसरीच्या आजोबांच्या ताडपत्रे ठेवलेल्या पेटीत होते. हे पदक आपले रक्षण व्हावे या साठीच तर आपल्या गळयात बांधले होते. मग आपल्याला कसलीच भीती नाही.

विक्रम कोणत्यातरी विचारात गढून गेला होता. शिखीमुख इम्यु कुलनायकाला म्हणाला—"इम्यु कुलनायका! तुझ्या हृदयात मानवत्व जिवंत आहे, हे पाहून आम्हां दोघांना आनंदच झाला. हा पुजारी एक पाताळयंत्री माणूस आहे. हे पदक आमच्या महाराजांना विक्रमकेसरींना कोणी तरी भेट म्हणून दिले होते. ते त्यांनी आपल्या ताडपत्रांच्या पेटीत संभाळून ठेवून दिले होते. ते काढून त्यांचे चिरंजीव महाराज जयपाळ यांनी स्वतःच्या हाताने ते माझ्या गळयात बांधले."

ते ऐकून इम्यु कुलनायक जास्तच चकित झाला. त्याने पुन्हा एकदां लक्ष देऊन शिखी व विक्रमकेसरी दोघांकडे पाहिले आणि उडी मारून विक्रमकेसरी जवळ जाऊन त्याला प्रेमादराने आलिंगन देऊन म्हणाला—"म्हणजे तू महाराज विक्रमकेसरींचा नातू आहेस तर! आमच्या जातीचे लोक एकदा पटकीच्या भयंकर आजाराने पटापट मरत असतां त्यांनीच आम्हांला वांचविले. त्यांच्या कुलदीपकाचा वध माझ्या हातून झाला असता तर मला केवढे मोठे पातक लागले



असते." असे बोलत असतां त्याच्या डोळयातून घळघळा पाण्याच्या धारा वाहू लागल्या.

इम्यु कुलनायकाच्या तोंडचे ते शब्द ऐकून सर्व इम्यु जातीच अपराध्यासारखे विक्रमकेसरी व शिखीमुखच्या समोर येऊन उभे राहले.

इम्यु कुलनायकाने शिखीमुखला जवळ बोलाविले व त्याच्या गळयात ते पदक पुन्हा बांधीत म्हणाला—"तुम्ही ज्या कामा करिता आला आहां ते मला माहीत आहे. तुम्ही महाराजांच्या शोधार्थ आला आहां. पण ते एका भयंकर आजाराने आजारी

पडून मरण पावले. म्हणून त्यांचा मृतदेह आणवून आम्ही आमच्या पूर्वजांच्या थडग्या जवळ पुरला व त्यावर एक समाधी बांधली. मीच हे पदक त्यांना आमची प्रेमाची भेट म्हणून दिले होते."

ते सर्व ऐकून स्मित करून शिखीमुख म्हणाला–"आम्ही काय म्हणत होतो ते सर्व ऐकण्यापूर्वीच आम्हांला बळी द्यायचे तुम्ही ठरविलंत. तुमच्या मनात कारण विष कालवणारा विषारी नाग तो पुजारी! तो तुमचा व आमचा शत्रू आहे."

इम्यु नायक आपल्या अनुयायांकडे वळून म्हणाला–"कोठे आहे तो दुष्ट? आणा धरून त्याला. त्यालाच बळी देऊ या."

इम्यु लोकांनी सर्व देऊळ हुडकून पाहिले पण पुजारी कोठे दिसला नाही. इम्यु नायकाबरोबर सर्व ओरडून म्हणाले–"पकडा त्या गुलामाला." आणि सर्व देवळाबाहेर आले.

कालीच्या देवळाला लागून पलीकडे एक डोंगर होता. त्याच्या टोकाला पुजारी व त्याचे अनुयायी पळून गेले होते. इम्यु कुल नायक व त्याच्या अनुयायांकडे पाहून पुजारी राक्षसी हास्य हसला व म्हणाला–"मंत्रबळावर जगणारा मी तुमच्या हातात सांपडेन असे वाटले होय तुम्हांला? पडके देऊळ कोठे आहे हे मला इतक्या वर्षांनंतर कळले आहे. असेल हिंमत तर येथे येऊन भेटा आम्हांला. तेथेच आपण परस्परांचे कर्ज फेडू."

इम्यु कुलनायक म्हणाला–"या दुष्टाला जो जिवंत धरून आणील त्याच्याशी मी माझ्या दहाव्या बायकोच्या मुलीचे लग्न करून देईन."

ते ऐकून इम्यु जातीची तरुण मंडळी पुजारी उभा होता त्या डोंगरावर चढून जाण्यासाठी धावली.

(पुढील गोष्ट पुढील अंकी)



# दैवाचा खेळ

विक्रमादित्य पुन्हा झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौनपणे स्मशानाच्या दिशेने चालू लागला तेव्हा प्रेतात असलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा! मनुष्य आपले नशीब पालटण्याचा प्रयत्न करतो, तो व्यर्थच असतो. त्याचे उदाहरण म्हणून मी गुणांक राजाची गोष्ट सांगतो. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला–

लावण्यपूरचा राजा गुणांक शिकार करीत असता वाट चुकून जंगलात कोठेतरी गेला. इतक्यात काळोख पडला. म्हणून त्याला जंगलातच एका भिल्ल शिकाऱ्याच्या घरी आश्रय घ्यावा लागला. त्या झोपडीत शिकारी, त्याची बायको व सात दिवस पूर्वीच जन्मलेली एक मुलगी होती.

शिकाऱ्याने राजाला ओळखले नाही. परंतु त्याने अतिथी म्हणून राजाचा सत्कार

## वेताळाच्या गोष्टी



केला. त्याच्या कडे जी मीठ भाकर होती ती त्याला खायला दिली व त्याला झोपण्या-साठी जंगली जनावरांची कातडी अंथरून दिली. मखमली गादीवर झोपणाऱ्या राजाला त्या खडबडीत जागी बराच वेळ झोप आली नाही. पण मध्य रात्र उलटल्यावर झोप लागली. झोपेत त्याला एक स्वप्न पडले. स्वप्नात त्याला कोणी म्हटले–"राजा, या झोपडीत जन्मलेली लहान मुलगी तुझी सून होणार आहे. ती एक सुंदर मुलगी होईल."

राजा दचकून उठला. भिल्ल शिकाऱ्याची पोर माझी सून! जिवात जीव असेपर्यंत ही गोष्ट अशक्य. तसे दैवात लिहिले आहे तर ते बदलण्याची शक्ती आपल्या अंगात आहे.

सकाळी राजा आपल्या राजधानीला निघाला तेव्हां तो शिकाऱ्याला म्हणाला–"मी या देशाचा राजा आहे. तुझ्या मुलीला या जंगलात काय सुख मिळणार? तू तिला माझ्याकडे पोचती केलीस तर तिला मी राजकन्येसारखी वाढवीन आणि अशातऱ्हेने तुझ्या उपकाराची फेड पण होईल."

राजा म्हणाला ते ऐकून शिकारी मागे पुढे करू लागला. स्वत:ला सावरून थोड्यावेळाने म्हणाला–"महाराज, जशी आपली मर्जी!" राजा तिला लगेच घेऊन जायला तयार झाला. शिकाऱ्याच्या बायकोने मुलीला आणून राजाच्या हातात दिले. राजा त्या तान्ह्या मुलीला घेऊन निघाला. थोडे अंतर चालून गेल्यावर राजाने त्या मुलीला एका झुडपात फेकून दिले व स्वत:शीच म्हणाला–"पाहतो आता, तू माझी सून कशी होतेस ती!"

थोड्या वेळाने एक शेतकरी त्या झुडपाजवळून जात असता त्याला तान्ह्या मुलाचे रडणे ऐकू आले. त्याला मूल बाळ नव्हते. कापडात गुडाळलेल्या मुलीला पाहून त्याला परमानंद झाला. त्याने मुलीला घरी नेऊन बायकोच्या हातात दिले व मुलीचे नाव 'वाणी' असे ठेवले.

एकदा राजा आपल्या राज्याची पाहणी करीत त्या शेतकऱ्याच्या गावी आला. शेतकऱ्याने राजाला आपल्या घरी बोलावून नेऊन चांगले दूध प्यायला दिले. राजाने शेतकऱ्याच्या घरी वाणीला पाहून म्हटले–"तुझी मुलगी खूप सुंदर दिसते, बरं का!"

शेतकरी म्हणाला–"महाराज, ही माझी स्वत:ची मुलगी नाही. जंगलातल्या एका झुडपात मिळाली. कोणीतरी तिला तेथे टाकले होते. तरी आम्ही तिला स्वत:च्या मुलीसारखीच वाढवीत आहो."

राजाचे सर्व शरीर वर पासून खालपर्यंत हादरले. ती मुलगी मेली असावी असे त्याला वाटत होते. परन्तु दैवगती विरुद्ध दसते. ती बदलली पाहिजे. असा विचार करून राजा शेतकऱ्याला म्हणाला–"मी या मुलीला घेऊन जातो. आमच्या अंत:पुरात दासदासी तिला वाढवितील. नेऊ का मग तिला?" राजानेच विचारले म्हणून इच्छा नसून ही राजाच्या भीतने शेतकरी म्हणाला–"महाराजांची मर्जी!"

राजा वाणीला बरोबर घेऊन निघाला. थोडे अंतर चालून गेल्यावर वाटेत एक नदी लागली. राजाने मुलीला नदीत फेकून दिले



तो आपल्या मुलाला म्हणाला–"मुला! या मुलीशी लग्नाला माझी परवानगी नाही. तू गादीला वारस आहेस. अशा परिस्थितीत ज्या मुलीचे जातगोत माहीत नाही अशा मुलीशी पुढे राजपदाचा अधिकारी असलेल्या युवराजाने लग्न करणे मुळीच इष्ट नाही."

युवराजाला बापाचे म्हणणे मुळीच पटले नाही. तो म्हणाला–"मी वाणीशी लग्न केल्यामुळे मला सिंहासन मिळणार नसेल तर त्या सिंहासनाचा त्याग करायला मी तयार आहे. मी ज्या मुलीशी विवाह करण्याचे ठरवून तिला मनाने वरले आहे, तिच्याशीच लग्न करणार. मी असे ही सांगू इच्छितो की मी स्वतः तुम्ही परत प्रेमाने बोलावीपर्यंत या राज्यात पाऊलदेखील टाकणार नाही.'

आपण दैवगतीशी लढण्यात हारलो. हे राजाला कबूल करावे लागले. म्हणून तो राणीसह लग्नाला हजर झाला. बोहल्यावर वधूला पाहून राजाला आश्चर्य वाटले. कारण वाणीसारखी सुंदर राजकन्या आपली सुनबाई म्हणून आल्याबद्दल त्याला राग येण्या ऐवजी आनंदच झाला. इतकी सुंदर राजकन्यातरी दुसरी कोठून मिळणार? आपण इतके दिवस या मुलीशी आपल्या



मुलाचा विवाह होऊ नये या साठी जे जे प्रयत्न केले ते सर्व फुकट व अनावश्यक होते असे पण त्याला वाटले. विवाह समारंभ संपल्यावर राजा युवराज व युवराणी दोघांना प्रेमाने राजधानीस घेऊन आला. शिकारी व त्याच्या बायकोला राजा आदरपूर्वक स्वतः जाऊन बोलावून घेऊन आला व म्हणाला– "ही पहा तुझी मुलगी! आज माझी सून झाली आहे."

त्यानंतर राजाने शेतकऱ्याला व त्याच्या बायकोला बोलावून सांगितले, तुम्ही ज्या तान्ह्या मुलीला वाचवून लहानपणी प्रेमाने तिचे पालन पोषण केलेत तीच ही मुलगी. मी तिच्याशी आपल्या युवराजाचे लग्न करून दिले आहे. राजाने शिकारी व शेतकरी दोघांच्या राहण्याची व्यवस्था राजधानीत करून दिली.

येथवर गोष्ट सांगून वेताळ राजाला म्हणाला–"राजा, दैवगती टाळणे शक्य नाही हे माहीत असून ती पालटण्याचा प्रयत्न त्या गुणांक राजाने का केला? ती बदलण्याची शक्ती मनुष्याच्या हातात आहे की नाही हे आजमावण्यासाठी का? मग त्याने दैवगतीसमोर शेवटी अशी मान का वाकविली? या शंकांचे समाधान माहीत असून तू करून दिले नाहीस तर परिणाम तुला माहीत आहेच, तुझ्या डोक्याची शंभर छकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील."

त्यावर विक्रमादित्य म्हणाला–"मनुष्य जितके प्रयत्न व परिश्रम करतो स्वतःची इच्छा पुरी व्हावी यासाठी करतो. समर्थ व्यक्ति कोणासमोर मानतुकवीत नाही. गुणांक राजाला दैवगतीची कल्पना पहिल्या-नेच कळली होती. म्हणून त्याने ती बदलण्याचा प्रयत्न केला. शिकाऱ्याची मुलगी त्याची सून होणार आहे हे कळले नसते तर कोणी चकारशब्द बोलला नसता. त्यावेळी वाणी राजाची सून शोभण्यालायक लावण्यवती पण होती व राजाच्या घरात वाढली होती. पण शिकाऱ्याच्या घरची ती तान्ही मुलगी त्याच्याच घरी वाढून राजाची सून होण्यालायक झालीच असती हे सांगणे कठीण आहे. राजाने न कळत तिला आपली सून होण्यालायक परिस्थिति निर्माण करून दिली. म्हणजे राजा न कळत दैवगतीच्या हातचे खेळणे होऊन बसला."

अशातऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेताबरोबर अदृश्य झाला आणि जाऊन त्या झाडाला लोंबकळू लागला.

(कल्पित)





# सर्वनाश

शबरवनात एक शेतकरी रहात असे. शेती करण्यालायक जमीन कोठे आहे का पहात तो जंगलात फिरत असता त्याला एका जागी मका व सुरण यांची लागवड करण्यास उपयोगी जमीन दिसली. जवळ नदी पण होती. त्या जागेला लागून डोंगर होते. त्या नदीच्या उत्तरेकडे एक जंगल होते.

दुसऱ्या दिवशी तो शेतकरी त्या जमिनी-तली झाडे झुडपे कापून जमीन खणून काढण्यासाठी कुऱ्हाड व कुदळ फावडे घेऊन तेथे आला. तो एक झाड तोडू लागला.

"कोण झाड तोडते आहे?" त्याला हा प्रश्न करणारा आवाज कोठून तरी ऐकू आला.

शेतकऱ्याने चारही बाजूला नजर फिरवून पाहिली. पण त्याला कोणी दिसले नाही. त्याला आश्चर्य वाटले. पण कदाचित आपल्याला भ्रम झाला, असेल असे समजून तो पुन्हा झाड तोडू लागला.

"कोण झाड तोडते आहे?" पुन्हा तोच आवाज ऐकू आला. या खेपेस तो आवाज त्याला दक्षिणेकडून ऐकू आला.

"मी एक शेतकरी आहे. शेजारच्या खोऱ्यात राहणारा. शेतीसाठी झाडी छाटून जमीन तयार करीत आहे." शेतकऱ्याने साहस करून उत्तर दिले.

"ठीक, तरमग आम्ही सुद्धा तुला मदत करू." असा अनेकांच्या तोंडचा आवाज ऐकू आला.

दुसऱ्या क्षणाला त्याला हे पाहून आश्चर्य वाटले की झाडे पटापट मुळापासून उपळून जमिनीवर आदळू लागली आणि पाहता पाहता त्याला शेतासाठी हवी होती तेवढी जमिनीची पट्टी साफ व समतल झालेली दिसली.

घडीत दोन घटकांतच जमीन तयार झालेली पाहून शेतकऱ्याला आश्चर्यच वाटले. कृतज्ञता व्यक्त करण्यासाठी जंगला-कडे पाहून तो म्हणाला—"तुमचे उपकार मी जन्मभर विसरणार नाही." अन् आपल्या घरी गेला.

शेतकऱ्याच्या बायकोने पान वाढले व विचारले—"काम कोठवर आले आहे?"

"काम म्हणतेस? मी आयुष्यभरात इतके काम केले नाही." शेतकरी म्हणाला.

"शेत कोठे तयार करता आहां?" शेतकऱ्याच्या बायकोने विचारले, पण त्याने काही उत्तर दिले नाही.

दुसऱ्या दिवशी शेतकरी गवत व काटक्या शेतात जाळू लागला.

"अरे गवत व काटक्या कोण जाळतो आहे?" कोणीतरी विचारले.

"मी शेतकरी आहे, वाळलेले गवत व काटक्या जाळीत आहे." त्याने उत्तर दिले.

"आम्ही करतो तुला मदत." या खेपेस पण अनेक आवाज ऐकू आले.

दुसऱ्या क्षणाला सर्व कचरा, गवत व पाचोळा जमा झाला व त्याला आग लागली. शेतकऱ्याने सर्व त्याच्या इच्छे-प्रमाणे झाले म्हणून घरी निघतांना त्याला मदत करणाऱ्यांचे आभार मानले.













तिसऱ्या दिवशी शेतकरी झाडांच्या फांद्या तोडून त्यांच्या मोळ्या रचून ठेवू लागला.

"कोण तोडतो आहे लाकडे?" एकदम अनेक आवाज ऐकू आले.

"मी शेतकरी आहे. जळणासाठी लाकडे तोडून जमा करतो आहे." शेतकरी म्हणाला.

दुसऱ्या क्षणाला लाकडांच्या मोळ्या बांधून तयार झाल्या. नंतर शेतकरी झाडांची मुळे खणून काढण्यासाठी कुदळ हातात घेऊन खणू लागला. त्या बरोबर एकदम कित्येक कुदळींनी खणण्याचा आवाज त्याला ऐकू आला. थोड्या वेळात सर्व झाडांची पाळेमुळे खणून निघाली.



एक दिवशी शेतकरी शेत नांगरू लागला. थोड्याच वेळात सर्व शेत नांगरून झालेले त्याला दिसले. अर्ध्या शेतात त्याने मका व अर्ध्या शेतात सुरण लावण्याचा विचार केला. पण कामाला सुरवात करण्यापूर्वीच मका व सुरण लावून झालेला दिसला.

त्यानंतर शेतकरी रोज शेतात जाऊ लागला. मक्याचे पीक छान वाढले होते व सुरण पण छान माजला होता. हिरवेगार शेत व डौलदार कणसे पाहून शेतकऱ्याला फार आनंद झाला. त्याला कधी शेताकडे लक्ष देण्याची गरज पडली नाही. कारण ते काम आधीच कोणीतरी पुरे करून टाकीत असे.

शेतकऱ्याच्या बायकोला वाटू लागले की जंगल कापून इतक्या लवकर लागवड कशी झाली व पीक कसे उभे तयार दिसू लागले? म्हणून ती नवऱ्याला म्हणाली—"मी शेत पाहायला यावे म्हणते."

"शेत पाहायला तू येण्याचे कारणच काय, मी म्हणतो?" शेतकऱ्याने रागावून विचारले. कारण त्याला वाटत होते की आपण बायकोला घेऊन गेलो तर



त्याची झोप मोडली तेव्हा त्याला त्याचे साथी मित्र कोणीच दिसले नाही. बंदरात जहाज पण नव्हते. दूर समुद्रात त्याचे जहाज व जहाजाची मोठमोठी शिडे त्याला दिसली. जहाजातले लोक सिंदबाद मागे राहिला असेल ही गोष्ट पार विसरून गेले.

सिंदबादचा धीरच खचला. त्याचा सर्व माल त्या जहाजावर होता आणि तो एकटा त्या निर्जन बेटावर राहिला होता. त्याला आपल्या विचित्र दैवगतीचे आश्चर्य वाटत होते. प्रत्येक वेळी भाग्य असे पाठ फिरवू लागले तर माणसाने तरी काय करावयाचे? मागच्या खेपेला आपण कसे तरी सुखरूप स्वदेशी पोचलो. या खेपेस पोचू का? पण याचे उत्तर तरी काय मिळणार?

त्याला स्वत:च्या या दीनवाण्या स्थितीबद्दल रडू कोसळले. त्याने आपले कपाळ बडवून घेतले. बगदादला चैनीत मुलांबाळांबरोबर आपण रहात होतो आणि पुन्हा परदेश पाहण्याची दुर्बुद्धी आपणांस कोठून व कशी काय झाली? आता नशिबात असेल ते भोगावेच लागेल.

अशा तऱ्हेने स्वत:च्या नशिबाला दोष देत तो बराच वेळ एका जागी बसून राहिला. नंतर थोडा धीर धरून ज्या बेटावर तो उतरला आहे होता, त्यावर पाणी व अन्न पोटभर मिळेल की नाही हे तरी पहावे असा विचार करून तो बेटावर हिंडू लागला. झाडावर फळे खूप होती. परंतु त्याच बरोबर त्याला एका गोष्टीची भीती वाटू लागली. या बेटावर जंगली श्वापदे तर नसतील? एखादे जनावर समोर येऊन उभेच राहिले तर काय करावयाचे? म्हणून तो एका उंच झाडावर चढला व नजर जात होती तितक्या दूर पाहून कोणी क्रूर जनावरे तर नाहीत ना कोठे, हे पाहू लागला.

आलेल्याला मदत करणारे देव कदाचित रागावतील.

एक दिवशी पीक तयार होऊन कापणीची वेळ झाली असे शेतकऱ्याला वाटले. मेहनतीचे फळ मिळण्याची वेळ जवळ आल्याचे पाहून त्याला फार आनंद झाला.

त्याच विचारात तो गाणे म्हणत घरी पोचला तेव्हा बायको पुढे येऊन त्याला म्हणाली–"काय पण सुंदर गोड गाणे म्हणता आहां. पण आज सैपाकाला लाकडेच कोठे आहेत? जाऊन लवकर लाकडे आणून द्या, मग बसा गात पाहिजे तितका वेळ!"

"शेतीत जाऊन पहा, वाळलेल्या काटक्या खूप पडलेल्या मिळतील. जाऊन घेऊन ये. हे काम पण आता मीच करायाचे का?" शेतकरी थोडा रागारागानेच म्हणाला.

"तुम्ही शेतासाठी झाडी नाही का तोडली? मग वाळकी लाकडे वेचून आणायची गरजच काय? तुम्ही आता मला तरी सांगाना शेत कोठे आहे ते, नाहीतर मी निघून जाईन माहेरी." बायको म्हणाली.

"सांगेन, का नाही सांगणार? ते एखादे गुपित थोडेच आहे." असे सांगून शेतकऱ्याने शेताच्या खाणाखुणा बायकोला नीट समजावून सांगितल्या व म्हणाला–"हे



नाहीतर सैपाकाला उशीर लागेल. आणखी एक गोष्ट लक्षात ठेव, कोणी काही अदृश्य राहून विचारले तर त्याचे काही उत्तर देऊ नकोस. जणूकाही तुला ऐकूच आले नाही असे सोंग कर."

शेतकऱ्याच्या बायकोने शेत पाहिले. पीक छानच आले होते. तिने मक्याचे एक कणीस तोडून पाहिले आणि अजून तयार न झाल्यासारखे तिला वाटले.

इतक्यात तिला एक आवाज ऐकू आला– "कोण तोडते आहे कणसे?"

नवऱ्याने तिला बजावून ठेवले होते तरी विसरून ती म्हणाली–"तू कोण रे विचारणारा? हे शेत आमचे आहे!"

त्याच वेळी शेतकऱ्याच्या बायकोची नजर सुरणाच्या शेतावर पडली. तिने सुरणाचे कांदे हातात आले तेवढे उपटून घेतले.

"सुरण कोण उपटतो आहे?" एक आवाज आला.

"मी माझ्या शेतातला सुरण उपटत आहे. तू कोण रे विचारणार?" शेतकऱ्याच्या बायकोने विचारले.

"ठीक, तर मग आम्ही सुद्धा तुझ्या मदतीला येतो." अदृश्य व्यक्तीचा आवाज ऐकू आला.

दुसऱ्या क्षणाला सर्व कणसे कापून त्यांचा ढीग पडलेला दिसला व दुसरीकडे सुरणाचे कांदे उपटून एका जागी जमा झालेले दिसले.

ते पाहून शेतकऱ्याची बायको घाबरून गेली. लाकडे गोळा करायला गेली होती ती राहली बाजूला. ती विमनस्कच गेली. सरळ घरी पळत गेली. नवऱ्याने तिला घरी येण्याचे कारण विचारले. पण तिच्या तोंडातून एक शब्द देखील उमटला नाही. शेतकऱ्याने शेतात जाऊन पाहिले, शेताचा सर्वनाश झाला होता.





# पैशाचे जाळे

एका गावी एक शेतकरी राहत असे. त्याला तिघे मुलगे होते. काही दिवसांनी तो शेतकरी व त्याची बायको इहलोकाची यात्रा संपवून परलोकी निघून गेले. तेव्हा मोठा मुलगा म्हणाला–"माझा वाटा म्हणून मी हे घर घेतो."

दुसरा म्हणाला–"मग माझा वाटा शेत राहील."

"मग माझ्या वाट्याला?" तिसऱ्या मुलाने विचारले.

सर्व घर हुडकल्यावर माळ्यावर एक मोठे दोरीचे वेटोळे मिळाले. "तू ही दोरी घेऊन जा. तो तुझा वाटा!" दोघा मोठ्या भावांनी तिसऱ्याला सांगितले.

धाकटा भाऊ गाव सोडून जाऊ लागला तेव्हा वाटेत त्याला एक जंगल लागले. त्याने दोरीचे एक जाळे विणून त्यात ससा व खार धरली. काटक्या व बांबूच्या काटक्यांचे लहान लहान पिंजरे करून त्यांत त्यांना ठेवले. नंतर तो थोडा पुढे गेला तेव्हा त्याला एक तळे लागले. जवळच वाढीस विरणारे एक असलपण त्याला दिसले.

दोरीची आणखी एक दोन जाळी विणून लहान मोठी जनावरे धरता येतील, असा विचार करून तो एका झाडाखाली बसून जाळी विणू लागला.

त्या तलावात एक राक्षस राहत असे. त्याने पाण्या बाहेर डोके काढून झाडाखाली बसलेल्या धाकट्या भावाला पाहिले. तो काय करतो आहे हे त्या राक्षसाच्या लक्षात आले नाही.

राक्षस पाण्याच्या तळाला निघून गेला. त्याने आपल्या मुलाला हाक मारली व म्हणाला–"बाळा! तलावाच्या काठी बसून एक तरुण मुलगा काम करतो आहे ते पाहून मला सांग."



राक्षसाचा मुलगा तलावाच्या बाहेर आला आणि धाकट्या भावाजवळ जाऊन त्याने विचारले–"काय रे, तू येथे बसून काय करतो आहेस?"

धाकट्या मुलाने मान वर करून पाहिले. समोर पाण्यातला राक्षस उभा आहे, हे त्याने ओळखले. त्याने पूर्वी पाण्यातल्या राक्षसांविषयी ऐकले होते. ते त्याला आठवले. ते स्वभावाने मूर्ख असतात. त्यांच्या समोर कोणी त्यांना व घाबरून वागला तर त्यांच्या हाती त्याचे मरण जवळ आले समजावे. म्हणून तो निधडेपणे म्हणाला–"तुला दिसत नाही काय? मी जाळे विणतो आहे. मी हे तलावात टाकून हे तळे पकडणार आहे. तुम्ही हे तळे सोडून दुसरीकडे निघून जा."

राक्षसाचा मुलगा बापाकडे निघून गेला व म्हणाला–"बाबा! तो म्हणतो आहे की मी जाळे विणतो आहे आणि ते तलावात टाकून तलाव त्यात धरणार आहे. म्हणून आपण दुसरीकडे निघून जावे असे."

"होय का? तू त्याला जाऊन सांग की त्याने तुझ्याबरोबर झाडावर चढण्या-उतरण्याची चढाओढ लावावी. तो नक्कीच हरेल. तो झाडावर चढला म्हणजे त्याला तलावात ढकल." राक्षस मुलाला म्हणाला.

राक्षसाचा मुलगा तलावाबाहेर येऊन धाकट्या भावाला असे म्हणाला.

"अरे, तुला दिसत नाही काय? मी कामात गुंतलो आहे. पाहिजे तर मी माझ्या धाकट्या भावाला तुझ्या बरोबर चढाओढ करायला पाठवतो." असे सांगून त्याने पिंजऱ्यातून खारीला बाहेर काढले. राक्षसाच्या मुलाची नजर तिच्यावर पडण्या पूर्वीच ती 'टुण्' दिशी उडी मारून झाडाच्या टोकाला जाऊन बसली. राक्षसाच्या मुलाने बापाला स्वतः हारल्याचे सांगितले.











आपल्याकडची सोन्याची नाणी टोपीत टाकली. पण टोपी रिकामी झाली. धाकटा भाऊ राक्षसाच्या मुलाला म्हणाला–"काय रे अजून माझी टोपी भरलीच नाही की ?"

राक्षसाच्या मुलाने जाऊन बापाजवळ सोन्याची आणखी नाणी मागितली. तेव्हा बापाने विचारले–"काय रे, तुला एक मोठे भांडे भरून सोन्याची नाणी दिली होती, तरी टोपी भरली नाही ? बरे तर आणखी एक भांडे भरून नाणी घेऊन जा."

दुसरे भांडे रिकामे झाले तरी टोपी भरली नाही. आणखी एक भांडे भरून सोन्याची नाणी ओतली तेव्हा कोठे टोपी व खालचा खड्डा भरला.

"बरे तर मी जातो. तुम्ही या तळ्यात आता बिनफिकीर होऊन रहा." असे सांगून धाकट्या भावाने राक्षसाच्या मुलाला पाठवून दिले. सोन्याची सर्व नाणी घेऊन धाकटा भाऊ आपल्या गावी परत आला. त्याने एक मोठे घर विकत घेतले, पुष्कळसे नोकर चाकर निरनिराळ्या कामावर नेमले व आनंदाने राहू लागला. मोठ्या भावांनी धाकट्या भावाचा सर्व थाटमाट पाहिला आणि विचारले "हे इतके पैसे तुला कोठून मिळाले रे?"

"तुम्ही दोघांनी माझा वाटा म्हणून जी दोरी दिलीत त्याचे मी एक जाळे विणले. त्या जाळ्यात जनावरे पकडून मी पैसे मिळविले." धाकटा भाऊ म्हणाला.

"हे पहा, तर मग आम्हांला ही दोरी उधार म्हणून काही दिवस वापरायला दे. आम्हीदेखील रुपये मिळवून ती परत करू." दोघे मोठे भाऊ म्हणाले.

"त्यात काय मोठेसे? घेऊन जा. खुशाल." असे सांगून धाकट्याने आपल्या मोठ्या भावंडांना दोरी देऊन टाकली.

परंतु ती दोरी पुन्हा धाकट्या भावाच्या हाती कधी आली नाही. त्यांनी त्या दोरीचे काय केले हेदेखील समजले नाही.





# हरवलेला मुलगा

एका गावी एक जमिनदार रहात असे. त्याला एक मुलगा होता. तो मुलगा जन्मला त्याच्या आधी जमिनदाराला एक स्वप्न पडले. स्वप्नात त्याला कोणी सांगितले की त्याला जो मुलगा होणार आहे त्याच्या अंगाला त्याला दहावे वर्ष लागेपर्यंत जर जमिनीचा स्पर्श झाला तर त्याच्या जिवाला धोका आहे.

जमिनदाराचा त्याच्या बोलण्यावर विश्वास बसला. म्हणून मुलगा जन्मल्याबरोबर त्याने नोकरांना तसे बजावून सांगून ठेवले. म्हणून मुलगा रांगू लागेपर्यंत अंगाखांद्यावरच वाढला.

परंतु असे किती दिवस चालणार. व्हायला नको होते तेच एकदा झाले. एक दासी एक दिवशी मुलाला घेऊन खेळवीत होती. त्याच वेळी अंगणात बाहेर कसला तरी ओरडा आरडा ऐकून तिने चटदिशी मुलाला खाली जमिनीवर ठेवले आणि अंगणात पळत गेली. थोड्याच वेळाने तिला आपली चूक आठवली तेव्हा ती परत मुलाला ठेवले होते तिकडे धावली. पण तेथे मुलगा दिसला नाही.

दासीने जमिनदाराला मुलगा हरवल्याचे जाऊन सांगितले आणि चुकीची माफी मागितली. गावभरचा पालथा घालण्यात आला, पण मुलगा कोठे दिसला नाही. राजवाड्याचे सर्व आवार हुडकून पाहिले, पण सर्व प्रयत्न फुकट गेले.

अशीच काही वर्षे लोटली. जमिनदाराच्या दिवाणखान्यात रात्रीच्या वेळी विचित्र आवाज ऐकू येऊ लागले. पहारेकऱ्यांनी ती गोष्ट जमिनदाराला जाऊन सांगितली. मध्यरात्रीच्या वेळी दिवाणखान्यात कोणी तरी नाचते आणि रडत असते हे कळाले. म्हणून रात्रीच्या











ती बातमी ऐकून म्हातारीने आपल्या धाकट्या मुलीला जमिनदाराकडे पाठविलं. ती जमिनदाराला भेटून म्हणाली—"मी आपल्या इच्छेप्रमाणे दिवाणखान्यातल्या त्या मुलाला वाचवायचा प्रयत्न करीन." जमिनदाराने तिला प्रयत्न करून पाहण्याची परवानगी दिली.

त्या रात्री त्या मुलीने आपल्या धाकट्या बहिणी बरोबर स्वयंपाकासाठी शिधा व झोपण्यासाठी चादर व बिछाना वगैरे सामान घेतलं आणि रात्री दिवाणखान्यात जाऊन बसली. तिने स्वयंपाक वगैरेला सुरवात केली. स्वयंपाक झाल्यावर ती ताटवाटी पुढून जेवायची तयारी करू लागली त्याच वेळी कोणी तरी चालत येत असल्याचा भास तिला झाला. तिने मान वर करून मागे वळून पाहिले तर एक तरुण मुलगा जवळ उभा असलेला तिला दिसला. त्याने तिला विचारले—"हा स्वयंपाक कोणासाठी?"

त्या मुलाचा आवाज तिला गोड वाटला. त्याचा केविलवाणा चेहरा पाहून तिला त्याची कीव आली. ती म्हणाली—"मी माझ्या साठीच स्वयंपाक करते आहे, पण मी तुला पाहिजे तर वाढीन."

हे ऐकून त्या मुलाला आनंद झाल्यासारखा तिला भासला. त्याने पुढे विचारले—





"हे ताट व वाट्या कोणासाठी?" त्या तरुण मुलाने विचारले.

"माझ्यासाठी आहेत. पण तुला मी वाढीन." ती मुलगी म्हणाली.

"ही खाट कोणासाठी आहे?" त्या मुलाने विचारले.

"माझ्यासाठीच आहे." ती मुलगी म्हणाली. "पण तुला पाहिजे असेल तर तुला झोपायला हरकत नाही." या प्रेमळ मुलाच्या चेहऱ्यावर स्मित झळकू लागले. तो म्हणाला—"मी तुझा फार आभारी आहे."

संपूर्ण स्वयंपाक झालेला होता. ती त्याला वाढू लागली. तेव्हा तो तरुण तिला म्हणाला—"पण थोडा वेळ थांब. माझ्यावर उपकार करणाऱ्याचे आभार मानून मी येतो." असे म्हणून तो तरुण उठला आणि दिवाणखान्याच्या मधोमध जमिनीखाली निघून गेला. एकाएकी जमिनी खाली एक मोठे भुयार दिसले आणि आतून फुलांचा गोड वास येऊ लागला.

ती तरुण मुलगी त्या भुयाराच्या तोंडाजवळ येऊन उभी राहिली. नंतर त्या मुलावर कोणकोणती संकटे ओढवतात हे जमिनदाराला सांगता यावे यासाठी ती त्या भुयारात खाली उतरली.

त्या भुयारात तिला एक विचित्र नवे जग पहायला मिळाले. तेथे एक सुंदर ओढा वहात होता. त्या ओढ्याचे पाणी सोन्याच्या ओघासारखे वाटले. तिला ओढ्याच्या काठी मखमलीसारखे हिरवे गवत पसरले होते. जिकडे पहावे तिकडे सुवर्णाची शिखरे असलेले देऊळ दिसत होते आणि फुलांनी बहरलेली झुडपे दिसत होती.

तो तरुण मैदानातून चालत चालत एका जंगलात जाऊन पोचला. त्या जंगलात सर्व झाडे सोन्याची होती. झाडावर बसलेले पक्षी त्याला पाहून त्याच्या भोवती गोळा जमा झाले. काही पक्षी त्याच्या खांद्यावर,



# सिंदबादच्या सफरी

सिंदबाद तीन चार वर्षे चैन करीत बगदादला राहिला. नंतर त्याला करमेनासे झाले. नवे देश पाहून यायची हुक्की त्याला झाली. देशाटन फुकटात होत नसते. म्हणून तो बाजारात व्यापार करण्या लायक माल विकत घेऊन आला. त्याने मालाची बांधाबांध करून घेतली आणि सर्व सामान घेऊन बंदरात आला.

त्याच दिवशी बंदरात एक उत्तम जहाज आले होते. त्याच जहाजात या वेळी जायचे त्याने ठरविले. त्या जहाजात त्याच्या ओळखीचे काही व्यापारी पण परदेशात व्यापारासाठी जात होते. सिंदबादने आपले सामान जहाजावर चढविले. मित्रमंडळी बरोबर या खेपेचा प्रवास मजेत होणार असे पण त्याला वाटले.

जहाज निघाले. जागोजागी थांबून निरनिराळ्या बेटात माल विकून व नवा माल खरेदी करून जहाज पुढे जात होते. सुमारे पाच आठवड्याचा प्रवास मजेत झाला. व्यापाऱ्यांना या सफरीत फायदा पण पुष्कळ झाला. शेवटी जहाज एका बेटाला लागले.

ते एक निर्जन बेट होते. परंतु त्या बेटात मोठ मोठी उंच झाडे पुष्कळ होती. झाडांवर निरनिराळ्या रंगाचे पक्षी रहात होते. जिकडे पहावे तिकडे ओढे व डोंगरी झरे वहात होते. एकंदरीत नैसर्गिक सौंदर्य मनोहर होते. या पृथ्वीवरचा जणुकाही स्वर्गच इतके सुंदर होते ते बेट.

व्यापारी बेटावर उतरून नैसर्गिक सौंदर्य पहात हिंडू फिरू लागले. सिंदबाद खाऊन पिऊन ओढ्याच्या काठी एका झाडाच्या सावलीत विसावा घेत बसला. नंतर गालिच्या सारख्या हिरव्या गवतावर पडून त्याने विश्रांती घेतली. थोड्या वेळाने त्याला झोप लागली.



त्याची झोप मोडली तेव्हा त्याला त्याचे साथी मित्र कोणीच दिसले नाही. बंदरात जहाज पण नव्हते. दूर समुद्रात त्याचे जहाज व जहाजाची मोठमोठी शिडे त्याला दिसली. जहाजातले लोक सिंदबाद मागे राहिला असेल ही गोष्ट पार विसरून गेले.

सिंदबादचा धीरच खचला. त्याचा सर्व माल त्या जहाजावर होता आणि तो एकटा त्या निर्जन बेटावर राहिला होता. त्याला आपल्या विचित्र दैवगतीचे आश्चर्य वाटत होते. प्रत्येक वेळी भाग्य असे पाठ फिरवू लागले तर माणसाने तरी काय करावयाचे?

मागच्या खेपेला आपण कसे तरी सुखरूप स्वदेशी पोचलो. या खेपेस पोचू का? पण याचे उत्तर तरी काय मिळणार?

त्याला स्वतःच्या या दीनवाण्या स्थितीबद्दल रडू कोसळले. त्याने आपले कपाळ बडवून घेतले. बगदादला चैनीत मुलांबाळांबरोबर आपण रहात होतो आणि पुन्हा परदेश पाहण्याची दुर्बुद्धी आपणांस कोठून व कशी काय झाली? आता नशिबात असेल ते भोगावेच लागेल.

अशातऱ्हेने स्वतःच्या नशिबाला दोष देत तो बराच वेळ एका जागी बसून राहिला. नंतर थोडा धीर धरून ज्या बेटावर तो उतरला आहे होता, त्यावर पाणी व अन्न पोटभर मिळेल की नाही हे तरी पहावे असा विचार करून तो बेटावर हिंडू लागला. झाडावर फळे खूप होती. परंतु त्याच बरोबर त्याला एका गोष्टीची भीती वाटू लागली. या बेटावर जंगली श्वापदे तर नसतील? एखादे जनावर समोर येऊन उभेच राहिले तर काय करावयाचे? म्हणून तो एका उंच झाडावर चढला व नजर जात होती तितक्या दूर पाहून कोणी क्रूर जनावरे तर नाहीत ना कोठे, हे पाहू लागला.

त्याला नजर जाई तिकडे फक्त डोंगर, झाडे व पक्षी तेवढे दिसत होते. एका जागी त्याला एक लंबगोल पांढऱ्या शिळे सारखे काही तरी दिसले. ते काय आहे हे पाहण्याची अनावर इच्छा त्याच्या मनात उत्पन्न झाली. म्हणून सिंदबाद झाडावरून खाली उतरला आणि ज्या बाजूला त्याला ती विचित्र वस्तु दिसली होती त्या दिशेने चालू लागला. वाटेत कोणी क्रूर जनावर आडवे तर येणार नाही ना, ही भास्ती पण वाटत होती. तरी धीर करून तो त्या जागी येऊन पोचला. ती शिळा होती की घर होते की आणखी काही हे त्याला कळेना. त्याने त्या वस्तूच्या चारी बाजूला तीन चारदा प्रदक्षिणा घालून पाहिले. कोठे खिडकी, दरवाजा किंवा साधे भोक सुद्धा त्याला दिसले नाही. त्याने त्या वस्तूवर चढण्याचा प्रयत्न करून पाहिला. परंतु त्या वस्तूवर त्याचे पाय घसरत होते. त्याने पावले मोजून त्या वस्तूला प्रदक्षिणा घालून पाहिली, बरोबर शंभर पावले झाली.

कोणाचे तरी हे नक्कीच घर असावे आणि याच्या आत शिरायला कोठे तरी चोर दरवाजा सुद्धा असला पाहिजे. काय





करावे असा विचार करीत तो उभा असता, एकाएकी सूर्य मावळल्यासारखा काळोख पडला. उन्हाळ्याचे दिवस होते, म्हणून पावसाळ्यातल्या ढगांसारखे एकाएकी वादळा मागोमाग आकाशात ढग येण्याची शक्यता पण नव्हती. त्याने वर मान करून आकाशाकडे पाहिले. तेव्हां त्याला एक ढगाएवढा मोठा पक्षी दिसला. त्याचे पंखच ढगासारखे मोठमोठे होते. त्या पक्ष्याला पाहूनच सिंदबादचा धीर खचला.

आपल्याला भ्रम तर झाला नाही, असे एक वेळ त्याला वाटले. पण त्याला घार गिधाडांच्या जातीच्या पक्ष्यांची आठवण झाली. व्यापाऱ्यांच्या तोंडी त्याने एकदा ऐकले होते की गरुडासारखे डोंगर एवढे काही पक्षी समुद्रातल्या कोणत्या तरी बेटात राहतात असे त्याने ऐकले होते. त्यांच्या पैकीच हा एक पक्षी असावा असे त्याला वाटले. हे पक्षी तर हत्तीला सुद्धा उचलून घेऊन जातात म्हणे. तरमग त्याने एक पांढरी शिळा पाहिली होती ते याच पक्ष्याचे अंडे तर नसेल, अशी एक शंका त्याच्या मनात आली आणि तीच शंका खरी ठरली. कारण तो पक्षी सरळ त्या अंड्यावर येऊन बसला आणि आपल्या पंखाखाली ते अंडे झाकून ठेवून तेथेच झोपी गेला.

ज्या वेळी पक्षी आकाशातून जमिनीकडे येत होता त्या वेळी सिंदबाद जमिनीवर उपडा तोंड टाकून पडून राहिला. त्या पक्ष्याचा एक पाय एखाद्या झाडा एवढा मोठा होता. सिंदबादने आपली पगडी डोक्यावरून काढली व दोरखंडासारख्या तिच्या लांब पट्टीने स्वतःला त्या पक्ष्याच्या पायाला बांधून घेतले. त्यात त्याचा एक हेतु होता. तो पक्षी नक्कीच कोठे तरी उडून जाणार आणि त्याच्या बरोबर आपल्याला त्या निर्जन बेटावरून सुटका मिळेल असा त्याने विचार केला.

सिंदबादने स्वतःला त्या पक्ष्याच्या पायाला बांधून घेतले ते त्या पक्ष्याला कळले सुद्धा नाही. तो पक्षी रात्रीच उडाला तर काय करायचे, असा विचार करून सिंदबाद त्याच अवस्थेत रात्रभर जागत राहिला. पण सुदैवाने तो पक्षी उजाडल्या-वर एकदा ओरडून उडू लागला. तो पक्षी बराच वेळ उडत राहिल्यावर एका खडकावर उतरला. तो पक्षी पुन्हा उडू लागण्यापूर्वी सिंदबादने स्वतःला सोडवून घेतले.

तो पक्षी पुन्हा उडाला तेव्हां सिंदबादला पक्ष्याच्या पायात एक मोठा काळा अजगर






दिसला. त्याला पहिल्याने ती एक रानटी वेल असावीशी वाटली होती.

सिदबादने एकदा चारी बाजूला दृष्टि फिरवून पाहिले तेव्हा भीतीने त्याचा चेहरा पांढरा फट्ट झाला. कारण तो उतरला होता ते एक मोठे खोरे होते. त्याच्या चारी बाजूला उंच उंच डोंगर होते. डोंगर कड्यासारखे खोऱ्याच्या दोन्ही बाजूला सरळ उभे होते. त्यांच्यावर चढून वर जाणे अशक्यच होते. त्या खोऱ्यात पाण्याचा एक थेंबही नव्हता. त्या डोंगरात गवत नव्हते की वनस्पती पण नव्हते. म्हणजे उपाशी मरावे लागणार हे निश्चितच होते. अर्थातच तो एका संकटातून स्वतःला वाचविण्याच्या प्रयत्नात दुसऱ्या संकटात येऊन सापडला होता.

तरी सिदबाद स्वतःच्या मनाला धीर देऊन त्या खोऱ्यात हिंडू लागला. त्या खोऱ्यात जे खडक होते त्यात त्याला हिऱ्या माणकांचे ढीग जागो जागी दिसले. पण ते ढीग पाहून त्याला आनंद झाला नाही. कारण हिरेमाणके खाऊन का त्याचे पोट भरणार होते? त्याही पेक्षा भयंकर गोष्ट म्हणजे मोठ मोठे साप त्या हिऱ्यांच्या मधून हिंडत असलेले त्याला दिसले.

"अरे, असा एकेक हिरा एकेक लाख रुपयाला मिळणार नाही. मी मोठमोठ्या व्यापाऱ्यांकडेदेखील इतके मोठे हिरे कधी पाहिले नाहीत. राजाच्या खजिन्यात सुद्धा एवढे मोठे हिरे मिळणार नाहीत."

इतक्यात आणखी काही व्यापारी तिकडे आले. त्यांनी सिंदबादच्या तोंडी हिऱ्याच्या खोऱ्याचे व त्यात त्याचा जीव कसा धोक्यात सापडला व कसा वांचला याचे रसभरीत वर्णन ऐकले व त्यांनी इतक्या संकटांतून वांचून आल्याबद्दल सिंदबादचे मन:पूर्वक अभिनंदन केले.

सिंदबाद व्यापाऱ्यांबरोबर ते उतरले होते तिकडे गेला. आपली भूक व तहान भागवून दोन रात्री व दोन दिवस त्याने झोप काढली. तिसऱ्या दिवशी सर्व जहाजातून स्वदेशी निघाले. वाटेत ते एका जागी कर्पूर द्वीपात पोंचले. तेथे कापुराच्या झाडाखाली उन्हाळ्यात सुद्धा थंडगार हवेचा आनंद मिळतो. त्या झाडाची साल काढून तिचा रस काढतात व त्या पासून कापूर तयार करतात.

त्या बेटात सिंदबादला एक राक्षसी गेंडा दिसला. पण आश्चर्य म्हणजे तो शाकाहारी होता. तरी भयंकरच होता. त्याच्या नाकावरचे शिंग होते त्याने तो एका हत्तीला सहजी ठार करून आकाशात उडवू शकला असता.

सिंदबाद कर्पूर द्वीपात काही दिवस राहला. तेथे जवळचे काही हिरे विकले आणि सोने व चांदी विकत घेतली. तेथून अनेक बेटे देश व शहरे पहात शेवटी बगदादला परत आला. तेथे बरेच दिवसा-नंतर आल्याने तो आनंदाने राहला. त्याला भेटायला त्याची मित्रमंडळी येत व त्याच्या सफरीचा वृत्तांत ऐकून चकित होऊन जात.

अशा तऱ्हेने सिंदबादची दुसरी सफर संपली.





# महाभारत

पांडव कुंतीमातेबरोबर वारणावतास जायला निघाले. त्यांच्यासाठी धृतराष्ट्राने रथ तयार ठेवले होते. निघण्यापूर्वी पांडवांनी भीष्म, धृतराष्ट्र, विदुर, द्रोण, कृपाचार्य, बाल्हिक, सोमदत्त वगैरे सर्व वडीलधाऱ्यांस नमस्कार करून त्यांचा आशीर्वाद घेतला. नंतर जणु काही फार दिवसांनी सर्वांना त्यांची भेट होऊ शकेल अशा तऱ्हेने निघाले.

त्यावेळी काही ब्राह्मण धृतराष्ट्र, दुर्योधन आदिकांच्या रागलोभाची पर्वा न करता पांडवांच्या बरोबर निघाले व म्हणाले–"हा आंधळा राजा महापापी आहे. बिचाऱ्या पांडवांनी कधी कोणाचे वाईट केले नाही की इच्छिले नाही. त्यांच्या वडिलांनी त्या सिंहासनावर बसून राज्य केले आणि ते राज्य वाढविले पण. मग ते राज्य त्यांना कां मिळू नये? आणि हे तरी काय, युवराज युधिष्ठिर तरी सहजी राज्ये सोडून जायला कसा काय तयार झाला? अशा पापी राजाच्या राज्यात आम्ही तरी कशाला रहावयाचे? आम्ही सुद्धा पांडवांच्या बरोबर जातो, वारणावताला. जेथे पांडव राहतील तेथेंच जाऊन आम्ही राहातो. या अंधेर नगरीत आम्हाला नाहीं रहायचे."

ते म्हणाले ते युधिष्ठिराने ऐकले व त्या ब्राह्मणांना बोलावून नम्रपणे म्हणाला–"आमचे काकाच आता आम्हांला वडील. ते सांगतील ते करण्यातच आमचे हित आहे. तुम्ही सुद्धा आमचे हितैषीच आहा.



म्हणून तुम्ही आम्हांला आशीर्वाद देऊन निरोप देण्याची कृपा करावी." अशातऱ्हेने त्या सर्वांची समजूत घालून युधिष्ठिराने त्यांना परत पाठविले.

ब्राह्मणमंडली परतल्यानंतर पांडव पुढे निघाले. त्यांच्याबरोबर काही अंतर विदुर चालत गेला. तो युधिष्ठिराला म्हणाला—"तुमच्यासाठी वारणावताला लाखेचे घर बांधून ठेवले जात आहे. शत्रूचा एक मनुष्य तुमच्याबरोबर त्या घरात राहणार आहे. लाखेच्या घराला आग लावण्यासाठी त्याची नेमणूक झाली आहे. म्हणून तुम्ही सावध रहा. तुमच्या पैकी एकाने लाखेच्या घरातून बाहेर दूर जंगलापर्यंत भुयाराची चोर वाटपाहून तयारी करून ठेवावी. जंगलांत पोचल्यावर नक्षत्रांच्या मदतीने तुम्हांला दिशा कळतील. तुम्ही कोठेंतरी अज्ञात जागी जाऊन रहा." या सर्व गोष्टी गुप्तपणे युधिष्ठिराला समजावून सांगून विदुर निघून गेला.

त्यानंतर कुंतीने युधिष्ठिराला विचारले—"कायरे सांगितले विदुरभावजींनी तुला एवढे?" त्यावर युधिष्ठिर तिला व आपल्या भावंडांना म्हणाला—"वारणावतात आगवीग लागण्याची भीती आहे. म्हणून आपण सर्वांनी सावधगिरी बाळगून रहावे. आणखी असे देखील सांगितले की आम्ही निराळेच राहून आपले राज्य मिळविण्याची खटपट करावी."

पांडव कुंतीबरोबर श्रावण शुक्ल अष्टमीच्या दिवशी रोहिणी नक्षत्र असता वारणावतास पोचले. पांडव येणार असल्याची वार्ता प्रथमपासूनच माहीत असल्याने वारणावताचे नागरिक त्यांच्या स्वागतासाठी आले. सर्व नगर तोरणांनी, फुलांनी आणि रांगोळी घालून छान सजविण्यात आले होते. पांडवांनी नगरात प्रवेश केला आणि गोरगरीबांना दानधर्म केला आणि नंतर ब्रह्मवृंदाला सुद्धा दान देऊन संतुष्ट केले.

मध्य रात्रीच्या सुमारास भीमाने पूर्वी ठरल्याप्रमाणे आपल्या चौघां बंधूंना व कुंतीला जागे केले. भीमाने पुरोचन झोपत असे त्या खोलीला सर्वात प्रथम आग लावली आणि तो सर्वांना बरोबर घेऊन भुयाराच्या वाटेने पळून गेला. भुयार खणणाऱ्याच्या हाती पांचपांडव व कुंती सुख रूप लाक्षागृहा बाहेर पडल्याची बातमी विदुराला कळली.

जंगलाच्या वाटेने रात्रीच्या वेळी कुंतीला चालणे अशक्य झाले, तेव्हां भीमाने तिला आपल्या खांद्यावर उचलून घेतले. इतरांना पण पाळी पाळीने दुसऱ्या खांद्यावर घेऊन भीम व पांडव कुंतीसह जंगलाबाहेर गंगेकाठी येऊन पोचले.

तेथे विदुरानेपहिल्या पासूनच एका नावेची व्यवस्था करून ठेवली होती. नावाडी स्वतःच पुढे येऊन नावेत बसायला सांगू लागला. त्याच्या बोलण्यावरूनच पांडवांना विदुराने सगळी व्यवस्था करून ठेवल्याचे कळले. सर्व पांडव कुंतीसह नावेत बसले. गंगा नदी पार केल्यावर पांडवांनी विदुराला कळविण्यासाठी जो निरोप सांगितला तो घेऊन नावाडी हस्तिनापूरला निघून गेला.



रात्र अजून संपली नव्हती. नक्षत्रांवरूनच दिशा कळत होत्या. ते दक्षिणेकडे निघाले. थोडे अंतर चालून गेल्यावर भीमाशिवाय बाकी सर्व इतके दमून गेले की एक पाऊल देखील पुढे टाकणे त्यांना शक्य नव्हते. रात्रभर त्यांना झोप नव्हती. जंगलाच्या वाटेने काट्याकुट्यात चालून सर्व दमून गेले होते. म्हणून भीमाने सर्वांना उचलून घेतले आणि चालू लागला. नंतर सर्वांना एका जागी उतरायला सांगून थोडा वेळ दम घेतल्यावर कुंती भीमाला म्हणाली—"तहान लागली आहे रे, भीमा, सर्वांना." तेव्हां भीम पुन्हां सर्वांना उचलून घेऊन पुढे



निघाला. एका वडाच्या झाडाखाली सर्वांना विश्रांती घ्यायला सांगून भीम पाण्याच्या शोधार्थ निघाला. त्याला एका बाजूने पक्ष्यांची किलबिल ऐकू आली. त्या दिशेने भीम निघाला. थोड्या अंतरावर त्याला एक सरोवर दिसले. भीमाने सरोवरात स्नान केले आणि पोटभर पाणी पिऊन आईसाठी व भावंडांसाठी पाणी घेऊन निघाला. परंतु सर्वांना गाढ झोप लागली होती.

अशा संकटसमयी सर्वांना इतकी झोप लागली आहे, याचा अर्थ सर्व दमून गेले आहेत. त्याने असा विचार करून कोणाला जागे केले नाही.

तिकडे वारणावतात पांडव उतरले होते त्या महालाला आग लागल्याची भयंकर वार्ता पसरली. लोकांची गर्दी जमली. ज्याने भुयार खणले होते त्याने आग विझविण्याचे सोंग करून भुयाराचे भोक कोणाच्या लक्षात येणार नाही अशा शिताफीने बुजवून टाकले. पुरोचन, दासी व तिची पाच मुले जळून गेली होती. लोकांना वाटले की पुरोचन व कुंतीसह पंच पांडव जळून गेले.

ती बातमी हास्तिनापूरला जाऊन पोचली. पंच पांडव कुंतीसह जळून गेल्याची बातमी ऐकून धृतराष्ट्र बेशुद्धच झाला. विदुराने इतरांबरोबर रडण्याचे सोंग केले.

पांडव ज्या जंगलांत झोपले होते त्या जंगलात हिडंब नावाचा एक राक्षस रहात असे. तो काळा कुट्ट व गले लठ्ठ होता. त्याचे डोळे पिवळे होते. आकृती भयंकर होती. ढगाएवढे पोट होते त्याचे व लाल लाल मिशा होत्या त्याला. तो नरभक्षक राक्षस होता. आहाराच्या शोधार्थ तो एका शाल वृक्षावरून पांडवांना त्या वडाच्या झाडा जवळ झोपलेले पाहून आला. जिभल्या चाटीत आनंदाने तो आपली बहीण हिडिंबा होती तिथे जाऊन तिला म्हणाला—" वडाच्या

झाडाखाली पांच जण झोपले आहेत. त्यांना आपण आज खाऊया व रात्रभर खूप नाचू व खेळू या."

हिडिंबा आनंदाने उड्या मारीत वडाच्या झाडाजवळ आली. तिने निद्रामग्न युधिष्ठिर, अर्जुन, नकुल, सहदेव व कुंती आणि पाहारा देत बसलेल्या भीमाला पाहिले. हिडिंबा भीमाच्या सौंदर्यावर भाळली आणि ती ज्या कामासाठी आली होती ते सर्व विसरून गेली. परंतु थोड्या वेळाने तिला भावाने ज्या कामासाठी पाठविले होते ते आठवले. परंतु त्या सुंदर लोकांना मारून खाण्या पेक्षा त्यांच्या बरोबर राहल्याने दिवस जास्त आनंदात जातील, असे तिला वाटले.

लगेच हिडिंबाने सुंदर रूप धारण केले आणि लाजत लाजत भीमाजवळ येऊन उभी राहली आणि गोड शब्दात त्याला विचारले— "कोण तुम्ही? कोठून आलात? या जंगलात कसं काय येणं झालं? ही झोपणारी मंडळी कोण? ही सुंदर दिसणारी वृद्ध स्त्री कोण? या जंगलात हिडिंब नावाचा एक महा बलशाली राक्षस राहतो. तो माझा भाऊ आहे. तो स्वभावाने क्रूर आहे आणि यांना पाहून गेला आहे. हे सर्व निश्चितपणे कसे काय झोपले आहेत? सर्वांना ठार करून खायला घेऊन येण्यासाठी त्याने मला इकडे पाठविले आहे. परंतु तुम्हांला पाहून कोणाला ठार करण्याची इच्छाच माझ्या मनात उरली नाही. तुम्ही माझ्या इच्छेप्रमाणे वागून मला संतुष्ट केलेत तर मी कोणाच्याही अंगाला हात लावणार नाही व तुम्हां सर्वांचे माझ्या भावापासून रक्षण करीन. तुम्हां सर्वांना मी स्वेच्छागमन नामक मंत्राच्या बळाने सुरक्षित जागी पोचती करीन. त्या जागी मी तुमच्या बरोबर निश्चिंतपणे तुमची पत्नी म्हणून विहार करीन. माझी एवढी इच्छा पुरी करा."







# गांधींचे चरित्र

[१०]

गांधीजींनी १० फेब्रुवारी रोजी, स्मट्स बरोबर जो समेट केला होता त्या प्रमाणे भारतीयांत सर्वांत प्रथम आपल्या नावाची नोंदणी करण्यासाठी गांधीजी घरून निघाले. कचेरीत प्रवेश करतांना त्यांना कचेरीबाहेर काही पठाणांचे काही तरी खलबत चालू असल्याचे दिसले. त्यांच्या पैकी एक जण मीर आलम नावाचा महा क्रूर उंचीचा पठाण गांधीजींचा पक्षकार होता. गांधीजींनी त्याला जवळ बोलावून विचारपूस केली. तो मागे पुढे करू लागला आणि गांधीजींच्या पाठोपाठ चालू लागला. गांधीजी फक्त थोडेच पावलांच्या मर्यादित अंतरात तो पुढे येऊन विचारू लागला— "कोठे निघालात?"

गांधीजींकडून उत्तर येण्यापूर्वीच पठाणांनी त्यांना मारहाण करण्यास सुरुवात केली. "हे राम!" म्हणत गांधीजी बेशुद्ध होऊन पडले. त्या दिवशीच गांधीजींची जीवनयात्रा संपली असती, परंतु गांधीजींचे काही अनुयायी व काही गोरे मित्र यांनी मिळून गांधीजींना वाचविले.

रक्तबंबाळ झालेल्या गांधीजींना उचलून लोकांनी एका दुकानात नेले. शुद्धीवर येताच गांधीजींनी विचारले—"मीर आलम कोठे आहे?" त्याला पोलिसांनी पकडून नेल्याचे लोकांनी सांगितले तेव्हां गांधीजी म्हणाले—"त्याला सोडून द्यायला हवे होते."

गांधीजींना त्यांच्या एका मित्राने आपल्या घरी ठेवून घेतले व दहा बारा दिवस त्यांची सेवाशुश्रूषा करून त्यांना बरे केले. गांधीजींच्या तब्येती संबंधी चौकशी करण्यासाठी त्यांच्या मित्रांची व अनुयायांची रीघ लागे. तब्येत सुधारल्यावर










# कल्पनेतली परी

शूरसेन देशाचा युवराज प्रदीप रूपवान व बुद्धिमान होता. त्याच्यामध्ये एकच एक दोष होता, तो म्हणजे तो एवढ्याशा कारणासाठी रागवायचा आणि लहान सहान गोष्टींसाठी दुःखी निराश होऊन बसायचा.

प्रदीप वयात आल्यावर त्याला अनेक राजकन्या सांगून आल्या. त्याने सर्वांच्या तसबिरी पाहिल्या. पण त्याला त्यांच्या पैकी एकदेखील पसंत पडली नाही. कारण त्याने स्वतःच्या कल्पनेने एका अप्सरे-सारख्या सुंदरीचे चित्र मनातल्या मनात-रेखाटले होते. ती सुंदरी मिळाली तरच लग्न करायचे त्याने मनाशी ठरविले होते.

प्रदीपला कोणी सुंदर राजकन्येचे चित्र आणून दाखविले की तो सांगे की मला हवी आहे ती सुंदरी ही नव्हे. तेच तेच उत्तर ऐकून राजासुद्धा कंटाळला व म्हणाला–"बाबा रे, तुला हवी असेल तशी राजकन्या तूच हुडकून काढ."

म्हणून एक दिवशी प्रदीप आपल्या बरोबर तिघाचौघां नोकरांना घेऊन आपल्या कल्पनेतल्या परीच्या शोधार्थ निघाला. कित्येक गावे व शहरे पहात हिंडल्यावर-देखील त्याला ती कल्पनेतली परी कोठे दिसली नाही. निराश होऊन तो परत निघाला. एका गावात आठवड्याचा बाजार होता. प्रदीपदेखील गंमत बघा-यला म्हणून एका जागी गेला. तेथे दुकानात त्याला एक चित्र दिसले. ते चित्र, चकित होऊन तो बराच वेळ पहात राहिला. कारण त्या चित्रातली सुंदरी त्याच्या कल्पनेतली सुंदरीच होती. म्हणून त्याने दुकानदाराला विचारले–"हे चित्र कोणाचे आहे?"

सौ. कुमुद ब. देशपांडे



"विजयदुर्गच्या राजकुमारीचे चित्र आहे हे! दक्षिणेकडच्या एका चित्रकाराने काढले आहे. त्या देशाच्या राजाला हे चित्र आवडले नाही. कारण हे त्या राजकन्येच्या सौंदर्या-पेक्षा कमी प्रतीचे होते. मला हे चित्र फार आवडले, म्हणून मी हे विकत घेऊन विकायला ठेवले" दुकानदार म्हणाला.

प्रदीपने, दुकानदाराने मागितलेली किमत देऊन ते चित्र विकत घेतले आणि आपल्या राजधानीस परतला. त्याने वडिलांना ते चित्र दाखविले व म्हणाला–"ही राजकन्या दक्षिणेकडील विजयदुर्गच्या राजाची मुलगी आहे. तिच्याशी लग्न करायला मी तयार आहे. बाकी व्यवस्था आपण करावी."

राजाने प्रधानाचा सल्ला घेतला. विजय-दुर्गचे राज्य दक्षिणेकडे फार दूर होते. इतक्या दूर दूत पाठवून लग्न ठरवून प्रत्यक्ष लग्नाला फार उशीर झाला असता. म्हणून प्रधानाने त्या देशाच्या एका जुन्या चाली-प्रमाणे राजपुरोहिताला पाठविण्याचे व विजयदुर्गच्या राजाने हा संबंध स्वीकारला तर प्रतीपच्या तसबिरीशी विवाहविधी उरकून घेऊन राजकन्येला घेऊन येण्याचे ठरले. त्याप्रमाणे विवाह समारंभ आटोपला आणि विजयदुर्गच्या राजाने अनेक मूल्यवान वस्तू अहेर म्हणून आपल्या जांवयाकडे व व्याह्यांकडे मुलीबरोबर पाठवून दिल्या. राजकन्या मंगला आपल्या सखी व दासीं-बरोबर शूरसेन नगरी पोचली.

मध्यंतरी प्रदीपच्या मनात आपल्या कल्पनेतल्या सुंदरीला स्वतः जाऊन पाहण्याची इच्छा उद्भवली. तो वेष पालटून राजधानी-पासून थोड्या अंतरावर, जेथे मंगला व तिच्या बरोबर आलेले लोक मुक्कामासाठी उतरले होते तेथे आला. तेथे सर्व लोक आपापल्या कामात गर्क होते.

प्रतीपने एका शिपायाला जवळ बोलावून विचारले–"राजकन्येची राहुटी कोठे





आहे? मी जाऊन यायला काही हरकत आहे का?"

शिपायाला थट्टा सुचली. मंगलाच्या राहुटीतून बाहेर येणाऱ्या एका दासीकडे बोट दाखवून तो म्हणाला—"भेटा न, पुढे जाऊन. ते काय राजकन्या मंगलाच तर येत आहेत, समोर?"

तिला पाहून त्याला आश्चर्यच वाटले. त्या चित्रात चितारलेली राजकन्या ती नव्हती. त्याला फसवून कोणत्या तरी राजकन्येला त्याच्या गळचात बांधण्यात येत आहे असा संशय त्याच्या मनात आला. पण आता त्याला काहीच करता येण्यासारखे नव्हते. मन मारून पदरी पडले ते पवित्र झालं असं मानूनच त्याला स्वस्थ रहावे लागणार होते.

प्रतीप राजवाड्यात परत आला. त्याने नोकराचाकरांना एका गोष्टीची ताकीद करून ठेवली की दिवसा कधीही राजकन्या त्याच्या नजरेस पडता कामा नये व काळोख पडल्यावरच राजकन्येने शयनगृहात प्रवेश करावा आणि शयनगृहात व बाहेर दिवे लावू नयेत.

युवराजांच्या या विचित्र आज्ञेचा अर्थ कोणाला कळला नाही. राजकन्या मंगला तर घाबरूनच गेली. तिला संशय आला की चित्रात दाखविलेल्या राजकुमाराशी तिचे लग्न झालं नसून दुसऱ्याशीच तर झाले नाही? राजकन्येने आपल्याला पाहू नये म्हणून युवराजांनी अशी आज्ञा काढली असावी. म्हणून पतीला कळल्याशिवाय तिने पतीला पाहून घेतले. तेव्हां तिच्या मनाचे समाधान झाले. पण पतीने अशी विचित्र आज्ञा कां काढावी या गोष्टीचा उलगडा होईना.

प्रदीप फार उशिरां शयनगृहात येई व पहाटे उजाडण्यापूर्वी उठून जाई. मंगलादेवीशी तो बोले, पण अगदी 'हो' किंवा 'नाही' एवढेच.



असेच आणखी काही दिवस लोटले. युवराजांच्या या विक्षिप्तपणाचा राजकन्येला राग आला. अशा वागण्याचे कारण तरी नको का कळायला? म्हणून तिने आपल्या एका म्हाताऱ्या दासीचा सल्ला विचारला.

ती म्हणाली—"मलासुद्धा आश्चर्यच वाटते बाई! तुमची नुसती तसबीर पाहूनच युवराजांनी तुमच्याशी लग्न करण्याचा हट्ट धरला होता, म्हणे कदाचित हे सर्व खोटे असेल. नाहीं तर या विचित्र वागण्याचा अर्थ काय?" नंतर विचार करून ती म्हणाली—"युवराज, रोज सकाळी गोठ्यात किंवा त्याच्या आसपास गाईंची देखरेख करायला जातात म्हणे. आपल्याला पहावे लागू नये, एवढ्याच साठी तर हे सर्व करीत असावेत. नाही तर युवराजांना कसले काम असणार गोठ्यात? तुमच्याकडे पाहून युवराज कसे वागतात हे पाहिले पाहिजे. म्हणून तुम्ही एक सामान्य दासीचा पोशाख करून माझ्याबरोबर त्या बाजूला सकाळच्या वेळी चला. तुम्हांला पाहून ते काय करतात हे तुम्ही पहा व मी पण पाहते, म्हणजे आपल्याला त्यांच्या विक्षिप्त वागण्याचा अर्थ कळेल." असा सल्ला त्या म्हाताऱ्या दासीने दिला.





दुसऱ्या दिवशी प्रदीप पहाटे उठून गोठ्याकडे निघून गेल्यावर आणि राजवाड्यातले सर्व लोक झोपले असताना मंगलादेवी साधा पोशाख करून म्हाताऱ्या दासीबरोबर गोठ्याकडे गेली. तोपर्यंत प्रदीप गोठ्यात पोचला होता. त्याच्याजवळ जाऊन म्हातारी दासी त्याला म्हणाली—"मालक! ही मुलगी माझी नात आहे. वैद्याने हिला धारोष्ण दूध पाजायला सांगितले आहे. काही दिवसांपासून हिची तब्येत बरी नाही. आपण परवानगी दिल्यास......" म्हातारीच्या तोंडचे ते वाक्य पुरे सुद्धा झाले नव्हते, प्रदीप चकित होऊन म्हातारीच्या नातीच्या वेषातल्या मंगलादेवीकडे पाहू लागला. त्याला आश्चर्याचा धक्काच बसला, म्हणजे त्याच्या कल्पनेतली परी या म्हातारीची नातच होती का? त्याचा स्वतःच्या डोळ्यांवर विश्वासच बसेना.

"मालक! मग मी घेऊ का दूध?" म्हातारीचा तो प्रश्न ऐकून युवराज जणु काही झोपेतून जागे झाले आणि म्हणाले—"धारोष्ण दूध ना? हो, घे की!" प्रदीप अडखळल्यासारखा बोलला.

नोकर एका गाईचे दूध काढीत होता, त्या बाजूला मंगला गेली. एकदम ती किंकाळी फोडून ओरडली. तिच्या पायात कांटा मोडला होता.

"काय झाले?" प्रदीपने पुढे येऊन विचारले. आपल्या कल्पनेतल्या सुंदरीच्या पायात काटा मोडलेला पाहून तो स्वतःला आवरू शकला नाही. त्याच्या डोळ्यातून दोन टिपे गळली. तो पुढे गेला आणि तिला म्हणाला—"मला धरून थोडो उभी रहा, मी कांटा काढतो." असे सांगून प्रदीपने स्वतःच्या हाताने निःसंकोचपणे कांटा काढला.

नोकराने काढलेले धारोष्ण दूध पिऊन जातांना प्रदीपचा निरोप घेत मंगला म्हणाली—"बर मी येते. आपले फार उपकार झाले माझ्यावर."

"रोज येत जा आणि धारोष्ण दूध पीत जा. मी नोकराला सांगून ठेवतो." बोलताना त्याच्या आवाजातला ओलावा चटकन लक्षात येण्यासारखा होता.

मंगला स्मित करून म्हणाली—"येईन, अवश्य येईन!" असे सांगून ती म्हातारीबरोबर निघून गेली आणि कोणाच्या नकळत राजवाड्यात गेली.

त्या दिवशी रात्री प्रदीप झोपला असतांना मंगलाने त्याला उठवले तेव्हां त्याने रागाने विचारले—"काय, झाले काय? काय पाहिजे तुला?"

"काही नाही, माझा तळपाय ठणकतो आहे. तळपायातसकाळी काटा किंवा असेच काही तरी मोडले होते आणि आता त्या जागी सूज आली आहे." मंगलादेवी म्हणाली.

म्हणून नाइलाजाने प्रदीपने दासीला हाक मारून दिवा आणायला सांगितले. दिवा आला, पण युवराजाने राजकन्येकडे पाहण्याचे टाळले व म्हणाला—"पाय कुठे सुजला आहे?"

"पाय सुजला नाही व ठणकत पण नाही. उजेडात तुम्ही मला पहावे म्हणून मी पाय दुखल्याचे सोंग केले होते." मंगलादेवी हसत म्हणाली.

प्रदीपने रागानेच वर मान करून मंगलादेवीकडे पाहिले आणि ती दुसरी तिसरी कोणी नसून त्याच्या कल्पनेतलीच परी आहे हे पाहून त्याला परमानंद झाला.

दुसऱ्या दिवसापासून शयन गृहात दिवा न लावण्याचा हुकुम युवराजांनी मागे घेतला.

हा बदल एकाएकी कसा झाला याचे गुपित एकट्या त्या म्हाताऱ्या दासीशिवाय इतर कोणाला कळले नाही.





# अमरवाणी

ज्ञातिभि र्वंच्यते नैव, चोरेणापि न नीयते ।
दानेन न क्षयं यातिः, विद्यारत्नं महाधनम् ॥ १ ॥

विद्या हें एक थोर धन होय! (पहा न कसें तें) नातेवाईक किंवा वारस फसवून तें घेऊं शकत नाहीं, चोर चोरून नेत नाहीं किंवा दान केल्यानें तें कमी होत नाहीं.

पुस्तकेषु च या विद्या परहस्ते च यद् धनम् ।
समयेतु परिप्राप्ते न सा विद्या, न तद् धनम् ॥ २ ॥

पुस्तकांत जी विद्या असते आणि दुसऱ्याजवळ जें धन असतें तें गरज असते तेव्हां आपल्याला (उपयोगी पडत नाहीं. म्हणून) ती विद्या आणि तें धन नसल्यासारखेंच (नाहीं का?)

सुखार्थी त्यजते विद्यां, विद्यार्थी त्यजते सुखम् ।
सुखार्तिनः कुतो विद्या, कुतो विद्यार्थिनः सुखम्? ॥ ३ ॥

सुखाचा अभिलाषी विद्येचा त्याग करतो आणि विद्येचा अभिलाषी सुखाचा त्याग करतो. सुखाची अभिलाषा असणाऱ्याला कोठून विद्या (लाभणार?) आणि विद्येची अभिलाषा असणाऱ्यास कोठून सुख (मिळणार?)

विद्वत्वंच नृपत्वंच नैवतुल्यं कदाचन ।
स्वदेशे पूज्यते राजा विद्वान सर्वत्र पूज्यते ॥ ४ ॥

विद्वत्ता आणि राजपद दोन्हींची तुलना करणें कधींच शक्य होणार नाहीं; (पहा ना,) राजाचा आदर स्वदेशांत, (म्हणजे त्याची सत्ता असते फक्त त्या प्रदेशांत) होतो, परंतु विद्वानाचा आदर सर्वत्र होतो.



# पडकें देऊळ

[२५]

[शिखीमुखला बळी देण्याच्या वेळी त्याच्या गळ्यात कालीमातेचा ताईत दस्यु कुलनायकाला दिसला आणि तो थक्कच झाला. खरी वस्तुस्थिति कळल्यावर त्याने पुजाऱ्यालाच बळी द्यायला आज्ञा केली. परंतु पुजारी डोंगरावर पळून गेला होता. त्याला पकडण्यासाठी दस्यु जातीचे लोक डोंगरावर चढू लागले. पुढे...]

आपल्याला पकडण्यासाठी अनेक दस्यु येत आहेत हे कळले तरी पुजारी थोडा-देखील घाबरला नाही. आपल्या डोक्यावरचे शिरस्त्राण काढून त्यातून एक ताडपत्र त्याने बाहेर काढले व ते शिखीमुख व विक्रमला दाखवीत हसत ताठ उभा राहिला. ते ताडपत्र पाहून विक्रम चकितच झाला. त्याने आपल्या पोशाखात ते आहे की नाही चाचपुन पाहिले. ते तेथे नव्हते.

"शिखी पाहिलेस ते ताडपत्र? आपल्याला तो जे ताडपत्र दाखवीत आहे त्यातच पडक्या देवळापर्यंत जाण्याचा मार्ग आहे. कालीमातेच्या देवळात जी ओढाताण झाली त्याच वेळी ते माझ्या पोशाखातून पडले असावे. तेच नेमके त्याला सापडले व्रष." विक्रमकेसरी घाबऱ्या घाबऱ्या म्हणाला.

एक क्षणभरच शिखीमुख किंकर्तव्य विमूढ स्थितीत त्याच्याकडे पहात उभा



राहला. परंतु थोड्याच वेळात स्वत:ला सावरून म्हणाला–"आता झाले ते झाले. पश्चात्ताप करीत बसण्यास आपल्याला वेळ नाही. पडक्या देवळापर्यंत कसे पोचता येईल हे पहावयाचे आहे. आपण त्या दुष्टाचा पाठलाग केलाच पाहिजे व शक्य तर त्याला पकडले पाहिजे."

दोघांचे संभाषण ऐकून इम्यु कुलनायक त्यांना धीर देत म्हणाला–"तुम्ही बेफिकीर रहा. त्या देवळापर्यंतच तुम्हांला जायचे आहे ना? तेथपर्यंत तुम्हांला वाट दाखविण्यासाठी मी एका दोघांना तुमच्या बरोबर पाठवितो. डोंगराच्या पायथ्याशी तुम्हांला ज्याने कैद केले होते त्या नांगसोमला तिकडचा प्रदेश माहिती आहे. तो वाट दाखवू शकेल. परंतु माझा सल्ला विचारला......" असे म्हणत इम्यु कुलनायक मध्येच बोलता बोलता थांबला.

पण शिखीमुखला मध्ये थांबायला धीर नव्हता. तो म्हणाला–"इम्युनायका! आपला जो सल्ला असेल तो आपण लवकर द्यावा."

"मला असे वाटते की दुरूनच सर्वांनी तो प्रदेश पाहिला आहे. जवळ जाऊन कोणी ते देऊळ पाहिले असेल असे मला नाही वाटत. तो प्रदेश आहेच तसा भयाण. त्या प्रदेशात भयंकर मोठमोठे साप व विंचू आहेत. पण त्या देवळात जाण्याचा एवढा आग्रह कां! हे नाही मला कळले!" इम्यु कुलनायकाने विचारले.

तो प्रश्न बरोबरच होता. कारण महाराज विक्रमकेसरी यांच्या शोधार्थ शिखीमुख व विक्रम निघाले होते. ते आता या जगात नाहीत हे नक्की झाले होते. आता पडके देऊळ पाहण्याचा आग्रह दाखवून जीव धोक्यात टाकण्याचे कारण काय? शिखीमुखने विक्रमकडे त्या अर्थी नुसते पाहून त्याचे मत विचारले. विक्रम थोडा विचार करून म्हणाला–"माझे आजोबा त्या देवळापर्यंत जाण्यात यशस्वी झाले नाहीत. परंतु मला ते पहावयाचे आहे. तेथे जे अलोट धन पडले आहे व तेथे शिल्पकलेचे दुर्मिळ असे जे नमुने आहेत ते घेऊन येण्याची आजोबांच्या मनात फार इच्छा होती. ते काम मी, त्यांचा नातू पुरा करू शकलो तर त्यांच्या आत्म्याला शांती मिळेल."

"तर मग मी पण शेवटपर्यंत तुझ्याबरोबर यायला तयार आहे. आम्हांला इतके दिवस ज्याने अक्षरश: छळले त्या पुजाऱ्याला ठार करून त्याची शेंडी कापून आणून नागमल्लीला दाखवीपर्यंत माझ्या मनाचे समाधान होणार नाही. तसे वचन पण मी तिला दिले होते. मी तरी कोणत्या तोंडाने तिच्या जवळ जाऊ?" शिखीमुख म्हणाला.

ते ऐकून विक्रम स्मित करून म्हणाला–"मग काय? त्या देवळाचा शोध लावून द्यायला मदतीला पुष्कळ लोक आपल्या बरोबर आहेत. आपापल्या मनातली इच्छा पूर्ण होण्यासाठी आपण तेथपर्यंत गेलेच पाहिजे. तो दुष्ट पुजारी त्या देवळाजवळच आपल्याला भेटेल."



"तरमग ऐका. तेथपर्यंत तुम्ही जाण्याची गरजच नाही. माझे अनुयायी त्याला धरून घेऊन येतील." इम्यु कुलनायक म्हणाला.

तेवढ्यात पुजाऱ्याच्या पाठीमागून नागगिधाड समोर आला व एक मोठा दगड उचलून धरून म्हणाला–"हा नागगिधाड जिवंत असेपर्यंत पुजारी धऱ्याला कोणी कैद करू शकणार नाही. माझ्या मनात आलं तर हा सर्व डोंगर तुमच्यावर कोसळेल." असे म्हणत नागगिधाडाने तो दगड इम्यु लोकांवर फेकला.

आपल्या अंगावर गडगडत येणारा दगड पाहून इम्यू लोक त्याच्यापासून आपला













बचाव करून घेऊन मोठ्याने ओरडत डोंगरावर चढून जाऊ लागले. पुजाऱ्याने ताडपत्र आपल्या शिरस्त्राणात लपवून ठेवले आणि आपल्या अनुयायांना उद्देशून म्हणाला–"तुम्ही सर्व उभे राहून काय पहात आहां? हे सर्व दगड व खडक ढकला या सर्व दुष्टांवर आणि विवरात निघून या." त्यानंतर शिखीमुख व त्याच्या अनुयायांकडे वळून पुजारी म्हणाला–"प्राणाचा मोह नसेल तर तुम्ही वृश्चिक द्वीपात येऊन मला भेटा. तेथे मी तुम्हांला महाशिथिलेश्वरीच्या चरणी बळी देईन. नंतर मी या ब्रह्मपुत्र नदीच्या खोऱ्यात इस्म्यु जातीचे राज्य स्थापन करून त्यांचा राजा होईन."

"ऐकलीत ना त्याची वटवट तुम्ही? माझे अनुयायी खात्रीनेच त्याला कैद करतील." इस्म्यु कुलनायक म्हणाला.

शिखीमुख व विक्रम दोघांनी अजित आणि वीरभद्र दोघांना सावध केले आणि डोंगर चढू लागले. तेथे त्यांना इस्म्यु जातीचे लोक एका मोठ्या खड्यात भरलेले पाणी पहात उभे असलेले दिसले. पुजाऱ्याच्या अनुयायांनी त्या गुहेत प्रवेश केल्यावर दोन दगड बाजूला सारले, त्या बरोबर शेजारच्या तळ्यातले पाणी आले आणि गुहेच्या तोंडाजवळचा खड्डा तुडुंब भरला.

"हा मोठा वस्ताद दिसतो बरं का! पळून जाण्याची योजना त्याने पाहिल्यानेच करून ठेवली होती व आपल्याला गप्पा गोष्टीत गुंतवून ठेवले होते त्यान." एक इस्म्यु म्हणाला.

."त्याची सर्व लबाडी आम्हांला चांगली माहिती आहे. तुम्ही उगाच आपला वेळ फुकट घालवू नका. डोंगराच्या चारी बाजूला पसरून त्याला वेढा घाला आणि तो आपल्या साथीदारां-बरोबर कोठून बाहेर पडतो, हे पहा. नंतर दोघे तिथे



आम्हांला कळवायला या. बाकी सर्व त्याचा पाठलाग करा." विक्रम म्हणाला.

विक्रमने सांगितले त्या प्रमाणे सर्व इम्यु लोक डोंगराला वेढा देऊन उभे राहले. शिखीमुख व विक्रम डोंगरावरून खाली उतरून आले आणि त्यांनी इम्यु कुलनायकाला सर्व हकीगत समजावून सांगितली.

"म्हणजे तो दुष्ट आपल्या हातातून निसटून गेला म्हणावयाचा. पडक्या देवळापर्यंत जायची वाट त्याला ताडपत्राच्या आधारे कळेल. मग तुम्हांला काय वाटते? तेथे जाण्याची गरज वाटते का तुम्हांला?" इम्यु कुलनायकाने विचारले.

"पडक्या देवळाचा रस्ता माहीत असलेला तुमच्या जातीतला नागसोम नावाचा नायक आहे ना, त्याला आमच्याबरोबर पाठवू शकलात तर आम्हांला तेथपर्यंत जाण्याची इच्छा आहे. पडक्या देवळातल्या सोन्या-चांदीचा मोह आम्हांला थोडादेखील नाही. तेथे शिल्पकलेचे जे उत्कृष्ट नमूने आहेत ते घेऊन येण्याची आमची इच्छा आहे. या सर्वापेक्षा महत्वाची गोष्ट म्हणजे आमच्या स्वर्गवासी थोरल्या महाराजांची शेवटची इच्छा पुरी होईल आणि त्यांच्या आत्म्याला शांती मिळेल." शिखीमुख म्हणाला.

"चला, त्या महाराजांच्या समाधीचे दर्शनतर प्रथम करून घ्या. वृश्चिक द्वीपापर्यंत पोचण्यासाठी नावांची व्यवस्था कशी करावयाची याचा विचार रात्री स्वस्थपणे बसून करू." असे सांगून इम्यु कुलनायक शिखीमुख वगैरेंना त्याच्या पूर्वजांच्या समाधी ज्या जागी होत्या तेथे घेऊन गेला.

एका मोठ्या सपाट मैदानात दहा बारा उंच मोठ्या समाधी शिखीमुख व त्याच्या साथीदारांना दिसल्या. प्रत्येक समाधीच्या दगडांवर अति सुंदर कोरीव काम केले होते. सर्वात मोठ्या समाधीजवळ जाऊन इम्यु कुलनायकाने श्रद्धा व भक्तिपूर्वक



प्रथम नमस्कार केला आणि म्हणाला—"विक्रम! हीच तुझ्या आजोबांची समाधी आहे. आमच्या इम्यु शिल्पकाराने त्याच्या समजुतीप्रमाणे व शक्तिप्रमाणे महाराजांचे रूप या समाधीवर कोरून काढण्याचा प्रयत्न केला आहे. तुला त्यांच्या रूपाची कल्पना असेलच."

विक्रमकेसरी समाधीवर कोरलेली त्याच्या आज्याची प्रतिमा ध्यानपूर्वक पहात थोडा उभा राहला व म्हणाला—"हे माझ्या आजोबांचे हुबेहूब रूप उतरले आहे, यात थोडीदेखील शंका नाही. मी त्यांना लहानपणी पाहिले होते. पण मला त्यांची मुखाकृती काल परवा पाहिल्यासारखी छान आठवते."

इम्यु नायकाच्या आज्ञेने एक जण काही हार घेऊन आला. विक्रम व शिखिमुख दोघांनी समाधीवर त्या माळा वाहिल्या आणि नमस्कार केला. त्यानंतर सर्व गावाच्या मध्यभागी असलेल्या गोल कुटीत परतले. गोलकुटीजवळ लाल कुत्रा शिखीमुखला येऊन बिलगला. शिखीमुखने त्याला जवळ प्रेमाने ओढून कुरवाळले.

सर्वांनी दुपारचे खाणेपिणे करून घेतले व गप्पा मारीत बसले असतां दोघां इम्यूंनी



पुजारी पळून गेल्याचे सांगितले. पुष्कळ शोध केला तरी तो दिसला नाही, असे ही सांगितले.

"तो याच डोंगरात वटवाघळासारखा लपला असेल. काळोख पडल्यावरच तो बाहेर पडेल. तुम्ही डोळ्यात तेल घालून त्याच्यावर सतत नजर ठेवा." इम्यू नायकाने आज्ञा केली.

त्या दिवशी रात्री इम्यु कुलनायकाने आपल्या काही खास इम्यु प्रमुखांना बोलावून त्यांचा सल्ला घेतला. शिखीमुख व त्याच्या साथीदारांना वृश्चिक द्वीपावर पोंचविण्यासाठी दोन होडक्यांची व्यवस्था

केली. एक नाव शिखीमुख व साथीदारांना नेण्यासाठी व दुसरी शिल्पकलेचे जे नमुने मिळतील ते आणण्यासाठी अशा दोन नावा ठरल्या. त्यांच्या पाठीमागून एक मोठी नाव त्यांच्याबरोबर मदतीसाठी इम्यु अनुयायांना घेऊन जाण्यासाठी ठरली.

दुसऱ्या दिवशी सकाळी इम्यु लोकांनी तिन्ही नावांची दुरुस्ती करून घेतली. नवीन कातड्यांनी त्या शिवून काढल्या आणि दुपारपर्यंत निघण्याची तयारी झाली. शिखीमुख, विक्रम आणि अजित एका नावेत बसले. नांगसोम ज्या नावेत बसला होता त्या नावेत महिनाभर सर्वांना पुरेल एवढा शिधा भरला होता.

नांगसोमची नाव सर्वात पुढे, तिच्या पाठीमागून शिखीमुख वगैरेंची नाव व सर्वात शेवटी इम्यु नायक व अनुयायांची मोठी नाव अशा तिन्ही नावा निघाल्या. पुढल्या दोन नावा नदीत दोन तीन कोस [illegible] घेऊन मोठ्या नदीला मिळणाऱ्या उपनदीकडे वळल्या. काही वेळाने त्या नावा एका मोठ्या सरोवरात येऊन पोचल्या. त्यांना त्या सरोवरात लहान मोठी बेटे दिसत होती. त्या बेटावर मोठमोठी झाडे व पाणथळ प्रदेशात राहणारे पक्षी दिसत होते.

नांगसोमला त्या सर्व प्रदेशाची चांगली माहिती होती. तो आपल्या जातीच्या लोकांना घेऊन मासे धरायला त्या प्रदेशात अनेक वेळा आला होता. त्या सरोवरात मोठ मोठे मासे तर होतेच त्यांशिवाय तऱ्हेतऱ्हेचे इतर भयंकर प्राणी पण होते. वृश्चिक द्वीपापर्यंत जायच्या वाटेवर अनेक बेटे होती.

जे नावाडी वल्हवीत होते त्यांना पाण्यात चारही बाजूला मोठमोठ्या मगरी व देवमाशासारखे मोठ मोठे मासे त्यांच्या नावांचा पाठलाग करीत येत असलेले दिसले.





# निर्भय

विक्रमादित्याने हट्ट सोडला नाही. तो पुन्हा झाडा जवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि मौनपणे स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा, तुझा दृढ निश्चय वाखाणण्यासारखा आहे. परंतु मणिभद्रासारखा निर्भय व दृढनिश्चयी पण एका लहानशा गोष्टीसाठी आपल्या निश्चया-पासून ढळला. त्याची गोष्ट मी तुला सांगतो, ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

गिरिव्रजपुर नावाच्या गावी एक श्रीमंत मनुष्य रहात असे. त्याच्या मुलाचे नाव मणिभद्र असे होते. लहानपणापासून त्याला भयभीती नावाची वस्तूच माहीत नव्हती. बापाला वाटे की मोठा झाल्यावर कळू लागेल सर्व. परंतु तो मोठा होत गेला तसतसा धोका असेल नेमका तिथेच तो जाई.



कोणी विचारले की कायरे तुला भीती वाटत नाही का, की तो विचारी–"भीती ! म्हणजे हो काय ?"

मणिभद्राचे आई वडील मुलाच्या या निर्भयपणालाच भिऊ लागले. कारण धोक्याचे भय नसणारी व्यक्ती कधी कधी चुकून धोक्यात सापडते.

एकदा एका म्हाताऱ्याने मणिभद्राच्या आईवडिलांना सुचविले की मुलाच्या बाबतीत तुम्ही इतकी काळजी करीत बसण्याचे कारण नाही. काळजी केल्याने का त्याच्या स्वभावात बदल होणार आहे ? हळूहळू तो स्वतःच सावध होईल.

तरुण वयात आल्यावर मणिभद्राच्या मनात देशाटन करण्याची इच्छा उत्पन्न झाली. त्याला वाटे की या जगात निरनिराळ्या प्रकारचे प्रसंग मनुष्याला अनुभवायला मिळतात. त्या सर्वांना तोंड देण्याची शक्ति मनुष्यात असली पाहिजे. म्हणून तो वडिलांची परवानगी घेऊन व एका नोकराला बरोबर मदतीला घेऊन देशाटनास निघाला.

नवनवीन गावे पहात व निरनिराळ्या प्रकारचे अनुभव घेत दोघे फिरत होते. मणिभद्राला बरेच लोक ओळखू लागले.

फिरत फिरत दोघे एका मोठ्या गावी येऊन पोचले. ते एक व्यापाराचे केंद्र होते आणि एक मोठे तीर्थक्षेत्र पण होते. मणिभद्र त्या गावी येऊन पोचला त्यावेळी गावात यात्रेकरूंची व व्यापाऱ्यांची मोठी गर्दी होती. म्हणून धर्मशाळेत किंवा इतर कोठे मणिभद्राला उतरण्यासाठी जागा मिळाली नाही. गावाच्या टोकाला एक वाडा रिकामा असल्याचे व घरमालक ते घर सोडून गावात एका जागी येऊन रहात असल्याचे त्याला कळले.

मणिभद्र त्या घराच्या मालकिणीला भेटण्यासाठी गावात तिच्या घरी आला. तेव्हां घरमालक मरण पावल्यावर त्याची बायको व मुलगी दोघी गावात येऊन राहू लागल्या होत्या.

मणिभद्राने मालकिणीला भेटून विचारले–"बाईसाहेब, मी या गावी काही दिवस रहाण्यासाठी परगावाहून आलो आहे. गावाबाहेर आपले घर रिकामे आहे, असे ऐकतो. त्या घरात काही दिवस रहायला मला परवानगी देता का ?"

"हे पहा त्या घरात रहायला लोक भितात. तुम्हांला हरकत नसेल तर खुशाल रहा." घर मालकीण म्हणाली.

मणिभद्र आपल्या नोकराला बरोबर घेऊन त्या घरी आला. वाड्याची झाडलोड करवून घेऊन त्यात त्याने त्या दिवशी सैपाक पण करवून घेतला आणि जेवणखाण आटोपून झोपला.

मध्यरात्रीच्या सुमारास काहीतरी खुडबुड ऐकून मणिभद्राची झोप मोडली. आवाजाकडे जास्त लक्ष देऊन तो ऐकू लागला. तेव्हां त्याला छपरातून कोणी बोलल्याचे कळले. त्याच्या कानावर हे शब्द पडले– "वरून खाली पडलो तर तू काय करशील ?"

"मी काय करणार? काही नाही! खुशाल पड." मणिभद्र निधडक पणे म्हणाला.



"कोठे पडू? हळूच पडू की तुकडे तुकडे होऊन पडू ?" पुन्हां प्रश्न कानी पडला.

"तू धूळ होऊन पडलास तरी मला हरकत नाही." मणिभद्राने उत्तर दिले.

मणिभद्राचे उत्तर आल्याबरोबर माणसाचा एक पाय खाली येऊन पडला. त्यानंतर दुसरा पाय व त्याच्या पाठोपाठ एकेक करून हात, डोके असे शरिराचे अवयव येऊन मणिभद्राच्या चारी बाजूला पडले.

मणिभद्र तिळमात्र घाबरला नाही. तो निर्भीकपणे म्हणाला–"आता पुरे कर आपला हा खेळ! तू आपले सर्व तुकडे



एकाला एक जोडून माझ्या समोर उभा रहा आणि मला हे सांग तू या घरात असा कां राहतो आहेस आणि घरातल्या माणसांना असा त्रास कां देतो आहेस?"

मणिभद्राने तो प्रश्न विचारल्यावरोबर पाहतां पाहतां शरिराचे अवयव जोडले गेले आणि एक मनुष्याकृती त्याच्या डोळ्या-समोर उभी राहली. ती आकृती रूक्ष आवाजात मणिभद्राला म्हणाली—"मी या घराचा मालक आहे. मी जिवंत असतांनाच एका गृहस्थाचा जमीन जुमला गडप केला. मी जे काम केले ते खरोखरच दुष्टपणाचे होते. तो जमीन जुमला माझ्या बायकोने त्याला परत केला तरच मला या स्थितीतून मोक्ष मिळेल. तू जाऊन माझ्या बायकोला समजावून सांग आणि मला या लाजिरवाण्या आयुष्यातून वांचव."

मणिभद्राने त्या भुताला त्याला हवे होते ते वचन दिले तेव्हां ते भूत अदृश्य झाले. उजाडताच मणिभद्र घर मालकिणीच्या घरी गेला. उजाडतांच मणिभद्राला घरी आलेला पाहून रात्री काहीतरी अघटित घडले असावे असे मालकिणीला वाटले. परंतु मणिभद्र घाबरलेला नसून त्याने पतीच्या आत्म्याला शांती मिळण्यास मार्ग काढला असून तो मृतपतीचा निरोप घेऊन आल्याचे कळल्यावर तिला आनंदच झाला.

"त्या वाड्यात माझे मृत पती भूत होऊन रहात होते. त्यांनी ज्या माणसा-विषयी तुम्हांला सांगितले त्याला मी चांगला ओळखते. बिचारा गरिबीत आयुष्य कठीत आहे. मी त्यांचा जमीनजुमला परत करते. तुम्ही खरोखरच कोणीतरी धाडसी व दिसता आहां. त्यांचा आत्मा इतके दिवस कां अडकून होता हे मला कळले नव्हते. तुमच्या कृपेने आज माझ्या पतीचा उद्धार होण्यास मार्ग निघाला. मी तुमच्या या उपकाराबद्दल तुम्हांला [illegible] आपल्या मुलीचे लग्न तुमच्या बरोबर करून द्यावे म्हणते. तुम्ही घरजांवाई होऊन आम्हांला सुखी करावे." मालकीण म्हणाली.

मालकिणीची मुलगी तशी सुंदर व हुशार होती. परंतु मणिभद्राच्या मनात साहसाची कामे करीत राहण्याची इच्छा फार होती. एका जागी डांबून राहणे त्याला आवडत नव्हते. म्हणून तो म्हणाला—"क्षमा करा! एकाच जागी फार दिवस राहणे मला आवडत नाही. नेहमी संकटात उडी घेण्यातच मला आनंद वाटतो. म्हणून मी आजन्म ब्रह्मचारी राहण्याचे मनाशी ठरविले आहे."

मालकिणीच्या मुलीजवळ दोन कबूतरे होती. तिने त्या कबुतरांचा पिंजरा कबूतरां-सकट आठवण म्हणून मणिभद्राला दिला.

मायलेकींचा निरोप घेऊन मणिभद्र आपल्या नोकराबरोबर त्या गावाहून निघाला. दुपारच्या सुमारास दोघे एका बनात येऊन पोचले आणि एका झाडाखाली आराम करण्यासाठी बसले. तेव्हां मणि-भद्राचा नोकर आपल्या धन्याला म्हणाला—"ही कबूतरे पिंजऱ्याबाहेर पडून जाण्या-साठी कशी धडपडत आहेत पहा. त्यांना बरोबर न्यायची गरजच काय?"













"बरोबर आहे, तू म्हणतोस ते!" असे म्हणत मणिभद्राने पिंजऱ्याचे दार उघडले. लगेच दोन्ही कबूतरे बाहेर उडून गेली. त्यांच्या पंखाचा फडफड आवाज ऐकून मणिभद्राला कां कोणास ठाऊक, भीती वाटली. त्याच्या मनात एकदम बदल झाला. देशाटन व साहसाची कामे करण्याची इच्छा विरून गेली. तो त्या ओसाड वाड्याच्या मालकिणीच्या घरी परत आला. तिच्या मुलीशी लग्न करून घेऊन तो तिच्याचकडे कायमचा राहू लागला. मणिभद्राच्या मनात झालेला हा बदल पाहून त्याच्या बापाला पण आनंद झाला.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला— "राजा! मोठमोठी साहसाची कामे करणारा मणिभद्र कबूतरांना पाहून कसा कां भ्याला? या प्रश्नाचे उत्तर माहीत असून तू दिले नाहीस तर त्याचा परिणाम तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर छकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील."

ते ऐकून विक्रमादित्य म्हणाला— "मनुष्याला फक्त संकटांचेच किंवा धोक्याचेच भय वाटते, अशी समजून करून घेणे चुकीचे आहे. केव्हां केव्हां मोठमोठे शूर योद्धे सुद्धा अगदी सामान्य स्थितीत भितात. ज्याला भीती ही काय वस्तु आहे हे माहीत नाही तो मोठमोठ्या संकटांना तोंड देऊ शकतो. तोच मनुष्य अनपेक्षित संकटाची कल्पना करून भितो. हेच पहा, कबूतरे स्वभावाने गरीब असतात. परंतु त्याच्या पंखांचा आवाज मात्र भयंकर असतो. एका गरीब प्राण्याच्या पंखातून एकदम निघालेला भयंकर आवाज पाहून मणिभद्र घाबरला."

राजाचे मौन अशातऱ्हेने भंग होताच वेताळ प्रेतावरोबर अदृश्य झाला व जाऊन झाडाला पुन्हा लोंबकळू लागला. (कल्पित)





# देवी की डाकीण

गांधार देशात एक नदी होती. असे सांगतात की दरवर्षी ती नदी चाळीस लोकांचा बळी घेत असे. नदीच्या काठी फिरणारे, नदी पार करून जाणारे किंवा नदीत स्नानाला येणारे लोक एकाएकी नदीला पूर येई आणि त्यात बुडून मरत. कधी कधी लोक पुलावरून नदी पार करून जात असतां मध्येच पूल मोडून जाई आणि नदी त्यांना गिळून टाकी. म्हणून त्या नदीला लोक डाकीण असे म्हणत.

ती नदी दरवर्षी चाळीस जणांचा बळी घेत असली तरी तीच नदी गांधार देशाच्या पीक पाण्याला मुख्य आधार होती. पाणी अडवून लोक कालवे व पाट काढून शेताला पाणी नेत. त्या नदीच्या पाण्याने जागोजागी लहान मोठी तळीं भरत व वर्षभर नदीचे पाणी वाळून गेले तरी शेताला पाण्याचा पुरवठा होत राही. म्हणून लोक त्या नदीला देवी पण मानीत.

एकदा गांधार देशाच्या गादीवर गिरिवर्मा नांवाचा राजा राज्य करू लागला. त्याला नदी चाळीस लोकांचा बळी दरवर्षी घेते ही गोष्ट आवडली नाही. म्हणून त्याने नदीत कोणी स्नान करू नये असा हुकूम काढला. त्याने असादेखील हुकूम काढला की नदीच्या काठी कोणी घर बांधू नये की नदी पार करून जाऊ नये. प्रजा राजभक्त होती. म्हणून ती राजाज्ञेबाहेर वागत नसे. म्हणून प्रजेने या राजाज्ञेचे डोळे मिटून पालन केले. त्यामुळे दोन वर्षे नदीत बुडून कोणी मेला नाही.

तिसऱ्या वर्षी नदी पूर्णपणे अटून गेली. डोंगरावर पाऊस पडला, परंतु नदीत पाण्याचा एकही थेंब नव्हता. उन्हाळ्यात डोंगरावरचे बरफ वितळले आणि नद्यांना










पूर आले, परंतु गांधार देशातल्या नदीला पाणी आले नाही.

चवथ्या वर्षी नदीच्या काठची सर्व तळी अटून गेली. शेते पाण्याच्या अभावी वाळून चालली. प्यायलादेखील पाणी मिळेनासे झाले. एका काळी हिरवी गार दिसणारी शेते ओसाड दिसू लागली. धुळीचे लोट आकाशापर्यंत उठू लागले.

भयंकर दुष्काळ पडला. राजा गिरिवर्मा घाबरून गेला. तो आपल्या अनुयायां-बरोबर नदीला पाणी कां नाही हे पाहण्या-साठी निघाला. डाकिनी नदीचा उगम एका उंच डोंगरात होता. नदी मैदानात ज्या जागी उतरे त्या जागी नदीच्या वाटेवर मधोमध एक मोठा खडक आडवा येऊन पडला होता व नदीचे पाणी यायला वाटच नव्हती. तो खडक बाजूला सारल्यास नदी पुन्हा वाहू लागेल असे राजाला वाटले. परंतु डोंगरासारख्या एवढ्या मोठ्या खडकाला कोण बाजूला सारणार?

राजाबरोबर त्याचे मंत्री व अनुयायी होते. प्रधान राजाला म्हणाला—"महाराज! हा दगड येथे आणून उभा करण्याची किंवा या दगडाला बाजूला सरकवण्याची शक्ती मनुष्य प्राण्यात असणेच शक्य नाही. हे डाकीण देवीला शक्य आहे. तुम्ही त्या [illegible] बाजूला सरेल व पुन्हां नदीचा प्रवाह पूर्वीसारखा चालू होईल."

गिरिवर्मा राजाने एकट्याने डोंगरावर चढून देवीला वंदन करून प्रार्थना केली—"हे नदी माते! तू पाहिजे तर माझा बळी घे. मला तो मान्य आहे. पण माझी एक प्रार्थना स्वीकार कर, आमचा हा शस्यश्यामल देश एक ओसाड मैदान होऊ पहात आहे. तो वांचव. लोक उपाशी मेले तर तुला तरी काय मिळणार?"

त्या नंतर राजा त्याच जागी आराम करण्यासाठी पडला तर त्याला झोप लागली व त्याला एक स्वप्न पडले—"हे राजा! मी पुन्हां तुझ्या देशात पाऊल ठेवू म्हणतोस तर ते मी मान्य करते, पण सामान्य जनांचा बळी घेऊन माझी भूक भागणार नाही. तू या खेपेस चाळीस विद्वान मंडळींचा बळी माझ्या चरणी वाहला पाहिजेस." असे सांगून देवी अंतर्धान पावली.

राजाची झोप मोडली. देवीची ती भयंकर इच्छा ऐकून राजा घाबरून गेला. आजपर्यंत राजाने आज्ञा काढून बळी होऊ न देण्याची काळजी बाळगली होती. अधिकाराचा वापर त्याने त्यासाठी केला







होता. आज त्याच अधिकाराचा उपयोग चाळीस पंडितांचा बळी देण्यास करणे कसे काय योग्य होईल?

तोच विचार करीत राजा राजधानीस परतला. त्याने राज्यातल्या श्रेष्ठ पंडितांना बोलावून आणण्यास मंत्र्याना आज्ञा केली. राजाज्ञेप्रमाणे तिसऱ्या दिवशी मोठमोठे पंडित हजर झाले. राजाने मोजून पाहिले ते एक्केचाळीस होते. पण त्याला आवश्यकता फक्त चाळीस पंडितांची होती. एक जास्त होता.

राजा पंडितांना म्हणाला—"विद्वत्जन हो! आपणां सर्वांस विदितच आहे की डाकिणी नदी अटल्यामुळे देशात दुष्काळ पडला आहे. मी नदी मातेला वंदन करून प्रार्थना केल्यावर नदीने मला वरदान दिले आहे. चाळीस पंडितांचा बळी तिच्या चरणी वाहल्यास तिची धारा पुन्हा पहिल्यासारखी वाहू लागेल. देशासाठी आपला बळी जाण्यास तुमच्या पैकी कोणी तयार झाल्यास प्रजेवर तुमचे फार उपकार होतील."

राजाने एकाही पंडिताला स्वतःचा बळी देण्यास आज्ञा केली नाही. राजा म्हणाला ते ऐकून सर्व पंडितांचे चेहरे पांढरे फट्ट पडले. नंतर प्रत्येक जण एकेक करून काही तरी सबब सांगून स्वतःचा जीव वांचविण्याचा प्रयत्न करू लागला.

"मी स्वतःचा बळी द्यायला तयार आहे, परंतु माझी मुले लहान आहेत. माझ्या शिवाय ती पोरगी अनाथ होतील." एक पंडित म्हणाला.

"माझा विवाह नुकताच झाला आहे. माझी बायको गरोदर आहे आणि......" दुसरा म्हणाला.

अशा तऱ्हेने प्रत्येक जण एक न एक सबब सांगू लागला. स्वतःचे बलिदान करायला एक देखील तयार झाला

एक पंडित म्हणाला—"महाराज! मी स्वतःचा बळी द्यायला तयार आहे. आपण नदीमातेजवळ नम्रपणे माझ्या वतीने विनंती करावी, माझ्या एकट्याचा बळी घेऊन तिने तृप्त व्हावे. कदाचित आपणां सर्वांवर देवीची कृपा होईल."

राजाने त्या विद्वानाला वांकून नमस्कार केला आणि म्हणाला—"विद्वत्वर! आपली प्रार्थना स्वीकार. नदीमाता पर्वतावरून उतरून खाली आली तर आपली कीर्ती अजरामर होईल. व्हा पुढें!"

भगीरथ शर्मा पर्वत चढू लागले. त्यांच्या बरोबर शिष्टाचारासाठी म्हणून इतर पंडित सुद्धा निरोप द्यायला निघाले. डोंगराजवळ पोचल्यावर इतर पंडित पायथ्याजवळच थांबले आणि एकटे भगीरथ शर्मा टेकडीवर चढू लागले.

खाली उभे राहून चाळीस विद्वानांनी वर टेकडीकडे पाहिले. एक मोठा खडक नदीत मधोमध पडलेला दिसला. भगीरथ शर्मा आता एकटे काय करणार? नदी त्यांची प्रार्थना स्वीकारील का? एकट्याचा बळी घेऊन नदीचा अंतरात्मा तृप्त होईल का? इत्यादी गोष्टीवर सर्व पंडित आपसात बोलत होते.

इतक्यात डोंगरावर कडा तुटून पडावा असा भयंकर आवाज झाला. तो आवाज वाढत गेला आणि तो खडक जागचा हलला. गडगडत खाली येत तो भयंकर शिलाखंड पंडित खाली उभे होते त्यांच्यावर येऊन आदळला. चाळीस पंडितांपैकी एकही वांचला नाही. भगीरथ शर्मा सकुशल डोंगर उतरून खाली आला.

डाकिनी नदी पुन्हा पहिल्यासारखी वाहू लागली. लोकांनी नदीची पूजा केली. राजाने मृत पंडितांच्या कुटुंबाच्या उदर निर्वाहाची व्यवस्था करून दिली.



# विदूषक

एका राजाने एक विदूषक नेमायचे ठरवून उमेदवारांनी दरबारात विशिष्ट दिवशी हजर रहावे अशी दवंडी पिटविली. शेकडो विदूषक हजर झाले.

राजाने त्या सर्वांना सुरवातीला सांगितले की तुमच्या पैकी जो कोणी स्वतः न हसता दुसऱ्यांना हसवू शकेल तोच खरा विदूषक.

एकेकाने पुढे येऊन आपापला विनोद प्रस्तुत केला. त्या चढाओढीत भाग घेणारेच श्रोते पण होते. म्हणून त्यांच्या पैकी एक जणदेखील हसला नाही.

सर्वात शेवटी एक गिड्डा मनुष्य उठला. सर्व चकित मुद्रेने त्याच्या कडे पाहू लागले. तो काहीच बोलला नाही. सर्वांकडे नुसता पहात उभा राहला. तो काय करतो आहे हे कोणालाच कळले नाही. त्याच्या त्या विचित्र वागण्या बद्दल राजाला राग येईल असेच सर्वांना वाटू लागले.

तेव्हां दरबाऱ्यांपैकी एक जण म्हणाला—"वा रे वा! तुमचा विनोद अप्रतिम आहे खरा! आतां जाऊन बसा आपल्या जागेवर!" गिड्डा मुकाट्याने आपल्या जागेवर जाऊन बसला. राजा खदखदा हसू लागला. लगेच सर्व मोठ्याने हसू लागले. शेवटी राजाने त्या गिड्ड्या माणसालाच विदूषकाच्या पदावर नेमले.





# कुरूप नवरी मुलगी

फार प्राचीन काळी एक महा पराक्रमी राजा होता. त्याला एकुलती एक मुलगी होती. ती दिसायला कुरुप होती. परंतु बापाला ती अपूर्व सुंदरी वाटे. कारण मुलीवर बापाचे फार प्रेम होते. बाप तिला सुंदर म्हणे, म्हणून तिला ती अप्सरेसारखी सुंदर आहे असे वाटे. राजाच्या म्हणण्या विरुद्ध बोलण्याची कोण छाती करणार? म्हणून सर्व राजकन्येच्या सौंदर्याची वाखाणणी करीत.

हळूहळू विवाह योग्य वय आले तेव्हां बापाने मुलीचे लग्न करून देण्याचे ठरविले. त्याने एका दूर देशाच्या राजकुमाराची मुलीसाठी निवड करून लग्न ठरविले. तो राजकुमार हुशार व सुशील होता. त्याच्या बापाने हा संबंध ठरवितांना मुलीच्या रूपाकडे लक्ष देऊन आपली संमती दिली होती असे नसून काही तरी राजकीय कारणास्तव त्याने आपल्या मुलाकडून होकार मिळविला होता. राजकुमाराने वडिलांनी ठरविलेला संबंध तो त्याच्या हिताचाच असणार असा विचार करून होकार दिला होता.

परंतु त्याने मुलीला प्रत्यक्ष पाहिले तेव्हां त्याचा भ्रमनिरास झाला. तिच्या शेजारी बसण्यास किंवा उभे राहण्यास ही त्याला लाज वाटू लागली. राजाने त्याला विचारले "काय रे राजकन्येबरोबर चार चौघात बसायला संकोच करतोस होय?"

तो म्हणाला—"नाही तिचे स्वर्गीय सौंदर्य पाहून माझे डोळे दिपून गेले आहेत. हिच्या समोर आपण फिक्के पडू की काय असे वाटते मला."

"अरे त्यात काय? ही तुझी पत्नी होणार. असा संकोच करू लागलास तर कसे चालेल?" राजाने विचारले.

"इतक्या सुंदर मुलीशी लग्न करण्यास मन धजत नाही. तिच्यासमोर मला उभी

केलीत किंवा बसविलेत तर तिला नाही का कमी पणा वाटणार?" मुलाने औपरोधिकपणे विचारले.

लग्नाच्या ऐन प्रसंगी मुलाचे असे वागणे राजाला आवडले नाही. त्याला भयंकर राग आला. परंतु राजकन्या आपल्या वडिलांजवळ येऊन त्यांना म्हणाली–"जर राजकुमारांना ते स्वत: माझ्या सौन्दर्या योग्य नाहीत असे वाटत असेल तर मी एका पंडिताबरोबर लग्न करीन."

ते ऐकून राजा आपल्या दरबारातल्या एका पंडिताला बोलावून म्हणाला–"तुमच्या सारखा विद्वान आमच्या राज्यात दुसरा कोणी नाही. म्हणून मी तुमच्या बरोबरच राजकन्येचा विवाह करून देणार आहे."

तो पंडित राजा समोर हात जोडून म्हणाला–"महाराज! असे कसे होईल? माझा विवाह या पूर्वीच झालेला आहे. मला मुलेबाळे आहेत. मी एक कुलीन ब्राह्मण आहे. जातीबाहेर हे लग्न करणे इष्ट नाही व त्यात आपला पण गौरव नाही."

मंत्री म्हणाला–"पंडितवर, शास्त्रात ब्राह्मणाला चार वर्णांपैकी कोणत्याही जाती-च्या मुलीशी लग्न करण्यास अधिकार आहे, असे सांगितले आहे. बोला, याला तुमचे काय उत्तर आहे?" "राजकुमारीची इच्छा एका पंडिताशीच लग्न करण्याची आहे. तिची इच्छा म्हणजे माझी आज्ञा, समजा. राजाज्ञेचा भंग करता कामा नये." राजा म्हणाला.

"महाराज! मला हे लग्न करणे शक्य नाही. राजाज्ञेचे उल्लंघन केल्याबद्दल आपण मला जो दंड देणार असाल, द्यावा. मी तो भोगण्यास तयार आहे." पंडित म्हणाला.

"उद्या उजाडण्यापूर्वी तू माझ्या राज्याच्या वेशीबाहेर निघून गेले पाहिजे, ही शिक्षा मी तुला करतो." राजा म्हणाला.

राजकुमाराने पाहिले की पंडितावर फार मोठा प्रसंग आला आहे. आणखी कोणावर तोच प्रसंग ओढवणार नाही कशावरून? असा विचार करून तो म्हणाला–"महाराज! राजकन्येचा विवाह झाला पाहिजे व होईलच. या साठी मी एक उपाय सुचवितो. आवडल्यास आपण करावा."

"बोल, ऐकू तर दे." राजा म्हणाला.

"क्षत्रियांना निमंत्रणे पाठवावी की राजकन्येच्या विवाहासाठी स्वयंवर रचण्यात आले आहे. द्वंद्व युद्धात सर्वश्रेष्ठ ठरेल त्याच्याशी राजकन्येचा विवाह करून देण्यात येईल. मी देखील त्या स्पर्धेत भाग घेईन." राजकुमार म्हणाला.

राजाला तो उपाय पसंत पडला. त्याने राजधानीतल्या सर्व क्षत्रिय तरुणांना





निमंत्रणे पाठविली आणि द्वंद्वयुद्धाची व्यवस्था केली. सर्व क्षत्रिय तरुणमंडळी द्वंद्वयुद्धात भाग घेण्यास हजर झाली. बराच वेळ द्वंद्वयुद्धे होत राहिली. पण एक देखील तरुण जखमी झाला नाही की हारला नाही.

हे पाहून राजा म्हणाला–"तुमच्या पैकी सर्वात प्रथम जो जखमी होईल त्याच्याशी राजकन्येचा विवाह करून देण्यात येईल."

द्वंद्वयुद्ध जोरजोराने सुरू झाले. प्रत्येक जण आपल्या प्रतिद्वंद्वाला जखमी करण्याचा प्रयत्न करू लागला. एका क्षणार्धात सर्व थोडेफार जखमी झाले. म्हणून प्रथम कोण जखमी झाला हे कळणे शक्य झाले नाही. प्रत्येक जण आपला प्रति द्वंद्वीच पहिल्याने जखमी झाल्याचे सांगू लागला.

ते दृश्य पाहून राजकन्या म्हणाली–"बाबा! माझ्या सौंदर्याची भीती वाटणाऱ्या [illegible] त्या पेक्षा अविवाहित राहणे मला जास्त बरे वाटेल."

त्याच वेळी दरबारी संगीताचार्याचा आवाज ऐकू आला. तो म्हणाला–"महाराज! माझी एक विनंती आहे."

"बोला, काय विनंती आहे तुमची?" राजाने संतापाने विचारले.

"मी जन्मांध आहे. अविवाहित आहे. राजकन्येचे सौंदर्य पाहून खूष होण्याचे किंवा घाबरण्याचे कारणच नाही. म्हणून माझ्याशी राजकन्येचा विवाह करून देऊन माझा उद्धार करावा. आपल्याला मोठे पुण्य लागेल."

राजकुमारी त्या जन्मांध गायकाशी विवाहास तयार झाली. राजाने दोघांच्या लग्नास संमती देऊन दोघांचे लग्न करून दिले आणि त्या अंध गायकालाच आपला उत्तराधिकारी म्हणून नेमले.





# गर्वाचे फळ

पुरुषपूरच्या राजाला सौदामिनी नावाची एक मुलगी होती. एकुलत्या एका मुलीचे लाड व कोडकौतुक पण होई. ती दिसायला सुंदर होती. म्हणून ती स्वभावाने थोडी हट्टी व गर्विष्ठ पण होत गेली.

सौदामिनीला अठरावे वर्ष लागले तेव्हां राजाने तिचे लग्न करून देण्याचे ठरवून अनेक राज्यांच्या राजकुमारांना पाहिले व शेवटी मणिपूरचा राजकुमार चित्राश्व हा आपल्या मुलीला योग्य वर होईल असे ठरविले. वरवधूने परस्परांची पसंती सांगावी या हेतूने राजाने चित्राश्वाला पुरुषपुर येऊन काही दिवस राहण्यास निमंत्रण पाठविले. त्याप्रमाणे चित्राश्व पुरुषपूरला येऊन राहिला व दोघां वधुवरांच्या पसंतीनेच लग्न ठरले.

परंतु राजाची इच्छा पुरी झाली नाही. कारण राजकन्येने आपल्या गर्विष्ठपणाने चित्राश्वाचा अपमान केला. चित्राश्व तिला म्हणाला–"तुला इतका जो गर्व आहे तो केव्हां तरी उतरेल. तुला स्वतःच्या पोटासाठी परक्यासमोर हात पसरावा लागेल, घाणरडे पाणी प्यावे लागेल आणि खडबडीत जमिनीवर झोपावे लागेल." असे सांगून राजकुमार आपल्या साथी मित्रांबरोबर स्वदेशी निघून गेला.

लाडात वाढलेल्या सौदामिनीला वाटत होते की वडील तिचीच बाजू घेऊन चित्राश्वाला दोष देतील. पण तिचा अंदाज चुकला. राजाने तिच्या मूर्खपणाची निंदा केली म्हणाला–"तुझ्यामुळे माझी मान आज खाली झाली. अशी मुलगी असून नसून सारखीच! तू चालती हो माझ्या घरातून. तुला माझ्या राज्यात कोठे ही रहायला परवानगी नाही." असे सांगून राजाने शिपायांना सांगून सौदामिनीला राज्याच्या हद्दीबाहेर पाठवून दिले.

श्री अरविंद प. [illegible]











सौदामिनी एका झाडाखाली बसून आपल्या मूर्खपणाबद्दल पश्चात्ताप करून रडू लागली. आपल्या हातून तशीच मोठी चूक घडली आहे. ठेच लागल्यावर मनुष्याला ज्ञानबोध होतो या नियमाप्रमाणे सौदामिनीचे डोळे उघडले.

सौदामिनी झाडाखाली रडत बसली असता एका म्हाताऱ्याने जवळ येऊन विचारले–"मुली! कां ग रडते आहेस? कोण तू? येथे एकटी कशी?"

वडीलधाऱ्यांविषयी किंचित् देखील मनात आदर न बाळगणाऱ्या सौदामिनीला त्या म्हाताऱ्याला पाहून देव पावल्यासारखा आनंद वाटला. तिने सर्व खरेखरे सांगून आपलीच चूक असल्याचे कबूल केले.

"मोठमोठ्या राजपुरुषांना आणि थोर संतांना देखील वाईट दिवस येतात. घाबरू नकोस. मी आपल्या गावी जातो आहे, तुला हरकत नसेल तर चल माझ्याबरोबर," म्हातारा म्हणाला.

सौदामिनी आनंदाने त्या म्हाताऱ्याबरोबर जायला तयार झाली. परंतु तिला पायी चालायची संवय नव्हती. थोडे अंतर चालून गेल्यावर तिचे पाय दुखू लागले. म्हातारा तिला धीर देत होता व हळूहळू चालण्यास सांगत होता. सौदामिनीला त्या म्हाताऱ्यासारखा दयाळू मनुष्य दुनियेत कोठे मिळणार नाही असे वाटू लागले.



सौदामिनीला भूक लागली तेव्हा म्हाताऱ्याने उपरण्यात बांधून ठेवलेले गूळ-पोहे तिला खायला दिले. ते खात असता सौदामिनीला रडू कोसळले. ते पाहून म्हातारा सहानुभूतीच्या स्वरात म्हणाला–"मुली! माणसाला भूक लागली की जे खावे लागते. भुकेला आंबटगोड, तिखटकडू काही कळत नाही."

तिला थोड्या वेळाने तहान लागली. शेजारच्या डबक्यात पाणी होते. पण तिला ते पाणी प्यावेसे वाटेना.

"तुला तेवढी तहान लागली नसेल तर थोडावेळ थांब. आपण पुढे जाऊ. बरेंसे पाणी मिळाले की पी." म्हातारा म्हणाला.

"तहान कां नाही? घशाला कोरड पडली आहे." सौदामिनी म्हणाली.

"तरमग हेच पाणी प्यावे लागणार, मुली!" म्हातारा म्हणाला.

सौदामिनीला तेच पाणी प्यावे लागले.

पायी चालत असता ती अगदी दमून गेली आणि तिला झोप आली. म्हणाली–"आजोबा! झोपावेसे वाटते."



त्या दिवशी रात्री सौदामिनीला झाडाखाली झोपावे लागले. जागा खडबडीत होती तरी तिला छान झोप लागली.

अशातऱ्हेने दोघे दोन तीन दिवस पायी प्रवास करीत मणिपूरच्या राज्यात येऊन पोंचले. म्हातारा तिला म्हणाला–"मुली, तुला जास्त दूर चालवणार नाही. आपण याच देशात राहून काही तरी कामधंदा करून पोटापाण्याला मार्ग काढू. तुला काही काय बीम येते का?" म्हाताऱ्याने सौदामिनीला विचारले.

"मला फक्त कशीदा काढता येतो. त्या कलेचा मी चांगला अभ्यास केला आहे

व मला त्या कलेत चांगले प्राविण्य मिळाले आहे," सौदामिनी म्हणाली.

तो म्हातारा सौदामिनीला राजवाड्यात घेऊन गेला. त्याने, तिला कोणते काम देता येईल याविषयी अंत:पुरातील स्त्रियांचा सल्ला घेतला. व नंतर बाहेर येऊन तिला म्हणाला–"तुला पाहिजे असेल तर येथे काम मिळू शकेल."

सौदामिनी दासी म्हणून अंत:पुरात रहायला कबूल झाली. राजवाड्यात तिला काम करावे लागे व गुरांच्या गोठ्यात तिला रहावे लागे. तेथेच म्हातारा पण राहू लागला. तिला कोणी ओळखले नाही. पहिल्यादिवशी सकाळपासून संध्याकाळपर्यंत तिला काम करावे लागले. दोन्ही वेळ तिला राजवाड्यातल्या इतर नोकरांबरोबर जेवायला मिळाले. ती दिवसभर काम करून झोपडीत परत आली. म्हातारा निराश होऊन एकटा बसलेला तिला दिसला. "जेवलात का आजोबा? दिवस-भर काय करीत होता?" तिने म्हाताऱ्याला विचारले.

"कामाच्या शोधार्थ मी दिवसभर हिंडत होतो. म्हाताऱ्याला काम कोण देणार? मला खायला प्यायला काही मिळाले नाही." म्हातारा म्हणाला.

सौदामिनीला कार [illegible] वेळी तिला आई बाप, बंधु बांधव असा सर्व काही तो एकटाच होता. म्हणून दुसऱ्या दिवशी जेवणा घेऊन तिने घरी जायचा विचार केला. परंतु तिला घरी जायला कोणी परवानगी दिली नाही. त्या दिवशी रात्री घरी घेऊन जाण्यासाठी तिने सर्वांची नजर चुकवून तिला मिळालेल्या अन्नातले थोडे राखून बाजूला काढून ठेवले होते. ते एका दासीने पाहिले व राज-मातेला जाऊन सांगितले.

"तुझी कीव येऊन आम्ही तुला काम दिले आणि तू हा उद्योग सुरू केलास होय?" राजमाता तिला खूप रागावली.

सौदामिनीला तो अपमान असह्य वाटला व तिला रडू कोसळले. ती रडत असता कोणी तरी पुरुषी आवाजात म्हटलेले तिला ऐकू आले–"आई! सोड बिचारीला. तिच्या हातून हा पाहिलाच अपराध घडला आहे. माफ कर तिला." सौदामिनीने मान वर करून पाहिले. बोलणारा चित्रारव आहे हे तिने ओळखले. त्याच्या चेहऱ्यावर त्याला दया दिसत होती.

चित्रारवने आपल्याला ओळखले तर आपली सर्व अब्रू गेलीच की, असे तिला







वाटू लागले. परंतु त्याने तिला ओळखले नसल्याची तिची खात्री पटली. आपण अशा दयाळू राजकुमाराचा अपमान करून मोठीच चूक केली असे तिला वाटू लागले. नशिबाने पाठ फिरविली की मनुष्याच्या आयुष्यात किती बदल होतो. कोठे ती राणी होऊन या घरात राहणार होती व आता दासी म्हणून राबते आहे.

रात्री घरी परतल्यावर म्हाताऱ्याने त्याला काम मिळाले असल्याचे व जेथे तो काम करतो तेथेच पोटभर जेवायलासुद्धा मिळत असल्याचे सौदामिनीला सांगितले. तेव्हां आपण म्हाताऱ्याच्या साठी अन्न चोरून ठेवून उगाच चोरीचा आळ स्वतःव[र] लावून घेतला.

आणखी काही दिवस असेच लोटल[े] राजकुमाराचे लग्न ठरल्याची गो[ष्ट] राजवाड्यात सर्व सांगू लागले. नवीन सुनबाईसाठी नवीन कपडे आणून त्याच्याव[र] कशिदा काढवण्याचे ठरले. सौदामिनीला [हे] काम उत्तम येते हे म्हाताऱ्याने सांगितले होते. म्हणून सौदामिनीला कशिदा काढण्याचे काम देण्यात आले. अंतःपुरात एका खोलीत बसून ती ते काम करू लागली. राणी व राजघराण्यातली मंडळी मधून मधून येऊन सौदामिनीचे काम पाहून तिच्या कलेची फार वाखाणाणी करू लागले.

लग्नाचा मुहूर्त ठरला होता त्याच्या एक दिवस आधी राजमाता सौदामिनीजवळ येऊन म्हणाली—"सुनबाईला तू कशिदा काढलेले कपडे कसे दिसतील हे पहावयाचे आहे. आमची होणारी सुनबाई तुझ्या एवढीच उंच व अंगापिडाने अगदी अशीच आहे. म्हणून तूच साडी चोळी नेसून तयार हो. आम्ही पहाणार आहो."

सौदामिनीला काय उत्तर द्यावे, सुचेना.

इतक्यात कोणीतरी ओरडून विचारले—"वधूला नेसायला द्यायचे कपडे दासीला ... तरी करायला सांग."

काही दासींनी सौदामिनीला बोलावून नेले व तेल लावून तिच्या अंगाला उटणे चोळून तिला न्हाऊ घातले. नंतर तिचे केस वाळवून सुवासिक तेल लावून वेणी फणी केली व सुंदर फुलांचे गजरे करून तिच्या वेणीत घातले. एका सुवासिनीने येऊन सौदामिनीच्या भांगात कुंकू भरले. दुसरीने तिला सुंदर कशीदा काढलेली साडीचोळी नेसायला मदत केली. आणखी एकीने येऊन तिला सर्व दागिने घातले.

सर्वांनी येऊन चकित होऊन सौदामिनीचे सौंदर्य पाहिले. तेव्हां चित्राश्व नवऱ्या मुलाचा पोशाख करून पुढे येऊन विचारू लागला—"हिला का नवरी मुलगी म्हणून बोहल्यावर उभी करणार? सौदामिनी! ह्यांनी तुला विचारून घेतले होते का?"

सौदामिनी लगेच पुढे येऊन चित्राश्वाचे पाय धरून म्हणाली—"मला वाटत होते की तुम्ही मला ओळखले नाही. क्षमा करा, मीच चूक केली होती."

"ते, सर्व आता विसर. हे सर्व नाटक मी व तुझे वडील दोघांनी मिळून रचले होते. तुझ्या बरोबर राहणारा म्हातारा मीच नेमलेला माझा एक विश्वासपात्र नोकर आहे. तू माझा जो अपमान केला होतास तो मी पार विसरून गेलो आहे. मी तुला जे कष्ट दिले ते तू विसरून जा." चित्राश्व तिला म्हणाला.

सौदामिनीच्या मनात तोंपर्यंत बराच बदल झाला होता. तिचा गर्व भंग करण्यासाठी तिला आणखी कष्ट दिले असते तरी ती ते सहन करायला तयार झाली असती. म्हणून आणखी जास्त परीक्षा घेण्याची गरज उरलीच नव्हती.

दोघांचा विवाह थाटामाटाने पार पडला.



# मूर्ख पंडित

एका गावी आपल्या पांडित्याच्या फुशारक्या मारणारा पंडित रहात असे.

एकदा एका हुशार मनुष्याने त्या पंडिताला येऊन विचारले–"कायहो, तुमचे पांडित्य समजणारा या गावात कोणीच नाही का? तुम्ही दिग्विजयाला कां जात नाही? तुम्ही एकामागून एक गाव जिंकीत जावे असे मला वाटते. देशभर तुमच्या पांडित्याची प्रसिद्धी होईल व या गावचे राहणारे तुम्ही, म्हणून या गावालादेखील प्रसिद्धी मिळेल."

त्या पंडिताला तो सल्ला पसंत पडला. तो सुमुहूर्त पाहून दिग्विजयाला निघाला. तो एका गांवाजवळ पोचला तेव्हां एक धनगर त्याला भेटला. त्या पंडिताने त्याला विचारले–"कायरे, तुमच्या गावात कोणी विद्वान पंडित आहे का? मी त्याचा पराभव करून त्याला जिंकणार आहे."

धनगराला वाटले की कोणीतरी बडबड्या दिसतो आहे. म्हणून त्याने एकदम खाली वाकून जमिनीवरची वाळू उचलून हातात घेतली व त्याला विचारले–"माझ्या हातात किती वाळू आहे, सांगू शकाल काय?"

पंडिताने रागाने त्याला विचारले–"हा काय प्रश्न झाला? तुझ्या हातात किती वाळू आहे हे मी मापून किंवा वजन करून का पाहिले आहे?"

"अहो, मुठीत मूठभर वाळू आहे, हे सुद्धां तुम्हांला सांगता येत नाही, मग तुम्ही पंडित कसे झालात?" धनगराने विचारले. तेव्हां पंडिताला स्वतःच्या पांडित्याचे मोजमाप कळले व त्याने फुशारक्या मारायचे सोडून दिले.





# सिंदबादच्या सफरी

धडपडी माणसे कधी स्वस्थ बसू शकत नाहीत. सफरीचा नाद लागल्यावर व जिवावरच्या संकटातून सुटका होऊन घरी सुखरूप परत आल्यावर सिंदबादचे तसेच झाले. स्वस्थपणा त्याला कसा आवडणार? तरी सिंदबाद चार दोन महीने घरी स्वस्थ राहला. पण थोड्याच दिवसात त्याला करमेनासे झाले. पुन्हा एखाद्या सफरीवर जाऊन येण्याची हुक्की त्याच्या मनात उपजली. त्याने व्यापारासाठी थोडा माल विकत घेतला व बसरा नगरी आला. तेथून एक व्यापारी जहाज निघणार होते. त्यात पुष्कळ व्यापारी होते. त्यांच्या बरोबर तो आपल्या तिसऱ्या सफरीवर निघाला.

काही दिवस त्यांचा प्रवास निर्विघ्नपणे चालू राहला. जेथे जेथे नवीन बंदरात जहाज थांबे तेथील पेठेत जवळचा माल विकून व नवीन माल खरेदी करून सिंदबाद इतर व्यापाऱ्यांबरोबर पुढे जात होता. त्यांना अनेक देश पहायला मिळाले. तो सफरीवर निघाला नसता तर त्याला हे पहायला मिळाले नसते.

जहाज निरनिराळ्या प्रदेशात हिंडत हिंडत भूमध्यसागराच्या मध्यभागी पोचले. इतक्यात जहाजाच्या कप्तानाने आपल्या कपाळावर हात आपटून डोक्याचा फेटा काढून फेकून दिला आणि वेड्यासारखा मोठमोठ्याने ओरडू लागला.

व्यापाऱ्यांनी त्याला विचारले–"कप्तान झाले तरी काय सांगाल की नाही?"

"अहो काय सांगू साहेब? वाऱ्याने आपल्याला फसविले. आपण ज्या जागी येऊन पोचलो आहो, ती एक भयंकर धोक्याची जाग आहे. दूर तुम्हांला एक बेट दिसते का, तेथे आपले जहाज जाऊन



लागणार. त्या बेटावर जाऊन आजपर्यंत कोणी मनुष्य जिवंत परतला नाही. त्या बेटाचे नाव माकड बेट आहे. आपले सर्वांचे मरण जवळ येऊन ठेपले आहे, नाहीतर आपले जहाज या बाजूला वाहून आलेच नसते." कप्तान म्हणाला.

कप्तानाच्या तोंडचे वाक्य पुरे होण्या पूर्वीच त्या बेटावरून अनेक जंगली माकडे पोहोत जहाजाकडे येत असलेली दिसली. त्या सर्व जनावरांनी जहाजाला चारी बाजूंनी जणुं गराडाच घातला. काही जनावरे काठावरूनच जहाजाकडे क्रूर नजरेने पहात होती. काही मोठमोठ्याने ओरडत होती.

त्यांचे ते भयंकर ओरडणे ऐकून व्यापाऱ्यांच्या सर्वांगाला घाम सुटला व कांपरे भरले. माकडे जहाजावर चढली व जहाजातला माल ओढून पाण्यात भराभर फेकू लागली. माकडे इतकी होती की कोणाची पुढे जाऊन त्यांना पळवून लावण्याची हिंमतच होईना.

माकडे एकाहून एक मोठी व दिसायला भयंकर होती. त्यांच्या अंगावर लांबलांब केस होते. त्यांची तोंडे काळी होती व डोळे हिरवे घारे होते. उंची अडीच तीनच फूट होती. परंतु त्यांची मुखाकृती व ओरडणे पहाणाराला व ऐकणाराला दहशत बसविणारी होती. ती माकडे आपल्या भाषेत शिव्या देत होती असे वाटे. डोळे मिचकावून व वेडी वांकडी तोंडे करून ती काही ओरडत. त्याचा अर्थ कोणाला कळत नव्हता.

काही माकडांनी शिडाच्या दांडीवर चढून शिडाच्या दोऱ्या तोडून टाकल्या आणि शिडे फाडून खाली टाकून दिली. काही माकडांनी सुकाणू धरून नाव वळविली. वाऱ्यामुळे जहाज किनाऱ्याकडे जाऊ लागले. जहाज किनाऱ्याला लागल्यावर माकडांनी त्यावरच्या उतारूंना किनाऱ्यावर उतरविले



[illegible] कोठेतरी घेऊन गेले.

सर्व उतारू जहाज परत येण्याची वाट पाहू लागले. दूरवर त्यांनी पाहिले, पण त्यांना एकदेखील जहाज समुद्रात दिसले नाही. म्हणून बेटावर आसऱ्यासाठी त्यांना जावेच लागले. झाडावरची फळे काढून त्यांनी खाल्ली व ओढ्याचे पाणी पिऊन आपली भूकतहान भागविली. हिंडत असता त्यांना दूर एक वाडा दिसला. त्या बाजूला सर्व जाऊ लागले.

तो वाडा चौकोनी व उंच होता. त्याच्या चारी बाजूला एक मोठे आवार होते आणि मोठी भिंत होती. आवाराचे फाटक उघडे होते. फाटकावर पाहरा नव्हता. म्हणून सर्वांनी आत प्रवेश केला.

त्या वाड्याला एक मोठा वरांडा होता. त्यात सैंपाकाची मोठमोठी भांडी व मांस भाजण्यासाठी गज ठेवले होते. फरशीवर हाडांचा ढीग पडला होता. काही हाडे वाळून गेली होती आणि काही अजून ताजी ओली होती. घाणेरडा वास इतका सुटला होता की श्वास घेणे सुद्धा अशक्य वाटत होते. सर्व उतारू अगदी दमून गेले होते. म्हणून ते जरा आडवे झाले आणि लगेच त्यांना झोप लागली.





काळोख पडू लागला. ढग गडगडतात असा आवाज ऐकून सर्व उतारू खडबडून जागे झाले. पाहता पाहता गच्चीवरून एक भयंकर राक्षसासारखी एक व्यक्ति खाली उतरून आली. दिसायला ताडाच्या झाडा-एवढी व काळीकुट्ट होती ती व्यक्ति. त्या राक्षसाचे डोळे निखाऱ्यासारखे लालभडक होते व कान खांद्यावर लोंबत होते. त्याची नखें वाघासिंहासारखी मोठमोठी व अण-कुचीदार होती. त्याला पाहून सर्व प्रवाशांचे तोंडे भीतीने पांढरी फट्ट झाली.

तो राक्षस सरळ जाऊन भितीजवळ एक बांक होते त्यावर जाऊन बसला. त्याने एकदा आपल्या चारी बाजला पाहिले. नंतर तो उठून सिंदबाद बसला होता तेथे आला. मांजराच्या पिल्लासारखे त्याला वर उचलून त्याने खाली वर चारी बाजूला पाहून घेतले. पण राक्षसाला सिंदबाद आवडला नसावा. त्याने त्याला खाली टाकून दिले आणि एकेक करून सर्वांना तो उचलून पाहू लागला.

शेवटी कप्तानाची पाळी आली. तो उंच व गलेलट्ठ होता. म्हणून राक्षसाने त्याची मान मुरगळून त्याला ठार केले. लोखंडी गज त्याच्या अंगात खुपसून त्याला छान भाजून काढले आणि मांस खाऊन तो त्याच बांकावर झोपला. थोड्याच वेळाने तो घोरू लागला.

सर्व प्रवासी त्या राक्षसाची ती लीला पहात होते. त्यांचा जीव कोठे दडी मारून बसता येईल का असा झाला होता. सकाळी उजाडल्यावर राक्षस निघून जाईपर्यंत सर्व एका कोपऱ्यात एकमेकाला चिकटून बसले होते.

काय करावे, कोणाला काही सुचेना. बाहेर लपायला कोठे जागा मिळेल का हे सर्व पाहू लागले. पण कोठे जागा दिसली नाही. त्यांनी विचार केला की राक्षसाच्या तोंडी मरण येण्यापेक्षा समुद्रात जीव गेला तरी हरकत नाही. एका दोघांनी असे मरण्यापेक्षा राक्षसाचा वध करता आला तर बरे, असा विचार केला. तोच सल्ला सर्वांना आवडला. त्याला ठार केल्यावर त्या बेटावरून पळून जायला कोणता तरी मार्ग निघेलच. त्यांनी समुद्रावर पडलेली ओणकी एक दुसऱ्याला जोडून वेलांनी ती बांधली व एक जुजुबी नाव तयार केली. नंतर सर्व त्या वाड्यात परतले.

ठरल्या वेळी राक्षस त्या वाड्यात परत आला. त्याने दोघांना एक दुसऱ्यावर वडवून ठार करून टाकले आणि बाकावर गाढ झोपी गेला. त्या वेळी सर्व प्रवाश्यांनी विस्तवात लोखंडी गज लालभडक होईपर्यंत तापविले आणि तिघाचौघांनी मिळून ते उचलून राक्षसाच्या डोळ्यात खुपसले. राक्षस इतक्या जोराने किंकाळ्या फोडून ओरडला की सर्व महाल हादरला.

राक्षस आंधळा झाला, पण मेला नाही. आपले लांब लांब हात पसरून प्रवाश्यांना धरण्याचा प्रयत्न करून पाहिला. पण कोणी ही त्याला सापडला नाही. शेवटी तो ओरडत महालाबाहेर पडला. सर्व प्रवासी समुद्रकाठ पळाले



आणि जुजुबी नावेला समुद्रात ढकलून नेऊन तिच्यावर चढू खोल समुद्रात वल्हवीत नेऊ लागले.

थोड्याच वेळाने त्यांना राक्षसाच्या आरोळ्या ऐकू येऊ लागल्या. त्यांना दुरून राक्षसाचा हात धरून एक राक्षसीण येत असल्याचे दिसले. दोघांनी मोठमोठे दगड प्रवाशांच्या नावेवर फेकायला सुरवात केली. सिंदबाद व दोघांशिवाय प्रवाश्यांखेरीज इतरांना दगड लागले आणि ते समुद्रात पडले. पण सिंदबाद व त्याच्या दोघा साथीदारांनी शिताफीने नाव खोल पाण्यात वल्हवीत नेली. ते तिघे दोन दिवस त्या











नावेतच प्रवास करीत आणखी एका बेटावर जाऊन उतरले. सर्व दमून गेले होते. झाडाची फळे खाऊन व एका ओढ्याचे पाणी पिऊन ते झाडांवर चढून बसले. रात्र पडू लागली होती, म्हणून झाडांवरच झोपणे जास्त सुरक्षित आहे असा विचार करून ते झाडांवरच झोपले.

उजाडल्यावर पाहतात तर एक मोठे अजगर, ते चढले होते त्या झाडाकडे येत असलेले दिसले. अजगराने आपले तोंड वर करून सिंदबादच्या एका साथीदाराला ओढून गिळून टाकले आणि निघून गेले.

त्यानंतर सिंदबाद व त्याचा साथीदार झाडावरून खाली उतरून आले आणि फळे खाऊन घेऊन बेटावर सर्वात उंच झाड कोठे आहे हे पहात हिंडू लागले.

बराच वेळ हिंडल्यावर त्यांना एक झाड दिसले. त्या दिवशी रात्री ते त्याच झाडावर चढून बसले. सकाळी उठून पाहतात तर तेच अजगर त्या झाडाच्या बुंधाला विळखा घालून बसले होते. सूर्योदय होताच त्या अजगराने सिंदबादच्या त्या एकुलत्या एका साथीदाराला सुद्धा गिळून टाकले आणि निघून गेले.

सिंदबादच्या मनाची त्या वेळी जी स्थिती झाली ती त्याची त्यालाच माहीत. त्या जाहजावरचा तो एकटाच आता जिवंत उरला होता. काही राक्षसाने खाल्ले, काही राक्षसाने फेंकलेले दगड लागून मेले आणि तिथे उरले होते त्यातल्या दोघांना अजगराने गिळले. त्या अजगराच्या तोंडचा घास होण्याऐवजी समुद्रात बुडून मरण आले तर बरे, असे त्याला वाटू लागले. असा विचार करून आत्महत्या करण्याच्या हेतूने तो किनाऱ्याकडे भरधांव पळत सुटला.

किनाऱ्यावर पोचताच त्याला स्वतःचा जीव वांचविण्यास एक युक्ती सुचली. समुद्र काठी अनेक फळकुट्या पडलेल्या होत्या. त्याने चार मोठ्या फळ्या जमा करून त्या जम्या पुरल्या आणि त्या फळ्यांचा एक पिंजरा करून तो आत बसून राहिला. अजगर आले, पण त्याला आत शिरण्या-पुरेशी फट नव्हती. म्हणून ते निराश होऊन आल्या वाटेने निघून गेले.

अजगर दूर निघून गेल्याची खात्री झाल्यावर सिंदबाद त्या पिंजऱ्याच्या बाहेर आला. त्याच वेळी सुदैवाने दूर समुद्रात त्याला एक जहाज दिसले. तो जोरजोराने वेड्यासारखा हात हालवून मोठ्याने ओरडून हाका मागून हाका मारू लागला. एका झाडावर चढून त्याने डोक्याची पगडी सोडून ती झेंड्यासारखी हालवून त्या जहाजावरच्या लोकांचे लक्ष आपल्याकडे ओढता आले तर पहावे म्हणून प्रयत्न केला आणि त्याला त्यात यश आले. खलाशांनी जहाज त्या बेटाकडे वळविले आणि बेटाजवळ आल्या बरोबर नांगर टाकला. त्यांनी सिंदबादला जहाजावर चढवून घेतले.

सिंदबादने खलाशांकडून कपडे मागून अंगात घातले. खाऊन पिऊन झोपला तो दुसऱ्या दिवशी उठला. त्याचा जणुकाही



पुनर्जन्मच झाला होता. म्हणून हळूहळू झोप मोडली तेव्हां त्याला आपण एका नवीन जगात आलो आहों की काय असे वाटले.

काही दिवसांनी ते जहाज सलाहिता नामक बंदरात लागले. सर्व व्यापारी आपला माल घेऊन पेठेत निघून गेले. एकटा सिंदबाद जहाजावर राहिला. मुख्य खलाशी त्याच्या जवळ येऊन म्हणाला—"तू म्हणाला होतास की तू सुद्धा एक व्यापारीच आहेस. पण तुझे सर्वस्व नष्ट झाले आहे. तर हे पहा, माझ्याजवळ एका व्यापाऱ्याचा माल पडून आहे. तो तू पेठेत घेऊन जा आणि


चांदोबा












विकून जो फायदा मिळेल तो तू ठेवून घे व मूळ किंमत मला आणून दे. मी त्या व्यापाऱ्याकडे पोचती करीन."

सिंदबादला ती सूचना मान्य झाली. तांडेलाने आपल्या कारकुनाला मालाची यादी टिपून घेऊन तो माल सिंदबादला द्यायला सांगितले. त्या व्यापाऱ्याचे नाव त्याने सिंदबाद असे लिहायला सांगितले.

सिंदबाद चकित होऊन ओरडला—"अरे, मीच तो दुर्दैवी सिंदबाद!"

त्याने तांडेलाकडे जरा लक्ष देऊन पाहिले. दोघांनी परस्परांना ओळखले. दुसऱ्या सफरीच्या वेळी सिंदबादला त्यानेच एका बेटावर सोडून पुढे जहाज नेले होते.

सिंदबादने, त्या तांडेलाला दुसऱ्या सफरीत त्याला हिऱ्या माणकांचा जो विचित्र अनुभव आला तो सांगितला. तो ऐकून तांडेल चकित होऊन म्हणाला—"अगदी बरोबर! अहो, मी एका राक्षसी गिधाडाला एका माणसाला उचलून नेताना पाहून जहाजातल्या प्रवाशांना सांगितले होते. ते कोणाला खरेच वाटले नव्हते. आता तुमच्या म्हणण्यावरून तो माणूस दुसरा तिसरा कोणी नसून तुम्हीच होतां तर?"

त्या तांडेलाने सिंदबादचे अभिनंदन केले व त्याचा माल त्याला देऊन टाकला. सिंदबादने तो माल विकून पुष्कळ पैसे मिळविले.

जहाज सलाहितातून निघाले ते सिंद देशात येऊन लागले. तेथे त्याला समुद्रातून वर आकाशात उडणारे मासे दिसले. कित्येक दिवस परतीचा प्रवास करून ते जहाज बसऱ्याला पोचले.

आपल्या नातेवाईकांना भेटून सिंदबादला परमानंद झाला. त्याने गोरगरिबांना दान धर्म केला व पुन्हां निश्चित होऊन चैनीत व आरामात राहू लागला.






हिडिंबाने भीमाजवळ विवाह करून घेण्यास विनंती केली तेव्हां भीम तिला म्हणाला—"तुझ्याशी लग्न करणे मला कसे काय शक्य होईल? तुझ्याशी लग्न करण्या-पूर्वी माझी आई आणि चौघे भाऊ यांना तुझा भाऊ ठार करील त्याची काय वाट?"

"मी तुला पहिल्यानेच नाही का सांगितले, त्यांना वांचविण्याची जबाबदारी मी घेते. सर्वांना जागे तर कर तू." हिडिंबा म्हणाली.

"सर्व दमून भागून झोपले आहेत. त्यांची झोप मोडायला मी तयार नाही. आता तुझा भाऊ येईल म्हणतेस तर मला त्याचीच काय कोणत्याही राक्षसाची भीती वाटत नाही. जो कोणी येईल त्याला क्षणार्धात मी यमसदनाला पाठवीन." भीम म्हणाला.

तिकडे हिडिंब वाट पहात होता. बराच वेळ झाला तरी बहिणीला परत न आलेली पाहून तो स्वत: पांडव झोपले होते तेथे आला.

भाऊ रागाने येत असलेला पाहून हिडिंबा भीमाला म्हणाली—"तो पहा, माझा भाऊ येतो आहे. तुमच्या पैकी एकाने देखील येथे राहण्यात शहाणपण नाही. मी तुम्हांला सर्वांना आकाशमार्गे दूर पोचती करते, चला."

"हिडिंबे! अशी भितेस का? तुझ्या भावाचे मरण जवळ येऊन ठेपले आहे. म्हणून तो स्वत: माझ्या क्रोधाग्नीत उडी टाकायला येतो आहे. त्याचे सार्थी मित्र



जरी आले आणि सर्वांनी मिळून एकदम माझ्यावर हल्ला केला तरी सर्वांचा समाचार घ्यायला मी उभा आहे. तुझ्या डोळ्या-समोर हे सर्व घडेल. तू नुसती पहात रहा." भीम म्हणाला.

"तुझ्या अंगात किती शक्ती आहे, हे मला नाही माहीत. पण माझ्या भावाने मोठमोठ्या तपस्वी ऋषी मुनींना ठार केलेले मी प्रत्यक्ष पाहिले आहे. म्हणून मी तुला सावध रहायला सांगितले." हिडिंबा म्हणाली.

हिडिंब तोपर्यंत जवळ आला होता. बहिणीला सुंदर रूप घेऊन भीमा शेजारी उभी पाहून त्याच्या तळपायाची आ मस्तकाला जाऊन भिडली आणि बहिणी म्हणाला–"काय ग हिडिंबे! तुला सुचले आहे का? मला कडकडून भू लागली आहे हे तुला माहीत होते. राक्षस कुळात जन्माला येऊन एका मान जातीच्या तरुणावर भाळलीस होय? था मी या सर्वांना प्रथम एकेक करून ठा करतो आणि मग तुझ्या समाचाराला येतो." असे म्हणत तो भीमाकडे वळला.

"अरे राक्षसा, ये! तू स्वतःच आगी उडी टाकतो आहेस तर ये. तुला ठा करून या जंगलात राहणारांना सुखी करण्याचे आज मी ठरविले आहे." भीम म्हणाला.

ते ऐकतांच हिडिंब हात पसरून भीमाव धावला. भीमाने युक्ती करून त्याला घ आवळून धरले आणि फरपटत दूर ओढून घेऊन गेला. इतक्यात हिडिंबने स्वतःला भीमाच्या मगरमिठीतून सोडवून घेतले आणि भीमाला आवळून धरून मोठ्याने ओरडला.

हिडिंबाचा आवाज ऐकून कदाचित पांडवांची झोपमोड होईल असा विचार करून भीमाने त्याला दूर ओढून नेले आणि

आवळून धरले. तेव्हां भीम म्हणजे सामान्य मनुष्य नाही हे हिडिंबच्या लक्षात आले. या खेपेस त्याने चवताळून भीमावर प्रत्याक्रमण केले.

दोघांची भयंकर कुस्ती सुरू झाली. सारी पृथ्वी प्रत्येक पदाघाताबरोबर हादरून जाई. जवळपासची झाडे कोलमडून पडू लागली. त्या भयंकर आवाजामुळे कुंती व पांडवांची झोप मोडली. सर्व दचकून उठून आवाज कोठून येतो आहे हे पाहू लागले. कुंतीला अगदी जवळ उभी असलेली एक रूपवती तरुण स्त्री दिसली. ती घाबरल्या-सारखी दिसत होती. कुंतीने तिला विचारले–"मुली, कोण ग तू? कोणी वनदेवी किंवा अप्सरा असावीस असे वाटते. कोठून व कशी काय आलीस?"

हिडिंबाने खरे तेच सांगितले. म्हणाली–"आई! मी व माझा भाऊ हिडिंब नामक राक्षस आम्ही या जंगलात राहतो. माझ्या भावाने तुम्हांला सर्वांना ठार करून आणण्यासाठी मला पाठविले होते. पण तुमचे चिरंजीव पाहरा देत उभे होते, त्यांचे रूप पाहून त्यांच्याशी विवाह कां करून घेऊ नये असे मला वाटले. मी तुमच्या चिरंजीवांजवळ तसे बोललेदेखील. इतक्यात





माझा भाऊ आला. आपले चिरंजीव माझ्या भावाला दूर ओढून घेऊन गेले. त्यांचे द्वंद्वयुद्ध चालू आहे."

हिडिंबा म्हणाली ते ऐकून युधिष्ठिर, अर्जुन, नकुल व सहदेव आपल्या आईबरोबर द्वंद्वयुद्ध चालू होते तिकडे गेले आणि थोड्या अंतरावर उभे राहून ते युद्ध पाहू लागले. दोघांचे ते द्वंद्व म्हणजे दोन सिंहांची जणू लढतच होती. दावाग्नीचा धूर पसरतो तसे धुळीचे लोट आकाशाला व्यापून टाकीत होते.

हिडिंबासमोर भीम थकल्यासारखा अर्जुनाला वाटला तेव्हां तो म्हणाला—

"भीमदादा! तू थोडा दम घे. मी लोळवतो याला."

भीम स्मित करून म्हणाला—"अर्जुना तू गमत तर पहा. अरे माझ्या हातात सापडलेला हा दुष्ट वाचेल असे वाटले होय तुला?"

"तरमग जास्त वेळ कशाला लावतोस? आपण येथे फार राहणेपण श्रेयस्कर नाही. सूर्योदयाची वेळ पण होत आली. जास्त वेळ घालवण्यातही अर्थ नाही. पाहिजे तर मी बाणांनी त्याचा शिरच्छेद करतो." अर्जुन म्हणाला.

ते ऐकून भीमाने हिडिंबाला दोन्ही हातांनी वर आडवा उचलला व जमिनीवर जोराने आदळला. त्याबरोबर हिडिंबची कंबरच मोडली. नंतर भीमाने त्याची नरडी आवळून त्याला ठार केले.

कुंती, युधिष्ठिर आदिकांनी भीमाचे अभिनंदन केले. अर्जुनाने भीमाच्या शौर्याची मुक्त कंठाने स्तुती केली व म्हणाला—"दूर एक गाव दिसते आहे. आपण लवकर त्या गावात जाऊ या. दुर्योधनाच्या हेरांच्या नजरेस पडण्यापूर्वी तिकडे गेले पाहिजे."

कुंतीला बरोबर घेऊन पांडव त्या गावाच्या दिशेने चालू लागले. हिडिंबापण



त्यांच्यावरोबर निघाली. तेव्हां भीम तिला म्हणाला–"हिडिंबे! तू या मायावी रूपाने भावाच्या वधाचा सूड घेण्यासाठी येत आहेस वाटते? नाही तर तुलादेखील तुझ्या भावाच्या शोधार्थ पाठवून देईन."

तेव्हां युधिष्ठिर भीमाला म्हणाला– "भीमा! एका स्त्रीला वधाची धमकी देतोस, तुला हे शोभत नाही. तिला आपल्यावर राग आला तरी ती काय करू शकेल? हिडिंबासुराचा तू वध केलास, त्यात काही गैर नव्हते. पण त्याची फक्त बहीण आहे म्हणून हिडिंबेचा वध करणे रास्त नाही. तो फार मोठी चूक ठरेल."

हिडिंबेने युधिष्ठिर व कुंतीला नमस्कार केला व म्हणाली–"मी आपल्या राक्षस जातीच्या धर्माविरुद्ध यांच्यावर प्रेम केले. ह्यांनी माझा स्वीकार केला नाही व दूर लोटले, तर मी आत्महत्या करीन. मी आपल्या चिरंजीवांना बरोबर घेऊन जाते. त्यांच्या बरोबर मी काही दिवस विहार करीन व नंतर आनंदाने तुमच्याकडे पाठवून देईन. मी तुम्हांला या जंगलाबाहेर सहज पोचती करू शकेन."

ते ऐकून युधिष्ठिर म्हणाला–"हिडिंबे! तू म्हणालीस त्याच्यावर माझा पूर्ण विश्वास बसला आहे. भीम तुझा स्वीकार करील. भीम दिवसभर तुझ्याबरोबर विहार करील. परंतु रात्री तो आम्ही राहू तेथे येत जाईल."

युधिष्ठिर म्हणाला ते भीमाला मान्य होते.

हिडिंबेला पुत्रप्राप्ती होईपर्यंत तिच्याबरोबर राहण्यास भीमाने मान्यता दिली. हिडिंबा भीमाला घेऊन आकाशमार्गाने निघून गेली. नदी, पर्वत शिखरे व सुंदर सरोवरे व वने पहात दोघे विहार करू लागले. काही काळ लोटल्यावर हिडिंबा गरोदर झाली. तिला नऊ महिन्यांनी एक मुलगा झाला. तो जन्मल्यावरोबर इच्छा रूप घेऊन अगडबंब मोठा वाढलेला दिसू लागला. त्याने आपल्या आईवडिलांना नमस्कार केला. त्याच्या डोक्याला एकदेखील केस नव्हता. म्हणून त्याचे डोके मडक्यासारखे गुळगुळीत दिसत होते. ते विचित्र रूप पाहून हिडिंबेला आश्चर्य वाटले. म्हणून त्या मुलाचे नाव घटोत्कच, म्हणजे केसांशिवायचा घट, असे पडले.

घटोत्कचाने आईवडिलांना नमस्कार केला व म्हणाला–"तुम्हांला केव्हां ही माझी गरज पडली की माझे स्मरण करा, मी तावडतोब हजर होईन." असे सांगून तो उत्तरेकडे निघून गेला. हिडिंबादेखील कबूल केल्याप्रमाणे भीमाची परवानगी घेऊन आपल्या घरी निघून गेली.

त्यानंतर पांडव वल्कलवस्त्रे धारण करून ब्राह्मण वेषात मत्स्य, त्रिगर्त, पांचाल, कीचक इत्यादि देशात प्रवास करीत पुष्कळ दूर निघून गेले. कुंतीला चालवेनासे झाले की पांडवांपैकी कोणी तरी तिला पाठुंगळीला बसवून घेई. आहारासाठी ते आवश्यक तेथे शिकार करीत.

देशाटन करीत असतां त्यांची व्यास मुनींशी भेट झाली. सर्वांनी त्यांना नमस्कार



केला. पांडवांना उदास मनाने समोर उभे पाहून व्यास मुनी म्हणाले–"मुलांनो! मला तुम्ही काय किंवा धृतराष्ट्राची मुले काय सर्व सारखेच. परंतु त्यांनी तुमच्यावर पुष्कळ अत्याचार व अन्याय केले आहेत. या लहान वयात तुम्हांला इतके कष्ट सहन करावे लागत आहेत. त्याबद्दल मला फार वाईट वाटते. परंतु काळजी करीत बसू नका. तुम्हांला लवकरच चांगले दिवस पहायला मिळतील. येथून थोडयाच अंतरावर एक चक्रपुर नावाचे गाव आहे. तुम्ही काही दिवस त्या गावी स्वतःची ओळख दिल्या शिवाय रहा."

व्यास मुनी पांडवांना त्या गावी स्वतः पोचवायला गेले. एका ब्राह्मणाच्या घरी त्यांच्या राहण्याची व्यवस्था करून देऊन व्यास मुनी कुंतीला म्हणाले–"तुम्ही त्या गावी एक महिनाभर रहा. मी पुन्हा येऊन तुम्हांला येथेच भेटेन." असे सांगून व्यास मुनी निघून गेले.

कुंती व पांडव त्या ब्राह्मणाच्या घरी रहात. ते भिक्षा मागून आपला उदरनिर्वाह करू लागले. पाच ही पांडव जी माधुकरी मागून आणीत तिचे कुंती दोन वांटे करी– एक वांटा ती भीमाला देई व दुसरा बांटा बाकी चौघां भावांना वांटून देऊन स्वतः खाई. त्यातलात्र थोडा वाचवून अतिथि सत्कार सुद्धा करी.

पांडव ब्राह्मण ब्रह्मचाऱ्या सारखे माधुकरी मागीत व वेदाध्ययन देखील करीत. सरोवरात व तलावात पोहोत आणि झाडाखाली बसून विश्रांती घेत.

एकदा युधिष्ठिर, अर्जुन, नकुल सहदेव गावात माधुकरीला गेले. घरा कुंती व भीम दोघेच होते. त्यावेळी त ब्राह्मण रहात होता, घराच्या त्या बाजू रडण्याचा आवाज ऐकू येत होता.

कुंती रडण्याचा आवाज ऐकून भीमाल म्हणाली–"बाळ, आपल्या घरमालकावर काही तरी संकट ओढवलेले दिसते आहे त्यांनी आपल्याला आपल्या घरात रहायल आश्रय दिला. आज त्यांच्यावर काही संकट आले असेल तर आपण त्यांना मदत केली पाहिजे. मी विचारून येते." असे सांगून कुंती त्या ब्राह्मणाच्या घरी गेली.

ब्राह्मण रडत होता आणि त्याची बायको, मुलगी व मुलगा समोर बसून रडत होते. त्यांच्या रडण्याचे कारण कसे विचारावे या संकोचात पडून कुंतीने काही विचारले नाही. ती सुद्धाजवळ जाऊन बसली.





# गांधींचे चरित्र

[११]

**१९१३** च्या सेप्टेंबर महिन्यात गांधीजींनी दक्षिण आफ्रिकेत सत्याग्रहाची जी चळवळ सुरू केली ती काही सुप्रसिद्ध राजकीय पुढाऱ्यांच्या मते एक थट्टा होती. सत्याग्रह्यांची कमीतकमी संख्या ११ आणि ६६ हून जास्त नव्हती. गांधीजींनी सर्वात प्रथम सत्याग्रह्यांना अनुज्ञापत्राशिवाय नाताळहून ट्रान्सव्हालला पाठविले. सरकारी अधिकाऱ्यांनी त्यांना कैद करून तुरुंगात ठेवले. त्यानंतर ११ स्त्रिया ट्रान्सव्हालची हद्द ओलांडून नाताळमध्ये आल्या आणि तेथून कोळशासाठी प्रसिद्ध असलेल्या न्यूकॅसल येथे जाऊ लागल्या. त्यांनी खाणीत काम करणाऱ्या मजुरांकडून संप-देखील करविला संपवाल्यांच्या हातून कदाचित अत्याचाराची कामे होतील या भीतीने गांधीजी न्यू कॅसल येथे गेले. खाणींचे मालक काही कडक उपाय योजना करतील अशी भीती संपवाल्यांना नव्हतीच. त्या सर्वांनी एकमताने "गांधीभाई"वर आमचा पूर्ण विश्वास आहे असे सांगितले.

परंतु खाणींच्या मालकांनी मजुरांच्या घरातले बीजपाणी बंद करून टाकले. म्हणून गांधीजी त्या सर्व मजुरांना ट्रान्सव्हालमध्ये घेऊन जाण्याच्या तयारीला लागले. २०३७ पुरुष, १२७ बायका व ५७ मुले एकदर त्या वस्तीत होती. ते सर्व जोहॅन्सबर्ग पोचण्यापूर्वीच गांधीजींना तीनदां कैद करण्यात आले. नंतर संपवाल्यांनापण कैद करून नाताळ मध्ये घेऊन जाण्यात आले व तेथे त्यांना तुरुंगात ठेवण्यात आले.

दक्षिण आफ्रिकेतील सरकारने निर्दयपणे भारतीयांना दडपून टाकण्याचा प्रयत्न केला.

     



# स्वेच्छा वृत्ती

एका गावी दोन फुटक्या नशिबाचे व्यक्ती रहात असत. त्या दोघांवर निरनिराळ्या प्रकारचे प्रसंग येऊन गेले. त्यांना कधी कोणाकडून मदत म्हणून मिळाली नाही. म्हणून दोघे शेजारच्या देशाचा राजा महेंद्रवर्मा याच्याकडून काही मदत मिळेल या आशेने त्याच्या राजधानीत गेले.

वाटेत त्यांना एक वाटसरू भेटला. तो सुद्ध फार गरीब होता. परंतु त्याच्या चेहऱ्यावरून त्याला कधी कोणत्याही गोष्टीची गरज किंवा उणीव असेल असे दिसले नाही. त्याने या दोघांना विचारले— "कोठे हो निघालात?"

"आम्ही आजपर्यंत चहूबाजूंनी फसवणूक सहन करीत आलो. आमचे भाग्यच फुटके होते. म्हणून आम्ही महेंद्रवर्माच्या दरबारी जाऊन त्याची मदद मिळेल या अपेक्षेने निघालो आहो. महेंद्रवर्मा दानशूर राजा आहे असे आम्ही ऐकतो." दोघे म्हणाले.

त्यानंतर त्या दोघांनी त्याला कोठे व कशासाठी जात असल्याचे विचारले. तेव्हां तो म्हणाला—"मी पण एक गरीब मनुष्य आहे. मी कोणाकडून दान घेत नाही. माझी स्थिती त्या परमेश्वराला चांगली माहीत आहे. 'ठेविले आनंते तैसेची रहावे.' असे मी मानतो आणि एकाहून दुसऱ्या गावी प्रवास करीत फिरत असतो."

पुष्कळ दिवस प्रवास करीत करीत ते महेंद्रवर्माच्या राज्यात येऊन पोचले. एक दिवशी रात्री तिघे एका जुनाट घरात उतरले. मध्य रात्र उलटून गेली तरी ते गप्पा गोष्टीत रंगून गेले होते. त्याच वेळी राजा महेंद्रवर्मा वेष पालटून फिरत फिरत त्या घरापर्यंत आला. त्याने आड उभा राहून तिघांचे बोलणे ऐकले.

महेंद्रवर्माने तिघांना दुसऱ्या दिवशी आपल्या दरबारात बोलावून आणवले. प्रत्येकाला त्याने एकच प्रश्न विचारला—"तू कोणी परदेशी दिसतोस. काय पाहिजे तुला?"

तिघांपैकी एक म्हणाला—"महाराज! श्रीमंत घराण्यात मी जन्मलो. ऐश आरामात दिवस जात होते. परंतु हळूहळू आमचे सर्व ऐश्वर्य तळ्यातल्या पाण्यासारखे अटून गेले. पैसा अडका होता तोपर्यंत अक्कल आली असती तर मी व्यापार धंदा करून पैसा मिळविण्याचा मार्ग शोधून काढला असता. अजून देखील आपल्या सारख्या दानशूरांनी दहा पांच हजार मोहरा दिल्या तर आरामाने राहण्याची इच्छा आहे."

दुसरा म्हणाला—"महाराज! काही वर्षां पूर्वी रंभेसारख्या एका रूपवती कन्येशी माझा विवाह झाला. संसारसुखात काही दिवस मजेत गेले. वाटले, दुनियेत माझ्या-सारखा सुखी कोण असणार? परंतु एकाएकी माझी बायको मरण पावली. मला वाटले की मला वेडच लागणार. म्हणून मी आपले गाव सोडून परदेशी निघालो. मला पहिल्या सारखे संसारसुख पहिल्या बायकोसारख्या सुंदर मुलीशी



लग्न झाले तरच मिळेल. तशी एक सुंदर कन्या पाहून आपण माझे लग्न करून द्यावे."

राजा महेंद्रवर्माने तिसऱ्या व्यक्तीला तोच प्रश्न विचारले–"तुला काय हवे आहे, बुवा ?"

"महाराज, प्रत्येक माणसाच्या अनेक इच्छा असतात. परंतु त्या पुऱ्या केल्याच पाहिजेत की नाही, हे ईश्वरच ठरवू शकतो. मी कोणासमोर हात पसरू इच्छित नाही की कोणाच्या उपकाराखाली दबून जाण्याची इच्छा पण माझ्या मनाला शिवत नाही." तिसरा म्हणाला.

तिसरा मनुष्य म्हणाला ते ऐकून राजाला राग आला. कारण राजा दानी म्हणून प्रसिद्ध होता. त्याच्याकडून दान घेण्यासाठी दुरदुरून लोक येत असत. अशा स्थितीत त्याच्याकडून दान घेण्यास नकार देणारा हा उद्धट मनुष्य कोण? त्याला ती गोष्ट मान्य झाली नाही. त्याने पहिल्या प्रवाश्याला दोन थैल्या भरून सोन्याच्या मोहरा आणि दुसऱ्याला एक सुंदर कन्या दिली व म्हणाला–"ठीक, आता तुम्ही तुम्हांला वाटेल तिकडे खुशाल जा."

त्याप्रमाणे तिघे दरबारातून निघाले. राजाने एका शिपायाला बोलावून आज्ञा



केली की हे तिघे प्रवासी आमच्या राज्या-बाहेर जाण्यासाठी निघाले आहेत. तू घोड्यावर बसून जा व त्यांना कोठे तरी गाठ. एकाजवळ मोहरा भरून दोन पिशव्या आहेत, दुसऱ्या बरोबर एक सुंदर मुलगी आहे. त्या दोघांच्या अंगाला स्पर्श करू नकोस. तो जो तिसरा आहे, त्याचे मुंडके उडवून ते माझ्यासमोर हजर कर."

मध्यंतरी ज्याला राजाने मोहरांच्या दोन थैल्या दिल्या होत्या त्याने ओझे फार वेळ सहन न झाल्यामुळे तिसऱ्या स्वतंत्र वृत्तीच्या प्रवाश्याला 'मदत करतोस का थोडी?' असे विचारले. त्याने थैल्या उचलून घेतल्या आणि तिघे पुढे निघाले. तेवढ्यात राजाने पाठ-विलेला शिपाई येऊन पोचला. एकाला रिकाम्या हाताने चालत असलेला पाहून तो त्याचे मुंडके कापून घेऊन निघून गेला.

राजा महेंद्रवर्मा ते मुंडके पाहून चकित झाला आणि म्हणाला–"मी त्याचे डोके कापून आणायला सांगितले नव्हते. तू चुकलास. पुन्हा जा आणि त्या सुंदर कन्येला घेऊन जाणारा मनुष्य आहे ना त्याला सोड आणि दुसऱ्याचे मुंडके कापून घेऊन ये."

शिपाई पोचला त्या वेळी कन्यादान ज्याला मिळाले होते तो लघुशंका करायला थांबला व कन्या त्या स्वतंत्रवृत्तीच्या माणसा-बरोबर चार पावले पुढे गेली. म्हणून तो कन्यादान घेणारा मनुष्य एकटाच पाठीमागून निघाला. त्याच वेळी शिपायाने त्याला पाहिले व त्याचे मुंडके कापून घेऊन परतला.

अशा तऱ्हेने राजाचा तो प्रयत्न निष्फळ ठरला. त्याने दिलेल्या दानावर जगण्याची इच्छा असणारे दोघे राजाच्या प्रयत्नानेच मरण पावले. परंतु देवाच्या भरंवशावर जो स्वतंत्र वृत्तीने राहू इच्छित होता त्याला मोहरा भरलेल्या दोन थैल्यांबरोबर एक सुंदरकन्या लाभली. ही गोष्ट कळल्यावर राजा महेंद्रवर्माचा अहंकार खाली उतरला.





# सोन्याचे पीक

जावा बेटात डोंगो नावाचा एक गरीब मुलगा रहात असे. तो एक अनाथ असहाय मुलगा होता. तो एका विधवेच्या शेतात काम करीत असे. ते एक सुपीक शेत होते. तरी ज्या वर्षी डोंगोने त्या शेतात काम करायला सुरवात केली. त्या वर्षी शेतात भात पेरले होते. पीक तयार उभे होते. मोठमोठ्या लोंब्या लोंबत होत्या. परंतु पीक कापून झोडपणी झाली तेव्हा नुसती फोलपटे निघाली, दाणे निघालेच नाहीत.

दुसऱ्या वर्षी पण पिकाची तीच गत झाली. म्हणून गावभर लोक आपसात म्हणू लागले की म्हातारी चिक्कू आहे. ती गावच्या देवीला नैवेद्य वगैरे दाखवील तर ना! म्हणून पीक असे निघते आहे. ते कळल्यावर म्हातारीला फार राग आला तिने डोंगोला मजुरी म्हणून एक पै देखील दिली नाही. उलट त्याला कामावरून काढून टाकले.

डोंगो उपाशीच त्या गावाहून निघाला. फिरत फिरत तो दुसऱ्या एका गावी येऊन पोचला. त्याने एका घरी जाऊन दाराची कडी वाजविली. एका विधवा बाईने दार उघडले. डोंगो दमून गेला होता. भुकेने त्याचा जीव कासावीस झाला होता. त्याला उभे देखील रहावत नव्हते. तो घेरी आल्यासारखे होऊन जमिनीवर पडला. पडताना म्हणाला–"बाई! जीव कंठाजवळ आला आहे. चार घास खायला घाला. तुम्हांला पुण्य लागेल, तुम्हांला उदंड आयुष्य लाभेल."

त्या बाईने मुलाला हातभार देऊन उभे केले आणि त्याला घरात घेऊन गेली. त्याला पोटभर खायला घातले आणि विचारले–"कायरे! तू तर चांगला धडधाकट मुलगा दिसतो आहेस, भीक कां मागतोस? काही काम कां करीत नाहीस?"

डोंगोने घडलेली गोष्ट सांगितली व म्हणाला–"मी मेहनत खूप केली, पण मी ज्या शेतात काम केले त्यात पीक निघालेच नाही. आता हा काय माझा दोष? त्या शेताच्या मालकिणीच्या भाग्यात काय होते, देवच जाणे. तिने मला हाकलून लावले."

"तुला शेतातली सर्व कामे करता येतात का? येत असतील तर कर. त्यात जे पीक निघेल त्यातला पाचवा वांटा तुझा. आमच्या घरी बैल वगैरे काही नाही. तुलाच स्वत: शेतात सर्व कामे करावी लागतील." विधवा म्हणाली.

"काही हरकत नाही, मी सर्व कामे करीन." डोंगो म्हणाला.

दुसऱ्या दिवशी सकाळी डोंगो कुदळ फावडे घेऊन शेतात गेला. त्याने सर्व शेत नांगरल्यासारखे छान खोल खणून काढले. वेळेवर बी पेरून शेताचे खत पाणी केले. शेत छान वाढले. लांबलांब लोंब्या लोंबू लागल्या व भाताचे पिवळे जर्द दाणे दिसू लागले.

कापणीची वेळ जवळ येऊ लागली. डोंगोने दाणे आहेत का नाही, हे नखाने



जावा देशातील एक लोककथा

दाबून पाहिले. पण नुसती फोलपटे होती. दाणे नव्हते.

आपले नशीबच फुटके, त्याला कोण काय करणार? कोणी काय दिले आणि किती काय केले तरी नशिबात नसेल तर काय मिळणार? तो निराश व हताश झाला. त्याने मालकिणीला काही सांगितले नाही. त्याने विचार केला की कापणी झाल्यावर तिला सर्व कळेलच. मी स्वतःच जाऊन कशाला सांगायचे?

कापणी होणार होती त्याच्या पहिल्या दिवशी डोंगोने पळून जायचे ठरविले. पहाटे उठून मांजराच्या पावलाने तो घराबाहेर पडला. इतकी मेहनत करून पीक उभे राहिल्यासारखे वाटले आणि हे काय झाले, असा विचार करीत एकदा शेत पाहून जावे असे त्याला वाटले. त्याने नखाने दाणे दाबून पाहिले. दाण्यात तांदूळ नव्हते. पातळ नाजूक सोन्याचे दाणे होते.

डोंगोला स्वतःच्या डोळ्यावर विश्वास होईना. त्याने धावत जाऊन मालकिणीला ते सोन्याचे दाणे दाखविले आणि म्हणाला– "मालकीण बाई! तुमच्या शेतात भाताचे पीक नाही, सोन्याचे पीक झाले आहे."

डोंगो म्हणाला ते मालकिणीने प्रत्यक्ष डोळ्यांनी पाहिले, ते सोन्याचे दाणे होते.

कापणी, झोडपणी, मळणी वगैरे संपली. खळ्यात सोन्याच्या दाण्यांचा ढीग लागला. मालकिणीने, वचन दिल्याप्रमाणे डोंगोला पिकाचे पांच वाटे करून एक वांटा दिला अणि गावकऱ्यांना एक मेजवानी दिली.

डोंगोने स्वतःचे शेत विकत घेतले. त्याच्या मालकिणीने पण शेत विकत घेतले. डोंगोच दोघांच्या शेताची कामे पाही. शेतात काम करणाऱ्या शेतकऱ्यांना दोघं पांचवा वांटा देत. तेव्हांपासून पुढे जावा देशात शेतकऱ्याला पांचवा वांटा देण्याची प्रथा पडली.





# पडकें देऊळ

[ २६ ]

[पडक्या देवळाचा पुजारी इम्बु जातीच्या लोकांच्या हातावर तुरी देऊन एका गुप्तमार्गाने पळून गेला. इम्बुकुलनायकाने नांगसोम नामक एका इम्बु प्रमुखाला वृश्चिक द्वीपाची वाट दाखवायला शिखीमुखबरोबर पाठविण्याचे मान्य केले. दोन नावा तयार करण्यात आल्या. आणि सर्व वृश्चिक द्वीपाकडे निघाले. पुढे–]

सूर्यास्तापर्यंत शिखीमुख व त्याच्या अनुयायांचा प्रवास चालू होता. रात्री कोठे तरी जमिनीवर मुक्काम करण्याचे ठरवून त्या जोगते चांगलेसे बेट ते पाहू लागले. सुमारे पंधरा मिनिटांनी त्यांना तसे एक बेट दिसले, तेव्हां त्यांनी किनाऱ्यावर उतरून झाडाला आपल्या नावा बांधून ठेवून दिल्या आणि सैपाकाच्या तयारीला लागले. त्यांनी चुली पेटवल्या. पाठीमागून येणाऱ्यांना जाळ दिसेल व त्यांना आपण या बेटावर उतरलो आहो हे कळेल असे त्यांना वाटले.

हळूहळू चांगलाच काळोख पडला. सैपाक झाल्यावर सर्वांनी जेवणे उरकून घेतली. एक शेकोटी पेटवून तिच्या चारी बाजूला सर्व शेकत गप्पा मारीत बसले. इतका वेळ झाला तरी तिसरी नाव पोचली नव्हती. पुजारी आधी वृश्चिक द्वीपावर



नक्कीच पोचला असणार याची त्यांना शंका उरली नाही. वाटेत कोठे गाठ पडली तर त्याच्या बरोबर दोन हात करावे लागणार असे पण त्यांना वाटत होते. त्यावेळी नावेतून त्यांच्या पैकी काही जण खाली पाण्यात पडणार व मगरी सुसरींचा आहार होणार हे पण निश्चित होते.

याच सर्व गोष्टींवर त्यांचे बोलणे चालू असता एकाएकी झाडावरच्या पक्ष्यांची किलबिल सुरू झाली आणि पाण्यात मगरी सुसरींची आपसात लढाई सुरू असल्याचा भास झाला. शिखीमुख विक्रमला म्हणाला— "पाहिलेस, या बेटाच्या चारी बाजूचे वातावरण किती भयंकर दिसते आहे. जंगलात क्रूर जनावरांची भीती यापेक्षा जास्त कधी वाटली का आपल्याला?"

नागसोमने होकारार्थी मान हलविली. विक्रमकेसरीने एकदा चारी बाजूला पाहिले व म्हणाला—"तू या बेटाविषयी म्हणतो आहेस ना? मला तर आणखी एक शंका वाटते आहे, तो पुजारी याच बेटावर कोठे तरी दडी मारून बसला असावा असे नाही का तुला वाटत?"

ते ऐकून शिखीमुख थोडा हसला व वाळक्या काटक्या शेकोटीत घालू लागला. इतक्यात बेटावरच दुरून एक किंकाळी ऐकू आली. लाल कुत्रे त्या दिशेला पाहून भुंकू लागले. शिखीमुख चटकन उभा राहून म्हणाला—"ही किंकाळी मनुष्याचीच वाटते, की कोणते तरी जनावर ओरडले असेल?"

"कोणी तरी मनुष्यच संकटात सापडून ओरडलेला दिसतो आहे. किंवा आपल्याला आणखी कोणत्या तरी संकटात ढकलण्यासाठी पुजाऱ्याने ही लबाडी तर केली नसेल? आपण सशस्त्र जाऊन पाहू या." विक्रमकेसरी म्हणाला.

अजित व वीरभद्र चटदिशी दोन मशाली हातात घेऊन उभे राहले. पुन्हा एक किंकाळी ऐकू आली. ओरडणारा कोणी तरी मनुष्यच होता, या गोष्टीची सर्वांना खात्री पटली. सर्व त्या दिशेला धावले. त्यांना एक मनुष्य लंगडत आपल्या हातातल्या काठीने दोन मगरींना मारीत स्वतःचा बचाव करीत असलेला दिसला.



शिखीमुख त्या असहाय लंगडयाच्या रक्षणार्थ धावला. पण लाल कुत्रा त्या लंगडयाला चावायला त्याच्या अंगावर धावला. कुत्राला चवताळून येत असलेला पाहून तो लंगडा गयावया करीत ओरडून म्हणाला—"शिखी धनी! पहिल्याने आपण आपल्या कुत्र्याला आवरा. मग मला जी पाहिजे ती शिक्षा द्या."

सर्वांनी त्या लंगड्याला त्याच्या आवाजावरून ओळखले, त्यांचा विश्वासघात करणारा वाटाड्या जांगलाच होता तो. तो किती दुष्ट असला तरी कुत्र्याने त्याला फाडून खाल्लेले शिखीमुखला पाहवले नसते. म्हणून त्याने कुत्र्याला आपल्याकडे बोलावले व तलवारीचा एक वार मगरीवर केला. त्याच वेळी दुसऱ्या मगरीला अजितने भाला मारला.

दोन्ही मगरी मशालींचा उजेड पाहूनच घाबरून गेल्या होत्या. त्या मागे वळल्या व पळून गेल्या. जांगला धापा टाकीत जमिनीवर बेशुद्ध होऊन पडला. त्याच्या तोंडावाटे एक शब्ददेखील उमटला नाही.

शिखीमुख व त्याचे साथी ती विचित्र घटना पाहून चकित झाले. या मध्य रात्रीच्या वेळी इतक्या काळोखात जांगला एकटा या बेटावर आलाच कसा? त्या पुजाऱ्याने आपला गुप्त बेत कळावा म्हणून याला आपल्या पाठीमागून येथे पाठविला नसेल कशावरून?

जांगला शुद्धीवर येऊन उठून उभा राहू लागला. शिखीमुख त्याला काही विचारणार होता. परंतु त्याच वेळी विक्रम-



केसरीने तलवारीचे टोक जांगलाला भोसकण्यासाठी पुढे करून विचारले–"जांगला! खरे काय ते बोल, नाही तर तुझा दुसरा पाय कापून तुला मगरी सुसरींसमोर टाकीन, लक्षात ठेव. तुझा मालक तो पुजारी या वेळी आहे कोठे, बोल! या बेटावरच लपला आहे की नाही?"

तो प्रश्न ऐकून जांगला फार भ्यायल्यासारखा दिसला नाही. अर्धमेल्या स्थितीत जगण्यापेक्षा मरण आले तर बरे, अशा मनःस्थितीत तो असावासे वाटले. तो म्हणाला–"विक्रमधनी! मी आपले मीठ खाऊन आपला जो विश्वासघात केला तो आठवून तुम्ही माझ्या बोलण्यावर विश्वास केला नाहीत तर मी तुम्हांला दोष देणार नाही. म्हणून तुम्ही मला जो पाहिजे तो दंड द्यावा. मी तो भोगायला तयार आहे."

"हे नाटक माझ्यासमोर नको आहे. तू खरे बोलणार आहेस की नाही हे प्रथम सांग." असे म्हणत विक्रमने त्याच्या मानेवर तलवारीचे टोक ठेवले.

शिखीमुख स्मित करून म्हणाला–"विक्रम! तू स्वतःच आपली प्रतिज्ञा विसरलास आणि त्याची मान उडविण्याच्या विचारात दिसतो आहेस! आताच थोड्या वेळापूर्वी तू त्याला मगरी सुसरींसमोर टाकीन म्हणाला होतास नाही का? जरा थांब." नंतर जांगलाकडे वळून म्हणाला–"जांगला! तुझी स्थिती पाहून चटकन मरण आले तर बरे असे तुला वाटत असावेसे आम्हांला दिसते आहे. पण लक्षात ठेव, तू खरे बोलला नाहीस तर विक्रम तुला जिवंत मगरींसमोर टाकील, विसरू नकोस!"

जांगला एकच क्षण गप्प राहिला, नंतर म्हणाला–"शिखीधनी! अपराध्याला मरायचेच असले तर तो खरे बोलला काय व खोटे बोलला काय सारखेच! परंतु मी मरण्यापूर्वी जे सांगणार आहे ते खरे आहे व ते तुमच्या हिताचे आहे. तो दुष्ट पुजारी आज दुपारी दोन नावात आपल्या साथीदारांसह पडक्या देवळाच्या बेटाकडे निघून गेला. तुम्ही सर्व तेथे पोचण्यापूर्वी तुम्हांला ठार करण्यासाठी तो डाव टाकण्याच्या प्रयत्नात असणार. म्हणून सावध रहा!"

जांगला म्हणाला ते खोटे नसावे असे शिखीमुखला वाटले. तो विक्रमला जरा बाजूला बोलावून घेऊन जांगलाला म्हणाला–"तरमग, कायरे तू आपल्या मालकाबरोबर कां गेला नाहीस आणि या धोक्याच्या जागी एकटा कां राहिलास!"

"निदान मरण्यापूर्वी तरी एकदा खरे सांगण्याची संधी मिळेल असे समजून, मालक! मी जो स्वामिद्रोह केला त्याच मुळे चित्त्याच्या हाती सापडून असा लंगडा झालो. मला माझ्या पापाचेच फळ मिळाले. कामाख्यानगरी मी सुखाने रहात होतो. कोणी मला लुच्चा, लबाड म्हटले नव्हते. परंतु या पुजाऱ्याने पैशाचे जाळे माझ्यासमोर टाकले आणि मी त्यात सापडलो. मी तुमच्या बरोबर लुच्चेगिरी अन् लबाडी



केली. मी संधी मिळाल्यास त्या दुष्टाला ठार करण्याचा विचार केला होता. पण त्याने माझा बेत ओळखला असावा. त्याचे ग्रह चांगले आहेत. म्हणून त्याने मलाच क्रूर जनावरांसमोर असे टाकले आणि निघून गेला." जांगला म्हणाला.

"तुला या मगरीसुसरींसमोर त्याने टाकले म्हणतोस? ते कसे काय बुवा?" शिखीमुखने चकित होऊन त्याला विचारले.

जांगला कसे ते सांगू लागला–"गोलभरा प्रदेशातल्या नदीतून येथपर्यंत आमची नाव येत असता मी चारी बाजूचा प्रदेश लक्षपूर्वक पहात होतो. मला उत्तम पोहता



येते. मी पुजाऱ्याला त्याच्या साथीदारांसह संधी साधून बुडवून एखाद्या फळकुटीच्या मदतीने गोलभरा पळून जाण्याच्या विचारात होतो. परंतु त्याने माझा बेत ओळखला. आज दुपारी आमच्या नावा या बेटानजीक आल्या आणि किनाऱ्या किनाऱ्याने पुढे जाऊ लागल्या तेव्हां त्याने पाण्यात वाकून पाहिले व म्हणाला–"ओहो! शिथिलेश्वरीच्या गळ्यातला हार अशा त्या महा जलसर्पाने दर्शन दिले आहे. त्याला नैवेद्य दाखविला पाहिजे व तो नैवेद्य मी दाखविणार आहे. एका सजीव मनुष्याचा नैवेद्य दाखवून आम्हांला सुखरूप त्या देवीच्या देवळाचा मार्ग दाखव" असे म्हणत त्याने आपले पीतांबर वर उडवले आणि ते माझ्या डोक्यावर येऊन पडले. तेव्हां तो ओरडला–"अरे जांगला! केवढा नशीबवान रे तू! तू शिथिलेश्वरीच्या अनन्य सेवकाचा आहार होणार आहेस आणि पुढल्या जन्मी सर्व इभ्युजातीचा कुलनायक म्हणून जन्मणार आहेस."

"याचा अर्थ काय बरे असू शकेल असा मी विचार करीतच होतो आणि त्याने नागगिधाडाला खूण केली. त्याने एका क्षणार्धात मला उचलून पाण्यात टाकले. मी बुडून गेल्याचे सोंग करून पाण्याच्या आतून पोहोत या बेटावर येऊन पोचलो. मी अगदी दमून गेलो होतो आणि त्याच वेळी मगरी सुसरींनी माझ्यावर हल्ला केला. तुम्ही येऊन मला वांचविलेत, नाही तर मी आज मेलोच होतो."

शिखीमुखने विक्रमकेसरीकडे पाहिले. तो त्यावेळी दुसरीकडे पहात होता. थोड्यावेळाने त्याला शिखीमुखने विचारले–"विक्रम! तुला काय वाटते? जांगला म्हणतो ते खरे असेल का?"

"त्याने आपली करुणकहाणी अशा तऱ्हेने सांगितली आहे की आपल्याला विश्वास करावा लागत आहे." विक्रमकेसरी म्हणाला.

विक्रमकेसरी म्हणाला ते ऐकून शिखीमुख हसला आणि तोच प्रश्न त्याने अजित, वीरभद्र व नांगसोमला पण विचारला. जांगला म्हणाला ते खरे असू शकेल असे त्यांचे मत पण पडले.

"तरमग उद्या आपण जांगलाला आपल्या बरोबर घेऊन जाऊ! काय म्हणतोस विक्रम?" शिखीमुखने विचारले.

"होय! घेऊन जाऊ. पण या खेपेस सुद्धा तो खोटे बोलला असे आढळले तर त्याचे मुंडके छाटून टाकू." विक्रमकेसरी म्हणाला.

तेथून सर्व पुढे निघाले तेव्हां जांगलाने शिखीमुख आणि विक्रमकेसरी दोघांचे पाय धरून त्यांची माफी मागितली व त्यांनी त्याला पुन्हां जीवदान दिल्याबद्दल त्यांचे आभार मानले आणि त्यांच्या बरोबर काठी टेकीत निघाला.

दुसऱ्या दिवशी पहाटेच सर्व उठून पुढे निघण्याच्या तयारीला लागले. जांगलाला शिखीमुख व विक्रम बसले होते त्या नावेत बसवून घेतले. त्यात हेतू एवढाच की वीरभद्र दमल्यास मदतीला आणखी एक



मनुष्य वल्हवायला राहील. निघण्यापूर्वी त्यांनी इभ्यु लोकांना घेऊन येणारी नाव कोठे दिसते का हे तिच्या वाटेकडे पाहिले. परंतु ती कोठे दिसली नाही. ती नाव वाट चुकून कोठे तरी गेली असावी असे त्यांना वाटले.

वारा अनुकूल दिशेला वाहू लागलेला पाहून दोन्ही नावांची शिडे उभी करण्यात आली. नांगसोम आणि वीरभद्राची नाव पुढे निघाली. दुपारची वेळ झाली तेव्हां कोणत्या तरी बेटावर थांबून जेवण खाण आटोपून घ्यायचे त्यांनी ठरविले. त्याच वेळी एका बेटाच्या वळणावर जोरजोराने








लाटा येऊन त्यांच्या नावावर आदळू लागल्या. एकाएकी अशा लाटा येण्याचें कारण कोणालाच काही कळेना.

नागसोमने आपली नाव बेटाकडे वळवीत शिखीमुखला पण सावध केले. इतक्यात त्या बेटाच्या वळणावर दोन नावा लाटांचे धक्के खात त्यांच्याच बाजूला येत असलेल्या दिसल्या.

त्या नावेत बसलेल्या लोकांना विक्रम व शिखीमुख दोघांनी ओळखले. एका नावेत पुजारी उभा राहून मोठमोठ्याने ओरडत होता–"जलसर्प आपल्याला गिळणार आहे. नावा काठाकडे घेऊन चला."

पाहता पाहता शिखीमुखच्या साथीदारांना सुद्धा जलसर्प दिसला. त्या सापाचे डोके व मान सापासारखी होती पण शरीर दहाबारा हत्तीएवढे होते. तो झपाट्याने पाणी घुसळून पुजाऱ्याच्या साथीदारांना पाण्यात पाडण्याच्या प्रयत्नात होता.

ते दृश्य भयंकर होते. शिखीमुख व त्याचे साथी थर थर कापू लागले. सुदैवाने त्यांच्या नावा किनाऱ्याजवळ आल्या होत्या. म्हणून ते किनाऱ्यावर उतरून स्वतःचा बचाव करू शकले. परंतु पुजाऱ्याच्या नावा जलसर्पाच्या वेगाने उठणाऱ्या लाटांच्या धक्क्याने पाण्यात वाहून जात होत्या.

शिखीमुखच्या देखत जलसर्पाने आपले तोंड पुढे करून पुजाऱ्याच्या नावेतल्या एकाला गिळून टाकले. पुजारी व त्याचे साथी वेड्यां-सारखे ओरडत जोरजोराने नावा दूर वल्हवून नेऊ लागले. जलसर्प त्या माणसाला पूर्णपणे गिळण्यासाठी क्षणभरच थांबला असेल. तो पुन्हा त्यांचा पाठलाग करू लागला.

"शिखी, ही संधी छान दिसते आहे. त्या दुष्टाला सहज बाण मारता येईल असे मला वाटते." असे म्हणत त्याने धनुष्यावर बाण ठेवून नेम धरला.

(पुढील गोष्ट पुढील अंकी)



# विदूषकाचा अपराध

विक्रमादित्याने हट्ट सोडला नाही. तो परत झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"सापाशी खेळ-णाराला कधी न कधी त्याचे फळ भोगावे लागतेच. तुला सावध करून देण्याच्या हेतूने मी तुला मद्रदेशाच्या विदूषकाची गोष्ट सांगतो. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

प्राचीन काळी मद्रदेशाच्या राजाच्या दरबारी एक विदूषक रहात असे. तो सहज बोलतां बोलतां लोकांना हसवी. एवढेच नव्हे तर त्याला नुसते पाहूनच लोक हसू लागत. तो गिड्डा व किडकिडीत काडी पहेलवान होता. त्याचे कान इतके लांब होते की तो हसू लागला की त्याची जिवणी दोन्ही कानांपर्यंत पसरत असे. तसा तो



फार हुशार होता. तो अशा गोष्टी सांगे की हसता हसता पोट दुखू लागे. आणि गंमत अशी की एकदा सांगितलेली गोष्ट तो पुन्हां सांगत नसे. तो सर्वांची थट्टा करी. त्याच्या थट्टेतून स्वतः राजापण सुटत नसे. परंतु राजाने कधी ती गोष्ट मनावर घेतली नाही. म्हणून इतर लोकांना पण त्याने त्यांची किती थट्टा उडविली तरी गप्प रहावे लागे. सर्वांना त्याचा भयंकर राग होता, परंतु सर्व त्याला भीत.

राजाला विदूषक अनेक तऱ्हेने उपयोगी आढळून आला. दरबाऱ्यांच्या हातून एखादा अपराध घडला की विदूषक तो साबित करून दाखवी आणि राजा त्या अपराधी दरबाऱ्याला दंड करी. परंतु कोणावर नुसता संशय असला तर विदूषक थट्टेथट्टेतच तशी गोष्ट पुन्हा घडू नये असा काही तरी उपाय करी. कधी कोणी अधिकारी काही वाईट काम करण्याचा प्रयत्न करताना आढळून आला की, विदूषक त्याची थट्टेतच अशी कान उघाडणी करी की तो अधिकारी पुन्हा ते काम करण्यास धजत नसे. कधी थट्टेथट्टेतच विदूषक सर्वांसमक्ष एखाद्या अधिकाऱ्याच्या वैऱ्यां त्या अधिकाऱ्याचा हेवा करणाऱ्या लोकांना ते बरे वाटे. अशा तऱ्हेने विदूषक कळत नकळत राजाला उपयोगी पडे. म्हणून विदूषक कधी राजाचीच थट्टा करी तेव्हां राजा त्याला रागवत नसे.

एकदा राजाचा वाढदिवस होता. संध्याकाळी मोठी मेजवानी होती. त्यानंतर नृत्य, संगीत वगैरे अनेक मनोविनोदाचे कार्यक्रम होते. राजा सभासदांबरोबर गप्पात रंगला होता. विदूषक लोकांना हसवीत मधून मधून एकाद्यावर कोटी करीत होता अन् सर्व खूप हसत होते. विदूषकाच्या कोट्या ऐकून सर्व पोट दुखेपर्यंत





हसत होते. मध्येच तो म्हणाला—"तुम्हांला वाटत असेल की माझ्यासारखा मूर्ख या जगात दुसरा कोणी नसेल, पण मूर्ख राज, म्हणजे मूर्खांचे राजे, महाराज आहेत बरं का!"

ते ऐकून राजा मोठमोठ्याने हसला व राजाच्या पाठोपाठ सर्व हसू लागले.

"मी एक कुरूप व विद्रूप मनुष्य आहे ही गोष्ट खरी आहे आणि महाराज सुंदर रूपवान आहेत हेदेखील तितकेच खरे आहे. परंतु त्यांचे सौंदर्य त्यांच्या वाकड्या तिकड्या गुडघ्यांमुळे आहे. त्यांचे पाय घोड्यावर बसतांना जसे वांकडे असतात तसेच ते जमिनीवर चालतांना पण वांकडेच असतात." विदूषक म्हणाला ते ऐकून राजा हसला व सर्व दरबारी पण हसले.

"आपल्या महाराजांसारखा चिक्कू मनुष्य सर्व जग हुडकून पाहिले तरी मिळणार नाही? माझ्याहून दहा लाखपट महाराजांकडे धन दौलत आहे. पण काय उपयोग? ते कमीत कमी माझ्या दुप्पट तरी खाऊ शकतील, का?" विदूषक म्हणाला, आणि राजा ते ऐकून देखील हसला.

"परमेश्वराने आपल्याला असे मंदबुद्धी, लोभी, वांकडे गुडघे असलेले आणि डोक्याला टक्कल पडलेले महाराज दिले आहेत. हे सर्व आपल्या पूर्वजन्माचे फळच आहे नाही का?" अशी विदूषकाने थट्टा केली.

या खेपेस मात्र राजाला ती थट्टा सहन झाली नाही. राजा ओरडून म्हणाला—"तुझी बटवट बंद कर." नंतर आपल्या शिपायांकरवी राजाने विदूषकाला कैद करविले आणि म्हणाला—"उद्या याला आमच्या सिंहासमोर फेकून द्या."

ते ऐकून विदूषकाला त्याचे रक्तच गोठल्यासारखे वाटले. 'आपण असे बोललो तरी काय की राजाने आपल्याला एकाएकी इतकी मोठी शिक्षा फर्मावली.'



शिपायांनी विदूषकाला धरून नेऊन राजवाड्यातल्याच एका खोलीत कोंडून ठेवले.

दुसऱ्या दिवशी सकाळी काही अधिकारी राजाला भेटून म्हणाले–"महाराज! विदूषकाला क्षमा करावी. जर क्षमा करणे शक्यच नसेल तर मृत्युदंड करण्याऐवजी काही तरी लहानशी शिक्षा करावी."

"मी त्याला वाघासिंहासमोर फेकण्याची शिक्षा सुनावली आहे. त्यात बदल होणार नाही." राजा म्हणाला.

"सिंहासमोर त्याला फेकले तर सिंह त्याला खाणार नाही का?" अधिकाऱ्यांनी विचारले.

"पण सिंहाने त्याला खाल्ले नाही आणि तो जिवंत राहिला तरी मला हरकत नाही." राजा म्हणाला.

"सिंहासमोरून तो वांचला तर आपण त्याला दुसरी एकादी शिक्षा करालच की नाही?" दरबाऱ्यांनी राजाला विचारले.

"नाही, मी त्याला सोडून देईन." राजा म्हणाला.

सिंह त्याला खाणार नाही असा काही तरी उपाय योजण्याचे अधिकाऱ्यांनी ठरविले.

सिंह लोखंडी गजांच्या एका पिंजऱ्यात होता. सिंहाला रोज खाणे घालणारा एक राखणदार होता. विदूषकाच्या हितैषी मित्रांनी त्या राखणदाराला लाच देऊन त्याला आपल्याकडे वळवून घेतले आणि म्हणाले–"सिंहाला आज खूप खायला घाल, म्हणजे त्याला उद्यां खाण्याची इच्छा उरणार नाही."

सिंहाच्या पिंजऱ्याला दोन दरवाजे होते. ते नेहमी बंद असत. पिंजऱ्याच्या दुसऱ्या दरवाज्याजवळ विदूषक येईल तेव्हांच तो दरवाजा त्याने उघडावा, असे देखील विदूषकाला समजावून सांगण्यात आले.

त्यानंतर काय काय करावयाचे हे त्यांनी विदूषकाला पण समजावून सांगितले. परंतु आपण जिवंत पिंजऱ्याबाहेर येऊ, या





गोष्टीवर त्याचा विश्वासच बसेना. तो आपल्या मित्रांना म्हणाला–"मी आजपर्यंत विदूषक म्हणून सर्व आयुष्य घालविले. म्हणून विदूषकासारखेच आपल्याला मरण यावे असे मला वाटते. तुम्ही माझ्यासाठी पांच निरनिराळे रंग असलेला पोशाख माझ्यासाठी तयार करवून आणा. त्याला लहान लहान घुंगरू लावलेले असावेत." विदूषकाने सांगितल्याप्रमाणे त्याच्या मित्रांनी पोशाख तयार करविला.

विदूषकाला दंड द्यायची वेळ जवळ आली. हजारो लोक सिंहाच्या पिंजऱ्याजवळ गंमत पहायला जमले. ठरल्या वेळी राजाने विदूषकाला पिंजऱ्यात टाकण्याचा हुकूम सोडला.

शिपाई विदूषकाला घेऊन आले. विदूषकाचा पंचरंगी विचित्र पोशाख पाहून व त्याला लावलेले घुंगरू वाजू लागलेले ऐकून आणि शिपायांच्या मध्यभागी आनंदाने हसत ऐटीत चालणाऱ्या विदूषकाला पाहून सर्वलोक हसू लागले, राजाला सुद्धा हसू आले. पण त्याने स्वतःला आवरले.

सिंह एका कोपऱ्यात घोरत पडला होता. खूप खाल्ल्यामुळे बाहेर काय होत आहे याची त्याला फिकीरच जणुंकाही नव्हती. विदूषकाने एका दरवाज्यातून प्रवेश करून दुसऱ्या दरवाज्यापर्यंत चालत जावयाचे ठरले होते. दुसरा दरवाजा उघडण्यासाठी तेथे राखणदार उभा होता. विदूषकाने पिंजऱ्याच्या दारात पाऊल टाकले. सिंह उठून बसला व विदूषकाकडे पाहू लागला.

विदूषक माकडासारखा उड्या व कोलांट्या मारू लागला. नंतर थोडा वेळ नाचला. पिंजऱ्याबाहेर जमलेले लोक ती गंमत पाहून मोठमोठ्याने हसत होते. विदूषकाचे पंचरंगी कपडे पाहात व त्याच्या कपड्यांना बसविलेल्या घुंगरांचा विचित्र आवाज ऐकत सिंह एका कोपऱ्यात बसला

होता. संधी पाहून विदूषक त्याच्या जवळून पलीकडच्या दरवाज्यापर्यंत गेला व दरवाजा उघडल्याबरोबर बाहेर निघून आला.

विदूषकाचा जीव वांचला. सर्वांना ते पाहून हायसे वाटले. विदूषकाचा जीव वांचावा असे राजाला पण वाटत होते. त्यानंतर राजाने विदूषकाच्या मित्रांच्या विनंतीला मान देऊन विदूषकाला आपल्या दरबारी स्थान दिले. परंतु त्यानंतर विदूषकाने कोणाला हंस विण्याचा प्रयत्न कधी चुकून सुद्धा केला नाही. म्हणून असे सर्वांना वाटू लागले की खरा विदूषक सिंहाच्या तोंडी खलास झाला.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला– "राजा! मला हे सांग त्या बिचाऱ्या विदूषकाने असा कोणता गुन्हा केला की त्याला एवढी मोठी शिक्षा राजाने सुनवावी. विदूषकाने केलेली थट्टा ऐकून हंसणारा राजा असा एकाएकी रागावला कां? याचे उत्तर माहीत असून तू दिले नाहीस तर परिणाम तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर छकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील."

ते ऐकून विक्रमादित्य म्हणाला– "विदूषकाने राजाला वांकड्या गुडघ्याचा, मंदबुद्धी व लोभी म्हटले. कदाचित हे सर्व खोटे असेल. म्हणून इतरांबरोबर राजा हसला. परंतु विदूषकाने राजाला टक्कल पडलेल्या डोक्याचा म्हटले, ही गोष्ट बहुतेक खरी असावी. म्हणून राजाला राग आला असावा. इतर गोष्टींबद्दल राजा पूर्वी हसलाच होता. विदूषकाला ही गोष्ट कळत तरी नसावी किंवा तो विसरला असेल की थट्टेतदेखील खरे व्यंग्य बोलून दाखवायचे नसते. हीच त्याची चूक असावी."

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह नाहीसा झाला व झाडाच्या फांदीला जाऊन लोंबकळू लागला.

(कल्पित)





# लोभी

विलासपुर नावाच्या गावी एक जव्हेरी रहात असे. त्याच्या वडिलांनी दर्यापार व्यापार धंदा करून खूप पैसा आणि नावलौकिक मिळविला होता. तो व्यापारी सच्चाई व चोखपणाबद्दल पण तितकाच प्रसिद्ध होता.

त्याचा मुलगा हिरालाल पण आपल्या धंद्यात बापा इतकाच वाकबगार होता. पण तो फार लोभी होता. गिऱ्हाइकांना फसविणे हे व्यापारातले कसब आहे असे तो मानी. म्हणून त्याने धंद्याचा व्याप जास्त वाढविला नाही, तरी त्याला बापाच्या दहापट फायदा होई.

एकदा हिरालालच्या दुकानात एक गिऱ्हाईक मोती विकायला आला. तो आपला मोती काढून हिरालालला दाखवून म्हणाला–"शेटजी! मी जन्मापासूनच गरीब कफल्लक नव्हतो. माझ्या नशिबाने पाठ फिरविली. नाहीतर मी असे मोती आपल्या मित्र मंडळींना प्रेमाची भेट म्हणून दिले आहेत. परंतु माणसाला सर्व दिवस सारखेच जात नाहीत. आणखी जास्त काय सांगू? माझ्याजवळ एवढाच एक मोती उरला आहे. पोटापाण्याला दुसरा काही मार्गच उरला नाही तेव्हा हा मोती विकायला काढला. जी किमत तुम्हांला योग्य वाटेल ती द्यावी."

हिरालालने विचार केला की मासा स्वतःच जाळ्यात येऊन पडला आहे. तसा तो मोती मोठ्या किमतीचा होता. पण त्या व्यापाऱ्याने तो कमी किमतीत मिळविण्याचे मनाशी ठरविले. ज्या मनुष्याला पोटभर खायला प्यायला देखील मिळत नाही तो जास्त किमतीची हाव ठेवून येणारच नाही. असा विचार करून हिरालाल म्हणाला–"हा मोती तसा जास्त

श्री विनायक गो. जाधव












किमतीचा दिसत नाही. तो विकत घेऊन मला काही फायदापण नाही. तरी तू म्हणतो आहेस म्हणून मी विकत घेईन. सांग, काय किमतीची अपेक्षा आहे तुला?"

तो गरीब मनुष्य ते ऐकून चकित झाला व म्हणाला—"शेटजी! अहो, तुम्हांला या मोत्याची किमत माहीत का नाही? असे सोंग कशाला करता? तुम्ही द्याल ती किंमत घेऊन हा मोती तुमच्या हाती विकायचा असे ठरवूनच मी आलो आहे."

हिरालालने मोती चांगला पाहून घेतला व म्हणाला—"मी वीस अशरफी द्यायला तयार आहे."

"हा अन्याय आहे, सरासर अन्याय आहे!" असे म्हणत तो गरीब मनुष्य वीस अशरफी घेऊन निघून गेला.

काही दिवस लोटल्यानंतर हिरालालच्या दुकानासमोर दुपारच्या सुमारास कोणीतरी दोघी बायका बोलत उभ्या दिसल्या. त्यांच्या बोलण्यावरुन त्या श्रीमंत घराण्यातल्या सासवासुना असाव्यातशा दिसले. सुनेच्या हातात एक लहान मूल पण होते.

"सासुबाई! धनगुप्त आपल्याला वेळेवर दागिने करून देईलसे दिसत नाही. तो आपल्याला फसविणार की काय, अशी शंका वाटू लागली आहे." सुनबाई म्हणाली.

"आजपर्यंत आपणाला हवे होते तसे काम त्याने वेळेवर करून दिले. याच वेळी त्याला थोडा उशीर झाला. आपल्याला पाहिजे होते तसे मोती त्याला अजून मिळाले नाहीत, म्हणतो. तो म्हणतो ते खरेदेखील असू शकेल." सासू म्हणाली.

"लग्न मुहूर्त जवळ आला आहे. त्याला मोती केव्हां मिळणार आणि तो केव्हां दागिने करून देणार, देवालाच माहीत." सुनबाई म्हणाली.

सासवासुनांचे बोलणे ऐकून हिरालालला वाटले, मोठे सावज सापडत आहे. त्याने



जवळ जाऊन नमस्कार केला व दुकानात बोलवून म्हणाला—"माझ्या दुकानात आपल्याला हवे असतील तसले हिरे, मोती व इतर रत्ने आहेत. एकदा आपण पहावेत तरी! नाहीतर, आम्ही एवढी दुकान मांडून बसलो आहो कशासाठी? आपल्या सारख्यांची सेवा करण्यासाठीच नाही का?"

"तसे मोठे नाही हो. माझ्या पुतणीचे लग्न मंत्र्याच्या मुलाशी ठरले आहे. चांगलासा अहेर केला नाही तर नावे ठेवतील आम्हांला ती मंडळी. एक तन्मणी करायला आम्ही धनगुप्ताकडे दिला होता. त्याने अजून दिला नाही." सासू म्हणाली.

"बाईसाहेब! महाराणीला देण्यालायक मोत्यांचे हार माझ्या दुकानात तयार ठेवले आहेत. आपण पहा, तरी!" असे सांगून त्याने एक हार त्यांच्यासमोर ठेवला.

"किमत काय वाटेल ती असली तरी एक चांगला हार विकत घेऊन नवऱ्यामुलीला द्यायचा आहे. मी हा हार नवऱ्यामुलीला दाखवून घेऊन येते. मी परत येई पर्यंत माझी सुनबाई येथे बसेल. तुम्ही माझ्याबरोबर आपल्या नौकराला पाठवावे." सासू म्हणाली.

"त्यात काय मोठे से? आपण नवऱ्यामुलीला दाखवून आणा." हिरालाल



म्हणाला. सासूबरोबर दुकानदाराचा नौकर निघून गेला.

तो गेल्यावर सुनबाई दुकानदाराला म्हणाली—"काय हो, तुमच्याकडे चांगले मोती आहेत का? मी नवऱ्यामुलीसाठी मोत्याची अंगठी करून द्यावी म्हणते."

हिरालालने मोत्यांबरोबर त्या गरिबाकडून विकत घेतलेला मोती दाखविला. सुनबाईने, गरिबाने दाखविलेला मोतीच निवडला आणि किंमत विचारली.

"हा मोती! अहो, त्याची फार किंमत आहे. दोन हजार अशरफी तरी कमीत कमी होतील." दुकानदार म्हणाला.



इतक्यात दुकानाबाहेर काहीतरी गलबला झाला. दोघे जण तलवारी घेऊन लढत होते. एक मोठी गर्दी जमा झाली. हिरालाल गंमत पहायला घराबाहेर येऊन उभा राहला. इतक्यात चारपाच शिपायांनी पुढे जाऊन त्या दोघांना कैद केले. गर्दी हळूहळू कमी झाली. हिरालालच्या दुकानासमोर मारामारी झाली होती म्हणून तो तेथेच उभा होता.

"तुम्ही या दोघांना मारामारी करतांना पहात होता. म्हणून साक्ष द्यायला चला आमच्याबरोबर." शिपाई म्हणाले आणि त्याला आपल्या बरोबर घेऊन गेले.

"मी आहे दुकानात. जाऊन या तुम्ही." सुनबाई दुकानदाराला म्हणाली.

एका अनोळखी बाईला दुकानात बसवून तिच्यावरच दुकान टाकून जाणे हिरालालच्या मनाला आवडले नाही. पण नाइलाजाने त्याला त्या अनोळखी बाईवर सर्व दुकान टाकून जावे लागले.

न्यायालयात हिरालाल उलट सुलट उत्तरे देऊ लागला. त्याचे सर्व लक्ष दुकानाकडे होते. न्यायाधिशाला, हिरालाल बोलला ते सर्व खोटे असल्याचे आढळून आले. म्हणून तो म्हणाला—"काय रे! तू सुद्धां आरोपीच दिसतो आहेस." त्यानंतर त्याला बराच वेळ न्यायालयातच थांबवून ठेवून पुन्हा त्याची उलट तपासणी केली व फार उशिरां त्याला सोडले.

हिरालालने परत येऊन पाहिले, तोंपर्यंत त्याला त्या बाईची सून दिसली नाही. एक लहान मुलगा दुकानात झोपविलेला दिसला. मुलाच्या अंगावर पांघरूण होते. दुकानाचा नोकर पण परतला नव्हता. या सर्व गोष्टी त्याला विचित्र वाटल्या.

इतक्यात नोकर परत येऊन म्हणाला— "शेटजी! आपण यात पूर्ण फसलो." नंतर त्याने, स्वत:ला सासू म्हणविणाऱ्या बाईबरोबर तो दूर एका मोठ्या घरी कसा गेला, त्या बाईने घरात जातांना त्याला अंगणात थांबायला कसे सांगितले व शेवटी बराच वेळ थांबल्यावर सुद्धा ती बाहेर आली नाही तेव्हां तो घरात कसा गेला व ते घर नसून ती एक धर्मशाळा होती आणि सर्व धर्मशाळा हुडकून पाहल्यावर ती बाई कोठे नाही हे कळल्यावर त्याला निराश होऊन कसे परतावे लागले हे सांगितले.

नोकर म्हणाला ते ऐकून हिरालाल मटकन खालीच बसला. मुलाच्या अंगावरचे पांघरूण बाजूला सारून त्याने पाहिले तर ते मूल नव्हतेच. एक बाहुली होती.

घाबरून जाऊन दुकानदाराने दुकानातली एखादी वस्तू चोरीला तर गेली नाही ना, तपासून पाहिले आणि दुकानातल्या सर्व मूल्यवान वस्तू नाहीशा झालेल्या पाहून त्याला वेड लागल्यासारखे झाले.

अशा तऱ्हेने हिऱ्याचा व्यापारी एक सामान्य निर्धन मनुष्य झाला. कोणत्याही व्यापाऱ्याने त्याला मदत केली नाही. त्याला आपले घरदार विकावे लागले आणि एक लहानसे दुकान उघडून पुढील व्यापार करावा लागला.

एक दिवशी एक श्रीमंत मनुष्य त्याच्या दुकानासमोर घोड्यावर बसून आला. त्याने दुकानासमोर घोडा उभा केला व दुकानात येऊन म्हणाला—"कायरे हिऱ्याचा व्यापारी मिठाचा व्यापारी झाला आहे वाटते? मला ओळखले नाहीस का? तू माझ्याकडून वीस अशरफी देऊन एक मोती विकत घेतला होतास आठवतो का? माझा तो मोती मला परत मिळाला. निदान यापुढें तरी इमाने इतबारे व्यापार धंदा कर. लक्षांत ठेव, माझ्या राज्यात अन्याय झालेला मला सहन होणार नाही." असे सांगून तो मनुष्य निघून गेला.





# न्हाव्याचा आरसा

पुष्कलावती नदीच्या काठी एक लहानसे राज्य होते. त्या देशाचा राजा अचानक मरण पावला. म्हणून त्याचा सुदर्शन नावाचा मुलगा लहानपणीच गादीवर बसला. मंत्री, सेनापती वगैरे राज्याचे सर्व अधिकारी त्याला योग्य सल्ला देत व मदत करीत. परंतु त्याला गुप्तपणे सल्ला देणारा एक न्हावी होता.

न्हावी वृद्ध होता. सुदर्शनचे वडील राज्य करीत असता ते कित्येक महत्वाच्या गोष्टी मंत्र्याला सुद्धा कळवीत नसत. ते याच न्हाव्याजवळ गुप्त मंत्रणा करीत व त्याचा त्याना फायदापण होई.

सुदर्शन गादीवर बसताच मंत्र्यांनी त्याला विवाह करून घेण्याचा सल्ला दिला. कारण, राज्याची प्रतिष्ठा राणी असल्याने वाढते असे त्यांचे मत होते. परंतु सुदर्शनने तिकडे दुर्लक्ष केले आणि "इतक्यात गर्दी कसली ?" असे सांगून तो ती गोष्ट टाळीत आला.

खरी गोष्ट अशी होती की सुदर्शनच्या मनात लग्न करावयाचे नाही, असे नव्हते. पण स्त्री जातीवर त्याच्या मनात नेहमी एक शंका वसत असे. ज्या मुली सुंदर असतात त्या सदाचरणी नसतात. एखादी मुलगी सुंदर व सदाचरणी असते तर तिला स्वत:च्या सौंदर्याचा गर्व तरी असतोच. म्हणून त्या स्वभावाने भांडखोर असतात. परंतु हे सर्व तो मंत्री व इतर दरबारी लोकांना सांगण्यास तयार नव्हता.

असेच बरेच दिवस लोटले. एकदा न्हावी राजाची दाढी करीत असता राजाला म्हणाला—"महाराज! मला सर्व विचारतात की महाराज लग्न कां करीत नाहीत?"

ते ऐकून सुदर्शनने त्याच्या मनात स्त्री जातीविषयी जी शंका त्याच्या मनात होती ती सांगून विचारले—"आता तूच सांग, अशी मुलगी कोठे मिळेल? मला मुलीची जातपात वगैरे विचारण्याची गरज वाटत नाही. जी मुलगी दिसायला सुंदर व सुशील असेल तिच्याशी मी लग्न करायला तयार आहे. पण अशी मुलगी कोठून मिळणार? तुला माहीत असेल तर सांग. मी लगेच तिच्याशी लग्न करीन."

न्हाव्याने थोडा वेळ विचार केला व म्हणाला—"तुमच्या समोर हाच प्रश्न असेल तर एक उपाय सांगतो. माझ्याजवळ एक आरसा आहे. त्यात कोणाचे ही रूप पाहल्यास त्या माणसाचा स्वभाव व गुण कळतात. तुम्हांला ज्या मुलीशी लग्न करावयाचे असेल ती कोण आहे मला सांगा. मी या आरशात तिला पाहून तिचे सर्व गुणदोष तुम्हांला येऊन सांगेन."

न्हावी म्हणाला ते ऐकून राजाला बरे वाटले. तो म्हणाला—"तू माझ्या योग्य वधू शोधून देशील तर मी आयुष्यभर तुझे उपकार विसरणार नाही."



त्याच दिवशी राजाने, तो लग्नाला तयार असल्याचे जाहीर केले. संध्याकाळपर्यंत राजधानीभर ती बातमी पसरली. राजाने जाहीर केले की तो जाती बाहेर देखील लग्नाला तयार आहे. गरीब श्रीमंत कोणाची ही मुलगी असो, ती सुंदर सुशील व गुणवती, असली पाहिजे. राजाने जाहीर केल्यावरोबर लग्नाला योग्य ज्या ज्या मुली होत्या त्या सर्व आरशात आपापली तोंडे पाहून राणी बनण्या लायक, त्या आहेत का स्वत:शीच विचारू लागल्या. परंतु दुसऱ्या दिवशी असे जाहीर झाले की राजा ज्या मुलीशी लग्न करील तिला प्रथम दरबारी न्हावी आपल्या आरशात पाहणार. त्या अराशात त्यांचे गुणावगुण व पात्रता कळतील.

ती गोष्ट कळल्यावर राणी बनण्याची इच्छा असणाऱ्या बऱ्याच मुलींचा उत्साह



थंड पडला. राजाच्या अंतःपुरात प्रवेश मिळण्याची हाव असून काय उपयोग? न्हाव्याला आपले गुणावगुण कळतील या गोष्टीची दहशतच सर्वांना बसली.

पाहता पाहता दहा दिवसपण लोटले. परंतु राजाशी विवाह करण्यास एक देखील मुलगी आली नाही.

"काय हो न्हावी दादा! आजपर्यंत तुम्ही सर्वांनी लग्न करून घ्या असे टुमणे माझ्या पाठीस लावले होते. पण आजपर्यंत एक देखील मुलगी माझ्याशी लग्नाला तयार झाली नाही?" राजाने न्हाव्याला विचारले.

"महाराज! माझ्या जादूच्या आरशाची गोष्ट सर्वांना कळली आहे. त्यात आपले रूप पाहायला केवढे धाडस अंगी असले पाहिजे? कोणी देवी मानव रूप धारण करून जन्मली असेल तर तीच आपल्याशी लग्नाला तयार होईल. सामान्य स्त्रीला आपल्याबरोबर मी गादीवर बसू देईन का?" न्हावी म्हणाला.

"तरमग तू असे कर, तुझ्या आरशाच्या परीक्षेला उतरणारी मुलगी हुडकून आणून दे." राजा न्हाव्याला म्हणाला.

प्रवासाला आवश्यक रकमेची व्यवस्था राजाने करून दिल्यावर न्हावी निघाला. तो प्रत्येक गावात जाऊन राजासाठी योग्य वधू शोधनाकरिता आल्याचे सांगे आणि विचारी–"तुमच्या गांवी राजाची राणी होण्यालायक कोणी मुलगी आहे का?"

एक जण एकनाव सांगे, दुसरा दुसरेच एकादे सांगे. कोणी कधी एकत्र जमून एक नाव सुचविले नाही.

अशा प्रकारे अनेक गावे हिंडत न्हावी बराच दूर निघून गेला. एकदां तो एका डोंगराळ प्रदेशात जाऊन पोचला. दुपारची वेळ होती व त्याला तहान लागली होती. डोंगरावर मेंढरांचे कळप चरत असलेले



दिसले. त्यांना चरायला नेणारा धनगर कोठे आहे हे पहात न्हावी डोंगर चढून गेला तेव्हां त्याला एका खडकाच्या सावलीत बसलेली एक सुंदर स्त्री दिसली.

"मुली, मी फार दुरून आलो आहे. जवळपास कोठे गाव दिसत नाही. आहे का कोठे. मला फार भूक लागली आहे, आहे का तुझ्याजवळ काही खायला?" न्हाव्याने त्या स्त्रीला विचारले.

"डोंगरापलीकडे एक गाव आहे, काका! पण तुम्ही उपाशी आहा? मग इतके दूर कसे चालत जाल? माझ्या जवळ खायला आहे थोडे, तेच खाऊन घ्या." मुलगी म्हणाली आणि तिने ज्वारीच्या भाकऱ्या व थोडी भाजी त्याला खायला दिला, खाऊन पिऊन न्हावी जरा आरामाने बसला व म्हणाला–

"मुली! आज तू माझ्या जीव वांचविलीस!" असे म्हणत त्याने त्या मुलीकडे पाहिले व चकित झाला. तिचे तोंड चंद्रासारखे गोल व सुंदर होते. मोठमोठे डोळे, काळे भोर लांब केस पाहून न्हाव्याला ती जुनेरे नेसलेली मुलगी पार्वतीसारखी सुंदर दिसली. ही मुलगी नीटनेटके कपडे घालून केस विंचरून राजाच्या शेजारी उभी राहली तर राणीसारखी शोभेल, हिचा स्वभाव अगदी भोळा दिसतो. मुलगीपण कशी गोड दिसते!












न्हावी मनातल्या मनात मुलीची वाखाणणी करीत होता. नंतर त्याने उघड तिला विचारले–"मुली! मी तुझे लग्न राजाशी करून देईन. आहेस का कबूल?"

"काका! आम्ही गरीब, आमच्या सारख्यांच्या भाग्यात राजाची राणी होणे कधी शक्य आहे का?" त्या मुलीने विचारले.

"तू त्याची फिकीर करू नकोस. माझ्या बरोबर चल. मी तुझे लग्न राजाशी करून देईन." न्हावी म्हणाला.

ती मुलगी न्हाव्याचा स्वभाव व वागणूक ओळखून त्याच्याबरोबर जायला तयार झाली.

दोघे राजवाड्यात पोचले. न्हाव्याने अंत:पुरातील दासींना सांगून त्या धनगराच्या मुलीला चांगले न्हाऊ घालवून तिला उत्तमोत्तम वस्त्रालंकारांनी सजवून घेतले. दासींनी तिच्या वेणीत फुलांची वेणी घातली आणि तिला न्हाव्यासमोर आणून उभे केले. ती मुलगी धनगराची पोर असेल या गोष्टीवर कोणाचा विश्वास होणेच शक्य नव्हते.

न्हावी घरातून एक आरसा घेऊन आला आणि त्यात त्या मुलीचे रूप राजाला दाखवून म्हणाला–"महाराज! या मुलीत आपल्याला काही दोष किंवा वैगुण्य दिसते आहे का?" सुदर्शनने मुलीचे रूप आरशात पाहिले. त्याला ती मुलगी आवडली व त्याने तिच्याशी लग्न करून घेतले. विवाह प्रसंगी न्हाव्याला राजाने एक मोठी जहागीर दिली आणि पुष्कळशा वस्तू इनाम म्हणून दिल्या.

न्हाव्याच्या आरशावर सर्वांचा विश्वास बसला. कित्येकांनी लग्नापूर्वी मुलीचा स्वभाव आरशात पाहून घेण्याची इच्छा न्हाव्याजवळ येऊन व्यक्त केली. पण न्हावी त्यांना उत्तर देई–"अहो, काय सांगू! आरसा फार चांगला होता हो, पण फुटला."





# समुद्राच्या मुली

अल्जीरियर्स नामक शहरात अब्दुला नावाचा एक तरुण रहात असे. त्याच्या बापाने पुष्कळ दौलत संपादन केली. बाप वारल्यावर मुलाने, बापाने ठेवलेला पैसा पाण्यासारखा खर्च केला आणि थोड्याच दिवसात तो संपुष्टात आला. तेव्हां त्याला काय करावे, सुचेना. म्हणून कोणाला काही सांगितल्याशिवाय तो एक दिवशीं घोड्यावर बसून गावाबाहेर निघून गेला.

गावांबाहेर एक जंगल लागले. एका जागी त्याला एक विचित्र दृश्य दिसले. एका उंच झाडाच्या फांदीला एक बाई उलटी टांगलेली होती.

अब्दुल्लाने जवळ जाऊन पाहिले. ती बाई फारच सुंदर होती. तिच्या मानेला जखम झाली होती आणि जखमेतून निघालेल्या रक्ताचे तीन थेंब खाली ठेवलेल्या ताटलीत पडलेले दिसत होते. अब्दुलाने खाली वाकून पाहिले. ते रक्ताचे थेंब तीन माणिक्ये झालेले दिसले. त्या बाईच्या अंगात जीव आहे की नाही हे कळावे म्हणून त्याच्या मनांत तिच्या अंगाला हात लावून पाहण्याचा विचार आला. पण कोणी तरी अदृश्य शक्ती त्या बाईच्या चारी बाजूला वावरत आहे असे त्याला भासले.

त्यानंतर अब्दुल्लाने त्या ताटलीतले एक माणिक्य उचलून आपल्या पागोट्यात ठेवून दिले. नंतर तो त्याने जे पाहिले ते लोकांना सांगण्यासाठी निघाला.

त्या गावच्या सुलतानाला एक मुलगी होती. वजिराच्या मुलाशी तिचे लग्न ठरले होते. पण सुलतानाच्या मुलीने त्या संबंधास नकार दिला, आणि बापाला म्हणाली–"माझ्याशी लग्न करण्याची ज्या कोणाला इच्छा असेल त्याने प्रथम मी मागेन ते दिले पाहिजे."



"तुला काय हवे आहे ते तर सांगशील?" सुलतानाने विचारले.

"मला तीन माणिक्य पाहिजेत. माझ्याशी लग्न करण्याची इच्छा बाळगणाराने ती तीन माणिक्ये आणून दिली पाहिजेत." सुलतानाची मुलगी म्हणाली.

"तुला वेडबीड तर नाही ना लागले? आपल्या देशात माणिक्ये कोठे मिळतील मुली?" सुलतानाने विचारले.

"वाटेल तिथे मिळू द्यात, मला ती हवी आहेत." सुलतानाची मुलगी म्हणाली.

आपल्या मुलीचा तो हट्ट पाहून सुलतानाला दवंडी पिटविणे भाग पडले. "जो कोणी माणिक्ये आणून देईल त्याला मोठे इनाम दिले जाईल," अशी सुलतानाने राज्यभर दवंडी पिटविली. अब्दुल्ला ती दवंडी ऐकून सुलतानाला ते विचित्र माणिक्य दाखवून म्हणाला–"माझ्या जवळ हे माणिक्य आहे."

सुलतानाची मुलगी ते माणिक्य पाहून खूष झाली व म्हणाली–"हे माणिक्य फार सुंदर आहे. मला तीन माणिक्ये हवी आहेत."

"एकच मिळाले आहे त्यात समाधान मानून घे मुली! मी तीन तीन माणिक्ये कोठून आणू?" सुलतान म्हणाला.

"जो एक माणिक्य घेऊन आला आहे तोच घेऊन येईल!" मुलागी म्हणाली.

म्हणून सुलतान अब्दुल्लाला म्हणाला–"मुला, अशीच आणखी दोन माणिक्ये घेऊन ये. तू घेऊन आलास तर तू मागशील ते बक्षिस मी तुला देईन. नाही तर तुझे डोके उडवीन."

"जी सरकार!" असे सांगून अब्दुल्ला हातात तलवार घेऊन जंगलात गेला. ती बाई त्याच जागी तशीच उलटी टांगलेली त्याला दिसली. इतक्यात विजा कडाडल्यासारखा आवाज झाला व त्या बाईच्या समोर



एक मांत्रिक काळे कपडे घालून उभा असलेला दिसला.

मांत्रिकाने त्या बाईला झाडावरून उतरवून जमिनीवर झोपविले व आपला मंत्रदंड तिच्या डोक्याला लावला. लगेच ती उठून उभी राहिली. आता ती पहिल्या पेक्षा जास्त सुंदर दिसू लागली. मांत्रिकाने तिला विचारले–"अजून विचारतो, तू माझ्याशी लग्नाला तयार आहेस का?"

"तू काय वाटेल ते केलेस तरी तुझ्या सारख्या क्रूर दुष्टाबरोबर मी लग्न करणार नाही." ती बाई म्हणाली.



मांत्रिकाला त्या उत्तराने भयंकर संताप आला. तो आपला कोरडा काढून त्या बाईला बेदम मारू लागला. जरा वेळ थांबून तो पुन्हा तिला मारण्यासाठी उठला. त्याच वेळी अब्दुल्लाने पाठीमागून जाऊन तलवारीने त्याचे मुंडके उडविले. ती बाई धावत अब्दुल्लाजवळ गेली व आपल्या प्राणरक्षकाला मिठी मारून म्हणाली–"तुम्ही माझे रक्षण केले आहे. मी आयुष्यभर तुमची गुलाम दासी होऊन राहीन."

त्या बाईने आपली करुण कथा या शब्दात सांगितली. ती म्हणाली–"माझे नाव माणिक! एका समृद्ध राजाची मुलगी आहे. एका वर्षापूर्वी हा दुष्ट मांत्रिक मला उचलून घेऊन आला आणि त्याच्याशी मी लग्न करावे म्हणून माझी छळणूक करू लागला. झाडाला उलटी टांगून माझ्या मानेवर सुरीचे पाते रोवून मला तो त्याच्याशी लग्न करायला सांगे. माझ्या रक्ताच्या थेंबांची माणिक्ये होत, ती तो उचलून घेऊन जाई."

"अल्लाच्या कृपेने आता तू त्याच्या हातातून कायमची सुटली आहेस. तर मग तू माझ्याशी लग्नाला तयार आहेस का?" अब्दुल्लाने विचारले.



"मी तयार आहे. परंतु पहिल्याने लग्नाची सर्व तयारी नको का करायला? त्यासाठी प्रथम मला समुद्रकाठी घेऊन चला." ती तरुण स्त्री म्हणाली. त्या प्रमाणे तिला घोड्यावर बसवून अब्दुल्ला समुद्रकाठी गेला. ती परत येईपर्यंत अब्दुल्लाने किनाऱ्यावरच वाट पहावी असे सांगून तिने समुद्रात उडी टाकली.

कित्येक तास झाले, अब्दुल्ला वाट पहात किनाऱ्यावर उभा होता. आता ती परत काय येते? तिने आपल्याला फस-विले, असे अब्दुल्लाला वाटले. इतक्यात समुद्रावरून एक मोठी मिरवणूक येत असलेली दिसली, घोडेस्वार, पालख्या, पायदळ शिपाई सर्व येत होते. एका पालखीत माणिक जरीची वस्त्रे परिधान करून बसली होती. अब्दुल्ला माणिकला तिच्या बरोबर आलेल्या सर्वांना घेऊन आपल्या घरी आला आणि मोठ्या थाटामाटाने दोघांचा लग्न समारंभ पार पडला.

अब्दुल्ला परत आलेला पाहून सुलतानाने त्याला बोलाविले आणि "माणिक्ये आणलीस का" विचारले.

तो म्हणाला—"सरकार! मी आपल्या लग्नाच्या गर्दीत माणिक्ये आणायची गोष्ट पार विसरून गेलो. मला एक महिन्याची मुदत द्यावी. मी खात्रीने घेऊन येईन."

"एका महिन्याच्या आत घेऊन आला नाहीस, तर लक्षात ठेव, मी तुला या खेपेस माफ करणार नाहीं नक्कीच तुझे डोके उडवीन" सुलतान म्हणाला.

अब्दुल्ला घरी परत आला. त्याला काळजीत मान खाली घालून बसलेला पाहून माणिकने त्याला कारण विचारले.

अब्दुल्लाने माणिक्यांची गोष्ट सांगितली. तिने लगेच एक सुरी हातावर मारली. रक्ताचे दोन थेंब हातावर दिसले. ते थेंब खाली पडताच त्याची माणिक्ये झाली. ती माणिक्ये अब्दुल्लाने सुलतानाला नेऊन दिली.

ती माणिक्ये मुलीला आनंदाने देऊन सुलतानाने तिला विचारले—"झाली न तुझी इच्छा पूर्ण?"

ती म्हणाली—"माझी एक इच्छा पूर्ण झाली. आणखी एक इच्छा आहे. एका माळेपुरेसे मोठमोठे मोती पाहिजेत. माझ्याशी लग्न करण्याची इच्छा असणाऱ्याने मोतीपण आणून दिले पाहिजेत."

"आपल्या देशात मोती कोठून मिळणार मुली?" सुलतानाने विचारले.

"ज्याला माणिक्ये मिळू शकतात त्याला मोती मिळणार नाहीत का?" सुलतानाच्या मुलीने विचारले.

सुलतानाने पुन्हा अब्दुल्लाकडे निरोप पाठविला व तो आल्यावर त्याला म्हणाला—"मोत्यांचा हार करायला मोती घेऊन ये. तुला एका महिन्याची मुदत देतो."

"जी सरकार!" म्हणून अब्दुल्ला घरी निघून गेला. या नव्या संकटाची गोष्टपण त्याने बायकोला सांगितले.

"त्यात काय मोठे से? पाहिजे तितके मोती मिळतील." असे सांगून तिने एका कागदावर काही तरी लिहून ती चिट्ठी



अब्दुल्लाच्या हातात दिली आणि म्हणाली—"ही चिट्ठी समुद्रात फेकून द्या व वाट पहात समुद्र किनाऱ्यावर बसून रहा."

अब्दुल्ला समुद्र किनाऱ्यावर गेला आणि माणिकने दिलेली चिट्ठी समुद्रात टाकून वाट पहात बसला. थोड्या वेळाने त्याला समुद्रातून आणखी एक मिरवणूक येत असलेली दिसली. या खेपेस माणिकसारखीच दुसरी एक समुद्रकन्या पालखीत बसली होती. तिचे नाव मोती होते.

अब्दुल्ला मोतीला पण आपल्या घरी घेऊन आला आणि आपली पहिली बायको माणिक हिच्या परवानगीने त्याने मोतीशी



पण लग्न करून घेतले. माणिक आणि मोती सख्ख्या बहिणी होत्या. लग्न समारंभ संपल्यावर अब्दुल्लाने माणिकला सुलताना-च्या हुकमाची आठवण करून दिली. तेव्हां माणिकने आपल्या धाकट्या बहिणीशी लटक्या कारणावरून भांडण केले व तिच्या मुस्कुटात फाडदिशी एक चापट मारली. मोतीच्या डोळ्यातून टपटप टिपे गळू लागली. त्या टिपांचे मोती झाले. अब्दुल्लाने ते मोती नऊन सुलतानाला दिले. सुलतानाने ते मोती मुलीला देत विचारले—"झाले ना तुझ्या मनासारखे? आता लग्नाला काही हरकत आहे का?"

"माझ्या मनात फक्त आणखी एक इच्छा उरली आहे. एका अंड्या एवढी कस्तूरी जो कोणी मला आणून देईल त्याच्याशी मी लग्न करीन." सुलतानाची मुलगी म्हणाली.

कस्तूरी म्हणजे काय हे सुलतानाला माहीत होते व ती मिळविणे किती कठीण आहे हे देखील त्याला माहीत होते. म्हणून कोण अणून देणार हाच प्रश्न होता. त्याने पुन्हा अब्दुल्लालाच बोलाविले आणि हुकूम दिला की एका महिन्याच्या आत अंड्या एवढी कस्तुरी आणून दिली नाहीस तर तुझे डोके उडवीन.

या खेपेस माणिकने अब्दुल्लाला आणखी एक चिट्ठी लिहून देऊन समुद्राकाठी पाठविले. अशा तऱ्हेने माणिकने आपल्या कस्तूरी नावाच्या बहिणीशी अब्दुल्लाचे लग्न करून दिले. तिच्या अंगाला वस्तूरीचा वास येत होते.

सुल्तानाने दिलेल्या मुदतीच्या आत कस्तूरी सांठविण्यासाठी माणिक आपल्या बहिणीला रोज न्हाऊ घालून तिच्या आंघोळीचे पाणी रोज मोठ मोठ्या भांड्यात ठेवून देई. थोड्या वेळाने कस्तूरी पाण्यावर तरंगताना दिसे. अशा तऱ्हेने कित्येक दिवसांनी एका अंड्या एवढी कस्तूरी जमा



...ाणून दिल्यावर
...—"तुझी शेवटची
...ता तू वजिराच्या

...च्या मुलाने पुन्या
...जो पुन्या करील
...न असे पहिल्या-
...आल्ये म्हणून मी
...." सुलतानाची

...न तीन बायका
...लग्न करणार?"
...ले.

...समुद्राच्या मुली
...म्हणून राहण्या-
...त्यांच्यात्र कृपेने
...ले तर होईल. तो
...! माझ्या इच्छा
...पारी कसा असू

शकेल? तुम्ही ज्याला मोठा मोठा म्हणता, त्याने माझी एक तरी इच्छा पुरी करून दाख-विली का?" सुलतानाच्या मुलीने विचारले.

सुलतान निरुत्तर झाला. त्याने अब्दुल्लाला बोलावून आपल्या मुलीशी लग्न करून घेण्यास विनंती केली.

"माझ्या तिघां बायकांच्या परवानगी बगैर मी लग्न करू शकणार नाही." अब्दुल्ला म्हणाला.

सुलतान समुद्राच्या मुलींना देण्यासाठी सुंदर सुंदर व मूल्यवान नजराणे घेऊन गेला आणि तिघां समुद्री कन्यांना अनेक प्रकारे विनंती करून त्यांची परवानगी मिळविली. नंतर सुलतानाच्या मुलीशी अब्दुल्लाचे लग्न झाले.

अब्दुल्लाचे त्याच्या चार ही पत्नींवर सारखे प्रेम होते. सुल्तान मरण पावल्यावर अब्दुल्ला सुलतान झाला. त्याच्या राज्यात प्रजा सुखी होती.



झाली. अब्दुल्लाने ती ...
सुल्तानाने मुलीला विचारले...
इच्छा पुरी झाली ना? आ...
मुलाशी लग्न करून घे."
"माझ्या इच्छा वजिरा...
केल्या का? माझ्या इच्छा ...
त्याच्याशीच मी लग्न करी...
असूनच नाही का सांगत ...
अब्दुल्लाशीच लग्न करीन...
मुलगी म्हणाली.
"त्या व्यापाऱ्याला ती...
आहेत आणि तू त्याच्याशी ...
सुल्तानाने मुलीला विचार...
"त्याच्या तिघी बायका...
आहेत. मी त्यांची दासी ...
लायक देखील नाही. ...
अब्दुल्लाशी माझे लग्न झा...
सामान्य व्यापारी पण नाही...
पुऱ्या करणारा सामान्य व्य...





# अमरवाणी

अन्नं दानात्परं दानं, विद्यादानं, अतः परम् ।
अन्नेन क्षणिका तृप्ति, यावज्जीवन विद्याया ॥ १ ॥

अन्नदान हे श्रेष्ठ दान होय! पण विद्यादान हे त्याहून श्रेष्ठ आहे. (कारण) अन्न तात्कालिक तृप्ति देते (या उलट) विद्या आयुष्यभर (उपयोगी पडते)

संपूर्ण कुंभो न करोति शब्दं, अर्धोघटो घोष मुपैति नूनम् ।
विद्वान कुलीनो न करोति गर्वं, गुणैर्विहीना बहु जल्पयन्ति ॥ २ ॥

भरलेला घट असतो तेव्हां त्यातून आवाज येत नाही. अर्धवट भरलेल्या मडक्यातले किंवा घागरीतले पाणीच सांडून जाते. त्याच प्रमाणे कुलीन विद्वान गर्व करीत नाही. मूर्खच जास्त बलाना करतो.

रूप यौवन संपन्नाः, विरुद्ध कुल संभवाः
विद्याहीनाः न शोभंते, निर्गंधा इव किंशुकाः ॥ ३ ॥

रूपलावण्य, तारुण्य आणि कुलीन घराण्यात जन्म, हे लाभले तरी विद्याहीन मनुष्य वास नसलेल्या किंशुक फुलासारखा असतो.

परं पलित कायेन कर्तव्यः श्रुतसंग्रहः;
न तत्र धनिनो यान्ति यत्र यान्ति बहुश्रुताः ॥ ४ ॥

म्हातारपण आले तरी ज्ञानार्जन केले पाहिजे. विद्वानांना जेथे प्रवेश असतो तेथे श्रीमंतांना नसतो.

श्री नारायण ब. जोशी



# सिंदबादच्या सफरी

मनुष्य संकटांत सापडला की घाबरून जातो. संकटांतून सुटका मिळाली की त्या संकटांच्या आठवणी देखील त्याला गमतीच्या व आनंद देणाऱ्या वाटतात.

सिंदबादच्या मनाची पण तीच स्थिती होती. त्याने तीन वेळा सफरी काढून पुष्कळ संकटांना तोंड दिले. म्हणून जीवनाचा अर्थ ऐश आरामात स्वस्थ बसून राहणे नसून नित्य संकटांना तोंड देत राहून नवनवीन अनुभव मिळविणे आहे हे त्याला कळले. त्याच बरोबर प्रवासात ज्ञानार्जनाबरोबर धनार्जन करणे शक्य असते हे देखील त्याला पटले होते. थोडक्यात म्हणजे सांगावयाचे तळपायाला खाज सुटली त्याला स्वस्थ बसवेना. म्हणून आपले आप्तेष्ट व बंधुबांधव आणि ऐश आराम सर्व सोडून व्यापारा जोगता माल विकत घेऊन सिंदबाद बसरा नगरी आला. तेथून काही व्यापाऱ्यांबरोबर जहाजात बसून आपल्या चवथ्या सफरीवर तो निघाला. ते जहाज मोठे होते व खूप वेगाने जात होते.

वाटेत जहाज कित्येक बंदरात थांबले. सर्व व्यापाऱ्यांनी प्रत्येक बंदरातल्या बाजारात जाऊन जवळचा माल चांगल्या किंमतीला विकला व नवीन माल पुढल्या मुक्कामासाठी खरेदी केला. एक दिवशी अचानक जहाजाच्या मालकाने समुद्राच्या मधोमधच जहाज थांबवून नांगर टाकला व म्हणाला—"मित्र हो! आपल्यांवर फार मोठे संकट आले आहे."

मालकाचे ते वाक्य पुरे झाले असेल नसेल, तेवढ्यात एक मोठे वादळ आले आणि ताडामाडाएवढ्या मोठ्या लाटा जहाजावर येऊन आदळू लागल्या. दोन तीन मिनिटात समुद्राने व्यापारी व त्यांचा माल यांच्यासकट जहाज गिळंकृत केले.











सिंदबाद व त्याच्या काही साथी व्यापाऱ्यांना त्यांच्या सुदैवाने लाकडाची एक मोठी फळी तरंगताना समोर दिसली. ती धरून त्यांनी आपला बचाव केला. एक मोठी लाट आली व फळीला धरून असलेले सिंदबाद वगैरे व्यापारी किनाऱ्यावर ढकलले गेले. लाटांच्या माऱ्याने व भीतीने सर्व इतके दमून गेले होते की कोणाला उठण्याची हिंमतच झाली नाही. वाळूत पडल्या पडल्या त्यांना केव्हां झोप लागली हे कळले देखील नाही.

दुसऱ्यादिवशी उजाडल्यावर त्यांना शुद्ध आली व थोडी हुशारी वाटली. ते उठून जमिनीवर पाय नेतील तिकडे चालू लागले. थोड्या अंतरावर त्यांना एक महाल दिसला. त्या वाड्यातून काही काळेकुट्ट लोक बाहेर आले व त्यांनी सर्वांना वाड्यात बोलावून नेले.

त्या वाड्यात एका मोठ्या दिवाणखान्यात एका उंच सिंहासनावर त्यांचा राजा बसला होता. त्याने सिंदबाद व त्याच्या साथीदारांना बसायला सांगितले. सर्व आपापल्या जागी बसल्यावर त्या काळ्या लोकांनी व्यापाऱ्यांसमोर खाद्यपदार्थ व फळफळावळ भरून ताटे व तबके आणून ठेवली. त्यांना जेवायला काय वाढले आहे हे सिंदबादला कळेना. ते खाद्य पदार्थ पाहून इतरांच्या मनात खाण्याची इच्छा उत्पन्न झाली त्यांनी सर्व खाद्यपदार्थांचा फडशा उडविला. गुरे पेंड किंवा हिरवे गवत हावरटासारखे खातात तसे सर्व खात होते.

सिंदबादचे साथी खात असतांना काळ्या कभिन्न लोकांनी कसला तरी लेप त्यांच्या अंगाला अंगावर लावायला सुरवात केली. तो लेप लावल्याबरोबर सर्वांची पोटे फुग्यासारखी फुगू लागली. त्याचबरोबर त्यांना त्यांची भूक जास्त जास्त वाढू लागल्या सारखे वाटले. तासन तास खात राहून सुद्धा त्यांची भूक न भागलेली पाहून सिंदबाद चकितच झाला.

सिंदबादने जेवणाला हातदेखील लावला नव्हता म्हणून बरे झाले. काळ्या जातीच्या लोकांनी त्याच्या अंगावर तो लेप लावण्यासाठी आणला, पण त्याने त्याला जरूर नसल्याचे सांगितले. थोड्याच वेळाने सिंदबादला ते काळे लोक नरमांसभक्षक असल्याचे कळले. मनुष्याला खूप खायला घालून लेप लावल्यावर त्यांची शरीरे चांगली टरटरून फुगली म्हणजे मग त्यांना कापून खायचे, अशी त्यांची रीत होती. इतर काळे लोक कच्चेच नरमांस खात, पण त्यांचा राजा एका माणसाला उभा भाजून त्याला खात असे.

आता आपल्या साथीदारांचा जीव वाचणे शक्य नाही हे सिंदबादने ओळखले.

परंतु सिंदबादला आणखी एका गोष्टीचे आश्चर्य वाटले. त्याच्या सर्व साथीदारांना गुरासारखे हाकून नेऊन काळ्या जातीच्या लोकांनी त्यांना एका कुरणात चरायला सोडले व सर्व अक्षरशः चरू लागले.

आता आपले कसे होणार, याची काळजी सिंदबादला वाटू लागली. म्हणून सर्वांची नजर चुकवून सिंदबाद त्या वाड्या बाहेर पडला. वाटेत त्याने त्याचे साथीदार





गुरासारखे कसे चरत होते हे झाडाआड उभे राहून पाहिले व थक्कच झाला. शेवटी तो चालत चालत त्या बेटाच्या दुसऱ्या टोकाला आला. तेथे सामान्य मनुष्य रहात होते. त्यांची भाषा सिंदबादला कळत असल्या कारणाने त्याला जिवात जीव आल्यासारखे वाटले. त्याने त्या लोकांसमोर त्याच्यावर गुजरलेल्या प्रसंगाचे वर्णन करून आश्रय देण्यास विनंती केली. त्या लोकांनी प्रेमाने त्याच्या जेवणा-खाण्याची सर्व व्यवस्था करून दिली आणि त्याला एका नावेत बसवून दुसऱ्या एका बेटावर आपल्या राजाकडे घेऊन गेले.

त्यांच्या राजधानीचे शहर सुंदर होते. रस्त्यावर पुष्कळ गर्दी होती. रस्ते रुंद होते. खोगिराशिवाय लोक घोड्यावरून फिरत होते. ते दृश्य पाहून सिंदबादने राजाला विचारले—"सुलतान! आपली प्रजा खोगिराशिवायच्या घोड्यावर बसून कां फिरते?"

"अरे, खोगीर कशाला म्हणतात तेच आम्हांला माहीत नाही." राजा आश्चर्य चकित होऊन म्हणाला.

"आपला हुकूम झाला तर मी दोन दिवसात एक खोगीर स्वत: तयार करून दाखवितो." सिंदबाद म्हणाला.

राजाच्या हुकमाप्रमाणे सिंदबादने एक लाकडाचे खोगीर एका सुताराकरवी तयार करविले. खोगिरावर खाली घालण्यासाठी पंखा पिसांची गादी तयार करविली. त्यावर कातड्याचे खोगीर तयार करवून बसविले. त्याने पाय ठेवण्यासाठी लोहाराकडून रिकाबी तयार करवून घेतल्या.

त्यानंतर सिंदबाद तबेल्यात गेला. एक उत्तम घोडा बाहेर काढून त्याच्या पाठीवर खोगीर चढवून त्याच्या तोंडात लगाम बसविला आणि घोड्याला राजासमोर आणून उभा केला. राजाने स्वत: घोड्यावर



बसून लगाम व खोगीर असल्याने घोड्यावर बसणाऱ्याला किती आराम पडतो हे पाहिले. राजाने खूष होऊन सिंदबादला एक मोठे इनाम दिले. मंत्र्याने पण आपल्या घोड्यासाठी लगाम व खोगीर तयार करवून घेतले. त्या दिवसापासून गावातल्या सर्व श्रीमंत लोकांनी आपापल्या घोड्यांसाठी लगाम व खोगीर तयार करवून घेतले.

की सिंदबादचे लग्न करून देऊन त्याला आपल्या देशाचा एक कायमचा नागरिक करून घ्यावे. सिंदबादला जेव्हां ते कळले तेव्हां तो घाबरूनच गेला. पण राजाच्या इच्छेविरुद्ध काही बोलण्याची त्याची छाती नव्हती. सिंदबादचे एका सुंदर मुलीशी लग्न झाले. ती मुलगी एका श्रीमंत बापाची एकुलती एक मुलगी होती.

प्रत्यकाने सिदबादला बोक्षिस म्हणून मोठ-



आपल्या बायकोला घेऊन बगदादला जाऊन आनंदाने राहता येईल असादेखील विचार त्याच्या मनात येऊन गेला.

एकदा सिंदबादच्या शेजाऱ्याची बायको वारली. शेजारी रडू लागलेला पाहून सिंदबाद शोक व दुखवटा व्यक्त करून त्याचे सांत्वन करण्यासाठी गेला आणि म्हणाला– "तुम्ही इतके दुःख कशासाठी करता? तुम्हांला दुसरी सुंदर व चांगली बायको मिळेल."

शेजारी म्हणाला–"दुसरी बायको! कोठून मिळेल बाबा? मी तर काही दिवसांचा, नाही तासांचा पाहुणा आहे."

शेजारी म्हणाला ते सिंदबादला कळले नाही. परंतु थोड्याच वेळाने त्याला खरी वस्तुस्थिती कळली. त्या देशाच्या रीती-प्रमाणे नवरा बायकोपैकी कोणी मेला तरी दोघांना एकदम मूठमाती देत असत. त्याच्या समोर त्याचा शेजारी बायकोच्या प्रेता बरोबर स्मशानात गेला. नदीकाठी एका डोंगरावर एक खोल विहीर होती. गावकऱ्यांनी त्या मृत स्त्रीबरोबर तिच्या नवऱ्याला पण त्या विहिरीत सोडले आणि वर एक दगड झांकण म्हणून ठेवला.

सिंदबादने दुसऱ्या दिवशी राजाकडे जाऊन निवेदन केले–"सुलतान! हा नियम सर्वांना सारखा लागू आहे का?" राजाने होकारार्थी मान हलविली. ते ऐकून निदान आपल्याला बायकोच्या आधी मरण यावे अशी तो अल्लाजवळ मनोमन प्रार्थना करू लागला.

परंतु देवाने त्याची प्रार्थना ऐकली नाही. काही दिवसांनी त्याची बायको एकाएकी आजारी पडून मरण पावली. सिंदबादला डोक्यावर वीज पडल्यासारखे झाले. राजाने सिंदबादला बायकोबरोबर सहगमन करावे लागणार याबद्दल दुःख



प्रगट केले आणि स्मशानात पोचवायला जातीने हजर राहण्याचे सुलतानाने वचन पण दिले.

सिंदबादच्या बायकोचा देह सुंदर वस्त्रा-लंकारांनी सजविण्यात आला व तो एका शवपेटिकेत ठेवण्यात आला. नंतर ती शव पेटिका डोंगरातल्या त्या विहिरीपर्यंत नेण्यात आली. सिंदबाद व राजा इतर लोकांबरोबर पायी तेथपर्यंत गेले. सिंदबादने सुलतानाला समजावून सांगितले की त्याच्या देशात त्याची बायको व मुले जिवंत आहेत. पण त्याच्या बोलण्याकडे कोण लक्ष देणार?

प्रथम शवपेटिका विहिरीत सोडण्यात आली. नंतर सिंदबादच्या खाकोटीला दोरी बांधण्यात आली. त्या दोरीला एक सुरई भरून पाणी व सात चपात्या पण बांधून ठेवण्यात आल्या. सिंदबादला विहिरीत सोडण्यात आले. सिंदबादने विहिरीत उतर-ल्यावर दोरीचे बंधन सोडून टाकले. दोरी वर ओढून घेण्यात आली आणि विहिरीवर दगडाचे झाकण ठेवण्यात आले. त्यानंतर सर्व लोक निघून गेले.

विहिरीला लागून एक गुहा होती. त्या गुहेत कोठून तरी उजेड येत होता. सिंदबाद



काही वेळ हाच विचार करीत राहला की त्याला स्वदेश सोडून निघण्याची दुर्बुद्धी झालीच कशी आणि निघालोच तर समुद्रात पडून सुद्धा मरण कां आले नाही?

त्याला भूकतहान नव्हती असे नाही, जास्त दिवस जगता यावे यासाठी तो एक किंवा अर्धीच चपाती व अगदी थोडे पाणी पिऊन दिवस कंठीत राहला. रात्री झोंपण्या लायक त्याची व्यवस्था करून घेतली. पण काही दिवसांनी चपात्या संपल्या व पाणी पण संपुष्टात आले. आतां मरण केव्हां येते याची वाट पाहात राहण्या व्यतिरिक्त मार्ग उरला नाही.

अशा परिस्थितीत एक विचित्र गोष्ट घडली. तो झोपला असतांना एक विचित्र आवाज त्याला ऐकू आला व त्याची झोप मोडली. कोणी तरी प्राणी पळून जात असल्यासारखा तो आवाज होता. त्याने धीर करून पळून जाणाऱ्या जनावराचा पाठलाग केला. थोडे अंतर चालून गेल्यावर त्याला तारे चमकत असलेले दिसू लागले. ते एक मोठे बीळ होते व त्यातून लांडगे व कोल्हे प्रेत खाण्यासाठी त्या विहिरीत येत.

सिंदबाद त्या बिळातून बाहेर निघाला. त्याला आकाशातले तारे दिसूं लागले होते. त्याने देवाचे मनापासून आभार मानले. नंतर तो पुन्हा त्या बिळातून विहिरीत गेला आणि मेलेल्या लोकांच्या अंगावरचे दागिने जितके काढून घेऊन येता आले ते घेऊन आला. डोंगरापलीकडे समुद्राच्या लाटा जणु काही त्याला जवळ बोलावीत होत्या. तो समुद्र किनाऱ्यावर एखादे जहाज दिसले तर पहावे म्हणून वाट पहात बसला.

आणि कर्मधर्म संयोगाने एक जहाज त्या बाजूला येत असलेले दिसले. जहाजातल्या प्रवाश्यांनी त्याला पाहिले व जहाज किनाऱ्याकडे घेऊन आले. दागिन्याच्या गाठोड्यासह तो जहाजात जाऊन बसला. नंतर त्याने जहाजाच्या तांडेलाला, त्यांचे जहाज कसे बुडाले व पुढे काय काय घडले ते वृत्त सांगितले. त्याने तांडेलाला एक दोन दागिने काढून देऊ केले. पण तांडेल म्हणाला—"जे अपघात होऊन त्यातून बांचले आहेत त्यांच्याकडून आम्ही भाडे घेत नाही." ते ऐकून सिंदबाद चकित झाला.

काही दिवसांनी जहाज बसरा नगरी येऊन पोचले. सिंदबाद काही दिवस तेथे राहिला. नंतर नदीच्या वाटेने बगदादला सुख रूप येऊन पोचला. त्याला भेटून त्याची बायको मुले व बंधुबांधव खूष झाले.





# महाभारत



कुंती, त्यांना आपल्या घरी आश्रय देणाऱ्या ब्राह्मणाच्या कुटुंबावर एकाएकी असे कोणते मोठे संकट ओढवले हे पाहण्यासाठी त्याच्या घरी गेली. कुंतीला आलेली पाहून ब्राह्मण म्हणाला—"या जगात बायको मुलांबाहेर सुखाने राहणे अशक्य आहे असे दिसले. मी एकदां याचसाठी आपल्या मंडळींना, हे गांव सोडून कोणत्या तरी दुसऱ्या गावी जाऊन राहू असे म्हटले होते, पण तिला ते आवडले नाही. आपण येथेच जन्मलो, येथेच लहानाचे मोठे झालो, म्हणून आपण हे गाव व आपल्या नातेवाइकांना सोडून कोठे जायचे, असे ती म्हणते. तिचे आईवडील गेल्याला किती तरी दिवस झाले. खरे बोलायचे तर आपला म्हणता येईल, असा एक नातेवाईक देखील गावात उरला नाही. तरी या गावाचा मोह सुटत नाही. ती तेव्हां कबूल झाली असती तर आजचा प्रसंग ओढवला नसता. आज काही सुटकाच नाही. मी आज त्या राक्षसासमोर त्याचा आहार व्हायला कोणाला पाठवू? आजपर्यंत माझ्या मुलांच्या खस्ता सोसून त्यांच्या सुखासाठी स्वतः कष्ट सहन करणाऱ्या बायकोला का मी राक्षसाकडे पाठवू? किंवा माझा वंशवृक्ष वाढवणाऱ्या आपल्या पोटच्या मुलांना तरी कसा पाठवू? म्हणून मी स्वतःच जायचे ठरविले आहे. दुसरा काही मार्ग दिवस नाही."

ब्राह्मणाची बायको त्या गोष्टीस कबूल झाली नाही. तिला पतीशिवाय स्वतःचे किंवा



मुलांचे पोट कसे भरेल याची काळजी वाटत होती. पदोपदी त्यांना परक्यासमोर हात पसरावा लागेल. मुलांचे शिक्षण कसे होणार? हे सर्व तिला नाही जामणार. म्हणून त्या राक्षसाचा आहार व्हायला तिनेच जावे हे इष्ट होईल असे तिचे म्हणणे होते. ती असे देखील म्हणाली की कदाचित, बाई समजून राक्षस तिला सोडून देणार नाही कशावरून.

बायकोचे ते म्हणणे ऐकून ब्राह्मण रडू लागला. बायको पण रडू लागली.

दोघां आईवडिलांना रडत असलेली पाहून मुलगी म्हणाली–"तुम्ही दोघं कशाला रडता? मला कां नाही पाठवून देत त्या राक्षसाकडे? मला आज ना उद्यां तुमच्या पासून दूर व्हावेच लागणार आहे. म्हणून मला पाठवून दिल्याने कोणाचेच काही नुकसान होणार नाही."

त्याच वेळी पाच वर्षांचा मुलगा एक काठी घेऊन खेळत खेळत बोबड्या भाषेत म्हणाला–"तुम्ही कशाला भिता? मी त्या राक्षसाला ठार करतो." ते ऐकून सर्व हसू लागले.

आता मात्र कुंतीला राहवले नाही. ती सर्वांना धीर देत जवळ जाऊन ब्राह्मणाला म्हणाली–"हे पहा, तुमच्यावर असे कोणते मोठे संकट ओढवले आहे, ते मला सांगाल तरी. माझ्याकडून होईल ती मदत, मी करीन, म्हणते."

तेव्हां ब्राह्मणाने कुंतीला त्याच्यावर जे संकट ओढवले होते ते थोडक्यात सांगितले. म्हणाला–"बाई! तुम्ही फार मोठ्या मनाच्या आहा. पण आमच्यावर जे संकट आज ओढवले आहे ते टाळणे कोणत्याही माणसाला शक्य नाही. या गावाबाहेर जंगलात बक नावाचा एक राक्षस राहतो. तो दररोज नरमांस खाऊन माजला आहे. तो या गावाचे रक्षण करतो, म्हणे. परंतु त्या बद्दल दररोज त्याचे पोट भरण्यासाठी



एक गाडीभर अन्न, दोन रेडे व एक माणूस पाठवावा लागतो. एखाद्या दिवशी चुकून हा नियम मोडला गेला तर तो राक्षस गावात शिरतो व समोर दिसेल त्याला ठार करून खातो. या देशाचा राजा वेत्रकीय नामक प्रदेशात राहतो. त्याने गावकऱ्यांना वाच-विण्यासाठी काहीच केले नाही. पाळी-पाळीने आम्ही एका गावकऱ्याला पाठवतो. आज माझी पाळी आहे. इतरांना वाच-विण्यासाठी आम्हांला पाळीपाळीने एवढे करावेच लागते. म्हणून आज आमच्या घरून कोणी जायचे हा प्रश्न आहे. मला वाटते मीच जावे."

ब्राह्मण म्हणाला ते सर्व ऐकून घेऊन कुंती म्हणाली–"अहो! एवढेच ना, मग मी आपल्या एका मुलाला तुमच्या बद्दल पाठवून देते. तुम्ही बेफिकीर रहा. राक्षस त्याचे काही करू शकणार नाही. उलट तोच राक्षसाला ठार करून घरी परत येईल. मी म्हणते आहे त्यात खोटे काहीच नाही. मी म्हणते ते तुम्हांला खरे वाटत नसेल तर विचार करा, कोणी आई, तिला शंभर मुले असली तरी राक्षसाचे भक्षण होण्यास आपल्या पोटच्या मुलाला पाठवील का? म्हणून मी सांगते आहे तसे करा. परंतु



ही गोष्ट गावकऱ्यांना कळता कामा नये. कारण कोणाच्या तोंडी माझ्या मुलाच्या गुरुवर्यांना ही गोष्ट कळली तर ते त्याला जाऊ देणार नाहीत, आणि राक्षसाला ठार करण्यास चालून आलेली हातची संधी निघून जाईल."

तेव्हां कोठे कुंती म्हणाली ते ब्राह्मणाला खरे वाटले. त्याच्या मनात कुंतीविषयी आदरभाव वाढला व त्या उपकाराबद्दल त्याने मनोमन तिचे आभार मानले.

कुंतीने घरी जाऊन भीमाला सर्व सांगितले व तो ती कामगिरी पार पाडण्यास तत्काल तयार झाला.



त्याच वेळी चार पांडव माधुकरीला जाऊन परत आले. भीमाला खूष पाहून युधिष्ठिराने त्याच्या आनंदाचे कारण विचारले. कुंतीने थोडक्यात सर्व सांगितले व म्हणाली–"इतक्या दिवसांनंतर या ब्राह्मणाने आपल्यावर केलेल्या उपकाराची फेड करण्यास संधी मिळाली आहे."

आई म्हणाली ते ऐकून युधिष्ठिराला बरे वाटले नाही. आईने थोडी घाई केली असे त्याला वाटले. भीमाच्या बळावरच पांडवांचे भविष्य अवलंबून आहे हे आईला माहीत आहे. कौरवांचा पराभव करून आपले राज्य मिळविणे भीमाच्या भुजबलावरच शक्य आहे हे आईला माहीत नाही का? लाक्षागृहातून सर्व पांडवांचे रक्षण एकट्या भीमाच्या भुजबलामुळेच तर झाले. त्याने त्याला वाटले ते आईला सांगितले.

युधिष्ठिराचे म्हणणे कुंतीला पटले नाही. ती म्हणाली–"संकटात सापडलेल्या लोकांचे रक्षण करणे क्षत्रियाचे कर्तव्य आहे. या ब्राह्मणकुटुंबाचे तर आपल्यावर उपकारच आहेत. म्हणून या कुटुंबाचे रक्षण आपण केले नाही तर आपल्याला पाप लागेल. भीमाविषयी आपण काळजी करणे हास्यास्पदच ठरेल. ते हा एकटा राक्षसच काय, याच्यासारखे आणखी दहापाच एकदम युद्धाला आले तरी त्याना भीम एकटा ठार करील." कुंतीला, तिने जे ठरविले तेच योग्य आहे असे वाटत होते. तेच तिने युधिष्ठिराला सांगितले. तरी युधिष्ठिराला शेवटपर्यंत ती गोष्ट मान्य झाली नाही.

उजाडताच भीम ब्राह्मणाला जाऊन भेटला व म्हणाला–"मला रात्रभर झोप लागली नाही. मी उपाशी आहे. मला पोटभर खायला घाला म्हणजे राक्षसाला ठार करायला पुरेशी शक्ती माझ्या अंगात येईल." ते ऐकून ब्राह्मणाने भीमाला पोटभर जेवायला वाढले. वरण भात, भाजी व पुरणपोळ्या, खीर बासुंदी वगैरे पेय पदार्थ तूप, दही कोणत्याहि वस्तूची कमतरता भासू दिली नाही.

त्यानंतर एक गाडीभरून अन्न तयार करविले आणि त्या गाडीला दोन रेडे जुंपले. नंतर भीम ती गाडी घेऊन गावाच्या दक्षिणेकडे जेथे बकासुर रहात होता तिकडे निघाला. त्याने गाडी यमुना नदीच्या काठी उभी केली आणि बकासुराला मोठमोठ्याने हाका मारू लागला. तो येईपर्यंत भीम त्याची वाट पहात बसला नाही, गाडीतले अन्न बकाबका खाऊ लागला.

एका सामान्य माणसाला हाक मारतांना पाहूनच त्याला राग आला आणि तो त्याच्या साठी गावकऱ्यांनी पाठविलेले अन्न बकाबका खात असलेला पाहून त्याच्या अंगाचा भडकाच उडाला. तो जवळ येऊन दरडावून विचारू लागला–"कोण रे तू? माझ्या साठी आणलेले अन्न खाणारा?"

भीमाने बकासुराकडे पाहून मिस्किलपणे स्मित केले आणि पुन्हा खाऊ लागला. बकासुराने रागाच्या भरात भीमाच्या पाठीत गुद्दे मारायला सुरवात केली. तरी भीम बेफिकीरपणे खात राहला. मारहाण करून सुद्धा भीम फिकीर करीत नाही





हे पाहून बकासुर जास्तच चिडला व आणखी जास्त जोरजोराने भीमाला मारू लागला. तरी भीमाने तिकडे दुर्लक्ष केले व सर्व अन्नाचा फडशा उडवून झाल्यावर नदीवर गेला. पाणी पिऊन एक मोठी लांबलचक ढेकर दिली आणि मग तोंड हात स्वच्छ धुवू लागला, बकासुराने रागाच्या भरात एक झाड उपटून ते भीमावर फेकले.

पोटभर पाणी पिऊन झाल्यावर भीम बकासुराच्या समाचाराला आला. बकासुराने फेकलेले झाड उचलून घेऊन भीम बकासुरावर धावला. तिकडे बकासुराने दुसरे झाड उपटून घेतले व भीमावर फेकले. भीमाने आपल्या हातातल्या झाडाने अडवले. जवळपासची सर्व झाडे उपटून टाकीपर्यंत त्यांचे परस्परांवर झाडे फेकण्याचेच युद्ध होत राहले.

त्यानंतर बकासुराने भीमाला आपल्या दोन्ही हातांनी धरले. दोघांचे मल्लयुद्ध सुरू झाले. दोघांनी परस्परांना जमिनीवर आदळले. शेवटी भीमाने बकासुराला जमिनीवर पाडले व त्याच्या छातीवर बसून मुष्टिप्रहार सुरू केला. त्याच्या छातीत व कमरेवर खूप मुष्टिप्रहार केल्यावर भीमाने त्याचा गळा आवळला. बकासूर रक्त ओकू लागला आणि थोड्या वेळाने ठार झाला.

बकासुराच्या किंकाळ्या आणि आरोळ्या ऐकून त्याचे नातेवाईक त्या बाजूला धावत आले आणि थर थर कापत भीमाकडे पाहू लागले. भीमाने त्यांना धमकी दिली– "तुमच्या पैकी कोणी मनुष्याच्या अंगावर हात टाकला तर, लक्षात ठेवा, त्याची हीच गत होईल." सर्व राक्षस भीमाचे ते उग्र रूप पाहून दूर पळून गेले.

भीमाने बकासुराचा मृत देह गावाच्या वेशीवर ओढून नेऊन टाकला आणि नदीत

स्वच्छ स्नान करून घेऊन घरी गेला. त्याने युधिष्ठिराला घडले ते सांगितले.

गावकऱ्यांनी बकासुराचा मृतदेह पाहिला व थक्क झाले. हा हा म्हणतां गावभर बकासुराच्या वधाची बातमी पसरली. पण बकासुराचा वध कोणी केला हे कोणाला कळले नाही. तरी सर्वांनी बकासुराचा वध करणाऱ्याचे मनातल्या मनात आभार मानले. त्या दिवशी एका ब्राह्मणाची पाळी होती हे गांवकऱ्यांना माहीत होते म्हणून ते त्या ब्राह्मणाच्या घरी गेले आणि बकासुराचा वध करणारा कोण याची चवकशी करू लागले.

आपल्या घरात उतरलेल्या लोकांचे गुपित उघड करणे ब्राह्मणाला बरे वाटले नाही. म्हणून तो म्हणाला—"काल माझी पाळी होती हे खरे आहे. पण माझ्या घरची रडारड ऐकून एक सिद्ध योगी आला व म्हणाला, मी आज राक्षसाचे खाणे घेऊन जातो. त्याच सिद्ध योग्याने राक्षसाला ठार केले व आपणां सर्वांचा उद्धार केला."

गावकऱ्यांनी आनंदाने एक मोठा ब्रह्मोत्सव केला. कुंती व पांडवांनी तो ब्रह्मोत्सव आनंदाने पाहिला. त्याच ब्राह्मणाच्या घरात आपल्या मातेसह पंच पांडव बरेच दिवस अज्ञातपणे राहले. उदरनिर्वाहासाठी ते पाळी पाळीने मधुकरी मागून आणीत.

एकदा एक ब्राह्मण देशाटन करीत त्या ब्राह्मणाच्या घरी आला. ब्राह्मणाने आपल्या प्रवासाचे रसभरीत वर्णन त्या ब्राह्मण समोर केले. अनेक राजे व राजकुमारांच्या शौर्य पराक्रमाचे वर्णन करून म्हणाला—"पांचाल देशाचा राजा द्रुपद याला शिखंडी, धृष्टद्युम्न आणि द्रौपदी अशी तीन मुले आहेत." नंतर त्याने द्रौपदीचा जन्म वृत्तांत सांगितला. पांडवांनी आणि कुंतीने तो वृतांत सविस्तर सांगण्यास ब्राह्मणाजवळ विनंती केली.





# गांधीचे चरित्र

[१२]

त्याच सुमारास गांधीजी सविनय कायदेभंगाची चळवळ सुरू करण्याचा विचार करीत होते. परंतु 'प्रिन्स ऑफ वेल्स' यांचे भारतात आगमन झाले व त्यांच्या स्वागत समारंभाविरुद्ध मुंबईत दंगा झाला. म्हणून गांधीजींनी चळवळ मागे घेण्याचे ठरविले. त्याच वेळी उत्तर प्रदेशात चौरीचौरा येथे दंगा झाला. सत्याग्रहींवर पोलीसांनी लाठी हल्ला केला तेव्हां प्रजेने चिडून जाऊन कित्येक शिपायांना जिवंत जाळले. म्हणून गांधीजींनी चळवळ बंद केली. अनत्याचारी चळवळ चालविण्यास देशात अनुकूल वातावरण नाही, असे गांधीजींना वाटले.

गांधीजींनी सविनय कायदेभंगाची चळवळ सुरू करण्याचे जाहीर केले तेव्हां कित्येक लोकांना ते आवडले नाही व त्यांनी त्या चळवळीस उघड विरोध केला होता. आतां त्यांनी चळवळ मागे घ्यायचे ठरविले तेव्हां त्याही गोष्टीस कित्येकांनी विरोध केला. खरी गोष्ट अशी की त्यापैकी अनेकांचा अनत्याचारी चळवळीवर विश्वासच नव्हता.

१० मार्च १९२२ या रोजी गांधीजींना अटक झाली. कारण गांधीजींनी सरकार विरोधी तीन लेख 'यंग इण्डिया' नावाच्या आपल्या इंग्रजी साप्ताहिकात लिहिले होते. कोर्टात गांधीजींनी देशात जे हिंसात्मक प्रकार घडले त्याची सर्व जबाबदारी स्वतःवर घेतली. या खटल्यास गांधीजींना ६ वर्षे सक्त मजुरीची शिक्षा देऊन पुण्याजवळच्या येरवडा येथील तुरुंगात ठेवण्यात आले. तुरुंगात दोनच वर्षे लोटली असतील, गांधीजी 'अॅपेण्डिसाइटिस' नांवाचा आंत ड्याच्या आजाराने आजारी पडले. त्यांचे ऑपरेशन झाले व



# विद्यादान

एका लहानशा गावी विष्णुशर्मा नावाचा एक विद्वान ब्राह्मण रहात असे. त्या गावातले लोक अशिक्षित होते. म्हणून विष्णुशर्माने गांवकऱ्यांना साक्षर करण्याचे ठरविले. त्याने आपल्याच घरी एक शाळा सुरू केली. जो कोणी त्याच्याकडे येई त्याला तो मन लावून शिकवू लागला. सर्व शिष्य त्याला चांगली गुरुदक्षिणा देऊ लागले. गरीब मुलांना विष्णुशर्मा फुकट तर शिकवीच, त्याच बरोबर त्यांच्या अन्नावस्त्राची व्यवस्थापण तो करून देई.

काही दिवसांनी परमानंद नावाचा एक विद्वान पंडित विष्णुशर्माच्या गुरुकुलाचे वर्णन ऐकून ते पाहण्यासाठी आला. तीन दिवस त्याने विष्णुशर्माचे आतिथ्य स्वीकारले. त्याने, विष्णुशर्माच्या विद्यादानाची पद्धत पाहून निरोप घेतेवेळी त्या गुरुकुलाला पुष्कळसे धन सहायतार्थ दिले.

महापंडित परमानंद गावात येऊन गेल्यानंतर गावकऱ्यांच्या मनात विष्णुशर्मा-विषयीचा आदरभाव जास्तच वाढला. ते विष्णुशर्माला अधिकाधिक आर्थिक सहाय्य देऊ लागले. त्या पैशाचा उपयोग विष्णुशर्माने आणखी काही गरीब विद्यार्थ्यांना विद्यादान देण्याच्या कामी केला. म्हणून जवळपासच्या गावातले गरीब विद्यार्थी विष्णुशर्माच्या गुरुकुलात येऊ लागले.

अशा तऱ्हेने शाळा उर्जितावस्थेत येऊ लागली. त्याच वेळी दुर्दैवाने विष्णुशर्मा आजारी पडून वारला म्हणून शाळा चालू ठेवण्याची सर्व जबाबदारी त्याचा मुलगा देवशर्मा याच्या शिरावर येऊन पडली. देवशर्मा देखील बापासारखाच विद्वान व हुशार पंडित होता. परंतु स्वभावाने तो बापापेक्षा निराळा होता. विष्णुशर्माने शाळेची जशी व्यवस्था ठेवली होती ती

सौ. सुवर्णा मा. चव्हाण

देवशर्माला पसंत नव्हती. विष्णुशर्माला पुष्कळ पैसे मिळू लागले होते. पण त्याने त्याचा उपयोग कधी स्वतःच्या सुखसोयी साठी किंवा संसारखर्चासाठी केला नव्हता, गरीब विद्यार्थ्यांना फुकट शिक्षण व अन्न-वस्त्र देण्याकडे केला होता.

देवशर्माने तसे केले नाही. त्याने काही नवीन नियम सुरू केले. त्यात एक नियम असा होता की प्रत्येक विद्यार्थ्याने एक ठराविक रक्कम गुरुदक्षिणा दिली पाहिजे आणि जेवणाखाणाचा व कपडयालत्त्यांचा खर्चपण विद्यार्थ्यानेच दिला पाहिजे.



हे नवे नियम सुरू झाल्यावर गरीब विद्यार्थ्यांनी शाळा सोडली आणि आपापल्या गावी निघून गेले. म्हणून विद्यार्थ्यांची संख्या कमी झाली. देवशर्मा श्रीमंत आईबापांच्या मुलांना चांगले शिकवी आणि कमी पैसे देणाऱ्यांकडे दुर्लक्ष करी. आपल्याला गुरूजी नीट शिकवीत नाहीत हे पाहून गावातले व गावाबाहेरचे पुष्कळसे विद्यार्थी शाळा सोडून आपापल्या घरी निघून गेले. शाळेतली मुले कमी झालेली पाहून देवशर्मा घाबरला व श्रीमंतांच्या मुलांकडे पण त्याचे पुरेसे लक्ष राहले नाही. अशा तऱ्हेने एका वर्षाच्या आत शाळा जवळ जवळ बंदचपडली. आता देव-शर्माजवळ शिकणारे चार एक विद्यार्थीच उरले. त्यांच्याकडून मिळणाऱ्या पैशांवर सर्व कुटुंबाचा खर्च निघणे अशक्य झाले. त्याने विचार केला त्याच्या उलट सर्व झाले.

त्याच गावी देवव्रत नावाचा एक गरीब तरुण मनुष्य रहात असे. त्याने लहानपणी विष्णुशर्माजवळच थोडा फार विद्याभ्यास केला होता. तो दिवसभर शेतात काम करी आणि रात्री मुलांना शिकवी. तो मुलांकडून गुरुदक्षिणा घेत नसे. तरी तो मन लावून शिकवी. देवशर्माची शाळा सोडून निघालेले विद्यार्थी रात्री देवव्रतच्या घरी येऊन अभ्यास करू लागले.

देवव्रताची लोकप्रियता पाहून देवशर्मा त्याचा हेवा करू लागला. 'चोराच्या उलटच्या बोंबा' म्हणतात तसा तो गावभर सांगत फिरू लागला की देवव्रताला त्याचा हेवा वाटू लागला आहे, म्हणून त्याने एक निराळी शाळा काढली आहे. गरीब अज्ञान आईबापांना फुसलावून त्यांच्या मुलांना आपल्या घरी शिकवू लागला आहे. शेतात काम करणाऱ्याला काय शिकविता येणार? 'विहिरीत असेल तर ना पोहऱ्यात येणार?' त्याने जेवढा विद्याभ्यास केला आहे तेवढाच ना तो शिकविणार! अशा तऱ्हेने देवव्रतच्या विरुद्ध मनाला आले ते तो लोकांना सांगत फिरू लागला. तरीदेखील देवशर्माजवळ शिकायला एकही विद्यार्थी आला नाही.

पुढे काही दिवसांनी लोकांच्या तोंडी देवशर्माला परमानंद लवकरच येणार असल्याची बातमी कळली. तसे ते आले देखील प्रमुख गावकरी त्यांच्या दर्शनास निघाले. एक दिवस झाला दोन दिवस झाले. पण देवशर्मा तिसऱ्या दिवशी त्यांच्या दर्शनास गेला. परमानंदांचे विद्यादान विषयावर प्रवचन चालू होते. ते म्हणाले– "विद्यादान धनापेक्षेने करता कामा नये. विष्णुशर्मांचे विद्यादान आणि आता देवव्रत करीत असलेले विद्यादान हेच विद्यादान होय! विद्यादान करणारा मनुष्य श्रीमंत दानी पुरुषापेक्षां थोर दानी आहे. देवव्रत असाच एक थोर दानी आहे."

परमानंद त्या गावाहून निघून गेल्यावर देवव्रतच्या शाळेत विद्यार्थ्यांची संख्या फारच वाढली. त्याला श्रीमंत लोकांकडून पैसे मिळू लागले. त्याने त्या पैशाचा उपयोग आपल्या गुरुप्रमाणे गरीब विद्यार्थ्यांना विद्यादान करण्याच्या कामी केला. थोड्याच दिवसांत गावात एकही मुलगा अशिक्षित राहला नाही.






अज्ञः सुखमाराध्यः सुखतरमाराध्यते विशेषज्ञः
ज्ञानलवदुर्विदग्धं ब्रह्मापि नरं न रंजयति ॥ १ ॥

जो अज्ञ म्हणजे अज्ञानी आहे त्याला सहज समजावून सांगता येते; जो ज्ञानी आहे त्याला तर त्याहून सहज समजावून सांगता येईल. परंतु जो अल्पज्ञान होताच स्वतःला पंडित समजू लागतो अशा माणसाची समजूत ब्रह्मदेव देखील घालू शकणार नाही.

प्रसह्य मणिमुद्धरेन्मकरवक्त्र दंष्ट्रांतरात्;
समुद्रमपि संतरेत् प्रचलदूर्मिमालाकुलं;
भुजङ्गमपि कोपितं शिरसि पुष्पवद्धारयेत्;
न तु प्रतिनिविष्ट मूर्खजन चित्तमाराधयेत् ॥ २ ॥

मगरीच्या तोंडातल्या दातात पडलेला मणि (देखील) बाहेर काढणे (कदाचित) शक्य होईल; खवळलेल्या समुद्राच्या लाटावरून पोहोत जाऊन (तो समुद्र देखील) पार करणे शक्य होईल; संतापलेल्या सापाला सुद्धा फुलासारखे डोक्यात (खोवून) ठेवणे शक्य होईल, परंतु मूर्ख माणसाच्या मनात काय आहे (हे त्याच्या पोटात शिरून ही) सांगणे अशक्य आहे.

लभेत सिकतासु तैलमपि यत्नतः पीडयन्;
पिबेच्च मृगतृष्णिकासु सलिलं पिपासार्दितः;
कदाचिदपि पर्यटन् शशविषाणमासादयेत्;
न तु प्रतिनिविष्ट मूर्खजन चित्तमाराधयेत् ॥ ३ ॥

वाळूचे कण (घाणीत घालून) रगडले तर त्यांतून ही (कदाचित) तेल निघेल, तृषार्त म्हणजे तहानेल्या माणसाची तहान मृगजळ पिऊन ही (कदाचित) भागेल, रान हुडकून पालथे घातले तर कदाचित सशाचे शिंगदेखील मिळेल, परंतु मूर्खाच्या मनात काय आहे हे सांगणे शक्य होणार नाहीं.



# धन व सुख

एका गावी एक व्यापारी रहात असे. तो चांगला शिकलासवरलेला होता आणि स्वभावाने पण चांगला होता. त्याने व्यापार करून अलोट पैसा मिळविला होता. व्यापार धंद्यामुळे त्याला थोडादेखील वेळ इतर गोष्टीकडे लक्ष देण्यास मिळत नसे. एवढेच नव्हेतर वेळेवर खाणेपिणे देखील अशक्य होई. सर्व दिवस हिशोब लिहिण्यात आणि खरेदी विक्रीची कामे करण्यात निघून जाई. कधी कधी धंद्याच्या काळजीने त्याला झोपदेखील लागत नसे. धंद्यातल्या प्रश्नांवर विचार करीत तो रात्रभर जागा राही.

व्यापाऱ्याच्या बायकोला नवऱ्याची काळजी वाटू लागली. ती नवऱ्याला म्हणे– "अहो! तुम्ही रात्रंदिवस इतकी काळजी कां करता? थोडी विश्रांती नको का देहाला?"

व्यापारी आपल्या बायकोची समजूत घाली– "अग! तुला व्यापाराचे काय कळणार? वाघावर स्वारी करून मनाला कधी निश्चितपणा येईल का?"

व्यापाऱ्याच्या शेजारी एक गरीब मनुष्य रहात असे. त्याला मेहनत मजुरी करून जे चार पैसे मिळत तेवढ्यावर त्या गरीब मजुराच्या कुटुंबाचा उदरनिर्वाह छान चाले. कधी त्याला रिकाम्या हाताने परत यावे लागे तेव्हां नवराबायको काही तक्रार केल्याशिवाय उपाशीच झोपी जात. बायको त्याला जी मीठभाकर खायला घाली ती खाऊन तो गात बाहेर पडवीत बसे.

तो गरीब गाऊ लागला की व्यापाऱ्याला ते आवडत नसे. परंतु त्याची बायको त्याचे गाणे मन लावून ऐके. या गरिबाला आयुष्यात जेवढे सुख आहे तेवढे सुख आपल्या जवळ इतके पैसे असून ही आपल्याला नाही याचे तिच्या मनाला फार वाईट वाटे.

एक दिवशी तिने आपल्या नवऱ्याला ती गोष्ट सांगितली. व्यापारी हिशोबाच्या वह्या बंद करून म्हणाला–"आपल्यापेक्षा तो जास्त सुखी आहे याचे कारण त्याला कामधंदा नाही. पण त्याचे गाणे एका मिनिटात मी बंद करतो पहा."

"तुम्ही कसे बंद करणार?"

"त्याला पैसे दिले की त्याचे तोंड बंद!"

व्यापाऱ्याची बायको ते उत्तर ऐकून हसली. म्हणाली–"तुम्ही पैसे दिलेत तर तो जास्तच सुखी होईल!"

दुसऱ्या दिवशी उजाडल्याबरोबर त्या व्यापाऱ्याने त्या गरीब माणसाला बोलविले व म्हणाला–"हे बघ रे! आम्ही तुझ्या शेजारी राहतो. परंतु कधी आपली गाठभेट नाही. कसे काय ठीक आहे ना?"

"आपल्याजवळ काय लपवायचे आहे? हाडाची काडे केली तरी पोटभर खायला मिळत नाही. पण देव ठेवील तसे रहावयाचे आहे." गरीब मनुष्य म्हणाला.

"तू इतकी मेहनत करतो आहेस पण कधी पोट भरत नाही तुझे. मला नाही हे पहावत. मी तुला पाचशे तोळे चांदी देतो. तू ते भांडवल म्हणून लावून व्यापार कर. आरामात जातील दिवस तुझे." असे सांगून त्या व्यापाऱ्याने त्या गरिबाला



पांचशे तोळे चांदी दिली. त्या बद्दल त्या व्यापाऱ्याचे कसे आभार मानावे हे त्या गरिबाला कळेना. तो ती चांदी घेऊन घरी गेला.

तो गरीब दुसऱ्यादिवशी दिवसभर घरीच राहला. रात्रभर या चांदीचे काय करायचे याचा विचार करीत दोघे नवराबायको बसून होते. अनेक तऱ्हेने विचार करून कोणता धंदा करावा हे ते ठरवू शकले नाहीत. रात्री खायला-प्यायला पण त्यांना सुचले नाही. जेवायला उशीर झाला होता, पण त्यांना भूकपण लागली नव्हती. जेवण पण जाईना. त्या दिवशी रात्री त्याला गाणेबिणे पण सुचले नाही.

रात्रभर त्याला झोप आली नाही. या कुशीवरून त्या कुशीवर वळत त्याने रात्र काढली. सकाळी उठल्यावर प्रथम सर्व चांदी जागेवर आहे की नाही त्याने जाऊन पाहिले.

असेच तीन दिवस गेले. गरिबाच्या मनात जणुकाही एकदम प्रकाश पडला. तो ती चांदी घेऊन त्या श्रीमंत व्यापाऱ्याच्या घरी गेला.

व्यापाऱ्याने त्याला पाहताच विचारले—"काय रे बुवा! ठीक आहे ना सर्व! पैशाचे काय करणार, काही ठरविलेस की नाही?"

"हो ठरविले शेटजी! आपण आपली ही चांदी ठेवून घ्या! मी आपले हे उपकार जन्मभर विसरणार नाही." असे सांगून त्याने सर्व चांदी व्यापाऱ्यासमोर ठेवली व काही बोलल्याशिवाय घरी निघून गेला.

तीन दिवसानंतर तो पुन्हा कामावर गेला. त्याला हलके वाटले. त्या दिवशी रात्री पुन्हां तो आपली एक तारी घेऊन आनंदाने गात बसला. व्यापाऱ्याची बायको गाणे ऐकत विचार करू लागली—हे सुख आपल्या नशिबी कधी येईल का? विचार करीत असता तिच्या डोळ्यातून नकळत दोन टिपे गळली.





# पडकें देऊळ

[२७]

[वृश्चिक बेटावरच्या वाटेवर शिखीमुख वगैरे जांगलाला भेटले. जांगलाने शिखीमुखला सांगितले की पुजारी त्याला ठार करण्याच्या प्रयत्नात होता. पण तो त्याच्या हातातून निसटून आला. सूर्योदय झाल्यावर सर्व निघाले. एका बेटाच्या वळणावर त्यांना पुजाऱ्याची नाव दिसली. विक्रमने पुजाऱ्यावर बाण सोडले. पुढे—]

विक्रमकेसरीचा बाण पुजाऱ्याला लागलाच नाही, एवढेच नव्हेतर त्याचे बाण त्याच्या नावेला सुद्धा लागले नाहीत, त्या भयंकर महासर्पाने पुजाऱ्याच्या एका साथीदाराला गिळले. त्यामुळे त्याचे पोट भरले होते, म्हणून त्याची गती थोडी मंद पडली. तो महासर्प एका जागी थोडा वेळ थांबून व आपली फडा वर करून चारी बाजूला पाहू लागला.

त्या भयंकर महासर्पाच्या दृष्टीआड होण्याच्या हेतुने शिखीमुख आपल्या साथीदारांसह शेजारच्या झाडीत जाऊन लपला. शिखीमुख लाल कुत्र्याच्या पाठीवर तो ओरडू नये या साठी हळू हळू हात फिरवू लागला. तो महासर्प आपल्या नावा बुडवून तर टाकणार नाही ना, ही भीती पण त्यांना वाटू लागली. तसे झाले तर त्यात धोका आहे. त्यांना त्या निर्जन बेटावर अडकून रहावे लागेल.



पाहता पाहता पडक्या देवळाच्या पुजाऱ्याच्या नावा बेटाच्या वळणापलीकडे दृष्टीआड झाल्या. महासर्प थोडा वेळ चारी बाजूला पाहून व खाण्या योग्य काही नाही हे पाहून दुसऱ्याच एका बेटाकडे वळला. शिखीमुख व त्याचे साथी तो सर्व प्रकार लपून पहात होते. नंतर महासर्प दूर निघून गेल्याची खात्री झाल्यावर ते आपल्या नावात बसून पुढे निघाले.

शिखीमुख आपल्या साथीदारांसह ज्या बेटावर उतरला होता त्या बेटावर त्यांच्या सुदैवाने अनिष्ट असे काही घडले नाही. त्यांनी पुढचा प्रवास सुरू करण्याचे ठरविले. ज्या बाजूला महासर्प भेटला होता त्या बाजूने न जाता शिखीमुख व त्याचे साथीदार दुसऱ्याच वाटेने निघाले. म्हणून त्यांना महासर्पाची भीती उरली नाही. पण असेच एकादे दुसरे जिवाणू तर भेटणार नाही वाटेत? अशी दुसरी भीती त्यांना वाटू लागली होती.

नावा निघण्यापूर्वी शिखीमुख आपल्या इतर साथीदारांना म्हणाला—"वृश्चिक द्वीपावर पोचण्यापूर्वी आपल्यावर अनेक संकटे येणार आहेत हे तुम्हांला आतापर्यंतच्या अनुभवावरून कळलेच असेल. मी व विक्रम दोघांना वृश्चिक द्वीपावर पोचावेच लागणार. म्हणून तुमच्यापैकी कोणाला मागे स्वतःचा जीव धोक्यात न घालता याच बेटावर रहावयाचे असेल तर मला तरी त्यात हरकत वाटत नाही. स्वतः विचार करून आनंदाने याच बेटावर विश्रांती घ्यावी. आम्ही परत जातांना वाटेवर त्यांना बरोबर घेऊन जाऊ. परत येईपर्यंत लागणारे खाद्यपदार्थ त्यांच्यासाठी ठेवून जाऊ."

शिखीमुख म्हणाला ते ऐकून सर्व थक्कच झाले. नांगसोम, अजित, वीरभद्र एवढेच नव्हे तर जांगलासह सर्व काय वाटेल ते संकट ओढवले तरी त्याला तोंड द्यायला तयार झाले. सर्व म्हणाले, वृश्चिकद्वीप पाहिल्याशिवाय आम्ही परत जायला तयार नाही. जंगला असे ही म्हणाला—"तो दुष्ट पुजारी ठार झालेला पाहिल्याशिवाय माझ्या मनाचे समाधान होणार नाही." त्याला एकट्याने वृश्चिकद्वीपावर जावे लागले व त्या प्रयत्नात मरण आले तरी चालेल, असे जांगलाने स्पष्ट सांगितले.



आपल्या सर्व साथीदारांचे साहस व दृढ निश्चय पाहून शिखीमुखला पण अर्थातच बरे वाटले. त्यांच्या नावा पुढे निघाल्या. पाठचा वारा मिळाला. म्हणून त्यांनी शिडे उभारली. त्यांच्या पूर्वी निघालेल्या पुजाऱ्याच्या नावा कोठे दिसतात का, हे त्यांनी लक्षपूर्वक पाहिले. परंतु त्यांना त्या दिसल्या नाहीत. सूर्यास्ताची वेळ होऊ लागली. कालोखात पुढे जाणे धोक्याचे होते. शिखीमुखच्या सूचनेवरून नावा एका लहानशा बेटाजवळ आणण्यात आल्या आणि त्यांच्या दोऱ्या काठावरच्या झाडांना बांधून ठेवण्यात आल्या. जवळच सैंपाकाच्या तयारीला सर्व लागले.

सैंपाक झाल्यावर सर्व खायला बसले. प्रहर रात्र उलटून गेली. त्या बेटावर मगरीसुसरी किंवा पाण्यातले इतर प्राणी दिसले नाहीत. परंतु झाडांवर पक्ष्यांची किलबिलाटच नव्हे तर ओरडणे चालू होते. कारण ते पाण्यातल्या माशांवर जगणारे पक्षी होते. तेव्हां निश्चितपणे कोणाला झोप येणे तर शक्यच नव्हते. म्हणून लहान मोठ्या शेकोट्या पेटवून त्यांच्या चारी बाजूला सर्व गप्पा मारीत बसले. लाटांबरोबर डोलणाऱ्या नावा त्यांना दुरून भुतासारख्या वाटल्या. पाळी पाळीने सर्वांनी पहारा द्यायचा नंतर झोपायचे ठरले. मध्य रात्र उलटल्यावर नांगसोमची पहारा देण्याची पाळी होती.










नांगसोम भाला घेऊन एकदा नावा पाहून आला आणि पुन्हां शेकोटीजवळ बसला. पक्ष्यांचे भयंकर आवाज त्याला नकोसे वाटत होते. एक जांभई घेऊन त्याने कुत्र्याच्या तोंडावर व पाठीवर प्रेमाने हात फिरवला.

कुत्र्याची नजर अचानक नावांच्या बाजूला वळली आणि चटदशी तो उभा राहून त्या बाजूला प्रथम नुसता गुरगुरत राहली व नंतर भूंकू लागला. कुत्रा हुशार आहे. काही धोका आहे, हे नांगसोमने ओळखले कुत्रा त्या बाजूला भुंकत निघाला सुद्धा. नांगसोमला एक नाव हलू लागल्याचे व दुसऱ्या नावेपासून दूर दूर सरकू लागल्याचे स्पष्ट दिसले.

नांगसोमने लालकुत्र्याच्या पाठीवर हळुवारपणे, तू भुंकू नकोस बरं का, हे सुचविण्यासाठीच जणुकाही हात फिरविला. नंतर भाला घट्ट हातात धरला व मांजराच्या पावलान खाली वाकून नावांजवळ गेला. त्याला नावा एकाबाजूला पुन्हां पुन्हां वाकत असल्याचे दिसले प्रथम त्याला वाटले की मगरीसुसरी नावेजवळ आल्या असतील. पण पाण्यात त्यामुळ लहान लहान लाटा उत्पन्न व्हायला हव्या होत्या. परंतु त्या पैकी काहीच न झालेले पाहून त्याला संशय आला, शत्रू नावा पळवून नेण्याचा किंवा नावांना भोक पाडून ठेवण्याचा प्रयत्न तर करीत नसेल?

नांगसोमने कुत्र्याला बाहेर किनाऱ्यावर रहायला खूण केली आणि स्वत: पाण्यात उतरला. तो नावांजवळ गेला आणि चटकन नावेत पाय टाकला. लगेच नाव डोलू लागली व नावे खालून एक काळी आकृती बाहेर आली. चांदण्याच्या मंद प्रकाशात देखील दोघांनी परस्परांना ओळखले. क्षणार्धात नांगसोमने आपला भाला त्या काळ्या आकृतीवर फेकला त्याच वेळी











पाण्यातल्या व्यक्तीने पण आपला भाला नांगसोमवर फेकला. सुदैवाने तो भाला नांगसोमला लागला नाही. नावेच्या कडेला जाऊन लागला. परंतु नांगसोमने मारलेला भाला मात्र त्या व्यक्तीच्या पाठीत जाऊन रुतला. शत्रू जोराने ओरडला. लगेच नांगसोमने पाण्यात उडी टाकली व शत्रूला पाण्याबाहेर ओढीत मोठ्याने ओरडला—"शत्रू! शत्रू!"

तो आवाज ऐकून शिखीमुख वगैरे ताडकन उठून उभे राहले व नांगसोमच्या मदतीला धावले. तोपर्यंत नांगसोम शत्रूला बाहेर ओढून घेऊन आला होता. शत्रूच्या पाठीत शिरलेला भाला तसाच होता. तो कण्हत होता. अजितच्या हातातली मशाल घेऊन शिखीने शत्रूला जवळ जाऊन पाहिले. तो शबरवस्तीजवळ लूटपाट करणाऱ्या टोळीतलाच एक जण होता. त्या टोळीतले दोघे तिथे पुजाऱ्याबरोबर गोलभरा आलेले होते.

नांगसोमने सर्व प्रसंग थोडक्यात वर्णन करून सांगितला. शिखीमुख शत्रूला म्हणाला—"तुला तुझ्या कर्माचे फळ मिळाले. आता जागण्याचा आशा सोडून दे. मरणापूर्वी एवढेच सांग, नावेला भोक पाडण्यासाठी तू आला होतास की नाही? आणि तो पुजारी कोठे आहे? कोणत्या बेटावर आहे? खरे काय ते सांग, नाही तर तुला भाल्याने टोचून टोचून ठार करू."

शत्रू मोठी कळ आल्याने एकदम मोठ्याने किंकाळी फोडल्यासारखा ओरडला. पहिल्या प्रश्नाचे त्याने होकारार्थी मान हलवून उत्तर दिले आणि एका बेटाकडे बोट दाखवून दुसऱ्या प्रश्नाचे उत्तर दिले. तेव्हां शिखीमुखने नांगसोमला हळूच भाला काढून तो वांचतो का पहायला सांगितले. परंतु भाला काढल्याबरोबर बिचारा गतप्राण झाला.





"शिखी! आपला पाठलाग त्या दुष्ट पुजाऱ्याने गोलभरा गावापर्यंत केला आणि वृश्चिक द्वीपापर्यंत तो आपला पिच्छा पुरवणार आहे से दिसते." विक्रमकेसरी म्हणाला.

"नुसता पाठलाग केला तरी हरकत नाही, वाटेत आपल्याला बुडवून किंवा इतर तऱ्हेने ठार करण्याचा पण त्याचा प्रयत्न आहे. आपल्या नावा वाटेत बुडाल्या तर इकडच्या निर्जन बेटावर आपण उपाशी मरू किंवा लांडग्या कोल्ह्यांच्या तोंडी आपल्याला मरण येईल. आता या पुढे या नावांचे रक्षण पण आपणां सर्वांना जिवा पलीकडे करावे लागणार." शिखीमुख म्हणाला.

काळोख्या रात्रीच त्या बेटावर जाऊन पुजाऱ्याचा शेवट करणे सोपे होईल हे नांगसोमने सुचविले. पण शिखीमुखला तो सल्ला पटला नाही. म्हणाला—"तो आपला मूर्खपणा ठरेल. झाडावरून किंवा झाडाआड लपून त्यांनी आपल्यावर बाणांचामारा सुरू केला तर? नाही, त्यात धोका आहे. आपण जास्त जास्त सावधगिरी बाळगली पाहिजे. पुजारी लबाड आणि वस्ताद आहे. तो आपल्याला पकडण्यासाठी व ठार करण्यासाठी केव्हां, कोठून व कसे जाळे टाकील, हे सांगणे कठीण आहे. वृश्चिक द्वीपावर पोचण्यापूर्वी आपल्याला ठार करता आले तर त्याला एकट्याला वृश्चिक द्वीपावरचा ठेवा मिळेल. त्या साठी त्याचा हा प्रयत्न चालू आहे. ताडपत्रे त्याच्या हातात आहेत. आपला काटा दूर करता आला तर तो त्याला हवा आहे. म्हणून आपण डोळ्यात तेल घालून सतत सावध राहलं पाहिजे."

उरलेली रात्र निर्विघ्न पार पडली. उजाडल्याबरोबर पुढच्या प्रवासाची सर्वांनी तयारी केली. त्या मृत शत्रूने सांगितल्या-

प्रमाणे ते त्या बेटावर जाऊन उतरले. बराच शोध केल्यावर त्यांना रात्री पेटवून विझत आलेल्या शेकोट्या दिसल्या. परंतु शत्रू जवळपास कोठे नव्हता. पहाटेच ते लोक पुढे निघून गेले असावेत असे शिखीमुखला वाटले.

त्यानंतर चार दिवस लागोपाठ लहान मोठ्या बेटांवर मुक्काम करीत ते पुढे गेले. पाचव्या दिवशी संध्याकाळी ते एका मोठ्या बेटानजीक पोचले. त्या बेटावर डोंगर व मोठमोठी उंच झाडे होती. परंतु त्यांना वाटेत कोठे ही पुजाऱ्याच्या नावा दिसल्या नाहीत किंवा त्या मोठ्या बेटाच्या किनाऱ्यावर पण दृष्टीस पडल्या नाहीत.

नांगसोम म्हणाला की त्यांच्या जातीतल्या लोकांच्या तोंडी वृश्चिक बेटाचे जे वर्णन त्याने ऐकले होते तेच ते बेट आहे. ते ऐकून शिखीमुख व विक्रमकेसरीला परमानंद झाला. त्यांनी नावा किनाऱ्याला नेण्याचे ठरविले.

थोड्याच वेळात नावा किनाऱ्याला जाऊन लागल्या. सर्व किनाऱ्यावर उतरले. सूर्यास्ताची वेळ होती. वृश्चिक द्वीप कसे आहे हे जरा पाहून घ्यावे, यासाठी विक्रम व शिखीमुख एका टेकडीवर चढले. बाकी लोक नावा होत्या तेथे थांबले.

दोघे उंच टेकडीच्या टोकाला जाऊन चारी बाजूला पाहू लागले. त्यांना दूर एक सर्वात उंच डोंगराचे शिखर दिसले. ते पाहून ते परत फिरले तेव्हां त्यांची दृष्टी एका दुसऱ्या टेकडीवर पडली. तेथे त्यांना जे दिसले ते पाहून दोघे थक्कच झाले. त्यांना एक जुनाट पडके देऊळ जीर्णावस्थेत दिसले. दोघे आश्चर्याने व आनंदाने परस्परांकडे पाहू लागले.

(पुढील गोष्ट पुढील अंकी)



# जानी दोस्त

विक्रमादित्याने हट्ट सोडला नाही. तो झाडाजवळ परत आला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि स्मशानाच्या दिशेने मौनपणे चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा! सामान्यपणे मनुष्याला काही काही अपूर्व अनुभव मिळतात. त्यांपासून त्यांना सुखापेक्षा दु:खच जास्त सोसावे लागते. त्याचे उदाहरण म्हणून मी तुला शौनक व मौद्गल्य यांची गोष्ट सांगतो." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला—

"फार प्राचीन काळी स्वर्णा नामक नदीच्या काठी एक गाव होते. त्या गावी शौनक व मौद्गल्य नावाचे दोन मित्र रहात असत. ते 'जीवश्चकंठश्च' असे जानी दोस्त होते. एखाद्या दिवशी चुकून दोघांची दिवसभर गाठ पडली नाही तर त्यांना चैन पडत नसे. काहीतरी चुकल्या चुकल्या सारखे वाटे.












एके दिवशी अचानक मौद्ल्य मरण पावला. शौनक आपल्या मित्राच्या प्रेताला मिठी मारून मोठमोठ्याने रडू लागला. तिघा चौघांनी मिळून त्याला दूर केले, पण तो तसाच रडत बसून राहिला.

मित्राच्या मृत्यूमुळे शौनकला कोणत्याही कामात उत्साह वाटत नाहीसा झाला. त्याला त्याचे पुढील आयुष्य अंधकारमय भासू लागले. भ्रमिष्टा सारखा तो करू लागला.

एक दिवशी शौनकला रात्री स्वप्न पडले. त्याला स्वप्नात त्याचा मित्र मौद्गल्य दसला. त्याच्या सर्वांगावर देवासारखे वस्त्रालंकार होते. तो शौनकला म्हणाला– "मित्रा! यमलोकात माझी चांगल्या पदावर नेमणूक झाली आहे. मला पुष्कळ अधिकार यमाच्या कृपेने मिळाले आहेत. म्हणून आपण रोज तेथे भेटावयाचे झाल्यास मी त्याची व्यवस्था करून ठेवली आहे. तू झोपण्यापूर्वी मी सांगतो तो मंत्र म्हणालास तर झोपल्यावर तुला यमलोकात विहार करता येईल व झोप मोडण्यापूर्वी परत मृत्युलोकात येता येईल." असे सांगून त्याने शौनकला एक मंत्र शिकविला. शौनकला परमानंद झाला.

दुसऱ्या दिवशी शौनकची झोप मोडली तेव्हां त्याला हलके हलकेसे वाटले. त्याला रात्री जे स्वप्न पडले होते ते खरें व्हावे अशी तो मनोमन देवाजवळ प्रार्थना करू लागला. रात्री त्याने झोपण्यापूर्वी तो मंत्र म्हटला. त्यानंतर थोड्या वेळाने तो यमलोकात पोचला. मौद्गल्य शौनकला भेटायला सामोरा आला आणि त्याला बोलावून घेऊन गेला दोघे बराच वेळ गप्पा मारीत बसले. किती वेळ झाला दोघांपैकी कोणालाच कळले नाही. परंतु शौनकची झोप मोडली तेव्हां तो आपल्याच घरात अंथरुणावर होता.





त्या दिवसापासून रोज झोपण्यापूर्वी शौनक तो मंत्र म्हणू लागला. तो रोज यमलोकी जाई आणि मौद्गल्यबरोबर गप्पा गोष्टीत स्वतःचे दुःख विसरून जाई.

एक दिवशी रात्री शौनकच्या कुशीत त्याचा पाच वर्षाचा नातू पण झोपला. आजोबा मंत्र म्हणू लागलेले पाहून त्याने तो मंत्र लक्षपूर्वक ऐकला आणि म्हटला. शौनकने यमलोकात नातवाला पण आलेला पाहिले व शौनक घाबरून गेला. परंतु मुलगा मात्र थोडादेखील घाबरलेला दिसत नव्हता. एका जागी मुले खेळत असलेली पाहून तो त्यांच्याबरोबर खेळू लागला.

आपल्या नातवाला इतर मुलांबरोबर खेळत असलेला पाहून शौनकच्या मनाचे समाधान झाले. तो नित्य नियमाप्रमाणे मौद्गल्यशी गप्पात रंगून गेला. पण सकाळी शौनकला अंथरुणावर नातवाचे निर्जीव शरीर मात्र दिसले. यमलोकातून शौनक जिवंत परत आला, पण त्याचा नातू तेथेच राहिला. दुसरा दिवशी रात्र होईपर्यंत त्याला काही करता आले नाही. दिवसभर तो काळजी करीत बसला होता.

घरातली इतर मंडळी मुलगा मेलेला पाहून मोठमोठ्याने रडू लागली. तेव्हां मौद्ल्य म्हणाला–" तुम्ही घाबरू नका, उद्या सकाळपर्यंत तो पुन्हा उठून हिंडू फिरू लागेल." सर्वांना शंका वाटू लागली की नातवाच्या मरणाला कारण शौनकच असला पाहिजे.

शौनकला तो दिवस एका युगासारखा वाटला. रात्री झोपल्याबरोबर शौनकने मंत्र म्हटला व यमलोकात पोचताच तो आपल्या मित्राला म्हणाला–"काल माझ्याबरोबर माझा नातूपण यमलोकात आला होता. तो येथेच राहिला आहे. त्याला हुडकून काढ."

"मी त्याला कोठे शोधू बुवा! हे तर अशक्य आहे." मौद्गल्य म्हणाला.



"कां, अशक्य कां म्हणतोस? मुलगा कोठे असा नाहीसा होईल का? माझ्या नातवाचा शोध लागल्याशिवाय मला येथून परत जाता येणार नाही. माझा जीव गेला तरी चालेल, पण मला परत जातां येणार नाही. परत जाईन तर मी आपल्या नातवाला बरोबर घेऊनच जाईन." शौनक म्हणाला.

"जन्म मरणाचा हिशोब लिहिणाऱ्या चित्रगुप्ताकडे गेल्यास आपल्याला तुझा नातु कोठे आहे हे कळेल. तरमग चल, आपण चित्रगुप्ताच्या कचेरीत जाऊ या." मौद्गल्य म्हणाला.

चित्रगुप्ताकडे पुष्कळ वह्या व चोपड्या होत्या. बराच वेळ तपासून पाहिल्यावर मुलाचा शोध लागला.

मौद्गल्य म्हणाला—"बाप रे बाप! किती त्रास झाला, पण तुझ्या नातवाचा पत्ता शेवटी लागला. तु खरोखर भाग्यवान आहेस. तुझ्या शेजारच्या गावी एक डुकरीण आज रात्री विईल. तिला तेरा पिल्ले होतील. एकां पिल्लाच्या तोंडावर पांढरा डाग असेल. तोच तुझा नातु." मौद्गल्य म्हणाला.

"मला तु भाग्यवान म्हणतोस! मनुष्याला डुकराच्या पोटी जन्म घ्यावा लागला म्हणजे त्याने काही तरी मोठे पाप केले असले पाहिजे असे आपण मानतो." शौनक चकित होऊन म्हणाला.

"माझ्या म्हणण्याचा अर्थ असा आहे की तु उजाडताच त्या गावी जा. डुकराच्या त्या पोराला ठार कर, म्हणजे तुझा नातु जिवंत होईल." मौद्गल्य म्हणाला.

थोड्या वेळाने मौद्गल्यची झोप मोडली त्याने शेजारच्या गावी जाऊन व्यालेल्या डुकरिणीचा शोध काढला. तिची पिले मोजून पाहिली. पांढरा डाग असलेले पिल्लू विकत घेतले व त्याला तेथल्या तेथ ठार करून घरी परत आला. त्याला घरी आल्यावर त्याचा नातू नेहमीसारखा घरात खेळत उड्या मारीत असलेला पाहून आश्चर्य वाटले व कमालीचा आनंद वाटला. परंतु त्यानंतर त्याने पुन्हा यमलोकात जाण्याचे नाव काढले नाही आणि आपल्या जानी दोस्ताला भेटण्यासाठी त्याचा जीव ही तळमळला नाही.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला—"राजा! माझ्या मनात एक शंका आहे. शौनकने अनेक वेळा यमलोकाची यात्रा केली व शेवटची यात्रा करून ही त्याचे नुकसान झाले नाही. झाला तो फ़ायदाच झाला. मग त्याने आपल्या जानी दोस्ताला भेटण्याचा विचार मनातून काढून कां टाकला? या प्रश्नाचे उत्तर माहीत असून तु दिले नाहीस तर तुला परिणाम माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर छकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील."

त्यावर विक्रमादित्य म्हणाला—"शौनकचा नातू यमलोकी गेला व त्याचा जन्म एका डुकराच्या पोटी झाला. त्याबद्दल मौद्गल्य मुळीच जबाबदार नव्हता. शौनकचे मित्रावरील प्रेम कमी व्हायला दुसरे कारण झाले असावे. ते कारण म्हणजे यमलोकातला एक अधिकारी असून ही मौद्गल्याचा मानवा संबंधी दृष्टिकोण बदलला हे होय. जन्म व मृत्यू होणे व उत्तम लोकांना नीच प्राण्यांच्या पोटी जन्म घ्यावा लागणे मौद्गल्यला सामान्य वाटल्या गोष्टी. परंतु शौनकच्या मनातला मानवधर्म जिवंत होता. दोघां मित्रांच्या मनः स्थितीत जे अंतर पडले ते शौनकला त्याच्या नातवाच्या मृत्यूनंतरच कळले. त्यानंतर दोघांच्या मैत्रीचा धागा तुटला असल्यास नवल नाही."

अशा तऱ्हेने राजाचे मौनभंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि झाडाला जाऊन लोंबकळू लागला. (कल्पित)



# समेट

उन्हाळ्याचे दिवस होते. जंगलातल्या एका तलवात पाणी प्यायला एक सिंह व एक रानटी डुक्कर दोघे जवळ जवळ एकाच वेळी येऊन पोचले. डुक्कर थोडे आधी आले आणि आल्याबरोबर पाणी पिऊ लागले. परंतु सिंहाने त्याला बाजूला ढकलले व म्हणाला–"मी आपली तहान भागवून घेतो, मग तू पाणी पी."

"मी पहिल्याने आलो, म्हणून मी प्याल्यावर तू पी." डुक्कर म्हणाले.

"मी म्हणतो ते ऐकले नाहीस तर तुला माझ्या पंज्यांचा तडाखा सहन करावा लागेल." सिंह म्हणाला.

"मी आपल्या सुळ्यांनी तुझे पोट फाडून टाकीन. खबरदार !" डुक्कर म्हणाले.

दोघांची झुंज सुरू झाली.

इतक्यात झाडांवर पक्ष्यांच्या पंखांचे फडफडणे ऐकू आले. सिंहाने वर डोके करून पाहिले. गिधाडे पहिल्याने कोण मरतो याची वाट पहात बसली होती.

"आपण व्यर्थ कां भांडायचे ?" सिंह म्हणाला.

"मी कोठे नाही म्हणालो ?" डुक्कराने विचारले.

दोन्ही रानटी श्वापदे एकाच वेळी तलावाचे पाणी पिऊन आपल्या वाटेने निघून गेली.





# कपटी काजी

फार जुनी गोष्ट आहे. गझनी नगरी सुलतान महंमद याची राजवट चालू होती. एक दिवशी एक व्यापारी हिन्दुस्थानच्या वाटेवर गझनी येथे उतरला. ते शहर त्याला फार पसंत पडले. म्हणून त्याने तेथेच राहून व्यापार करण्याचे ठरविले. व्यापारांत त्याला खूप फायदा झाला. तेव्हां त्याने एका सुंदर मुलीशी लग्न केले आणि ऐश आरामात राहू लागला.

त्याचा व्यापार उत्तरोत्तर वाढतच गेला. तो हिंदुस्थानात माल पाठवी. त्याला व्यापाराच्या कामाने हिंदुस्थानात जावे लागले. व्यापाऱ्याने विचार केला की आपल्याला हिंदुस्थानात कमीत कमी एक वर्ष तरी रहावे लागणार. बायकोला गावातकडे ठेवून जाण्यासारखा जवळचा नातेवाईक कोणी नव्हता. पण गावात एक काजी साहेब होते. लोक त्याला सदाचारी म्हणून फार मान देत. म्हणून व्यापारी त्याच्याकडे जाऊन म्हणाला–"काजी साहेब ! मी व्यापाराच्या कामाने परदेशी जात आहे. बायकोला बरोबर घेऊन जाणे कठीण वाटते. म्हणून मी परत येईपर्यंत कुटुंबाला आपल्या आश्रयास सोडून जावे म्हणतो. खर्चासाठी जी रक्कम लागेल ती मी आगाऊ देऊन ठेवतो."

काजी त्या गोष्टीस कबूल झाला. व्यापारी बायकोला काजीच्या आश्रयाखाली सोडून परदेशी निघून गेला.

व्यापाऱ्याच्या बायकोने ईश्वर चिंतनात काजीच्या घरी एक वर्ष काढले. परंतु काजीने तिला एकदा छान पाहून घेतले. तिचे सौंदर्य पाहून काजी चकित झाला. त्याने व्यापाऱ्याच्या बायकोला फसविण्याचा विचार केला.



एक दिवशी काजीची बायको व्यापाऱ्याच्या बायकोला घरात लक्ष ठेवायला सांगून कोठे तरी निघून गेली. ती गोष्ट काजीला कळली. म्हणून ती बायको निघून गेल्याचे कळल्याबरोबर नेहमीच्यापेक्षा लवकर घरी परत आला व सरळ व्यापाऱ्याची बायको ज्या खोलीत रहात असे त्या खोलीत गेला व म्हणाला–"पापकर्मापासून मी किती दूर पळतो हे सर्व जगाला माहीत आहे. मग तू पडद्या आड कां बसतेस?"

काजी म्हणाला ते ऐकून व्यापाऱ्याच्या बायकोला काजीसमोर जायला धीर आला. तिने जेवायला ताट वाढून ठेवले व खोलीत जाऊन बसली. तेव्हां काजीने भूल येणारे औषध अन्नात मिळवून ठेवून दिले. नंतर व्यापाऱ्याच्या बायकोला बोलावून म्हणाला–"तू मला एकट्याला खायला वाढून निघून गेलीस. एकट्याने जेवणे हे एक मोठे पाप आहे. ते पाप लागू नये यासाठी चार घास तू देखील खा."

आपल्या आश्रमदात्या काजीच्या इच्छे विरुद्ध काही करणे बरोबर नाही असा विचार करून व्यापाऱ्याच्या बायकोने चार घास खाल्ले आणि औषधाचा परिणाम झाल्यामुळे ती बेशुद्ध होऊन पडली.

ठीक त्याच वेळी कोणी तरी दाराची कडी वाजविली. काजी घाबरला. त्याने व्यापाऱ्याच्या बायकोला एका मोठ्या कपटात नेऊन ठेवले व दार बंद केले.

घराचे दार उघडल्याबरोबर काजीची बायको मुलांना घेऊन घरात आली. काजी तिला पाहिल्याबरोबर रागाने विचारू लागला–"कोठे गेली होतीस?"

"कां? मी व्यापाऱ्याच्या बायकोला लक्ष ठेवायला सांगून गेले होते. ती नव्हती का?" काजीच्या बायकोने विचारले.

"मी येऊन दोन तास होत आले. घरात कोणी नाही. परक्या माणसांवर घर टाकून जाणे शोभते का? काही कोणी उचलून नेले तर कोण जबाबदार?" काजी बायकोला रागावला.

ते ऐकून काजीची बायको व मुले चकितच झाली. त्यांचे बोलणे चालू होते नेमका त्याच वेळी व्यापारी परदेशांतून परत आला. हिंदुस्थानातून तो त्याच दिवशी परतला होता.

व्यापारी काजीला म्हणाला–"मी बायकोला घेऊन जायला आलो आहे. तुम्ही इतके दिवस तिला आश्रय दिलात त्याबद्दल मी फार फार आभारी आहे."

"तुझी बायको कोणाला काही सांगितल्याशिवाय घराबाहेर कोठेतरी निघून गेली." काजी म्हणाला.

"काजी साहेब! थट्टा करता आहा, हे मला कळते. बोलवा तिला. मला कामे पण पुष्कळ आहेत." व्यापारी म्हणाला.

"मी थट्टा नाही करीत. तुमची बायको घरात नाही. ती कोठे गेली मला माहीत नाही." काजी म्हणाला.

"माझी बायको घर सोडून कोठे बाहेर जाणे शक्यच नाही!" व्यापारी म्हणाला.

काजी रागाचा आव आणून म्हणाला–"तू एक महा मूर्ख दिसतो आहेस! खरे














वाटत नसेल तर मग जा घरात आणि पहा, कोठे आहे तुझी बायको ती."

व्यापारी घरात कसा जाणार? त्याने सरळ सुलतानाकडे आपले गाऱ्हाणे नेले.

सुलतानाने काजीला बोलावून चवकशी केली. काजी सुलतानाला म्हणाला–"आज तीन महिने झाले, या व्यापाऱ्याची बायको कोणाला काही सांगितल्याशिवाय घराबाहेर निघून गेली. पुष्कळ शोध काढला पण कोठे सापडली नाही."

"माझी बायको असे कधी करणेच शक्य नाही. काजी साहेब साफ खोटे बोलत आहेत." व्यापारी म्हणाला.

सुलतानाने काजी साहेबांना त्यांचे म्हणणे खरे असल्याबद्दल साक्षीपुरावा द्यायला सांगितले. काजी साहेबांना शेजाऱ्च्या काही गरीब लोकांना पैसे चारून खोटी साक्ष द्यायला तयार करून आणले. त्या सर्व साक्षीदारांनी काजीने शिकवल्याप्रमाणे साक्ष दिली.

सुलतानाने व्यापाऱ्याची फिर्याद खोटी ठरल्याचा निवाडा दिला.

सुलतान महंमद वेष पालटून राज्यात कोठे काय घडते हे पाहून येत असे. सुलतान त्या दिवशी रात्री आपल्या राजधानीत फिरत फिरत एका दुकानाजवळ आला. तेथे काही मुले खेळत होती. त्या मुलांनी आपल्या पैकी एकाला राजा केले आणि म्हणाली–"तू आमच्या सुलतानासारखा निवाडा दिलास तर आम्ही तुला गादीवरून काढून टाकू. समजले?"

सुलतान ते ऐकून चकितच झाला. त्याने ते म्हणणाऱ्या मुलाला जवळ बोलावून विचारले–"काय रे सुलतान महंमदाचा निवाडा बरोबर नसतो का?"

"नाहीतर काय? आज सुलतानाने जो निवाडा सांगितला तो बरोबर होता का? कोणी बुद्धिमान मनुष्य अशा निवाड्यावर कधी विश्वास करील का?" मुलाने विचारले. ते उत्तर ऐकून सुलतान थक्कच झाला.

दुसऱ्या दिवशी सुलतानाने त्या मुलाला आपल्याकडे बोलावून त्याला निवाडा द्यायला सांगितले.

मुलाला न्यायासनावर बसविण्यात आले. पहिल्या दिवशी काजीने ज्या ज्या लोकांना साक्षीदार म्हणून बोलाविले होते त्या सर्वांना एकेक करून बोलावण्यात आले. मुलाने त्या सर्वांना विचारले–"काय हो, तुम्ही व्यापाऱ्याच्या बायकोला कधी पाहिलेत का? तिचे वय काय असेल से वाटते तुम्हांला? ती दिसायला कशी काय आहे?"

सर्व साक्षीदारांनी तिला पाहिल्याचे सांगितले, पण तिचे वय, उंची वगैरे त्यांना सांगता आले नाही.

"तुम्ही खरे काय ते बोलणार की सर्वांना फाशीची शिक्षा सांगू?" मुलाने दटावून विचारले.

फांशीचे नाव ऐकताच सर्व साक्षीदारांनी मुलाच्या पायावर लोटांगण घालून गयावया करीत खरे ते सांगून टाकले. म्हणाले–"आम्हांला ही सर्व काय भानगड आहे, माहीत नाही? काजी साहेबांनी आम्हांला चार पैसे दिले म्हणून ते म्हणाले तशी साक्ष आम्ही दिली."

त्यानंतर काजीला खरी गोष्ट सांगावी लागली. व्यापाऱ्याच्या बायकोला कपाटातून बाहेर काढून परत व्यापाऱ्याला सोंपविण्यात आले. सुलतानाने काजीला हद्दपारीची शिक्षा केली आणि त्याची सर्व इस्टेट त्याच्या बायकोला देऊन टाकली. त्या मुलाने जितक्या चातुर्याने काजीचा कपटीपणा उघडकीस आणला ते पाहून सुलतानाने त्या मुलाच्या शिक्षणाचा सर्व खर्च राज्यातर्फे देऊन तो मुलगा मोठा झाल्यावर त्याला आपला वजीर म्हणून नेमले.



# लांचखाऊ

पूर्वी एका राज्यात लांचखाऊपणा उत्तरोत्तर वाढत होता. राजाने कित्येकदा लांचखाऊ अधिकाऱ्यांना तंबी दिली, परंतु त्याचा काही उपयोग झाला नाही. म्हणून जो कोणी लांच खाताना सांपडे राजा त्याला ठार करून चव्हाट्यावर उलटा टांगून ठेवी किंवा त्याच्या अंगाचे तुकडे तुकडे करून कोल्ह्या कुत्र्यांना खायला घाली. शिक्षेची अंमल बजावणी करण्याचे काम एक न्हावी करी.

एकदा राजाने न्हाव्याला एका आरोपीशी गुप्तपणे बोलत असतांना पाहिले. राजाने दोघांना बोलवून दोघांचे बोलणे कशाविषयी चालू होते, हे विचारले.

आरोपी राजाला म्हणाला—"महाराज, न्हावी म्हणतो की त्याच्याकडे दोन सुरे आहेत. एका सुरीला चांगली धार आहे व दुसरी बोथट आहे. मी दोन रुपये दिले तर तो धार असलेल्या सुरीने ठार करील. नाही तर बोथट सुरीने टोचून टोचून ठार करील."





# भाग्य पालटले

एका गावी एक श्रीमंत मनुष्य रहात असे. त्याला मूलबाळ नव्हते. पण मूल झाले नाही म्हणून नवराबायकोने कधी तक्रार केली नाही. कारण त्यांचा राग होता तो मनुष्य जातीवरच होता. त्यांच्या घरी कोणी भिकारी आला की ते त्याला घराबाहेर काढून लावीत. सरळ सांगून गेला नाही तर धक्के मारून काढीत. त्याच्या मनात दयाधर्म नावाची वस्तूच नव्हती.

घरकामासाठी त्यांनी दूरच्या गावाहून एका मुलीला विकत आणून ठेवले होते. त्या मुलीला इतके राबावे लागे की तिला एका क्षणाचीदेखील फुरसत मिळत नसे. मालकीण बाई एक राक्षसीण होती. मुलीला स्वस्थ बसलेली पाहल्यावर ती तिच्यावर खसकन ओरडे. ती मुलगी स्वतःच्या भाग्याला दोष देऊन रडत बसे.

ती मुलगी सुंदर असती तर कोणीतरी तिला तिच्या आई बाबांकडून विकत घेऊन तिच्याशी लग्न केले असते. पण तिला रूप नव्हते.

एक दिवशी ती चुलीत वाळलेले गवत घालून जाळ करीत होती. वाळक्या गवताला कधी कधी धान्याचे दाणे उरलेले मिळत. ती चुलीत गवत घालण्यापूर्वी ते दाणे काढून ठेवी. अशातऱ्हेने तिने शेरभर धान्य लपवून एका जागी ठेवले होते.

एक दिवशी ती मुलगी वाळलेले गवत चुलीत घालू लागली तेव्हां एक म्हातारा दारासमोर उभा राहून म्हणाला—"मुली! मी उपाशी आहे. काहीतरी भीक घाल!"

त्या मुलीला भूक म्हणजे काय हे चांगले माहीत होते. म्हणून तिला म्हाताऱ्याची दया आली. त्या वेळी घराचे मालक मालकीण घरात नव्हते. पण घरातली एकादी वस्तू उचलून दिली तर त्यांना ते

सहजी कळेल. म्हणून तिने जे धान्य जमा करून गुप्तपणे ठेवले होते ते त्या म्हाताऱ्याला भीक म्हणून घातले आणि म्हणाली— "आजोबा! तुम्ही लवकर निघून जा. घराचे मालक व मालकीण येतील. त्यांचे तोंड व हात दोन्ही मोठे वाईट आहेत."

म्हाताऱ्याने त्या मुलीच्या हातात एक मळके फडके देत म्हटले—"मुली! तू जेव्हां जेव्हां तोंड धुशील तेव्हां तेव्हां या फडक्यालाच तोंड पुसत जा. तुझे कल्याणच होईल. माझ्या शब्दावर विश्वास ठेव."

म्हाताऱ्या भिकाऱ्याने कृतज्ञता म्हणून आपल्याला हे फडके दिले असावे आणि घेतले नाही तर म्हाताऱ्याला वाईट वाटेल असा विचार करून तिने ते ठेवून घेतले.

त्याच वेळी घराचा मालक व मालकीण घरी परत आले. "हा म्हातारा कोण ग? त्याला तू काय दिलेस? त्याच्याशी तू काय बोलत होतीस?" अशी त्यांनी प्रश्नांची झडीच लावली.

"मी घरातली एकही वस्तू त्याला दिली नाही. पाहिजे तर तुम्ही स्वतः जाऊन तपासून पहा." मुलगी म्हणाली.

"दिलेस तर त्याचा परिणाम माहीतच आहे तुला? तू मला ओळखतेसच." मालक म्हणाला.



परंतु मालकिणीचे तेवढ्याने समाधान झाले नाही. ती म्हाताऱ्याजवळ काय आहे हे पहायला पुढे झाली. पण म्हातारा एकाएकी अदृश्य झाला. तो अदृश्य झाल्यावर दोघांनी मिळून त्या बिचारीला खूप झोडपले.

त्या दिवसापासून मुलगी जेव्हां जेव्हां स्नान करी किंवा तोंड धुई तेव्हां तेव्हां त्याच फडक्याला अंग किंवा तोंड पुसे. ते फडके मंत्रवलेले असावे. कारण त्या मुलीचे अंग हळू हळू काळ्याचे गोरे गोरे होऊ लागले. तिचा रंग उजळू लागला त्याच बरोबर तिच्या रूपात पण फरक पडू लागला. ती अधिकाधिक सुंदर होऊं लागली.

मुलगी दिवसे दिवस अधिकाधिक सुंदर होत गेली व तिचा रंग उजळ होऊं लागला हे मालकिणीच्या लक्षात आले. हा बदल होण्याचे कारण नक्कीच असले पाहिजे. तिने मुलीला विचारले, पण तिने काहीच सांगितले नाही. तेव्हां मारहाण करून व नाही नाही त्या तऱ्हेने तिचा छळ करून मालकिणीने तिच्या कडून त्या मळक्या कपड्याचे गुपित काढून घेतले. दुसऱ्याच क्षणाला त्यांनी ते मळके फडके तिच्याकडून काढून घेतले आणि आपले तोंड धुवून त्या फडक्याने पुसले. त्यांनी विचार केला की आपले सौंदर्य वाढवून नंतर ते फडके भाड्याने सौंदर्य वाढवायला कोणाला देता येईल व अशा तऱ्हेने पुष्कळ पैसे मिळविता येतील. परंतु थोड्या वेळाने त्यांना त्यांच्या तोंडावर केस उगवलेले दिसले व शेपटी निघालेली दिसली. दोघे घाबरून जाऊन गावालगतच्या जंगलात पळून गेले. ती मुलगी त्या घरची मालकीण झाली. गावातल्या एका सुंदर श्रीमंत तरुणाने तिच्याशी लग्न करण्याची तयारी दाखविली. त्यांचे लग्न झाल्यावर दोघांचा संसार सुखाचा झाला.



# इस्टेटीची वाटणी

एका व्यापाऱ्याला दोन मुलगे होते, मोठा मुलगा आतल्या गाठीचा व स्वार्थी होता आणि धाकटा मुलगा अगदी भोळसट होता. आपण मेल्यावर मोठा मुलगा धाकट्याला फसवील असे व्यापाऱ्याला वाटले. म्हणून त्याने आपली सर्व संपत्ती दोन पोत्यात बांधून ठेवली. मरते वेळी दोघांना जवळ बोलावून तो म्हणाला–"मुलांनो! माझ्याजवळ जेवढे धन व संपत्ती आहे ती मी दोन पोत्यात बांधून पश्चिमेकडल्या खोलीत ठेवली आहे. एकेक पोते वाटून घेऊन तुम्ही दोघे सुखाने रहा."

काही दिवसांनंतर व्यापारी मरण पावला. तेराव्या दिवशी सर्व क्रियाकर्म संपल्यावर मोठ्या मुलाने दोन्ही पोती उघडून पाहिली. एका पोत्यात वर चांदीचे रुपये होते व खाली मातीची ढिकळे होती. दुसऱ्या पोत्यात वर मातीची ढिकळं होती व खाली रुपये होते. मोठ्या मुलाला मातीच्या ढिकळांची व रुपयांची अशी अदलाबदल करून ठेवण्यात बाबांचा हेतू काय होता हे कळेना. म्हणून त्याने चांदीचे सर्व रुपये एका पोत्यात भरले. आणि एका पोत्यात मातीची ढिकळे भरून ठेवली. दुसऱ्या दिवशी तो आपल्या धाकट्या भावाला बोलवून म्हणाला–"छोटू! दादांनी आपणां दोघांना एकेक पोते घ्यायला सांगितले आहे. मी हे पोते घेतो आणि तू हे घे. तुला कबूल आहे ना?" असे सांगून त्याने रुपयांचे पोते स्वत:साठी ठेवून घेतले आणि मातीच्या ढिकळांचे पोते छोटूला दिले.

धाकट्या मुलाने मातीची ढिकळे फोडून पाहिली. प्रत्येकात सोन्याचे एकेक नाणे होते. अशातऱ्हेने छोटूला सोन्याच्या नाण्यांचे पोते मिळाले.





# सिंदबादच्या सफरी

चार वेळा दर्यापार व्यापारासाठी सफर करतांना जीव धोक्यात पडला होता तरी सिंदबादला प्रत्येक वेळी अलोट पैसा मिळाला. त्या शिवाय त्याला अनुभव पण खूप मिळाला. तो अनुभव त्याला आयुष्यभर फार उपयोगी पडला. म्हणून घरी सर्व प्रकारचा ऐश आराम करण्यास सुखसोयी असूनही आणखी एका सफरीवर जाण्याचा मोह तो आवरू शकला नाही. त्याने आपल्या पाचव्या सफरीची तयारी सुरू केली. परदेशात ज्या मालाला चांगली किंमत मिळणे शक्य होते तो माल खरेदी केला. विक्रीकरिता एक सुंदर जहाजसुद्धा त्याने खरेदी केले. त्याने उत्तम खलाशी व तांडेल ते जहाज चालविण्यासाठी नेमले आणि त्यानंतर आपल्या घरच्या काही नोकरांचाकरांना बरोबर घेऊन पाचव्या सफरीवर निघाला. सिंदबाद स्वत:च्या जहाजात व्यापारासाठी निघत असल्याची बातमी ऐकून दुसरे काही व्यापारी प्रवासाचा खर्च आगाऊ देऊन त्याच्या बरोबर प्रवासाला निघाले. त्याला प्रवासाचा चांगला अनुभव होता म्हणून तो आपल्या खलाश्यांना व तांडेलांना मधून मधून सल्ला पण देत होता.

बसरा नगराहून निघाल्यावर सफर आनंदात चालू झाली. वारा अनुकूल होता आणि समुद्रपण शांत होता. जेथे जेथे जहाज नांगर टाकून थांबे त्या त्या गावी मालाची विक्री व खरेदी पण चांगली होत गेली. म्हणून सर्व व्यापारी खुषीत होते आणि पुढे कोठे कोठे कसे जायचे व कोणत्या मालाची विक्री व खरेदी करावयाची याविषयी विचार करू लागले.

या खेपेस जहाज एका निर्जन बेटावर जाऊन पोचले. तेथे जहाजाने नांगर



टाकला. सर्व व्यापारी त्या बेटावरची गंमत पहायला निघाले. त्यांना एका जागी राक्षसी गरुड पक्षाचे अंडे दिसले. प्रथम ते काय आहे हेच त्यांच्या लक्षात आले नाही. त्यांनी त्या अंड्यावर दगड फेकले. अंडे फुटले आणि पक्ष्याच्या पिल्लाचा एक पाय बाहेर आला. व्यापाऱ्यांनी अंड्यातल्या पक्ष्याला बाहेर काढून त्याचे तुकडे तुकडे केले आणि ते आपसात वाटून घेऊन ते जहाजावर परत आले.

सिंदबादला जेव्हां ही गोष्ट कळली तेव्हां तो तर घाबरूनच गेला. तो म्हणाला— "तुम्ही निव्वळ खुळेपणाने नकळत आपला जीव धोक्यात टाकला आहे. ही गोष्ट गरुड पक्ष्यांना कळली की ते आपल्यावर हल्ला करून आपल्याला ठार करतील. म्हणून आपण येथून तावडतोब दूर निघून गेले पाहिजे." नंतर त्याने खलाश्यांना तयार व्हायला सांगून शिडे उभी करायला सांगितले. सर्व प्रवासी घाबरून गेले होते. सर्व दूर निघून जाण्याच्या घाईत होते.

व्यापाऱ्यांनी पक्ष्याचे मांस शिजविले पण ते खाण्यापूर्वीच आकाशात ढगासारखे दोन मोठे पक्षी घिरट्या घालू लागले. त्यांच्या पंखांची फड फड आणि ओरडणे ढगांच्या गडगडण्यासारखे वाटे. ते पक्षी सिंदबादच्या जहाजावर उडत होते. त्यांच्या दोन्ही पंज्यांत दोन मोठे दगड होते. ते नुसते दगड नसून दोन मोठे खडक होते,— सिंदबादच्या जहाजाहून मोठे मोठे. खडक पाहूनच व्यापाऱ्यांच्या छातीत धडकी भरली.

पाहता पाहता एका पक्ष्याने आपल्या पंज्यातला दगड ठीक जहाजावर टाकला. परंतु तांडेलाने चटकन सुकाणू फिरवून जहाजाला वाचविले. तो खडक जहाजाजवळ समुद्रात पडला. तो खडक पडल्याने पाण्यात एक मोठा खड्डा पडल्यासारखे झाले व एक क्षणभरच समुद्राचा तळ दिसला.



त्यावेळी जोरजोराने उंच उंच लाटा येऊन जहाजावर आदळू लागल्या आणि जहाज बुडते की काय असे वाटू लागले.

तेवढ्या अवधीत दुसऱ्या पक्ष्याने दुसरा दगड सोडला. तो दगड सरळ जहाजावर येऊन पडला. त्याच्या धक्क्याने जहाजाचा अर्धा अधिक भाग तुटून त्याचा चक्काचूर झाला. दगडाखाली चेंगरून काही लोक तत्काळ मरण पावले. बाकी लोक पाण्यात पडले. त्यांचे काय झाले हे कळायला मार्ग नव्हता. सिंदबादने मात्र स्वतःचा जीव वाचविण्यासाठी आटोकाट प्रयत्न केला. त्याच्या हाती एक फळकूट आले. त्याच्या आधारे तो कसाबसा स्वतःला वाचवून एका बेटावर येऊन पोचला. वाळूत पडून काही वेळ विश्रांती घेऊन तो ते बेट पहायला निघाला.

सिंदबादला ते बेट पृथ्वीवरच्या स्वर्गासारखे वाटले. जिकडे पहावे तिकडे फुलझाडे आणि फळझाडे होती. निसर्ग सौंदर्य पाहण्यासारखे होते. झाडावर चित्रविचित्र रंगाचे पक्षी निरनिराळ्या प्रकारे बोलत होते. खाली जमिनीवर गालिचासारखी हिरवळ पसरलेली होती व मधून मधून फुलझाडांमुळे ती जास्तच खुलून दिसत होती. फुलांच्या सुगंध सर्वत्र













दरवळत होता. सिंदबादने फळे तोडून खाली व ओढ्याचे पाणी पिऊन गवतावर पाय पसरून झोपला.

त्याची झोप मोडली तेव्हां संध्याकाळ होऊ लागली होती. बेट निर्जन होते म्हणून बेट भयाण वाटत होते. त्याने मोठ्या कष्टाने ती रात्र काढली. झोपेत त्याला स्वप्ने पडत होती. सकाळी उठून बेटावर कोठे काय आहे हे पाहण्यासाठी तो हिंडू लागला.

थोड्या वेळाने त्याला अचानक एक मनुष्य दिसला. एका जागी एक मोठा खड्डा होता. त्यात ओढ्याचे पाणी पडत होते. त्या खड्ड्याच्या काठावर तो मनुष्य बसला होता. तो म्हातारा होता. त्याने कपड्यांसारखी पानांचीच एक चादर करून आपले अंग झाकले होते. तो मनुष्य कोणी तरी त्याच्यासारखाच जहाज बुडाल्यामुळे किनाऱ्यावर येऊन लागलेला असहाय मनुष्य असावा असे सिंदबादला वाटले.

सिंदबादने जवळ जाऊन त्याला विचारले—"काय रे बुवा! तू कसा काय येथे येऊन पोचलास?" पण तो मनुष्य काही बोलला नाही. जोर जोराने डोके, व मान हलवून आणि हातवारे करून त्याने काही तरी सांगितले. त्याला ओढ्यापलीकडे जायचे आहे आणि फळे खाली वाटत आहेत. असा अर्थ असावासा सिंदबादला वाटले. म्हणून त्याला ओढा पार करायला मदत करावी असे सिंदबादने ठरविले.

सिंदबादने खाली वाकून त्याला खांद्यावर उचलून घेतले. म्हाताऱ्याने सिंदबादची मान आपल्या दोन्ही मांड्यात आवळून धरली आणि त्याचे डोके दोन्ही हातांनी घट्ट धरून ठेवले. सिंदबादला त्याचा हेतू काय असावा हे कळले नाही. म्हणून तो त्याला ओढ्यापलीकडे घेऊन आला व खाली उतरायला खुणावले. पण त्याने सिंदबादची मान जास्त आवळून धरली. त्या म्हाताऱ्याचे दोन्ही बळकट पाय पाहून सिंदबादच्या अंगाचा थरकाप उठला. त्याने त्या म्हाताऱ्याला खाली जमिनीवर पाडण्याचा प्रयत्न करून पाहिला. पण तो फुकट ठरला. त्या म्हाताऱ्याने सिंदबादचा गळा इतक्या जोराने आवळला की सिंदबादची जीभच बाहेर आली आणि तो बेशुद्ध होऊन जमिनीवर पडला.

सिंदबादला शुद्ध आली तेव्हांदेखील म्हातारा खांद्यावरच बसलेला असल्याचे त्याला दिसले.

सिंदबादला शुद्ध येत असलेली पाहून म्हाताऱ्याने त्याच्या छातीवर लाथा मारायला सुरवात केली. धीर करून सिंदबाद उठून उभा राहिला आणि हळू हळू चालू लागला. म्हाताऱ्याने थांबायला खूण केली म्हणजे सिंदबाद थांबे व त्याने पुढे चालायला खूण केली म्हणजे पुढे चाले. सिंदबादला, स्वतःला कसे सोडवून घ्यावे हे कळेना. रात्री सिंदबाद झोपला की म्हातारा तसाच त्याच्या खांद्यावर बसूनच राही. त्या म्हाताऱ्यामुळे सिंदबादला जो त्रास झाला तसा पूर्वी आयुष्यभरात कधी झाला नव्हता.





सिंदबादला असे कित्येक दिवस त्या म्हाताऱ्याचे घोडे व्हावे लागले. एक दिवशी त्याला एका जागी दूधभोपळ्याचा वेल दिसला. एक दुधभोपळा वाळून गेला होता. सिंदबादने त्याच्या आतला गर काढून त्यात द्राक्षाचा रस भरून ठेवला. नंतर तो रस भोपळ्यासकट उन्हात ठेवू लागला. काही दिवसांनी त्या रसची दारू तयार झाली. सिंदबाद त्यातली दारू मधून मधून पिऊ लागला. त्यामुळे त्याच्या अंगात शक्ती वाढत गेली व उत्साहपण वाढला. सिंदबादच्या अंगात अचानक आलेली शक्ती पाहून त्या म्हाताऱ्याला आश्चर्य वाटले. त्याने सिंदबाद-जवळ दारू मागून चाखून पाहिली व आवड-ल्यावर सर्व दारू गटागट पिऊन भोपळा रिकामा केला. थोड्या वेळाने त्याला ती दारू चढली. त्याच्या मांड्या सैल झाल्या. सिंदबादने त्याचे पाय दूर ओढून स्वत:ची मान सोडवून घेतली आणि म्हाताऱ्याला जमिनीवर फेकले. म्हातारा दारूच्या निशेत वरळत होता. सिंदबादने एक मोठा दगड उचलून त्या म्हाताऱ्याच्या टाळक्यात टाकला. तत्काळ म्हातारा गतप्राण झाला.

म्हाताऱ्याच्या हातातून स्वत:ला सोडवून सिंदबाद समुद्र किनाऱ्याकडे धावला. किनाऱ्यावर त्याला एक व्यापारी जहाज व खलाशी वगैरे भेटले. त्याला वाटले की त्याला वांचविण्यासाठी जणुंकाही अल्लानेच त्यांना पाठविले आहे. ते लोक पाणी व फळे घ्यायला त्या बेटावर आले होते.

सिंदबादच्या तोंडून त्या म्हाताऱ्याची गोष्ट ऐकून त्या जहाजावरचे व्यापारी चकित होऊन म्हणाले—"त्या म्हाताऱ्याच्या हातातून तू वांचलास? देवानेच तुला वांचविले आहे असे समज. त्याने आतां-पर्यंत किती लोकांचा जीव घेतला असेल, नकळे."



व्यापाऱ्यांनी सिंदबादला आपल्याबरोबर घेतले त्याला अंगात घालायला कपडे दिले. जहाज पुढे निघाले. कित्येक दिवसांनंतर ते जहाज एका बंदराला लागले. ते एक मोठे शहर होते. त्या शहराच्या आसपास झाडावर सहस्रावधी काळ्या तोंडाची माकडे रहात. म्हणून त्या गावाचे नावच वानरवाडीं असे पडले होते. त्या गावी दूर दूरच्या देशाचे व्यापारी येत असलेले सिंदबादला दिसले.



एका व्यापाऱ्याशी सिंदबादची मैत्री वाढली. तो त्याच्याबरोबर गावात गेला. व्यापाऱ्याने सिंदबादच्या हातात काही दगडगोटे भरून एक पिशवी दिली व म्हणाला—"नगराच्या प्रवेशद्वारातून बाहेर कित्येक लोक खाली दरीत जातांना दिसतील. तू सुद्धां त्यांच्याबरोबर जा. ते करतील तसे तू कर. त्याचा तुला फायदाच होईल."

सिंदबाद ती पिशवी घेऊन नगराच्या प्रवेशद्वारावर पोचला. पुष्कळ लोक नगरा-बाहेर निघालेले पाहून तो देखील त्यांच्यात मिसळून बाहेर निघाला. थोडे अंतर चालून गेल्यावर त्याला एक मोठी दरी दिसली. त्या दरीत मोठमोठी उंच झाडे होती. ती नारळाची झाडे होती. त्यांवर माकडे बसली होती.

सर्व झाडाखाली पोचल्यावर माकडांना दगड मारू लागले. माकडे दगडांचे उत्तर नारळांनी (नारळ तोडून व्यापाऱ्यांच्या अंगावर फेकून) देऊ लागली. पण व्यापारी स्वत:चा बचाव करीत नारळ थैल्यात भरू लागले. त्यांच्या थैल्या भरल्यावर नारळ उचलून लोक परत शहराकडे निघाले.

सिंदबादने आणून दिलेले नारळ त्याच्या मित्राने ठेवून घेतले व त्याने आणलेल्या नारळाचे पैसे सिंदबादला दिले. असेच काही दिवस दररोज सिंदबाद त्या दरीत जाऊन

नारळ आणीत राहला आणि व्यापारी मित्र नारळांची किमत सिंदबादला देऊ लागला. सिंदबादजवळ थोडे पैसे जमल्यावर त्याने मजूर लावून त्यांच्या करवी नारळ मागवून व्यापार सुरू केला. त्याच्याकडे मोत्यांच्या बेटावर जायलादेखील पुरतील इतके पैसे जमले.

मोत्यांच्या बेटावर निघतांना सिंदबाद बरोबर नारळ घेऊन निघाला. वाटेत जी जी बंदरे लागली त्यात त्याने नारळ विकले आणि मिरे, दालचिनी वगैरे मसाल्याचे पदार्थ विकत घेतले आणि आणखी काही बेटांवर ते नेऊन विकले. अशातऱ्हेने त्याने पुष्कळ धन जमविले. हे धन त्याला समुद्रात बुडी मारून शिंपले काढणारांना मजुरी द्यायला पुरेसे होते.

शिंपल्यात चांगले मोती मिळणे ही गोष्ट नशिबावरच अवलंबून असते. सिंदबादचे नशीब चांगले होते. म्हणून त्याने ज्या शिंपल्या विकत घेतल्या त्यात मोठमोठे व चांगले मोती मिळाले. ते विकल्यावर त्याला पुष्कळ किंमत मिळाली. त्याच्याजवळ पुष्कळ पैसे जमले. तेव्हां घरी परतावे, असे त्याला वाटू लागले. त्याने परत प्रवास करण्यासाठी सर्व तयारी केली. वाटेत लागणाऱ्या बंदरात विकायला योग्य असा माल खरेदी केला. तसा माल त्याला मिळाला पण.

त्या मालाची विक्री करीत सिंदबाद कित्येक दिवसांनी बसरा बंदरात येऊन पोचला आणि तेथून बगदादला सुखरूपघरी पोचला.

सिंदबाद सुखरूप घरी पोचल्यावर त्याची मित्रमंडळी व नातेवाईक त्याला भेटायला व त्याच्या सफरीचे वर्णन ऐकायला जमली. या सफरीत त्याला खूप फायदा झाला होता. म्हणून त्याने गोर गरिबांना खूप दानधर्म केला आणि बायका-मुलाबरोबर चैनीत राहू लागला.





# तीन कवड्या

एका गावी चांग नावाचा एक तंबाकूच्या व्यापारी रहात असे. तो कावडी-सारख्या दोन्ही बाजूला टोपल्यात तंबाकू घालून गल्लोगल्ली फिरून तो विकत असे. गल्लचातून गर्दी असे म्हणून पैसे मिळविण्यासाठी त्याला फार मेहनत करावी लागे. कित्येक वर्षांपासून तो हाच धंदा करीत असे. परंतु तंबाकू जास्त विकला जात नसे.

एक दिवशी चांग तंबाकूची कावड खांद्यावर टाकून गर्दीतून वाट काढीत गल्लीतून जात होता. तेव्हां फाटके मळके कपडे घातलेला एक म्हातारा जवळ आला आणि त्याची पाठ थोपटीत म्हणाला– "काय रे बुवा! माझ्या चिलमीत तंबाकू भरून देतोस का?"

चांगने म्हाताऱ्याकडे वळून पाहिले. कावड खाली उतरवून ठेवणे त्याला कठीण वाटत होते. म्हणून तो म्हाताऱ्याकडे पहात जागच्या जागी उभा राहला. चांगजवळ तंबाकूचा भाव विचारीत तो म्हातारा बसला नाही. त्याने आपल्याजवळच्या तीन कवड्या काढून दाखविल्या. चिलमभर तंबाकूला ती किंमत थोडी जास्तच होती.

"आपली चिलम स्वतःच भरून घ्या दादा! खांद्यावर ओझे जास्त आहे. रागावू नका." चांग म्हणाला.

म्हाताऱ्याने आपला अंगठा आणि अंगठी घालायच्या बोटाने तंबाकू तीनदां काढून चिलमीत भरला. पण चांगला आश्चर्य वाटले ते या गोष्टीचे की त्याची कावडच रिकामी झाली आणि त्याहून आश्चर्याची गोष्ट म्हणजे ती सारी तंबाकू त्या एवढ्या शा चिलमीत भरून ठेवता आली. चांग चकित होऊन चिलमीकडे, म्हाताऱ्याच्या बोटांकडे व तोंडाकडे पाहू लागला. आपण

कावड खाली न ठेवता गिऱ्हाइकाला चिलम भरून घेण्यास सांगितली ही आपलीच चूक झाली असा पश्चात्ताप करीत तो म्हाताऱ्याकडे पाहू लागला.

म्हाताऱ्याने त्या तंबाकूची किंमत म्हणून त्याच्या रिकाम्या टोपल्यात तीन कवड्या टाकल्या. म्हातारा चिलम हुक्क्यात घालून पीत गर्दीत कोठे निघून गेला कळले नाही.

चांग निराश होऊन घरी निघाला. वाटेत त्याला आपली कावड जड होऊ लागल्याचा भास झाला. शेवटी शेवटी वजन इतके वाढले की उचलून घेऊन जाणे त्याला कठीण वाटले. कावड उतरवून त्याने पाहिले तर दोन्ही टोपल्या कवड्यांनी भरलेल्या होत्या. कवड्या वाढतच होत्या. म्हणून त्याने पुन्हा साहस करून कावड उचलून घेतली आणि झपाझप पावले उचलीत घरी येऊन पोचला.

उंबरठा पार करतांना ठोकर लागून तो खाली पडला तेव्हां सर्व कवड्या जमिनी-पसरल्या. त्याने मोठ्या कष्टाने कशाबशा सर्व कवड्या जमा करून एका लाकडी पेटीत त्या बंद करून ठेवल्या.

या एवढ्या कवड्या एकदम कशा काय आल्या, हाच विचार त्याच्या मनात राहून राहून येऊ लागला. इतक्यात पेटीत खणखण



आवाज होऊ लागला. चांगने आत जाऊन पाहिले. पेटीचे झांकण उघडे होते आणि कवड्या पेटी भरल्यामुळे बाहेर उड्या पडत मारीत होत्या.

चांग डोके खाजवू लागला, या कवड्या आतां कोठें ठेवायच्या? त्याच्याकडे एक मोठे मडकी होती. एक आणून त्यात त्याने कवड्या भरल्या. क्षणार्धात ते मडके पण भरले. अशातऱ्हेने त्याच्या घरातली तीन मडकी भरली. चांग दिवसभर कवड्या भरण्याचेच काम करीत राहला. तरी कवड्या जमिनीवर उरलेल्याच होत्या.

चांगजवळ इतके धन जमा झाले की आतां चांगच्या आनंदाला पारावार नव्हता. त्याला यापुढे गल्लोगल्ली कावड उचलून फिरत राहण्याची गरज नव्हती.

त्याने व्याजावर कर्जाऊ पैसे द्यायला सुरवात केली. त्याला आता सावकारा-सारखे लोडाला टेकून बसण्याशिवाय गत्यंतर नव्हते. त्याला स्वतःचे नशीब एकाएकी इतके उघडल्याबद्दल कमालीचे आश्चर्य वाटू लागले.

आश्चर्याची गोष्ट म्हणजे तिकडे कवड्यांची संख्या पण दिवस दिवस वाढतच चालली होती. मडक्यांतून कवड्या काढल्या तरी मडकी रिकामी होत नव्हती.

एकदां एक म्हातारा चांगच्या दुकानात आला. त्याला काही तरी विकायचे होते. त्याने आणलेल्या वस्तू तशा मूल्यवान पण नव्हत्या. चांगने त्या वस्तू उलटून पालटून पाहिल्या आणि विचारले—"तुला यांची किती किंमत येईलसे, वाटते?"

म्हातारा निःसंकोच म्हणाला—"मला फक्त तीन कवड्या पाहिजेत." चांगने त्याला तीन कवड्या दिल्या. म्हातारा आनंदाने तीन कवड्या घेऊन निघाला. त्या दिवसापासून चांगच्या मडक्यातल्या कवड्या वाढायच्या थांबल्या.





# बुद्धिमान

एका गावी एक शेतकरी रहात असे. त्याला सारंग नावाचा एक मुलगा होता. सारंग एक हुशार मुलगा होता. त्याच्या हुशारीबद्दल त्याच्या आईवडिलांना अभिमान वाटे याबद्दल नवल नाही. गावकऱ्यांना पण अभिमान वाटे. म्हणून सारंगच्या वडिलांनी खर्चासाठी आपली एक गाय विकली आणि सारंगला उच्च शिक्षणासाठी दुसऱ्या एका गावी पाठविले.

एका वर्षानंतर सारंग घरी परत आला तेव्हां सारंगच्या वडिलांनी विचारले–"बाळ! तू काय काय शिकून आलास?"

"बाबा! मला आतां बेडकांची भाषा येऊ लागली आहे." सारंग म्हणाला.

"काय! बेडकांची भाषा! मी आपली गाय विकून तुला शिक्षणासाठी पाठविले आणि तू बेडकांची भाषा शिकून आलास? पुरे झाले हे शिक्षण! तू घरी राहून शेतावर जात जा कामाला!" बाप म्हणाला.

सारंग शेतावर कामाला जाऊ लागला. त्याने आपल्या बापाला घरच्या शेतीच्या कामाला मदत केली. त्याची तब्येत सुधारली. एक दिवशी त्याने शिक्षणासाठी जाण्याची परवानगी बापाजवळ मागितली. परंतु बापाने त्याला साफ नकार दिला. परंतु त्याच्या आईने नवऱ्याशी भांडून त्याला शिक्षणासाठी पाठवायला सांगितले. म्हणाली–"माझा मुलगा बुद्धिमान आहे. तरमग शेताच्या कामात लावून त्याची बुद्धिमत्ता मातीमोल व्हावी, असे वाटते का तुम्हांला? त्याला शिकविण्याची व्यवस्था झालीच पाहिजे."

बायकोच्या म्हणण्याविरुद्ध नवरा काय बोलणार? त्याने पुन्हां सारंगला शिक्षणासाठी पाठविले. या खेपेस त्याने आणखी एक गाय विकली. काही दिवस विद्याभ्यास करून सारंग घरी परत आला.

"बाळ! या खेपेस तरी काही शिकून आलास की नाही?" बापाने सारंगला विचारले.

"कां नाही बाबा? मी या खेपेस कुत्र्यांची भाषा शिकून आलो आहे." सारंग म्हणाला.

"मूर्खा! बेडकांची व कुत्र्यांची भाषा आल्याने तुझे पोट भरणार आहे का? चल, उद्यांपासून शेतात काम करायला चल." बाप या खेपेस ही खूप रागावला.

काही दिवस सारंगने बापाबरोबर शेतात काम केले आणि पुन्हां शिकायला जाण्याची इच्छा प्रगट केली. सारंगने मदत केल्यामुळे पीक चांगले निघाले होते. म्हणून सारंगच्या बापाने पुन्हां मुलाला शिक्षणासाठी पाठविले.

तिसऱ्या खेपेस सारंग घरी परत आला. तेव्हां बापाने विचारले–"या खेपेस तरी तू काही विद्या शिकून आलास की नाही?"

"होय बाबा! मी या खेपेस माशांची भाषा शिकून आलो आहे." सारंग म्हणाला.



"आतां पुरे झाला तुझा विद्याभ्यास! ज्यांच्याकडे फालतू पैसे आहेत त्यांच्यासाठी या सर्व विद्या आहेत." बाप म्हणाला.

सारंगने आता विद्येचा नाद सोडून देण्याचे ठरविले आणि शेताचा काम करू लागला. एकदां सारंग शेतात बांध सारखा करीत होता. त्यावेळी दोघे जण त्या बाजूला आले. सारंगला पाहून त्यांनी विचारले–"कायरे मुला! आम्ही दोघे रामपूरला जात आहो, तिथल्या राजाला मंत्री हवा आहे असे ऐकतो आपले नशीब पारखून पाहू या. कदाचित ते पद मिळेल. तू येतोस का आमच्याबरोबर?"



ते दोघे खरोखरी एका नोकराच्या शोधार्थ होते. त्यांना सारंग एक चांगला नोकर होईल असे वाटले.

"मी आलो असतो, परंतु शेताचे काम बिघडेल!" सारंग म्हणाला.

"अरे! तुझे जे नुकसान होईल ते आम्ही सर्व भरून देऊ. तू आमच्याबरोबर चल." दोघे म्हणाले. सारंग त्यांच्याबरोबर जाण्यास तयार झाला. ते दोघे सारंगला बरोबर घेऊन निघाले. दुपारी एका तलावाच्या काठी ते खाण्यापिण्यासाठी थांबले. त्या वेळी तलावातून कोणीतरी बोलत असल्याचे सारंगला ऐकू आले. त्याने तिकडे वळून पाहिले, दोन बेडूक होते. एका बेडकाच्या हातात एक गोळी होती. दुसऱ्या बेडकाने त्याला विचारले–"ही कसली रे गोळी?"

"हे एक उत्तम औषध आहे!" पहिला बेडूक म्हणाला.

"मला नाही ते खरे वाटत!" दुसरा म्हणाला.

"तुझा विश्वास माझ्या बोलण्यावर असो किंवा नसो, माझे त्यात काही नुकसान नाही. गावप्रमुखाची बायको आजारी आहे, म्हणे. ही गोळी तिने खाल्ली तर एका क्षणात ती उठून बसेल." पहिला बेडूक म्हणाला.

"चल, सोड या गप्पा!" दुसरा म्हणाला आणि त्याने पाण्यात उडी मारली. पहिला बेडूक गोळी तलावाच्या काठी टाकून देऊन उडी मारून तलावात निघून गेला.

सारंगने ती गोळी उचलून खिशात ठेवून घेतली.

तिघे जेवणखाण आटोपून काही वेळ झोपले आणि सूर्यास्ताच्या सुमारास पुढे निघाले. गावात पोचे पोचेतो चांगला काळोख पडला होता.

रात्रभर गावातल्या धर्मशाळेत उतरायचे त्यांनी ठरविले. पण धर्मशाळेचा मॅनेजर म्हणाला–"मला यावेळी त्रास देऊ नका.



गावप्रमुखाची बायको मरणाला टेकली आहे. मी वैद्याला बोलावून घेऊन जाण्यासाठी निघत आहे."

"मी सुद्धा एक वैद्यच आहे. मला घेऊन चला." सारंग म्हणाला.

धर्मशाळेच्या मॅनेजरने चकित होऊन त्याच्याकडे पाहिले. नंतर त्याला गावप्रमुखाच्या घरी घेऊन गेला. ती बाई बेशुद्ध होऊन पडली होती. सारंगने आपल्या खिशातली गोळी काढून तिच्या तोंडात टाकली आणि तिला थोडे पाणी पाजले. थोड्या वेळाने त्या बाईने डोळे उघडले. वैद्याने तिची नाडी पाहिली, ती जिवंत होती, एवढेच नव्हे तर तिची तब्येत छान सुधारली होती. म्हणाला–"आता काही भीती नाही, बाई वाचल्या."

त्यामुळे सर्व सारंगकडे कौतुकाने पाहू लागले. त्याच्या हाताला गुण आहे असे सर्वांना वाटले. गावप्रमुखाने त्या आनंदात सर्व गावकऱ्यांना मेजवानी दिली. सारंग रामपूरला जात आहे हे जेव्हां गावप्रमुखाला कळले तेव्हां त्याने त्याच्याबरोबर दोघां नोकरांना पाठविले आणि वाटेतल्या गावी सर्वांची उतरण्याची उत्तम सोय करून देण्यास त्यांना सांगितले.



दुसऱ्या दिवशी सर्व पुढे निघाले. एका गावाच्या धर्मशाळेत ते उतरले. धर्मशाळेत फार गर्दी होती. तरी सुद्धा तिघांच्या उतरण्याची उत्तम व्यवस्था झाली. जेवणखाण आटोपून सर्व आपल्या खोलीत झोपायच्या तयारीला लागले. पण त्यांना झोप आली नाही. कारण धर्मशाळेच्या बाहेर कुत्री भुंकत होती.

"ही कुत्री स्वस्थपणे झोपू देणार नाहीतसे वाटते!" सारंग बरोबर आलेले दोघे म्हणाले.

"असे कां म्हणता? ही कुत्री आमच्या फायद्याची आहेत. आज रात्री या धर्मशाळेत

       

चोर चोरी करायला येणार आहेत असे ती कुत्री म्हणत आहेत. एक चोर धर्मशाळेत उतरला आहे. मध्य रात्रीच्या सुमारास तो धर्मशाळेचे दार उघडणार आहे. नंतर इतर चोर आत शिरून दरवडा घालतील."

"हे खरे आहे म्हणतोस?" दोघांनी त्याला विचारले.

"जनावरे कधी खोटे बोलत नाहीत." सारंग म्हणाला.

धर्मशाळेत उतरलेल्या सर्व प्रवाश्यांना सावध राहण्यास सांगण्यात आले. मध्य रात्रीच्या सुमारास धर्मशाळेच्या मॅनेजरनेच स्वतः दार उघडून चोरांना आत शिरू दिले. सर्व झोपल्याचे सोंग करून पडले होते. चोरांनी धर्मशाळेत पाऊल टाकल्याबरोबर सर्वांनी मिळून चोरांना पकडले. त्यांच्या बरोबर धर्मशाळेचा मॅनेजर पण कैद झाला.

दुसऱ्या दिवशी सारंग त्या दोघां वडील-धाऱ्यांबरोबर पुढे निघाला. दुपारच्या सुमारास ते एका ओढ्याच्या काठी येऊन पोचले. खाऊन पिऊन ते विश्रांती घेत असतां सारंग दोघांना म्हणाला—"ओढ्यातले मासे आपल्याविषयी बोलत आहेत."

"काय म्हणत आहेत ते?" दोघांनी विचारले.

"ते म्हणत आहेत, आपल्यापैकी कोणी तरी एक मंत्री होणार आहे, म्हणे!" सारंग म्हणाला.

दोघांना फार आनंद झाला. त्यां दोघांना वाटले की त्यांच्यापैकी कोणी तरी मंत्री होणार. परंतु तिघें जेव्हां रामपुर पोचले तेव्हां मंत्रीपद सारंगसाठी वाट पाहात असल्याचे कळले. कारण सारंगने गाव-प्रमुखाच्या बायकोला कसे वांचविले व चोरांना पकडवून देण्यासाठी त्याने कशी सूचना केली हे राजाला दूतांकरवी प्रथमच कळले होते. म्हणून राजाने सारंगलाच मंत्री केले.





# महाभारत

पुत्रअपत्य प्राप्तीची इच्छा मनात बाळगून द्रुपद राजा मुनींच्या दर्शनास निघाला. त्याने प्रत्येक आश्रमात जाऊन पुत्र व पुत्रीची कामना असल्याचे निवेदन केले. पुत्र जन्मल्यास त्याच्या हातून द्रोणाचार्यांचा वध व्हावा व पुत्री जन्मल्यावर तिचा विवाह अर्जुनाशी व्हावा अशी कामना पण त्यांनी व्यक्त केली. भ्रमण करीत करीत द्रुपद राजा गंगा यमुना नदीच्या संगमां-जवळच्या एका आश्रमात आला. त्या आश्रमात याज व उपयाज नावाचे काश्यप गोत्री दोघे भाऊ रहात असत. दोघे सूर्योपासनेत निमग्न असत. दोघां पैकी उपयाज मोठा तपस्वी असावा असे द्रुपदाला वाटले. म्हणून द्रुपद त्याची सेवा करू लागला.

एकदां द्रुपद राजा एकांत स्थानी उपयाज मुनीचे पाय दाबीत बसला होता. त्याने उपयाज मुनी प्रसन्न असल्याचे पाहून निवेदन केले—"मुनिवर्य! द्रोणाने माझा अपमान केला आहे. मी किंवा इतर राजे द्रोणाचा वध करण्यास असमर्थ आहो. म्हणून आपण माझ्यावर अनुग्रह करून मला द्रोणाचार्यांचा वध करू शकणारा पुत्र होईल असा यज्ञ करावा. मी आपण मागाल तितक्या गाई देण्याचे वचन देतो."

त्याला उपयाज म्हणाला—"मला कोणत्याही वस्तूची गरज नाही. मी असल्या कामामध्ये कोणाला मदत करीत नसतो."

परंतु ते उत्तर ऐकूनदेखील द्रुपद निराश झाला नाही. उलट आणखी जास्तच श्रद्धा



व भक्तीने तो उपयाज मुनींची सेवा करू लागला. एक वर्ष असेच लोटले. एकदा उपयाज ऋषींनीच द्रुपदाला म्हटले–"राजा! तू माझी सेवा ज्या हेतूने करीत आहेस तो पूर्ण होण्यास माझ्याकडून तुला काही मदत मिळणार नाही. तू माझा भाऊ याज याच्याकडे जा. त्याला असंख्य गाई देण्याचे वचन दे. कदाचित तो तुझी इच्छा पूर्ण करील. तो स्वभावाने थोडा लोभी आहे. एकदा लोभाला बळी पडून त्याने धाणीत पडलेले फळ देखील खाल्ले होते. गुरुकुल वास करीत असतां त्याने खाण्यापिण्यात शुद्धाशुद्धतेचा विचार ठेवला नव्हता. जे मनाला वाटेल ते खात असे."

उपयाज म्हणाला ते ऐकून द्रुपद याज मुनींच्या आश्रमात गेला. त्याने याज मुनींना नमस्कार करून ऐंशी हजार गाई दिल्या व मनातली इच्छा प्रगट केली.

याजने द्रुपदाची इच्छा पूर्ण करण्याचे मान्य केले. त्याने यज्ञाला आवश्यक सर्व सामुग्री जमविली आणि 'पुत्रकामेष्टी' यज्ञ सुरू केला. याजने होम करून हवि हातात घेतला. नंतर द्रुपदाची राणी कोकिळाला बोलावून म्हणाला–"तू हा हवि ग्रहण कर. तुझ्या पोटी एक मुलगा व मुलगी जन्माला येतील."

तेव्हां कोकिळादेवी म्हणाली–"मुनिवर्य! थांबा, मी स्नान करून लवकर परत येते."

"मी व माझा भाऊ दोघांनी यज्ञ करून जो हवि मिळविला तो फक्त तुझ्या मर्जी-खातर फुकट घालवू का? पाहिजे तर ग्रहण कर नाही तर सोडून दे." असे सांगून याजने हवि अग्नीत टाकला.

अग्निकुंडातून त्याच वेळी एक योद्धा रथारूढ होऊन एका हातात तलवार व दुसऱ्या हातात धनुष्यबाण घेऊन सिंह-गर्जना करीत बाहेर आला. त्याच्या





डोक्यावर रत्नखचित मुकुट होता. पाहतां पाहतां तो अदृश्य झाला.

त्यानंतर त्याच अग्निकुंडातून एक तेजस्विनी स्त्री निघाली. अशा तऱ्हेने द्रुपदाला एक मुलगा व एक मुलगी यांची प्राप्ती झाली. ते पाहून पांचाल देशाची प्रजा फार फार खूष झाली.

तोंपर्यंत कोकिळा स्नान करून आली. तिने याज व उपयाजजवळ विनंती करून अग्निकुंडात जन्मलेला मुलगा व मुलगी दोघांची माता होण्याचा वर मिळविला.

ब्राह्मणांनी द्रुपदाच्या मुलाचे धृष्टद्युम्न व मुलीचे कृष्णा अशी नावे अनुक्रमे ठेवली. मुलगी थोडी काळी होती, म्हणून तिचे कृष्णा असे नाव ठेवण्यात आले होते. द्रुपदाने याज याला असंख्य गाई दान केल्या आणि ब्राह्मणांना अलोट धन दान करून कांपिल्य नगरास परत आला.

पुढे काही दिवसांनी द्रुपदाने धृष्टद्युम्नाला द्रोणाकडे अस्त्रविद्येचा अभ्यास करण्यासाठी पाठविले. द्रोणाने इच्छा नसून ही अपकीर्ती होऊ नये म्हणून धृष्टद्युम्नाला अस्त्रविद्या शिकविली.

द्रुपदाची मुलगी द्रौपदी लग्नायोग्य झाली. तिचा विवाह अर्जुनाशीच व्हावा अशी इच्छा द्रुपदाच्या मनात सुरवाती-पासूनच होती. परंतु पांडव लाक्षागृहात जळून गेल्याची वार्ता ऐकल्यामुळे त्याला निराश व्हावे लागले. त्याने आपल्या नातेवाईकांना मंत्री व पुरोहित या सर्वांना बोलवून त्यांचा सल्ला विचारला.

तेव्हां द्रुपदावर फार कृपा असलेल्या एका पुरोहिताने राजाला सुचविले की महाराजा मला असे वाटत आहे की पांडव सुरक्षित कोठे तरी अज्ञातवास करीत आहेत. मला काही सूचक असे शुभशकुन घडल्याचे आढळून आले. त्यावरून ते सुखी असावेत असेच मला वाटते. तेव्हां आपण



काळजी करण्याचे कारण नाही. आपण द्रौपदीच्या स्वयंवराची गोष्ट जाहीर करावी. ती बातमी कळल्यावर पांडव नक्की स्वयंवराला हजर होतील. राज-कन्यांचे स्वयंवर शास्त्रसंमत आहेच!

त्या प्रमाणे स्वयंवर करण्याचे ठरले. साडेतीन महिन्यानंतर स्वयंवराचा मुहूर्त ठेवण्यात आला. स्वयंवरासाठी एक विशिष्ट धनुष्य तयार करविण्यात आले. वर छप-राला टांगून एक मासा ठेवण्यात आला.

एकचक्रपुर गावी पांडव ज्या ब्राह्मणाच्या घरी रहात असत त्या ब्राह्मणाकडे कोणी पाहुणा त्याच सुमारास आला. त्याने द्रौपदीच्या स्वयंवराची गोष्ट पांडवांना सांगितली व म्हणाला—"सर्व देशांचे राजे व राजकुमार द्रौपदीच्या स्वयंवरासाठी कांपिल्य नगरी जात आहेत."

गुरु द्रोणाचार्यांचा वध करणारा पुरुष जन्मला असल्याची गोष्ट ऐकून पांडवांना फार वाईट वाटले. परंतु विधिलिखित कधी टळत नाही, या गोष्टीचा विचार करून त्यांनी स्वतःच्या मनाचे समाधान करून घेतले. द्रौपदीच्या स्वयंवराला हजर राहण्याची इच्छा त्यांच्या मनात पण उत्पन्न झाली. तेव्हां कुंती पांडवांना म्हणाली—"मुलांनो! आतां एकचक्रपूरला रहायला लागून आपल्याला बरेच दिवस झाले. याच एका गावात राहून भिक्षा मागून उदर निर्वाह करणे काही दिवसांनी कठीण जाईल. आपण पांचाल देशात जाऊन राहू या. तो देश सुखी व समृद्ध आहे. तसे कांपल्य नगर सुंदर पण आहे. द्रुपद राजा ब्राह्मणांचा आदर करतो."

युधिष्ठिराला आईचा सल्ला पसंत पडला. त्याने आपल्या धाकट्या भावा-बरोबर एकचक्रपुराहून निघण्याचे ठरविले आणि त्यांना आश्रय देणाऱ्या कुटुंबाचा निरोप घेऊन पांडव निघाले.





पांडव प्रवास करीत एक दिवशी मध्य रात्रीच्या सुमारास गंगानदीकाठच्या सोम-श्रव नामक तीर्थस्थानी आले. चारी बाजूला गडद अंधकार होता. सर्वांच्या पुढे अर्जुन एक जळत लाकूड घेऊन जात होता. गंगानदीत आंघोळ करण्यासाठी ते नदीवर गेले. त्यावेळी अंगारपर्ण नावाचा एक गंधर्व आपल्या स्त्रियांसह जलक्रीडा करीत होता. कोणीतरी मानवजातीतले येत आहेत हे पाहून त्याने त्यांना दरडावून विचारले—"कोण येते आहे ते? निघून जा इकडून! हे वन माझे आहे. माझे नाव अंगारपर्ण गंधर्व. मी कुबेराचा मित्र आहे. या शिवाय ही वेळ यक्ष, गंधर्व व राक्षस यांच्या संचारासाठी नेमलेली आहे. मनुष्य जातीला या प्रदेशात संचार करण्यास या वेळी मनाई आहे."

ते ऐकून अर्जुन म्हणाला—"मूर्ख, दुष्टा! हिमालय व गंगानदी कोणाच्या स्वतःच्या मालकीची होऊ शकतात का? यांवर संचार करण्यास सर्वांस सारखा हक्क आहे. गंगेचे दर्शन करून आंघोळ सर्वांनी करावे असे शास्त्र आहे, मग ती सकाळ असो की संध्याकाळ असो किंवा रात्र असो. म्हणून आम्ही गंगेत स्नान केल्याशिवाय पुढे जाणार नाही."

अर्जुनाच्या तोंडचे ते उत्तर ऐकून अंगार-पर्ण गंधर्वाला राग आला. त्याने अर्जुनावर शरवृष्टी सुरू केली. अर्जुनाने जळते लाकूड आडवे धरून बाण अडविले व म्हणाला—"हे गंधर्वा! तू आपल्या या बाणांनी का आम्हांला अडविणार आहेस? आम्ही कोण आहो असे तुला वाटले? आमच्या जवळ तुझी डाळ शिजणार नाही, लक्षात असू दे." असे सांगून अर्जुनाने आग्नेयास्त्र सोडले. त्यामुळे गंधर्वाचा रथ जळून गेला आणि गंधर्व बेशुद्ध होऊन जमिनीवर पडला.

त्या वेळी गंधर्वाची स्त्री कुंभीनसी हिने युधिष्ठिराजवळ क्षमाप्रार्थना करून आपल्या

पतीला जीवदान देण्यास सांगितले. तेव्हां युधिष्ठिर अर्जुनाला म्हणाला–"अर्जुना! ही स्त्री आपल्या जवळ पतीच्या प्राणाची भिक्षा मागत आहे. म्हणून तू त्याला सोड."

अर्जुनाने आपल्या वडील भावाच्या आज्ञेने गंधर्वाला जीवदान देऊन सोडून दिले.

गंधर्व शुद्धीवर आल्यानंतर अर्जुनाला म्हणाला–"माझा पराभव तुझ्या हाती झाला आहे. मी आपले अंगारपूर्ण हे नाव सोडून देऊन दुसरे नाव धारण करतो. तू माझा रथ जाळून टाकला आहेस. म्हणून मी स्वत:साठी एका विचित्र रथाची सृष्टी करतो व आजपासून माझे नाव चित्ररथ असे राहील. तू महानवीर आहेस. म्हणून मी तुला 'चाक्षुसी' नामक विद्या शिकवून देतो. त्या विद्येच्या सहाय्याने तुला त्रिलोकात केव्हां, कोठे व काय घडत आहे हे कळेल. ही मंत्रशक्ती माझ्याजवळ आहे. म्हणून देव आम्हांला काही अपाय करू शकत नाहीत. या विद्येबरोबर मी तुला काही अमोघ अस्त्रपण देतो. तुझ्या सर्व भावांना प्रत्येकी शंभर शंभर अश्व देतो."

अर्जुन म्हणाला–"मी किंवा माझे बंधू कोणाकडून कोणते ही दान किंवा भिक्षा ग्रहण करीत नाही."



"तर मग तू असे कर, तू मला काही दे व त्याबद्दल मी देईन ते ग्रहण कर." गंधर्व म्हणाला.

गंधर्वाला आग्नेयास्त्राचा मंत्र शिकवून अर्जुनाने त्याच्या कडून अश्व घेण्याचे कबूल केले.

शेवटी गंधर्व अर्जुनाला म्हणाला–"तुम्ही क्षत्रिय आहां, म्हणून तुम्हांला एक ब्राह्मण पुरोहित म्हणून असला पाहिजे. तो तुम्ही नेमावा. तो सल्ला देईल तसे तुम्ही वागावे. म्हणजे तुमचे हितच होईल."

अर्जुन चित्ररथ गंधर्वाला अग्नेयास्त्राचा मंत्रोपदेश करून म्हणाला–"तूर्त तू घोडे

आपल्याच जवळ ठेवून घे, मला वाटतील तेव्हां मी मागवून घेईन." त्यानंतर पांडव गंधर्वाचा निरोप घेऊन पुढे निघून गेले.

गंगेच्या काठाने चालत चालत पांडव उत्कोच क्षेत्री आले. तेथे धौम्य ऋषी तपश्चर्या करीत होते. पांडवांनी त्यांना नमस्कार करून विनंती केली की त्यांनी पांडवांचे पौरोहित्य स्वीकारावे. धौम्य ऋषींनी पांडवांचा पराक्रम, उत्साह व शक्तिसामर्थ्य पाहून त्यांचे पौरोहित्य स्वीकारले. धौम्य ऋषींनी पौरोहित्य स्वीकारल्यामुळे पांडव निश्चिंत झाले.

त्याच वेळी धौम्य ऋषींच्या आश्रमात द्रौपदीच्या स्वयंवराला निघालेले काही लोक आले. मातेबरोबर स्वयंवर समारंभ पाहण्याची इच्छा असल्याचे पांडवांनी त्यांना सांगितले. ब्राह्मण वेषधारी पांडवांकडे पाहून त्या लोकांनी त्यांच्याविषयी चवकशी केली. "तुम्ही कोण, कोठून आलात आणि कोठे जाणार?"

पांडव म्हणाले–"आम्ही एकचक्रपुर गावाहून आलो आणि कांपिल्य नगरी जात आहो."

"आम्ही तिकडेच निघालो आहो. तेथे द्रुपद महाराजांची कन्या द्रौपदी हिचे स्वयंवर आहे. द्रौपदी फार देखणी व सुंदर आहे, म्हणून स्वयंवरात भाग घेण्यासाठी दूरदूरून क्षत्रियवीर येत आहेत. स्वयंवरास येणाऱ्या ब्रह्मवृंदास द्रुपद गोदान करीत आहे. सुवर्णदान व अन्नदान पण करणार आहे असे ऐकतो. चला तर आपण सर्व बरोबरच जाऊ." ते लोक ब्राह्मण वेषधारी पांडवांना म्हणाले.

त्यांच्या बरोबर पांडव कांपिल्य नगरीला निघाले.





# गांधींचे चरित्र

[ १२ ]

१९३४ साली सविनय कायदेभंगाची चळवळ बंद पडली. म्हणून सरकारने राष्ट्रीय महासभेवरची बंदी काढून टाकली. त्यानंतर गांधीजींनी राजकीय कार्यातून आपले अंग काढून घेतले आणि ग्रामोद्धाराच्या कार्यास स्वतःस वाहून घेतले.

१९३७ साली नवीन राज्य घटना अमलात आली. घटनेच्या तज्ज्ञ लोकांना वाटले की या घटनेनुसार भारत हळूहळू शासनसूत्रे आपल्या हातात घेऊ शकेल.

काँग्रेसने अनेक प्रांतात शासनाधिकार स्वीकारून मंत्रिमंडळे स्थापन केली. त्यामुळे काँग्रेस आणि मुस्लिमलीग यांच्यात मतभेद वाढत गेला. १९३९ मध्ये दुसरे जागतिक युद्ध सुरू झाले.

महायुद्ध सुरू झाल्यानंतर दहा दिवसांनी काँग्रेसने एका ठरावान्वये काँग्रेसने नाझी अत्याचाराखाली चिरडून निघालेल्या लोकांविषयी सहानुभूती प्रगट केली. त्याच ठरावात, ब्रिटीश सरकारने लोकशाही विषयी आपले विचार स्पष्टपणे प्रगट करावे असे नमूद करण्यात आले होते. तसे केले तरच भारतीयांचा पूर्ण सहकार सरकारला मिळेल. थोडक्यात याचा अर्थ असा होता की इंग्रजांना भारतीय प्रजेची मदत हवी असेल तर त्यांनी भारतीयांना स्वातंत्र्य दिले पाहिजे.

परंतु इंग्रज भारतीयांना स्वातंत्र्य देण्यास कबूल नव्हते. म्हणून काँग्रेसचे पुढारी चळवळीची तयारी करू लागले. परंतु गांधीजींनी व्यक्तिगत सत्याग्रहालाच परवानगी दिली होती. १७ ऑक्टोबर १९४० या रोजी व्यक्तिगत सत्याग्रहाची चळवळ सुरू करण्यात आली. अडीच महिन्यात



# ज्ञानाचा प्रकाश

एका गावी अंबादास नावाचा एक शेतकरी रहात असे. त्याच्या शेजारी अंबू मावशी नावाची एक बाई झोपडी बांधून तीत रहात असे. ती आपल्या अंगणात व परसात फुल-झाडे लावून फुले येत ती विकत असे. त्यावर तिला पोटापाण्यापुरते पैसे मिळत. अंबूमावशीला पाच वर्षांचा एक नातू होता.

अंबादासाला एकदा अंबूमावशीचे अंगण आपल्या अंगणात मिळवून घ्यावे असे वाटले. त्याने अंबूमावशीला भेटून तसे विचारले. म्हणाला—"मावशी! मी आपले अंगण थोडे मोठे करावे म्हणतो. तुम्ही तुमची ही थोडीशी जमीन मला देऊन टाका. तुम्हाला चार पैसे मी नक्कीच देईन."

ती म्हणाली—"बाबा! मला व माझ्या नातवाला टेकायला आहे ती एवढीच जमीन व झोपडे. माझी सून, मुलगा व त्याचे बाबा याच झोपडीत आम्हांला सोडून गेले. माझा देह मी येथेच सोडला तर माझ्या आत्म्याला थोडी शांती मिळेल."

अंबादासाने अनेक प्रकारे म्हातारीची समजूत घालण्याचा यत्न करून पाहिला, पण काही उपयोग झाला नाही. तेव्हां रागावून दटावून म्हणाला—"उद्या संध्या-काळपर्यंत तू ही झोपडी रिकामी केली नाहीस तर पहा!"

"मी आपली झोपडी रिकामी करु, म्हणतो? ती कां? मी येथून हलणार नाही. पाहते, तू काय करतोस ते!" म्हातारीने तितक्याच कडक आवाजात उत्तर दिले.

अंबादासने म्हातारीला बळजबरीने तिच्या झोपडीबाहेर हाकलून द्यायचे ठरविले. त्याने नोकरांकरवी म्हातारीचे सामान झोपडीबाहेर फेकविले आणि झोपडी पाडून टाकली.

श्री विनयकुमार म. जोशी

म्हातारी गावच्या सरपंचाकडे अंबादास विरुद्ध फिर्याद केली. पंचांनी अंबादासला बोलावून चवकशी सुरु केली.

अंबादासने पंचासमोर आपली जबानी दिली. तो म्हणाला—"या म्हातारीच्या मुलाने माझ्या जवळून शंभर रुपये कर्जाऊ घेतले होते. त्याने मला कर्जरोखा लिहून दिला होता. परंतु या म्हातारीने मुद्दल तर सोडाच व्याजसुद्धा दिले नाही. मी कर्जाच्या वसूलीसाठी तिची झोपडी ताब्यात घेतली." असे सांगून त्याने एक कर्जरोखा पंचांसमोर सादर केला. त्यावर एक अंगठ्याचा ठसा पण होता.

पंचांनी तो कर्जरोखा खरा मानून अंबादासच्या बाजूने निवाडा दिला. म्हातारीवर तो अन्यायच झाला.

त्यानंतर म्हातारी दुसऱ्या एका जागी आपली झोपडी बांधून राहू लागली. पहिल्या सारखीच फुले विकून तीवर आपला उदर निर्वाह चालवू लागली.

काही दिवस लोटले. अंबादास म्हातारी-कडून काढून घेतल्यावर त्या जमिनीवर एक घर बांधण्याच्या हेतूने पाया खणू लागला. पाय खणण्याचे काम चालू होते. म्हातारी नातवाला घेऊन आलेली पाहून अंबादासला आश्चर्य वाटले. त्याने तिला पाहताच



विचारले–"काय मावशी! कसे काय, बरं आहे ना? आज इकडे कशा काय?"

"तुम्ही श्रीमंत, मी गरीब अनाथ म्हातारी. माझ्यावर थोडी कृपा दृष्टी ठेवा. एक मदत मागायला आले आहे." म्हातारी म्हणाली.

"कसली मदत, विचाराल तरी!" अंबादास म्हणाला.

"माझा नातू रोज आपली जुनी झोपडी दाखव म्हणून हट्ट धरून बसतो. म्हणून आले होते त्याला दाखवायला." म्हातारी म्हणाली.

"मग दाखविलीत ना जागा! मग आणखी काय?" अंबादासने विचारले.

"जाते, माझ्या जमिनीतली टोपलीभर माती घेऊन जाते, देता का? त्या मातीची चूल करून घ्यावी म्हणते! त्या चुलीवर सैपाक करून चार घास मिळाले म्हणजे मनाचे समाधान होईल." म्हातारी म्हणाली.

म्हातारी म्हणाली ते ऐकून अंबादास हसू लागला. म्हणाला–"टोपलीभर मातीच ना! घेऊन जा!"

म्हातारीनें टोपलीभर माती घेतली आणि म्हणाली–"मालक! जरा हात लावता का टोपलीला? पुण्य लागेल तुम्हांला!"

अंबादासने टोपली उचलायला हात लावला. पण टोपली उचलवेना. त्याने पुष्कळ प्रयत्न करून पाहिला, घामाघूम झाला, पण टोपली उचलवेना.

म्हातारी जोरजोराने हसू लागली आणि म्हणाली–"एक टोपलीभर माती उचलवत नाही आणि ही सर्व माती तू बरोबर उचलून घेऊन कसा काय जाणार आहेस बुवा!"

अंबादासाची मान शरमेने खाली झाली. त्याच्या डोळ्यात ज्ञानाचा प्रकाश पडला. आपली चूक त्याच्या लक्षात आली. त्याने त्याच जागेवर घर बांधून झाल्यावर ते म्हातारीला देऊन टाकले.





# पश्चात्ताप

फार जुनी गोष्ट आहे, एका गावी दोन मित्र रहात असत. गोपाल दयाळू व उदार स्वभावाचा होता आणि त्याचा मित्र कृष्णाजी चिक्कू स्वभावाचा होता. गोपाळला मूलबाळ काही नव्हते. म्हणून त्याने तीर्थयात्रा करण्याचे ठरविले. त्याच्या जवळ चारशे अशरफी रोख होत्या. त्याने प्रवासासाठी शंभर अशरफी बरोबर घेतल्या आणि बाकी तीनशे कोठे तरी ठेवून द्यायचे ठरविले. परंतु कोठे व कशा ठेवायच्या हे त्याला कळेना. म्हणून त्याने कृष्णाजीचा सल्ला विचारला.

"मी तुझ्या अशरफी आपल्याजवळ ठेवून घ्यायला तयार नाही रे, बाबा! माझ्या मते गांवाबाहेरच्या वडाखाली त्या पुरून ठेव." कृष्णाजीने सल्ला दिला.

गोपाळला तो सल्ला पसंत पडला. परंतु त्याला एक शंका वाटली, दिवसा झाडाखाली पुरून ठेवल्या तर लोकांच्या नजरेस ती गोष्ट येईल आणि मग कोणीतरी उचलून नेईल. म्हणून त्याने रात्री सर्व झोपल्यावर आपला ठेवा पुरून ठेवण्याचे ठरविले. परंतु त्याला एकट्याने गावाबाहेर वडाच्या झाडाखाली जायला धीर होईना. म्हणून त्याने सोबतीला कृष्णाजीला बरोबर घेतले. तीनशे अशरफी पुरून ठेवल्या व पहाटे उठून काशीयात्रेला निघून गेला.

नवरा रात्री उशिरा आलेला पाहून कृष्णाजीच्या बायकोने उशिरा येण्याचे कारण विचारले. त्याने गोपाळच्या अशरफी पुरून ठेवल्या असल्याची गोष्ट सांगितली. ते ऐकून कृष्णाजीच्या बायकोला त्या उखलून आणण्याचा लोभ उत्पन्न झाला. तिने नवऱ्याला तसे सुचविले. कृष्णाजीला ते पटले नाही. पण बायको हट्टालाच पेटली व विहिरीत जीव द्यायला निघाली तेव्हां

सौ. लीला देशपान्डे








विचारले–"काय मावशी! कसे काय, बरं आहे ना? आज इकडे कशा काय?"

"तुम्ही श्रीमंत, मी गरीब अनाथ म्हातारी. माझ्यावर थोडी कृपा दृष्टी ठेवा. एक मदत मागायला आले आहे." म्हातारी म्हणाली.

"कसली मदत, विचाराल तरी!" अंबादास म्हणाला.

"माझा नातू रोज आपली जुनी झोपडी दाखव म्हणून हट्ट धरून बसतो. म्हणून आले होते त्याला दाखवायला." म्हातारी म्हणाली.

"मग दाखविलीत ना जागा! मग आणखी काय?" अंबादासने विचारले.

"जाते, माझ्या जमिनीतली टोपलीभर माती घेऊन जाते, देता का? त्या मातीची चूल करून घ्यावी म्हणते! त्या चुलीवर सैपाक करून चार घास मिळाले म्हणजे मनाचे समाधान होईल." म्हातारी म्हणाली.

म्हातारी म्हणाली ते ऐकून अंबादास हसू लागला. म्हणाला–"टोपलीभर मातीच ना! घेऊन जा!"

म्हातारीने टोपलीभर माती घेतली आणि म्हणाली–"मालक! जरा हात लावता का टोपलीला? पुण्य लागेल तुम्हांला!"

अंबादासने टोपली उचलायला हात लावला. पण टोपली उचलवेना. त्याने पुष्कळ प्रयत्न करून पाहिला, घामाघूम झाला, पण टोपली उचलवेना.

म्हातारी जोरजोराने हसू लागली आणि म्हणाली–"एक टोपलीभर माती उचलवत नाही आणि ही सर्व माती तू बरोबर उचलून घेऊन कसा काय जाणार आहेस बुवा!"

अंबादासाची मान शरमेने खाली झाली. त्याच्या डोक्यात ज्ञानाचा प्रकाश पडला. आपली चूक त्याच्या लक्षात आली. त्याने त्याच जागेवर घर बांधून झाल्यावर ते म्हातारीला देऊन टाकले.



स्वतःला सावरून म्हणाला–"कसे काय गोपाळ? कशी झाली काशीयात्रा?"

"होय बुवा! तुझ्या कृपेने यात्रा तर फार छान झाली. बरं तर आता पुन्हा एकदा आपण दोघे मिळून त्या वडाच्या झाडापर्यंत गेले पाहिजे! कारण या खेपेस देवाच्या कृपेने मला एक हजार अशरफी आणखी मिळाल्या आहेत. त्या अशरफी जुन्या अशरफीबरोबर ठेवून मी रामेश्वरच्या यात्रेला जावे, म्हणतो. उद्या रात्री मी तुझ्या घरी येतो. आपण दोघे त्या वडाच्या झाडाजवळ जाऊ." गोपाळ म्हणाला.

गोपाळ म्हणाला ते ऐकून कृष्णाजी घाबरून गेला की दोघांना पुन्हा वडाच्या झाडाखाली जावे लागणार. पण काय करणार? होकार देऊन त्याने गोपाळला परत पाठविले. नंतर आपल्या बायकोला म्हणाला–"आता उद्या मी वडाच्या झाडाजवळ कोणते तोंड घेऊन जाऊ? चोरी सापडणार? तू माझे ऐकले नाहीस, आणि उगाच हट्ट केलीस!"

"एवढ्या एवढ्याशा गोष्टीसाठी तुम्ही इतके घाबरता काय? माझे सर्व जुनेनवे दागिने गहाण ठेवून तीनशे अशरफी घेऊन या. त्या पाहून गोपाळला धीर येईल आणि तो एक हजार अशरफी तेथे पुरून ठेवील.



तो रामेश्वरला निघून गेल्यावर आपण त्या सर्व अशरफी काढून घेऊन येऊ." कृष्णाजीची बायको म्हणाली.

कृष्णाजी आपल्या बायकोच्या चातुर्याची स्तुती करू लागला. त्याने तिचे दागिने एका सावकाराकडे गहाण ठेवून दिले आणि तीनशे अशरफी आणून वडाच्या झाडाखाली पुरून ठेवल्या.

दुसऱ्या दिवशी रात्री गोपाळच्याबरोबर जाण्यासाठी कृष्णाजी गोपाळची वाट पहात बसला. पण गोपाळ आला नाही. मध्यरात्र उलटून गेली होती. कृष्णाजीने गोपाळच्या घरी जाऊन दाराची कडी वाजविली. गोपाळ उठून बाहेर आला आणि विचारू लागला—"काय रे कृष्णाजी! इतकी रात्र उलटून गेल्यावर कसा काय आलास?"

"अरे तूच आज रात्री वडाच्या झाडाखाली जाऊ, नव्हतास का म्हणालास?" कृष्णाजीने विचारले.

"असे होय! मला वाटले की उद्यां सकाळी तुला भेटून खरी गोष्ट सांगावी. अरे मी रामेश्वरची यात्रा काही दिवस पुढे ढकलली आहे. म्हणून मी काल संध्याकाळीच फिरत फिरत वडाच्या झाडाखाली गेलो आणि पुरलेल्या अशरफी घेऊन आलो." गोपाळ म्हणाला.

कृष्णाजीला ते उत्तर ऐकून घेरीच आल्यासारखे वाटले. तो निराश होऊन घरी परतला आणि घडले ते सर्व बायकोला सांगितले.

"देवा! काय रे केलेस हे? आमची केवढी चूक? पाचशे अशरफी किमतीचे दागिने फक्त तीनशे अशरफी घेऊन गहाण ठेवले होते. आतां ते कसे सोडवायचे?" असे म्हणत गोपाळची बायको छाती बडवून रडू लागली. कृष्णाजीला चांगलीच अक्कल घडली व केलेल्या चुकीबद्दल तो पश्चात्ताप करू लागला.





# पडकें देऊळ

[ २८ ]

[ शिखीमुख व त्याच्या साथीदारांनी रात्री एका लहानशा द्वीपात रात्र काढली. पुजाऱ्याचा एक नोकर शिखीमुखच्या नावा बुडविण्याचा प्रयत्न करीत असता नागशोभने व लाल कुत्र्याने ते ओळखून त्या नोकराला ठार केले. त्या नंतर चार दिवस प्रवास केल्यावर ते वृश्चिक द्वीपावर पोंचले. तेथे शिखीला व विक्रमला एक ओसाड देऊळ दिसले. पुढे— ]

टेकडीच्या टोकावरून त्यांना जे ओसाड देऊळ दिसले त्या बाजूला दोघे निघाले. वृश्चिक द्वीपापर्यंत पोंचण्यास त्यांना अपार संकटांना तोंड द्यावे लागले होते. परंतु इतक्या सहजी ते देऊळ सापडेल याची कल्पना स्वप्नातही त्यांनी केली नव्हती.

सूर्यास्ताची वेळ होती. काळोख पडू लागला होता. ते दोघे देवळापर्यंत येऊन पोचले. परंतु देवळात पाऊल टाकल्यावर त्यांना निराशा वाटली. ते देऊळ ओसाड व पडायला झाले होते हे खरे आहे. परंतु महाराज विक्रमसिंहांना वाटले होते तसे शिल्पकलेचे उत्तमोत्तम नमुने त्यांत नव्हते व ते सोन्याने मढवलेले पण नव्हते. सर्व देऊळ दगडाने बांधलेले होते. गाभाऱ्यात कालीमातेची मूर्त होती, ती एका बाजूला थोडी झुकलेली होती. भिंतीतल्या कोनाड्यात काही प्रकार मूर्ती होत्या. त्या



आडव्या तिडव्या पडलेल्या होत्या. शिखी व विक्रमला वाटले की त्या बहुतेक भूकंपामुळे अशा पडल्या असतील. पडक्या देवळासंबंधी त्यांनी जी कल्पना करून ठेवली होती तसे ते देऊळ नव्हते.

"विक्रम ! मला वाटते, आपण ज्या देवळाच्या शोधार्थ इतके दूर कष्ट सहन करून आलो ते देऊळ हे नव्हे. तुझ्या आजोबांनी ज्या देवळाविषयी ऐकले होते आणि इम्युजातीच्या लोकांनी त्याचे जसे वर्णन केले होते त्या प्रमाणे या देवळात शिल्पकलेचे नमुने असायला हवे होते. त्याच प्रमाणे सोन्याच्या रंगाने डोळे दिपवून टाकणारे असेदेखील काही नाही." शिखीमुख म्हणाला.

विक्रमकेसरी शिखीमुख जे म्हणाला ते बरोबर असल्याबद्दल होकारार्थी मान हलवून मूर्तीजवळ गेला. त्याच वेळी एक विंचू मूर्तीच्या मागून बाहेर आला व भिंतीकडे जाऊ लागला. तो सामान्य विंचवांपेक्षा दहा बारा पट मोठा होता. विक्रमने त्याला मारण्यासाठी तलवार उपसली. त्या बरोबर मूर्तीच्या मागून तसेच मोठे आणखी दोन विंचू बाहेर आले.

शिखीमुख विक्रमला अडवून म्हणाला— "विक्रम आपण असे किती विंचू मारणार? ह्या द्वीपाचे नावच वृश्चिक द्वीप आहे. आपण हे राक्षसी विंचू मारीत बसलो तर आपल्याला दुसरे काम करायला वेळ कोठून मिळणार? आपण आपले कर्तव्य विसरतां कामा नये. म्हणून चल येथून निघून जाऊ."

"बरोबर आहे तुझे म्हणणे. या विंचवांच्या वाटेस न जाण्यातच शहाणपण आहे. हे आपण हुडकत असलेले पडके देऊळ नव्हे." विक्रमकेसरी म्हणाला.

शिखीमुख मान खाली करून विचार करीत देवळाबाहेर आला. चहूकडे पसरलेली पर्वतश्रेणी पाहून म्हणाला—"त्या देवळाचा शोध काढण्यासाठी हे सर्व डोंगर व खोरी पालथी घालावी लागतील. परंतु फार सावधगिरीनें आपण आपले काम केले पाहिजे. कारण तो पुजारी आपला वध करण्यासाठी लपून बसलेला आहे. केव्हां कसा घात करील सांगता येणार नाही."

"शिखी ! मला वाटते की पुजारी आपल्या आधीच या बेटावर येऊन पोचला असावा. तो पडक्या देवळात पोचून तेथल्या सर्व अमूल्य वस्तु उचलून पळून तर गेला नसेल ?" विक्रमने विचारले.

ते ऐकून शिखीमुख स्मित करून म्हणाला—"संशय करून शंका काढीत बसण्यात काय अर्थ आहे ? उद्या उजाडल्या बरोबर आपण पडक्या देवळाच्या शोधार्थ निघू. वाटेंत कोठे तो पुजारी भेटला तर त्याला यमसदनाला पाठवू. पुजारी पडक्या देवळाजवळ पोचला असेल असे मला नाही वाटत."

त्यानंतर दोघे काही बोलल्याशिवाय मौनपणे त्यांच्या नावा होत्या तेथे परत आले. त्यांनी आपल्या अनुयायाना पुढे काय करावयाचे हे समजावून सांगितले. ते ऐकून नांगसोम म्हणाला—"असली पडकी देवळे या बेटात किती तरी असतील." तो



असे ही म्हणाला की कधी काळी दस्यु-जातीचे सहस्रावधी लोक या प्रदेशात रहात असत. आजची स्थिती त्याला ठीकठीक माहीत नव्हती.

जेवणखाण झाल्यावर सर्वांनी झोपायची तयारी केली. चांदण्या रात्रीची वेळ होती. चारी बाजूचे डोंगर व त्यांच्यावरची झाडे फार सुंदर दिसत होती. जांगलाला नावांवर लक्ष ठेवायला नेमून सर्व झोपी गेले.

खूप दमल्यामुळे शिखीमुखला गाढ झोप आली होती. परंतु अचानक काहीतरी आवाज झाल्यामुळे तो ताडकन उठून उभा राहिला. जांगला लंगडत लंगडत जवळ येत



होता. शिखीमुखला त्याचा संशय आला. तलवार उपसून पुढे सरसावला. जांगला चमकला व म्हणाला–"शिखी साहेब! तुम्हांला वाटत असेल, मी तुम्हांला ठार करण्याच्या विचारात आहे. अजून तुमचा माझ्यावर विश्वास बसला नाहीसे दिसते. मी तुम्हांला धोक्याची सूचना देण्यासाठी आलो आहे."

शिखीमुख पश्चात्ताप करीत म्हणाला–"असे होय! शत्रू येतो आहे का? कोण पुजारी का?"

"कोण आला आहे कळत नाही. पण जमिनीवर पडून ऐका जरा, डफलीचा आवाज ऐकू येत आहे. ऐका, आता जास्त जास्त स्पष्ट ऐकू येऊ लागला आहे." असे म्हणत जांगलाने जवळच्या झाडीकडे दृष्टी वळवली.

शिखीमुखला पण तो आवाज स्पष्ट ऐकू येऊ लागला. तो मोठ्याने ओरडून आपल्या साथीदारांना सावध करीत म्हणाला–"शत्रू येतो आहे, उठा, शत्रू!"

विक्रमकेसरी बरोबर नांगसोम वगैरे सर्व जागे झाले. सर्व आपापली शस्त्रे घेऊन तयार उभे राहले, काहीतरी संकट असल्याचा संशय त्यांना वाटू लागला. तेवढ्यात वीस-पंचवीस जणांनी त्यांना चारी बाजूंनी घेरले. त्यांच्या पैकी एकाच्या डोक्याला विंचवाच्या आकृतीचा टोप होता. त्या टोपने त्याने आपले तोंड झांकून घेतले होते. डोळ्यांच्या जागी फक्त दोन भोके होती. त्या भोकातून त्याचे डोळे छान चमकत होते.

टोप घातलेला तो मनुष्य आपल्या हातातली दगडी कुऱ्हाड वर उचलून आपल्या साथीदारांना म्हणाला–"स्वप्नात वृश्चिक मातेने दर्शन देऊन मला या लोकां-विषयी काही सांगितले आहे. यांच्यापैकी एका योग्य माणसाला बली दिल्यास आप-



त्याला वृश्चिक मातेच्या देवळात निर्विघ्न पणे प्रवेश मिळू शकेल."

ते विचित्र वेषधारी लोक त्याच बेटा-वरचे आदिवासी लोक असावेत असे अंदाजाने शिखीमुखने ओळखले. अशा स्थितीत त्यांच्याशी मारामारी करण्यात शहाणपण नाही. त्याने ती गोष्ट विक्रम-केसरीला सांगितली तेव्हां त्याला सुद्धा ती पटली.

मध्यंतरी नांगसोम शिखीमुखजवळ जाऊन म्हणाला–"हे लोक बोलत असलेली भाषा आमच्या इम्यु भाषेच्या सारखीच आहे."

"तरमग ह्या भाषेत आपण बोललो तर आपला फायदा होईल असे वाटते का तुला? तू त्यांना सांग, आपण त्यांना त्रास द्यायला आलेले नसून तुफान आल्यामुळे आपल्या नावा त्यांच्या बेटाला येऊन लागल्या." शिखीमुख म्हणाला.

नांगसोमने, शिखीमुखने सांगितल्या-प्रमाणे त्या आदिवासी लोकांच्या नायका जवळ जाऊन सांगितले आणि म्हणाला–"आम्ही पण इम्यु जातीचेच. मग आपण आपसात भांडण करण्यात काय अर्थ आहे? उजाडल्यावर आम्ही आल्या वाटेने निघून जाऊ."



नांगसोम म्हणाला ते ऐकून रानटी जातीचा नेता चकित होऊन म्हणाला–"आम्ही इम्यु जातीचे आहो, ही गोष्ट फार जुनी आहे. आतां आम्ही वृश्चिक जातीचे आहो. दोन दिवसापूर्वी पुजारी नावाचा एक मनुष्य या बेटावर उतरला. तो सुद्धा स्वतःला इम्यु जातीचाच सांगत होता. तो शिथिलेश्वरी देवीच्या देवळाच्या शोधार्थ आला आहे. मला असे वाटते की तो म्हणतो ते शिथिलेश्वरी देवीचे देऊळ आणि आमच्या वृश्चिक मातेचे देऊळ दोन्ही एकच. उद्यां मी त्याच्या व तुमच्या टोळीची गाठ घालून देतो. तेव्हां तुम्ही कोणत्या



हेतूने या बेटावर आलात हे आम्हांला बरोबर कळेल. परवा पौर्णिमेला मी उन्मत्त कात खाऊन माझ्या अंगात आले की ते देऊळ पृथ्वीच्या पोटात कोठे आहे हे हुडकून काढीन आणि नंतर तुम्हांला सर्वांना वृश्चिक मातेच्या समोर बळी देईन."

शिखीमुख काही बोलणार इतक्यात त्या जंगली जातीच्या नायकाने त्याच्या हातातली दगडी कुऱ्हाड उगारली. नंतर सर्व कैद्यांना त्याच्या पाठीमागून घेऊन यायला सांगून तो पुढे निघाला.

शिखीमुख व त्याच्या साथीदारांना मुकाट्याने त्यांचे कैदी म्हणून जाण्याशिवाय दुसरा मार्गच नव्हता. शिखीमुखला एवढे नक्की कळले की पडक्या देवळाचा पुजारी त्या बेटावर येऊन पोचला आहे आणि पडके देऊळ हुडकून काढण्यासाठी काहीतरी युक्त्या लढवीत असावा. वृश्चिक जातीच्या नायकाच्या बोलण्यावरून ते देऊळ याच बेटावर पृथ्वीच्या पोटात कोठे तरी आहे. पण तो म्हणाला तो उन्मत्त कात कोणती वस्तू असेल बरे?

नागसोमच्या मनात तीच शंका होती. त्याने त्याच्या जवळून चालणाऱ्या एका वृश्चिक जातीच्या माणसाला विचारले—"काय रे मित्रा! तो उन्मत्त कात कोठे रे मिळतो? त्यात अशी काही तरी दिव्य शक्ती आहे का?"

त्या रानटी मनुष्याने दोन डोंगरांकडे बोट दाखविले व म्हणाला—"काताची झाडे त्या डोंगराच्या शिखराखाली एका तलावाच्या काठी आहेत. तेथे तीनचार झाडे आहेत. त्या झाडाची फळे खाल्ल्याने पृथ्वीच्या पोटात कोठे काय आहे हे दिसते. तू आमच्या नायकाच्या तोंडी ते ऐकले नाही का?"

उन्मत्त काताची गोष्ट नागसोमने गोलभरा गावात पण इम्बु नायकांच्या तोंडून ऐकली होती. तो कात खाणाराला हे जग काही निराळेच दिसते. हे फळ वृश्चिक द्वीपावरच कोठे तरी मिळते. पण ते खाल्याने पृथ्वीच्या पोटात काय आहे हे देखील दिसते हे प्रथम त्या बेटावर आल्यावरच त्याला कळले.

काहीतरी करून ते उन्मत्त काताचे फळ हुडकून काढले पाहिजे, म्हणजे पडक्या देवळाचा शोध नक्कीच लागेल आणि सर्व प्रश्न सुटतील. परंतु तेथपर्यंत जावयाचे म्हणजे वृश्चिक जातीच्या लोकांच्या नकळत तेथपर्यंत गेले पाहिजे.

नागसोमच्या डोक्यात हे विचार घोळत असता एकाएकी वृश्चिक जातीचा नायक एका गुहेजवळ थांबून म्हणाला—"सर्व कैद्यांना आज रात्रभर या गुहेत झोपायला सांगा. उजाडल्यावर काय करायचे हे मी ठरवीन." असे सांगून नायक गुहेत निघून गेला.

शिखीमुख व त्याचे साथी गुहेसमोरच्या झाडाखाली झोपले. त्यांना कैद करणारे वृश्चिक लोक जवळच्या दगडांना टेकून बसले आणि हळूहळू पेंगू लागले.

नागसोमला ती संधी छान चालून आल्यासारखे वाटले. शिखीमुखला आपण उन्मत्त काताच्या शोधार्थ जात असल्याचे सांगून जावे असे वाटले. पण त्याने पुन्हा



विचार केला की कदाचित शिखीमुख जाऊ नकोस असे सांगेल. म्हणून तो कोणाला काही सांगितल्याशिवाय मांजराच्या पावलांनी त्या तलावाकडे निघाला.

नांगसोम तलावाजवळ पोचला तेव्हां वृश्चिक जातीचा एक मनुष्य उन्मत्त झाडाच्या जवळ उभा राहून पाहारा देत असलेला दिसला. त्याला फसविल्याशिवाय ते काताचे फळ मिळणे अशक्य हे त्याला माहीत होते. असा विचार करून त्याने एका मोठ्या खडकाआड उभा राहून शीळ वाजविली.

शीळ ऐकून त्या खडकाआड कोण आहे हे पाहण्यासाठी पाहरेकरी जवळ आला. नांगसोमने पाठीमागून त्याच्यावर झडप मारून त्याच्या तोंडावर गुद्दे मारले. तो पाहरेकरी खाली जमिनीवर बेशुद्ध होऊन पडला. नागसोमने एक वेल तोडून आणून त्याचे हातपाय घट्ट बांधून ठेवले आणि दगडाआड त्याला ठेवून दिले आणि मग स्वत: त्या उन्मत्त काताच्या झाडांकडे पळत गेला.

एक दोन मिनिटातच पाहरेकऱ्याला शुद्ध आली. त्याने काताच्या झाडांकडे वळून पाहिले. त्याला नांगसोम दिसला. तो स्वत:ला सोडवून घेण्यासाठी धडपडू लागला. त्याला सुटका तर मिळाली नाहीच, पण त्याच्या बाजूला असलेला दगड मात्र हलू लागला. तो दगड आपल्यावर येऊन पडू नये व त्याच्या खाली चेंगरून जाण्याचा प्रसंग येऊ नये यासाठी त्याने खांद्याचा नेट देऊन तो दगड मागे सरकवायचा प्रयत्न केला. दगड हलला व गडगटत खाली गेला. त्याच्या बरोबर पाहरेकरी पण शिखीमुख व त्याचे साथीदार जेथे झोपले होते त्या बाजूला फरपटतखाली जाऊ लागला.

(पुढील गोष्ट पुढील अंकी)



# अतिथि देवोभव !

विक्रमादित्याने हट्ट सोडला नाही. तो पुन्हा झाडाजवळ गेला. प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि मौनपणे स्मशानाकडे निघाला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा! तुझी ही निष्ठा पाहून मला दृढव्रतची गोष्ट आठवते. त्याची निष्ठा इतकी होती की त्याच्यासमोर देवादिकांना पण आपली मान तुकवावी लागली. मी तुझे श्रम तुला हलके वाटावे म्हणून त्याची गोष्ट सांगतो. ऐक."

वेताळ गोष्ट सांगू लागला–"श्वेतवनात दृढव्रत नावाचा एक मनुष्य आश्रम बांधून त्यात रहात असे. तो ब्रह्मचारी होता आणि एकटाच आश्रमात राही. त्याने तपश्चर्यापण केली नव्हती. परंतु तो आतिथ्य सत्कार मात्र फार उत्तम करी. रात्री अपरात्री केव्हांही कोणी पाहुणा आला की तो त्याचा सत्कार करी व त्याच्याकडे जो खाद्यपदार्थ

वेताळाच्या गोष्टी



असे तो त्याला देई. तो आश्रमाबाहेर कंदमुळे व फळे आणण्यासाठीच जात असे. तो त्याला आवश्यक असत थोडी जास्तच आल्यास कंदमुळे आणीत असे, कोणी पाहुणा त्याला उपाशी रहावे लागू नये त्यात हाच हेतु असे.

एक दिवशी मध्यरात्रीच्या सुमारास दाराची कडी कोणीतरी वाजविली. दृढव्रतने दरवाजा उघडून पाहिले, एक ऋषी उभे होते. त्यांचा चेहरा तेजस्वी होता. त्या ऋषींनी दृढव्रतला विचारले–"वत्स! मला भूक लागली आहे. काही आहे का खायला?"

त्या मुनिवर्यांना आदरपूर्वक आत यायला सांगून दृढव्रत म्हणाला–"मुनिवर्य! माझ्याकडे जी मीठभाकर आहे ती आपणांला वाढीन."

"मी एकटा नाही. माझ्याबरोबर आणखी सात जण आहेत. आम्ही सर्वच उपाशी आहो." मुनि म्हणाले.

"त्यांना देखील आंत बोलवावे!" दृढव्रत म्हणाला.

दृढव्रत ते म्हणाला खरा, पण सातजणांना काय वाढावयाचे हा विचार करून तो थोडा घाबरला. कारण त्याच्या झोपडीत त्यावेळी फक्त दोनचार कंदमुळे व फळेच काय ती होती. तेवढ्यावर आठ जणांची पोटे भरणे शक्य नव्हते. बाहेर जाऊन फळे आणायला वेळ नव्हता.

तरी देवावर भरंवसा ठेवून त्याने आठहीजणांचे आतिथ्य करण्याचे ठरविले. सर्व झोपडीत आल्यावर तो अतिथींना म्हणाला– "आपण थोडा वेळ विश्रांती घ्या, मी तुमच्या जेवणाची तयारी करतो." असे सांगून तो अग्निहोत्राच्या खोलीत गेला.

त्या खोलीत पाऊल टाकताच त्याला चकित करुन सोडणारे एक दृश्य दिसले. एका कोपऱ्यात कंदमुळे व फळे यांचा ढीग पडलेला होता. ही कंदमुळे कोठून व कशी आली याचा विचार करीत तो बसला नाही. त्याने आपल्या पाहुण्यांसमोर फळे आणून ठेवली आणि म्हणाला– "बसा!" आणि कंदमुळे उकडून घेऊन आला.

दृढव्रताचा आतिथ्य सत्कार पाहून सर्व पाहुणे खूष झाले. मुनि त्याला म्हणाले– "तू खरोखर पुण्यवान आहेस! तुझे हे सर्व पुण्य फुकट जाणार नाही. त्याला या सर्व पुण्याचे फळ लाभेल. बरे तर, आता आम्ही तुझा निरोप घेतो."

"पण इतक्या रात्री कोठे जाणार? सकाळी उजाडल्यावर गेलात तर नाही का चालणार?" दृढव्रतने विचारले.

"आम्हांला रात्र काय किंवा दिवस काय, सारखाच! आम्हांला फार दूर जायचे आहे. म्हणून तू काळजी करण्याचे काही कारण नाही." मुनि म्हणाले.

मुनि झोपडीच्या बाहेर पडले, त्यांच्या पाठोपाठ त्यांचे शिष्य पण बाहेर आले. तेव्हां त्यांच्यापैकी शेवटचा शिष्य म्हणाला– "खुळचा! तू मुनिवर्यांकडून वर नाही मागितलास? ते देवेन्द्र आहेत देवेन्द्र? आणि आम्ही सर्व दिक्पाल आहो!"





दृढव्रत ते ऐकून घाईघाईने बाहेर आला आणि घाईघाईने मुनिवर्यांना नमस्कार करून म्हणाला–"मुनिवर्य! आपला अनुग्रह या गरिबावर झाला तर एक वर मागावा म्हणतो."

देवेंद्र खूष होऊन म्हणाला–"माग, अवश्य माग! काय पाहिजे तुला!"

"काही नाही, मुनिवर्य! विश्रांतीच्या वेळी मी सोंगट्यांचा डाव मांडून फासे हातात घेतो. पण कोणी खेळायला येत नाही. म्हणून मला, मी बोलवीन त्याने माझ्याशी द्यूत खेळायला यावे व खेळात मलाच यश मिळेल, असा वर द्यावा." दृढव्रत म्हणाला.

ते ऐकून देवेंद्राला फार आश्चर्य वाटले. कारण त्याला वाटले होते की हा आश्रमवासी मनुष्य स्वर्ग किंवा वैकुंठ मागून घेईल. किंवा फार झाले तर एखाद्या अप्सरेशी त्याचे लग्न होईल असा वर मागेल. तसा वर मागितला असता तर देवेंद्राने खुषीने त्याला तो वर देऊन टाकला असता. पण दृढव्रताने एक सामान्य असा वर मागितला. तरी देवेंद्राने वचन दिले होते म्हणून त्याला तो वर द्यावा लागला. म्हणाला–"तुला ज्या कोणाशी द्यूत खेळावयाचे असेल त्याच्याशी खेळ, तुला यश मिळेल, हा माझा वर आहे." असे सांगून देवेंद्र अंतर्धान पावला. त्याच्याबरोबर दिक्पाल पण अंतर्धान पावले.

त्या दिवसापासून दृढव्रतचा सर्वकाळ द्यूत खेळण्यात जाऊ लागला. जवळपासचे आश्रमवासी त्याच्याशी द्यूत खेळायला येत आणि त्यात त्या सर्वांना हार मानावी लागे. दृढव्रतचा आतिथ्यसत्कार देखील अव्याहत चालू होता.

एक दिवशी यमधर्मराजाचे दूत दृढव्रतच्या शोधार्थ आले. आपल्या बरोबर फासे घेऊन दृढव्रत यमाच्या दरबारात गेला. तेथे चित्रगुप्ताने दृढव्रतच्या पापपुण्याचा हिशोब पाहिला व म्हणाला–"हा एक फार मोठा पुण्यवान पुरुष आहे. याने आयुष्यभर आतिथ्य सत्कार केला. म्हणून याला स्वर्गात एक कोटी वर्षे सुखोपभोग घेता येईल. परंतु याला द्यूताचे व्यसन लागले आहे. म्हणून याला एकदा नरक लोकाचे अवलोकन करवून नंतर स्वर्गात पाठवावे."

यमाच्या आज्ञेने यमदूत दृढव्रतला नरकलोकाकडे घेऊन गेले. नरकलोकांत पडलेल्यांना ज्या यातना भोगाव्या लागत होत्या त्या पाहून दृढव्रतला फार वाईट वाटले. यमाच्या घरी पाहुण्यांचा पाहुणचार असाच घेतात की काय असे ही त्याला वाटले.

नरकलोक पाहून झाल्यावर यमाचा निरोप घेते वेळी दृढव्रत यमाला म्हणाला–"यमा! माझ्याशी द्यूत खेळायला ये. एक लहानसा पण आपण लावूया. मी या डावात हारलो तर मी आपले पुण्य देऊन पुन्हां मर्त्यलोकी जन्म मिळेपर्यंत नरकलोकात वास करीन. तू हारलास तर तू या नरकात ज्या कोणाला ठेवले आहेस त्या सर्वांना मुक्त करून माझ्याबरोबर स्वर्गात पाठविले पाहिजेस!"



चित्रगुप्ताने 'नको नको' म्हणून कित्येकदा आग्रहपूर्वक सांगितले तरी यमाने त्याच्या बोलण्याकडे दुर्लक्ष केले आणि द्यूतात हारला. म्हणून सर्व नरकलोक रिकामा झाला व सर्व पापी लोकांना दृढव्रत बरोबर स्वर्गात पाठवावे लागले. यमदूत दृढव्रत व सर्व पापी लोकांना स्वर्गाच्या दारापर्यंत घेऊन गेले आणि द्वारपालकाला म्हणाले–"या दृढव्रताला यमाने एक कोटी वर्षभर स्वर्गात सुखोपभोग करण्यास पाठविले आहे." असे सांगून दूत निघून गेले.

स्वर्गाच्या द्वारपालकाने दृढव्रताला आत जायला परवानगी दिली. पण इतर










लोकांना अडवून म्हणाला–"तुम्ही सर्व कोण?"

"हे सर्व माझ्याबरोबर आलेले लोक आहेत." दृढव्रत म्हणाला.

"या लोकांना स्वर्गात जागा नाही." द्वारपालक म्हणाले.

दृढव्रतला ते आवडले नाही. तो म्हणाला–"जा, तू देवेंद्राला विचारून ये, त्यांच्याबरोबर माझ्या घरी जे कोणी आले त्यांना मी, 'तुम्ही कोण?' असे एका शब्दाने तरी विचारले होते का?"

ती गोष्ट देवेंद्राच्या कानावर पडली. त्याने पुढे जाऊन दृढव्रतचे स्वागत केले आणि त्याच्याबरोबर आलेल्या सर्वांना स्वर्गात प्रवेश करण्यास परवानगी दिली.

येथवर गोष्ट सांगून वेताळाने विचारले–"राजा! दृढव्रतने अशातऱ्हेने हुशारीने सर्व पापी लोकांना स्वर्गात प्रवेश मिळवून दिला. हे योग्य झाले का? इंद्राने दृढव्रतच्या इच्छेला असा मान देणे रास्त झाले का? या प्रश्नाचे उत्तर माहीत असून तू दिले नाहीस तर त्याचा परिणाम तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर छकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील."

ते ऐकून विक्रमादित्य म्हणाला–"इंद्राने दृढव्रतच्या इच्छेला मान देऊन असे केले हे म्हणणे बरोबर होणार नाही. अतिथि-सत्कार एक उत्तम व्रत आहे. म्हणून ते एकच एक पुण्य मिळविल्यामुळे दृढव्रतला स्वर्गप्राप्ती झाली. अशा व्रताचे पालन करणारा कित्येक पापी लोकांना पावन करू शकतो. ही गोष्ट माहीत असल्यामुळेच इंद्राने सर्व पापी लोकांना दृढव्रत बरोबर स्वर्गात प्रवेश देवविला."

अशातऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेताबरोबर अदृश्य झाला आणि झाडाला जाऊन लोंबकळू लागला.





# बिनबोभाट निकाल

एका गावात एक जमिनदार रहात असे. त्याला तीन मुलगे होते. ते वयात आले तरी त्यांचे परस्परांवरील प्रेम थोडे देखील कमी झाले नाही. त्यांना आपल्या उच्चकुळाचा फार मोठा अभिमान होता. म्हणून ते जिवापलीकडे कुळप्रतिष्ठा राखण्यासाठी झटत.

जमिनदाराच्या घरी वीस सोन्याची शिवलिंगे होती. सर्व एकाच साच्याची सारखी सारखीच होती. दररोज त्यांची पूजा सर्व भाऊ पाळी पाळीने करीत. हे नित्यनियमित पणे अव्याहत चाले. एक दिवशी एक शिवलिंग एकाएकी नाहीसे झाले.

शिवलिंगाची नक्कीच चोरी झाली होती. चोर कोणी बाहेरचा नव्हता. तिघां भावांपैकीच कोणीतरी एक होता. परंतु तिघांपैकी कोण चोर होता हे कळले तर इतर दोघां भावांना त्या गोष्टीबद्दल फार वाईट वाटणे साहजिक होते. कारण चोरी कोणत्या भावाने केली हे कळले असते तर कुळप्रतिष्ठा नष्ट झाली असती. त्यापेक्षा त्यांना मरण आले असते. तरी ते परवडले असते. म्हणून चोर कोण आहे हे कळण्यापेक्षा शिवलिंग आपोआप जागी आले तर जास्त चांगले, असे त्यांना वाटले. पण हे व्हायचे कसे?

तिघां भावांना काय करावे हेच सुचेना. म्हणून सर्वात मोठा भाऊ गावच्या न्यायाधिशाकडे त्या बाबतीत त्यांचा काही सल्ला मिळाला तर तो विचारण्यासाठी निघाला. त्याच्या पाठोपाठ दुसरा व तिसरा भाऊ पण गेले. न्यायाधीश हुशार होता.

तिघां भावांनी न्यायाधिशाला त्यांच्या समोर जो प्रश्न उभा होता तो सविस्तर वर्णन करून सांगितला आणि म्हणाले–

श्री शंकर द. गर्गे

"चोरांचा शोध किंवा चोराचा शोध लागावा असे नाही आमचे म्हणणे. त्याबद्दल आमचा आग्रह पण नाही. ते जरूर पण नाही. चोरी गेलेले शिवलिंग जागेवर येऊन पोचले की झाले."

"हे पहा, तुमचा प्रश्न कसा सोडवायचा हे नाही मला कळत, कारण प्रश्न मुळात काय आहे, हेच मला कळले नाही. मग मी तो सोडवणार तरी कसा? तरी मला विचार करू द्या. आता रात्र होऊ लागली आहे. तुम्ही रात्रभर माझ्याकडेच रहा. उद्या सकाळी मी तुमचा प्रश्न पुन्हा नीट समजावून घेईन आणि मग काय तो सल्ला देईन. तुमची समस्या दूर व्हावी यासाठी पुरा प्रयत्न करीन, तुम्ही अगदी निश्चित रहा." न्यायाधीश म्हणाला.

नंतर न्यायाधीश घरात निघून गेला. थोड्या वेळाने परत येऊन तो तिघांना म्हणाला–"जेवायला बसण्यापूर्वी तुम्ही पूजा करावी म्हणून माझी मुलगी वीस शिवलिंगे तयार करविते आहे. तुम्ही आपल्या नियमाप्रमाणे पूजा करून घ्या. नंतर आपण सर्व जेवायला बसू."

सर्वात प्रथम मोठा भाऊ पुजेला पुजेच्या जागी जाऊन बसला. पूजा करतांना त्याला एकोणीस शिवलिंगेच दिसली. पण तो त्या विषयी उघड काहीच बोलला नाही. पूजा संपल्यावर कोणाशी काही बोलल्याशिवाय बाहेर आला.



त्यानंतर दुसरा भाऊ पूजा करायला घरात गेला. त्याला देखील एकोणीस शिवलिंगेच दिसली. पण तो देखील कोणाशी काही बोलला नाही. तो देखील पूजा संपल्यावर बाहेर परत आला.

सर्वात शेवटी धाकटा भाऊ पुजेसाठी आत गेला. त्याने देखील एकोणीस शिवलिंगेच असलेली पाहिली. पण तो थोडा घाबरला. त्यानेच आपल्या घरातले शिवलिंग चोरले होते आणि ते लिंग त्यावेळी त्याच्याच जवळ होते. त्याने विचार केला की न्यायाधिशाने विसांपैकी एक शिवलिंग नाहीसे झालेले पाहून जर झडती घेतली आणि आपल्याजवळ हे शिवलिंग निघाले तर आपली चोरी पकडली जाईल. म्हणून त्याने आपल्या जवळचे शिवलिंग त्या एकोणीस शिवलिंगांबरोबर ठेवून दिले आणि पूजा झाल्यावर काही बोलल्या शिवाय बाहेर आला.

सकाळी उजाडल्यावर न्यायाधिशाने तिघा भावांना बोलविले आणि म्हणाला– "काय पण विचित्र पहा, सुदैवाने तुमचे हरवलेले शिवलिंग सापडले आहे. हे पहा. त्यावर तुमची खूण पण आहे. परंतु चोर कोण आहे हे तुम्ही मला विचारू नये आणि हे शिवलिंग कसे सापडले हे देखील विचारू नये. कारण मला ती गोष्ट कळलीच नाही."

जमीनदाराच्या मुलांनी शिवलिंग अगदी जवळून निरखून पाहिले. ते त्यांच्या घरातून हरवलेले शिवलिंगच होते. ते ज्या हेतूने न्यायाधिशाकडे आले होते तो पुरा झाला. म्हणून त्यांनी न्यायाधिशाचे मनःपूर्वक आभार मानले आणि आपल्या घरी परतले.













# अमरवाणी

स्वायत्त मेकान्तहितं विधात्रा
विनिर्मितं छादन मज्ञतायाः;
विशेषतः सर्वविदां समाजे
विभूषणं मौनम पंडितानां ॥ १ ॥

स्वतःचा मूर्खपणा लपविण्या योग्य मनाची सृष्टी विधाताने म्हणजे ब्रह्मदेवाने केली आहे. म्हणून मूर्ख माणसात उत्तम गुण कोणता (असे विचाराल तर) विद्वान लोकांच्या सभेत त्याने तोंड उघडू नये हा होय!

शिरश्शार्वं स्वर्गात्, पशुपतिशिरस्तः क्षितिधरं,
महीध्राादुत्तुंगा दवनि, मवनेश्चापि जलधिं,
अधो गंगासेयं पद मुपगतास्तोक मथवा;
विवेक भ्रष्टानां भवति विनिपातः शतमुखः ॥ २ ॥

गंगा नदी आकाशातून शंकराच्या डोक्यावर पडली. तेथून हिमालय पर्वतातून खाली येत पृथ्वीवर आली. पृथ्वीवरून वहात वहात समुद्रात विलीन झाली. समुद्रातून पाताळ लोकात येऊन पोचली. अशा तऱ्हेने मनुष्याचे अनेक प्रकारे पतन होत जाते व तो मूर्ख गणला जातो.



# नशिबाचा खेळ

प्राचीनकाळी मगधच्या गादीवर विक्रमसिंह नावाचा राजा राज्य करीत असे. त्याला कित्येकवर्षे मूलबाळ काही झाले नाही. एकदा मगध राज्यावर जंगली जनावरांनी हल्ला केला. म्हणून विक्रमसिंहाने जंगलात शिरून शिकार करण्याचे ठरविले. शिकार करून परत येते वेळी राजाला एक सुंदर मुलगा दिसला. विक्रमसिंहाने त्या मुलाला मोठ्या आनंदाने उचलून घरी आणले. त्याचे नाव जयसिंह असे ठेवण्यात आले. राजाने स्वतःच्या मुलासारखे त्याचे सर्व लाड पुरविले.

जयसिंह मिळाल्यानंतर काही दिवसांनी विक्रमसिंहाची राणी गरोदर झाली आणि नऊ महिन्यांनी तिला एक मुलगा झाला. त्या मुलाचे नाव विजयसिंह असे ठेवण्यात आले. जय व विजय सख्या भावंडासारखे राजवाड्यात वाढत होते.

विक्रमसिंहाला वार्धक्य आले तेव्हां त्याने दोघां मुलांपैकी एकाला युवराज पद देण्याचे ठरविले. राजाला दोघं मुलं दोन डोळ्यांसारखी होती. जयसिंह वयाने मोठा होता, पण तो औरस पुत्र नव्हता. विजयसिंह औरस पुत्र होता, पण वयाने लहान होता. मोठ्याला सोडून लहानाला युवराजपद देणे रास्त नाही असे राजाला वाटे.

राजा स्वतः काहीच निश्चय करू शकला नाही. म्हणून राजाने आपल्या मंत्र्याचा सल्ला घेतला. जयसिंह हुशार, पराक्रमी व प्रजावत्सल होता. त्याच्या मानाने विजयसिंह अशक्त व दुष्ट स्वभावाचा होता. ही गोष्ट राजाला स्वतःच माहीत होती. म्हणून राजाने मंत्र्याच्या सल्लयाप्रमाणे जयसिंहाला युवराज केले. परंतु विजयसिंहाला राजाने केलेला निर्णय आवडला नाही. कारण तोच राजाचा औरस पुत्र होता व म्हणून गादीला हक्काने



वारस होता. राजाने त्याचा तो हक्क धुडकावून लावून एका अनाथ मुलाला गादीवर बसविले हे त्याला मुळीच आवडले नाही. तो संधीची वाट पाहू लागला.

पुढे काही वर्षांनी विक्रमसिंह इहलोकाची यात्रा संपवून स्वर्गवासी झाला. राज्यात सर्वत्र शोककळा पसरली. विजसिंहाने अशा प्रसंगी शेजारचा राजा रविवर्मा याच्याकडे गुप्तसंदेश पाठवून राज्यावर स्वारी करण्यास उत्तम संधी असल्याचे कळविले. त्याला वाटत होते की रविवर्मा त्याच्या बापाचे राज्य जिंकून त्यालाच राज्याचा अधिकार देऊन निघून जाईल.

परंतु जयसिंह आपल्या धाकट्या भावाच्या प्रत्येक हालचालीवर बारीक नजर ठेवीत होता. म्हणून त्याने एक युक्ती केली. विजयसिंहच विजयसिंहाच्या गादीला वारस असल्याचे सांगून त्याचा राज्याभिषेक करविला.

विजयसिंहाने गादीवर बसल्यावर रविवर्मकडे निरोप पाठविला की राज्यावर आता स्वारी करण्याची गरज नाही. विजयसिंहाचा मूर्खपणा रविवर्म्याने पूर्वीच ओळखला होता. म्हणून तो गादीवर बसल्यावर मगध राज्य जिंकणे जास्तच सोपे झाले असे रविवर्म्याला वाटले. म्हणून तो सैन्य घेऊन मगध देशावर चालून आला.

ती बातमी कळल्यावर विजयसिंह घाबरूनच गेला. सारा देश राज्याभिषेकाच्या उत्सवात गर्क झाला होता. प्रजा किंवा राजा कोणीच युद्धाला तयार नव्हता. त्याने दुसऱ्यावर म्हणून जो वार केला होता तो त्याच्याच शिरावर आदळला. म्हणून विजयसिंह जयसिंहाकडे मदतीला धावला. पण त्यावेळी जयसिंह तरी काय करणार? परंतु तो म्हणाला–"मी स्वतः रविवर्म्याकडे दूत म्हणून जातो व त्याचे मन पालटता आले तर पाहतो."



जयसिंहाला आलेला पाहून रविवर्मा व त्याचा वृद्ध मंत्री दोघे चकित झाले. कारण जयसिंह हुबेहूब रविवर्म्यासारखाच दिसत होता. दोघांची उंची रूप रंग सर्व एकच. फक्त वयात काय तो फरक होता. परंतु रविवर्मा जयसिंहाच्या वयाचा होता तेव्हां अगदी तसाच दिसायचा हे वृद्ध मंत्र्याला चांगले आठवत होते.

राजा रविवर्म्याला पुष्कळ राण्या होत्या. परंतु त्याच्या पट्टराणीला एक मुलगा झाला व इतर राण्यांना झाला नाही. म्हणून सवती मत्सराने इतर राण्यांनी त्या मुलाला उचलून जंगलात नेऊन टाकले होते. ज्या दिवशी त्याला त्यांनी जंगलात नेऊन टाकले होते त्याच दिवशी विक्रमसिंह शिकारीला गेला असता त्याला एक अनाथ मुलगा सापडला होता. राजा रविवर्म्याने आपल्या एकुलत्या एका मुलाचा पुष्कळ शोध केला, पण तो सांपडला नाही तेव्हां त्याला निराश व्हावे लागले. तोच मुलगा आज त्याच्या समोर उभा आहे हे चवकशी केल्यावर कळले. सर्व गोष्टी पडताळून पाहिल्यावर व खात्री पटल्यावर की हाच आपला मुलगा आहे रविवर्म्याला परमानंद झाला. त्याने त्या आनंदाच्या भरात मगध राज्यावर स्वारी करण्याचा विचार सोडला.

रविवर्म्याचा एकुलता एक मुलगा हरवल्यावर त्याला एक मुलगी झाली होती. त्या एकुलत्या एका मुलीचा विवाह रविवर्म्याने जयसिंहाचा मानलेला भाऊ विजयसिंह याच्याशी करून दिला.

जयसिंहाला आपला युवराज मानून रविवर्म्याने त्याचा राज्याभिषेक केला. रविवर्मा वारल्यावर जयसिंह गादीवर बसला. जयसिंह आणि त्याचा मानलेला भाऊ व आता मेहुणा विजयसिंह यांचे आपसात सख्य वाढतच गेले.





# कार्तिक पुराण

एका गांवी कैलाश आणि पार्वती नावाचे एक ब्राह्मण जोडपे रहात असे. घरची गरीबी होती. सकाळची काळजी संध्याकाळी असे तर संध्याकाळची सकाळी काळजी असे, अशी त्यांची स्थिती होती.

एक दिवशी पार्वती आपल्या पतीला म्हणाली–"असे किती दिवस चालणार? माधुकरीला जावे, काही हरकत आहे का? 'ब्राह्मणाची दीक्षा, मागितली पाहिजे भिक्षा'!"

"मी माधुकरी मागू म्हणतेस? मग कोणाला तोंड तरी दाखविता येईल का?" कैलाश म्हणाला.

एक दिवशी पार्वती देवळात पुराणाला गेली. पुष्कळ लोक आले होते. पुराण संपल्यावर सर्व ताम्हनात, ज्याला जे शक्य होते ते टाकून आपापल्या घरी निघून गेले. पार्वतीने ती गोष्ट घरी आल्यावर नवऱ्याला सांगितली व म्हणाली–"तुम्ही सुद्धां पुराण वाचायला कां नाही देवळात जात? चार पैसे हाती लागतील!"

कैलाशला तो सल्ला पसंत पडला. परंतु दुसऱ्या गावात पुराण वाचावे असा त्याने विचार केला.

तो कार्तिक महिना होता. म्हणून कैलाश कार्तिक पुराण वाचून सांगू लागला. गावातली सर्व लहान थोर मंडळी पुराण ऐकायला जमली. दररोज श्रोत्यांची संख्या वाढतच गेली.

कार्तिक पुराणात एका जागी चोरीचा प्रसंग आला. कैलाश म्हणाला–"चोरी करणे हे एक फार मोठे पाप आहे. चोरी करणारा सरळ रौरव नरकात जातो."

पुराणाला आलेली सर्व मंडळी काही बोलल्याशिवाय लक्ष देऊन सर्व कथा ऐकत होती. परंतु त्यांच्या तोंडावर हास्य, दुःख, निराशा किंवा भय यांपैकी एकही भाव न उमटलेला पाहून श्रोत्यांना कथाप्रसंग सोदाहरण समजावून देण्याच्या हेतूने कैलाशने समोर बसलेले गाव प्रमुख व त्यांचे मेहुणे यांच्याकडे बोट दाखवून म्हटले–"समजा, ह्या गृहस्थांनी ह्यांच्या घरातून एक हजार रुपयांची चोरी केली."

ते ऐकताच गाव प्रमुख भडकला. तो फार श्रीमंत होता. तो रागाच्या भरात म्हणाला–"काय म्हणतोस? मी चोरी केली? गप्प बैस! पुरे झाले तुझे हे पुराण प्रवचन आणि आमच्या गावाबाहेर प्रथम चालता हो!" असे म्हणत गावप्रमुख उठून उभा राहला.

"बंधु व भगिनींनो! थांबा! मी काय म्हणतो ते प्रथम ऐकून घ्या." कैलाशने गांवकऱ्यांना हात जोडून विनंती करून सांगितले. परंतु सर्व निरुपयोगी ठरले. गावप्रमुख कैलाशला अशी धमकी देऊन निघून गेला की 'गावात पुन्हां कधी पाऊल टाकलेस तर तुझे पायच मोडून टाकीन.'

दोन दिवस कैलाश कोठेच गेला नाही. पार्वती आणखी एका गावी गेली आणि तिचा नवरा पुराण सांगायला रोज येणार असल्याचे गावकऱ्यांना सांगितले. पुराण ऐकायला मोठी गर्दी जमली. पुराण वाचन चालू असता कैलाश म्हणाला–"भक्त हो!



श्री सुहास प्र. पाटील

कार्तिक महिना हा एक पुनीत महिना आहे. या महिन्यात एका रुपयाचे दान केले तर दहा रुपये दान केल्याचे पुण्य लागते." असे सांगून त्याने आपली बायको व तिच्या शेजारी बसलेली आणखी एक स्त्री दोघींच्या कडे बोट दाखवून म्हटले– "समजा, ह्या बाईंनी ह्या बाईंना एक रुपया दान केला आहे!..."

कैलाशचे म्हणणे अजून संपलेच नव्हते. मध्येच ती बाई फणकारून उभी राहली आणि विचारू लागली–"मी कशाला कोणाकडून दान घ्यायला जाऊ? मी भिकारीण आहे का? उलट मीच ब्राह्मणांना दररोज दान करते. पुराण बंद कर आणि चालू लाग गावाबाहेर!"

असे म्हणत ती बाई उठून निघून गेली. ती त्या गावच्या ग्रामप्रमुखाची बायको होती. म्हणून ती निघून गेल्यावर सर्व लोक उठून निघून गेले.

आणखी एका गावी कैलाश पुराण सांगायला गेला. त्या दिवशी तो देवळात त्याच्या बायकोला पुराण सांगत होता. येणारे जाणारे येऊन पुराण ऐकू लागले. कैलाश ब्रह्महत्येचा एक प्रसंग घेऊन सांगू लागला–"ब्रह्महत्त्या एक भयंकर मोठे पाप आहे. कार्तिक महिन्यात ब्रह्महत्त्या करणारा रौरव नरकात जातो." असे सांगून पुढे एका ब्राह्मणकडे बोट दाखवून म्हणाला– "समजा! मी या ब्राह्मणाचा वध केला..."

तो बोलतच होता. मध्येच तो मनुष्य संतापून उठत म्हणाला–"तूं! तूं! माझा वध करणार?" असे म्हणत त्याने कैलाशला खूप बडविले. पुराणवाचन जागच्या जागी थांबले. कैलाशला रुपये पैसे तर मिळालेच नाहीत, चोप बसल्यामुळे त्याचे सर्वांग दुखू लागले.

त्या दिवसापासून कैलाशने पुराण प्रवचनाचे नावदेखील काढले नाही.





# सिंदबादच्या सफरी

सिंदबाद एक दिवशी संध्याकाळी घरासमोरच्या अंगणात थंड हवेत विश्रांती घेत बसला असता त्याला समोर रस्त्यावरून काही व्यापारी येत असलेले दिसले. सिंदबादने त्यांना पाहल्याबरोबर ओळखले. ते दुरून कोठून तरी येत होते. स्वदेशी परत आल्याचा आनंद त्यांच्या चेहऱ्यावर झळकत होता. यात्रा सफर कधी न करणाऱ्याला त्या आनंदाची कल्पना येणे शक्य नाही.

त्यांना पाहल्याबरोबर सिंदबादचे मन चलबिचल करू लागले. पुन्हां एकदा परदेशात व्यापारासाठी जाण्याची इच्छा त्याच्या मनात बळावली. लगेच त्याने व्यापारासाठी माल विकत घेतला व तो घेऊन बसऱ्याला आला. बंदरात परदेशात जाण्यासाठी एक गलबत तयार उभे होते. त्यात अनेक व्यापारी व जहाजावर काम करणारे लोक हजर होते. सिंदबादने आपला माल चढवला व इतर व्यापाऱ्याबरोबर तो प्रवासाला निघाला.

ते गलबत एका गावाहून दुसऱ्या गावी एका देशातून दुसऱ्या देशात मोठमोठी बंदरे व व्यापारी पेठा पहात आणि प्रत्येक पेठेत मालाची खरेदी विक्री करीत पुढे जात होते. प्रवासी व्यापाऱ्यांना वाटेत विचित्र गोष्टी पहावयास मिळत होत्या. एक दिवशी सर्व व्यापारी विश्रांती घेत पडले होते तेव्हां एक खलाशी मोठ्याने ओरडत आपल्या डोक्याचे पागोटे सोडून ते जमिनीवर वेड्यासारखा आपटू लागला आणि आपल्याच डोक्याचे केस ओढू लागला.

सर्वांनी जवळ जाऊन त्याला कारण विचारले.

मुख्य खलाशी म्हणाला–"आपण वाट चुकून कोठच्या कोठे निघून जात आहो.



कोठे चाललो आहे ते फक्त त्या अल्लाला माहीत. आतां तो सर्वरक्षक अल्ला वाचवील तरच आपण वाचू."

त्याच वेळी एक जोराचे वादळ आले आणि लाटांच्या धक्याने गलबत हेलकावे खाऊ लागले. थोड्या वेळाने त्या जहाजाची शिडे फाटून गेली व जहाज वारा नेईल तिकडे वहात जाऊ लागले. थोड्या वेळाने ते गलबत एका खडकावर आपटून फुटले. जहाजाबरोबर काही व्यापारी समुद्रात बुडाले. सिंदबाद काही व्यापाऱ्यांबरोबर पोहोत समुद्राच्या मध्यभागी असलेल्या एका खडकाळ टेकडीवर कसाबसा येऊन पोचला. ती टेकडी एका बेटावर होती. त्या टेकडीवर त्या पूर्वी अशीच कित्येक गलबते आपटून फुटून गेली होती. हे किनाऱ्यावर पडलेल्या फळ्या व माल पाहून स्पष्ट कळत होते. काही पेट्यांतून मूल्यवान वस्तू दिसत होत्या.

वादळाच्या झपट्यात जे लोक वांचले आणि त्या बेटाला येऊन लागले होते त्यांच्याबरोबर सिंदबाद त्या टेकाडावरच्या एका डोंगरी ओढ्यावर येऊन पोचला. तो ओढा एक सपाट मैदानावर काही अंतर वहात जाऊन एका गुहेत कोठेतरी नाहीसा झाला होता. त्या ओढ्याच्या दोन्ही काठांवर व पाण्यात सोने, चांदी हिरे व माणके चमकत होती. तेथे संपत्तीची नदीच जणु-काही दुथडी वहात होती. ओढ्याच्या दोन्ही तिरांवर मोठमोठी झाडे होती.

त्या बेटात सिंदबादला आणखी एक विचित्र वस्तू दिसली. ते डांबर होता व उन्हात वितळून समुद्रात वाहात जात होते. मासे खाववेल तितके खात होते. पण ते त्यांना पचले नाही म्हणून ओकत पण होते. ते पुन्हां वहात किनाऱ्यावर येत होते. त्याचा कस्तूरी सारखा वास बेटावर सर्वत्र पसरला होता.

त्या बेटावर इतके वैभव पडले होते. परंतु ते उपभोगायला मनुष्यच नव्हते. कारण त्या बेटाजवळ जे जे जहाज आले ते चक्काचूर होऊन गेले. सिंदबाद व त्याचे साथी त्या बेटावर आल्याबद्दल आनंदाने नाचू लागले. परंतु बेटावर खायला काही नाही हे पाहून सर्व घाबरून गेले. त्यांच्याजवळ जे काही खाण्या जोगे होते ते त्यांनी आपसात सारखे सारखे वांटून घेतले होते. परंतु असे किती दिवस चालणार? सिंदबादला उपास काढण्याची संवय होती. म्हणून त्याने पुष्कळ थोडे थोडे खाऊन आपला जीव बरेच दिवस वांचविला. पण इतर लोकांनी जवळ होते ते सर्व लवकरच खाऊन टाकले आणि हळूहळू मरू लागले. मरण पावलेल्यांना जिवंत लोक पुरून टाकीत होते. अशातऱ्हेने एका शेवटच्या माणसाला पुरून झाल्यावर त्या बेटावर एकटा सिंदबाद उरला. तो मेल्यावर त्याची अंत्येष्टी करणारा पण कोणी उरला नव्हता.

सिंदबादजवळ खायला जे उरले होते ते देखील संपुष्टात आले. भूकेने त्याचा जीव कासावीस होऊ लागला. अंत्येष्टीचा व्यवस्था स्वतःच करून ठेवावी म्हणून सिंदबादने वाळूत एक खड्डा खणला आणि खड्यात जाऊन बसला. वाऱ्याने वर वाळू





येऊन पडेल व निसर्ग पुढील काम करील अशी समजूत करून घेऊन सिंदबाद विचार करीत पडून राहला. पांच वेळा तो मरता मरता वांचला होता. तरी त्याची बुद्धी ताळ्यावर आली नाही. पैशाच्या मोहाला आपण शेवटी बळी पडणार तर! आपल्या मूर्खपणाबद्दल तो फार पश्चात्ताप करू लागला.

परंतु त्याही स्थितीत सिंदबादचे डोके काम करीतच होते. हा ओढा कोणत्या तरी गुहेत शिरला आहे तर तो कोठे तरी बाहेर पडेलच की नाही. येथे उपाशी मरण्यापेक्षा हा ओढा वहात कोठवर गेला आहे कां पाहू नये?

तो विचार मनात आल्यावर त्याला पुन्हा स्फूर्ती चढली. त्याने झाडाच्या मोठ-मोठ्या फांद्या तोडून त्यांचे एक होडके तयार केले. त्यावर काटक्या पाचोळा घालून त्यावर सोने, चांदी, हिरे व माणके जेकाही लावता आले, लादले. दोन सरळ सोट घेऊन तो आपली ही जुजुबी नाव त्या ओढ्यात चालवू लागला. नाव पुढे पुढे सरकू लागली.

ओढा ज्या गुहेतून वहात जात होता त्या गुहेत त्याची नाव शिरली. गुहेत काळोखच कोळोख होता. ओढा नागमोडी वाटेने चकरा खात वहात होता. म्हणून नाव प्रत्येक वळणावर थोडा वेळ अडकून पुढे जात होती. कोठे कोठे सिंदबादचे डोके गुहेच्या छपराला लागून आपटत होते. म्हणून तो वाकून बसला होता व कोठे कोठे उपडा झोपून रहात होता. थोड्या वेळाने ओढ्याचे पाणी एकदम जोराने वाहू लागले. आता सिंदबादला भीति वाटू लागली, कदाचित कोठे तरी धबधबा असेल व आपण उंच डोंगरावरून खाली कोसळून मरणार. त्यापेक्षा उपाशी राहून मेलो असतो तर बरे झाले असते. तो इतका घाबरून गेला की बेशुद्ध होऊन पडला. पुढे काय झाले हे त्याला कळलेच नाही.



तो शुद्धीवर आला तेव्हां तो एका मैदानात पडलेला होता. त्याची नाव किनाऱ्याला बांधलेली होती. त्याच्या चारी-बाजूला लोकांची गर्दी होती. ते लोक इथियोपियाचे रहिवासी होते.

सिंदबादने डोळे उघडून पाहल्यावर लोक त्याच्याशी बोलायला जवळ आले. ते काय बोलत होते ते सिंदबादला कळत नव्हते. तरी त्यांच्यापैकी एकाने पुढे येऊन अरबी भाषेत त्याला विचारले–"कोण तू? कोठून आलास? आमच्या देशात कसा काय येऊन पोचलास? आम्ही सर्व शेतकरी आहो. आम्ही शेताला पाणी लावायला आलो होतो. तू नदीत वहात येत असलेला दिसलास. या लोकांनी तुझी नाव अडवून किनाऱ्याला बांधून ठेवली आणि तुला येथे आणून निजविले."

"मला फार भूक लागली आहे. काही खायला द्याल ना? नंतर मी सर्व सांगतो." सिंदबाद मोठ्या कष्टाने म्हणाला.

लगेच त्या लोकांनी सिंदबादला खायला दिले. त्याला जिवात जीव आल्यासारखे वाटले. त्याने आपली सर्व करुण कहाणी सुरवातीपासून शेवटपर्यंत सांगितली. ते सर्व भाषांतर करून अरबी भाषा येणाऱ्या माणसाने इतरांना सांगितले. ते वृत्त ऐकून





सर्व चकित झाले. त्यानंतर त्यांनी सिंदबादला आपल्या राजाकडे नेले. सिंदबाद व त्याच्या बरोबर आलेली सर्व संपत्ती पण राजाच्या दरबारात नेण्यात आली.

इथियोपियाच्या राजाने सिंदबादचे प्रेमाने स्वागत केले. त्याचा यात्रावृत्तांत ऐकून राजाने त्याचे अभिनंदन केले. सिंदबादने बरोबर आणलेले सोने व रत्न माणिक्ये पाहून राजा खूष झाला. राजा स्वतः एक उत्तम रत्नपारखी होता. सिंदबादने प्रत्येक तऱ्हेचे एक सर्वोत्तम रत्न नजराणा म्हणून राजाला दिले. राजाने सिंदबादला एक अतिथि म्हणून त्याचा सत्कार केला.

राजाच्या दरबारी लोकांनी बगदाद, खलीफा आणि त्याच्या राज्यकारभारा संबंधी अनेक प्रश्न सिंदबादला विचारले. त्याची उत्तरे ऐकून राजा म्हणाला–"तुमचे खलीफा हारून उल रशीद फार थोर पुरुष आहेत यात शंका नाही. त्यांच्या विषयी माझ्या मनात जो आदर वसत आहे त्याची खूण म्हणून मी तुझ्या बरोबर त्यांना देण्यासाठी एक नजराणा पाठवावा, म्हणतो."

"पाठवा! मी आनंदाने घेऊन जाईन तो नजराणा आणि मी खलीफांना आपल्या उच्च विचारांची व थोरपणाची ओळख करून देईन." सिंदबाद म्हणाला.

राजाने खलीफांना देण्यासाठी उत्तमोत्तम वस्तू मागविल्या. त्यांत फक्त सहा इंच उंचीची एक माणिक्य रत्नाची सुरई होती. सुरई भरून उत्तमोत्तम मोती पण भेट म्हणून इथियोपियाच्या राजाने पाठविले. राजाने एक उत्तम गालीचा पण पाठविला. या गालीचाचे विशेष म्हणजे तो सापाच्या कातडयाचा होता. त्यावर झोपल्यास सर्व आजार बरे होतात व नवा आजार येत नाही अशी समजूत होती. नजराण्याच्या इतर वस्तूत दोनशे कापराच्या गोळ्या, हत्तीचे मोठेमोठे दात आणि आपाद मस्तक दागिन्यांनी सजलेली एक दासी पण होती.

राजाने खलीफांच्या नावी लिहिलेले पत्र सिंदबादला दिले व म्हणाला–"मी हा लहानसा नजराणा खलीफांकडे पाठवीत आहे. म्हणून माझ्या वतीने खलीफांना क्षमा करण्यास विनंती कर. या नजराण्याहून जास्त मोलाचा माझा त्यांच्या वरील स्नेह प्रेम भाव आदर आहे. परंतु सिंदबाद, तू येथेच आमच्या देशात कां नाही कायमचा रहात? तुला कोणत्याही गोष्टीची उणीव भासू नये याची मी काळजी बाळगीन. खलीफांकडे मी हा नजराणा आपल्या प्रधानांबरोबर पाठवून देईन. बोल, मग तू राहतोस का आमच्या देशात?"

सिंदबादने, राजाच्या विनंतीस मान देऊन राहणे शक्य नसल्याबद्दल क्षमा मागितली. कारण एक जहाज नुकतेच बसऱ्याला निघणार होते. त्याशिवाय त्याला सर्व नातेबाईक, कुटुंबातली मंडळी सर्वांना भेटण्याची फार फार इच्छा होती. त्याने स्वदेशी जाण्यास राजाजवळ परवानगी मागितली.

सिंदबादला त्याच्या इच्छेविरुद्ध आपल्या देशात ठेवून घेण्याचा आग्रह इथियोपियाच्या राजाने दाखविला नाही. म्हणून राजाने गलबताच्या मुख्य अधिकाऱ्याला बोलावून












सिंदबादची ओळख करून दिली आणि त्याच्या प्रवासाचा सर्व खर्च स्वत: दिला. नंतर सिंदबादची सर्व जबाबदारी गलबताच्या मुख्य अधिकाऱ्यावर टाकून सिंदबादला निरोप देतांना प्रेमाची भेट म्हणून अनेक मूल्यवान वस्तू दिल्या.

सिंदबादने राजाचे आभार मानले आणि राजाच्या व इतर मंडळींचा निरोप घेऊन गलबतात बसला. स्वदेशी परत जाण्याचा प्रवास आनंदाने पार पडला. काही दिवसांनी त्यांचे गलबत सुखरूप बसरा येथे येऊन पोचले. तेथून सिंदबाद बगदादला परत घरी आला.

सिंदबाद बंदरात उतरल्याबरोबर सरळ खलीफांच्या खास महालात गेला आणि इथियोपियाच्या सुलतानाने दिलेला नजराणा व पत्र सादर केले.

खलीफाने पत्र वाचले व नजराणा पाहिला आणि विचारले–"एवढा मोठा नजराणा पाठविणारा सुलतान स्वत: फार श्रीमंत असणार नाही का?"

"गरीबपरवर! त्यात काय संशय? इथियोपियाचा सुलतान नुसता श्रीमंतच नव्हे. मनाचा पण श्रीमंत आहे. तो एक न्यायशील, धर्मशील व प्रजावत्सल सुलतान आहे." सिंदबाद म्हणाला.

खलीफाने सिंदबादला त्याच्या धाडसी स्वभावाबद्दल अनेक वस्तू प्रेमाची भेट म्हणून देऊन त्याचा सत्कार केला. त्याने सिंदबादच्या सफरींचा वृत्तांत आपल्या दरबारी लेखकांकरवी लिहून घेतला आणि असा हुकूम काढला की इतिहासात सिंदबादच्या सफरी नमूद करण्यात याव्या.

सिंदबाद खलीफांचा निरोप घेऊन आपल्या घरी आला. आपल्या नातेवाईकांना व कुटुंबियांना भेटून त्याला परमानंद झाला. नंतर त्याने पुढील आयुष्य घरीच आरामात घालविण्याचे ठरविले.





# फाशी

राजा नागादित्य हा एक फार पराक्रमी राजा होऊन गेला. त्याचा खजिना नेहमी भरलेला असे. त्याचे सैन्य पण फार मोठे होते. म्हणून जवळपासचे राजे त्याचे नुसते नाव ऐकून थरथर कापत. असा त्याचा दरारा होता. त्याला कित्येक वर्षे मूलबाळ काही झाले नाही. शेवटी एक मुलगा झाला. त्याचे नाव देवादित्य असे ठेवण्यात आले. राजा प्रजा सर्वांचे आपल्या युवराजावर फार प्रेम होते. देवादित्य वयात आला तोंपर्यंत त्याने सर्व विद्या संपादन करून त्यांत प्राविण्य मिळविले.

नागादित्याच्या राज्याबाहेर एक जंगल होते. त्याला लोक भुतांचे जंगल म्हणत. त्यांत जायला सर्व भीत. परंतु पराक्रमी राजा नागादित्य याने त्याच जंगलात शिकारीला जाण्याचे ठरविले आणि बरोबर काही शिपाई घेऊन निघाला. प्रधानाने व इतर दरबारी लोकांनी त्या जंगलात न जाण्याबद्दल राजाचे मन निरनिराळ्या प्रकारे वळविण्याचा प्रयत्न केला. पण त्याचा काही उपयोग झाला नाही. राजाच्या डोक्यात जंगलात प्रवेश करण्या पूर्वीच जणुकाही भूत शिरले होते.

राजा नागादित्य याने जंगलात प्रवेश करून पाहिले. जंगल त्याने ऐकले किंवा त्याला वाटले तसे भयंकर तर नव्हतेच उलट सुंदर होते. सर्वत्र शांतता होती. झाडावर पक्षी निरनिराळे गोड आवाज काढीत होते. राजा त्या जंगलात खोल आत गेला तर त्याला एक सुंदर सरोवर दिसले. सरोवराचे पाणी स्फटिकासारखे स्वच्छ होते. त्यात हंस विहार करीत होते. सर्व दृश्यच मोहक होते. म्हणून राजा आपल्या अनुयायांसह त्या सरोवराच्या काठी उतरला. थोडा वेळ विश्रांती घेऊन

ए. सी. सरकार, जादूगार












तो धनुष्य बाण घेऊन एकटाच जंगलात शिकारीला निघाला.

थोडे अंतर चालून गेल्यावर राजाला एक सुंदर पांढरा ससा दिसला. राजाने त्याला एक बाण मारला. त्या बरोबर ससा अदृश्य झाला व त्याच्या जागी एक सुंदर तरुण स्त्री राजाला दिसली. राजाने जो बाण सोडला होता तो फुलांचा हार होऊन तिच्या गळयात पडलेला होता.

"महाराज! आपण ही वरमाला माझ्या गळयात घातलीत, मी धन्य झाले! आजपासून मी आपली पत्नी झाले." ती स्त्री म्हणाली.

राजा नागादित्य त्या स्त्रीचे सौंदर्य पाहून थक्कच झाला होता. तो तिचा गोड आवाज राजा ऐकून देहभान विसरला आणि त्या तरुण स्त्रीला घेऊन सरोवराच्या काठी आला व अनुयायांना म्हणाला– "तुम्ही राजधानीत जाऊन माझ्या लग्नाची तयारी करा."

राजा नागादित्य विवाह झाल्यानंतर आपल्या दुसऱ्या बायकोच्या प्रेमात आपली पट्टराणी व युवराज सर्वांना विसरला. त्यांच्या नावाचा उल्लेख कोणी केला की राजाला राग येई. राजाच्या दुसऱ्या बायकोचे नाव सुरसुंदरी होते. परंतु ती खरोखरी जंगलातल्या भुतांची राणी होती. तिने आपल्या मायाजाळात राजाला गुरफटून टाकले होते. राजा तिच्या हातचे एक बाहुले झाला होता.

एक दोन वर्षांनी सुरसुंदरीला पण एक मुलगा झाला. त्या दिवसापासून तिने देवादित्याचा काटा दूर करण्याचे ठरविले आणि राजाला म्हणाली–"माझी तब्येत दिवसे दिवस खालावत चालली आहे. आपला मोठा मुलगा देवादित्य राज्याबाहेर गेला तरच सुधारेल." आपल्या धाकट्या राणीच्या हातचे बाहुले झालेल्या राजाने काही एक विचार न करता देवादित्याला देशाबाहेर निघून जाण्यास आज्ञा केली. राजाचा तो हुकुम ऐकून मोठी राणी राजवती देवी हिने राजाचे पाय धरून मुलाला राज्याबाहेर पाठविण्याचा हुकुम मागे घेण्याबद्दल विनंती केली. परंतु राजाने तिला सुद्धा हद्दपारीची शिक्षा दिली आणि दोघांना राज्याबाहेर हाकलून देण्याची कामगिरी सेनापती रुद्रक यांना सोपविली.

सेनापति रुद्रक राणी राजवती देवी आणि युवराज देवादित्य यांच्या हातात हातकड्या घालून आपल्याबरोबर घेऊन निघाला. परंतु त्यांना राज्याबाहेर हाकलून देण्या ऐवजी गुप्तपणे आपल्या घरी घेऊन गेला आणि दोघांना राज्याबाहेर हाकलून दिल्याचे त्याने जाहीर केले.

राजाचा प्रधान धर्मप्राण याने राजाला झालेला बुद्धिभ्रम पाहून या गोष्टीस कारण नवीन राणी सुरसुंदरी असल्याचे ओळखले. तिचा शेवट झाल्याशिवाय राजाचा उद्धार होणे शक्य नाही असे मनाशी ठरवून अंतःपुरातील एका दासीच्या हाती सुरसुंदरीला विष देवविले. पण सुरसुंदरीवर त्या विषाचा परिणाम मुळीच झाला नाही. तिने ते विष पचविले.





ते कळल्यावर धर्मप्राण जास्तच घाबरला. त्याने आपल्या गुरूचा सल्ला घेण्याचा विचार केला. त्याचे गुरु दूर एका पर्वतावर तपश्चर्या करीत होते. धर्मप्राणच्या तोंडी सर्व वृत्त ऐकून गुरूने सुरसुंदरीचा शेवट करण्यास उपाय सांगितला. भुतांच्या जंगलात एक बारा फांद्या असलेले वडाचे झाड होते. त्याच्या फांद्या जेथून फुटतात तेथे झाडाच्या खोडात एक पोकळी आहे. त्या पोकळीत एक चांदीचा दाभण आहे. तो दाभण सुरसुंदरीच्या उजव्या पायाच्या अंगठ्याला बोचला तर सुरसुंदरी तत्काळ मरेल. प्रधानाने ती गोष्ट सेनापतीला सांगितली.

"असावीर नक्कीच मिळेल, परंतु मला थोडी सवड द्या." सेनापती म्हणाला.

त्याच दिवशी रात्री सेनापतीने त्याच्या घरी गुप्तपणे राहणाऱ्या देवादित्याला चांदीच्या दाभणाची गोष्ट सांगितली. देवादित्य निर्भय होताच. तो रात्री भुतांच्या जंगलात शिरला आणि बारा फांद्या असलेल्या वडाच्या झाडाजवळ आला. त्याला त्या झाडाच्या पोकळीत चांदीचा दाभण मिळाला.

देवादित्य दुसऱ्या दिवसाची रात्र पडे पर्यंत जंगलातच राहिला आणि रात्र पडल्यावर राजधानीत परत आला. परंतु तो राजधानीत पाऊल टाकणार इतक्यात दुर्दैवाने राजाच्या शिपायांनी त्याला ओळखले. ते त्याला सरळ सुरसुंदरीजवळ आशेने घेऊन गेले की देवादित्याला पकडून आणल्यावर राणी मोठे बक्षिस देईल. त्याप्रमाणे त्यांची इच्छा पूर्ण झाली. सुरसुंदरीने देवादित्याला राजवाड्यातच कैद करून ठेवले आणि त्याने हद्दपारीची शिक्षा दिली असून राजाचा हुकूम मोडल्याबद्दल त्याला फाशी देण्याचा हुकूम देण्याबद्दल राजाचे मन वळविले.

दुसऱ्या दिवशी राजाने देवादित्याला फाशीची शिक्षा द्यावी असा हुकुम सोडला. दुपारी ठीक बारा वाजता फाशी देण्याचे ठरले. आता प्रधानासमोर एक मोठा प्रश्न आणखी उभा राहिला. त्याने सेनापतीला बोलावून त्याचा सल्ला घेतला.

"तुम्ही मुळीच काळजी करू नका. माझे मित्र मायाधर यांनी मला एक युक्ती सांगितली आहे. ती केली हे संकट दूर होईल." सेनापती म्हणाला. तेव्हां प्रधानाच्या मनाला थोडा धीर आला.

प्रथमपासून योजून ठेवल्याप्रमाणे सेनापती सुरसुंदरीला जाऊन म्हणाला—"महाराणी! मी स्वतः देवादित्याला फाशी देण्याची जबाबदारी आपल्या शिरावर घेतली आहे. मला असे वाटते की आपण त्या वेळी आपला शत्रू कसा मरतो हे पहायला जातीने हजर रहावे."

सुरसुंदरीला ते मान्य झाले.

ठीक दुपारी देवादित्याला फाशी देण्याच्या जागी आणण्यात आले. सेनापती रुद्रक एक दोरी घेऊन आला. देवादित्याला भिंतीला टेकून उभे करण्यात आले. रुद्रकने दोरीचा मधला भाग देवादित्याच्या गळ्याला गाठ मारून ठेवला आणि दोरीची दोन्ही टोके दोघां बळकट व्यक्तींच्या हातात देऊन त्यांना म्हणाला—"मी म्हटल्याबरोबर तुम्ही दोरी जोराने ओढा."












सुरसुंदरी शत्रू फाशी जाणार या आनंदात पहायला अगदी जवळ जाऊन उभी राहली. त्याच वेळी सेनापती म्हणाला– "ओढा दोरी!"

दोघां जवानांनी दोरीची टोके जोराने ओढली दोरीचा फास देवादित्याच्या गळ्याला लागण्याऐवजी सुटला. देवादित्याने खाली पडल्याचे सोंग करून दाभण काढून सुरसुंदरीच्या अंगठ्याला बोचला आणि ती मोठ्याने एकदा ओरडली व दुसऱ्या क्षणाला मरून खाली पडली. त्याच वेळी अंत:पुरात तिचा मुलगा सुद्धा मेला. दोघे मेल्यावर राजाच्या डोळ्यावरची धुंद उतरली. तो देवादित्य व आपल्या पहिल्या राणीची चवकशी करून विलाप करू लागला. प्रधान व सेनापती दोघांनी देवादित्य व राणीला बोलावून आणले. त्यानंतर सर्व सुखी झाले.

* * *

दोरीची दोन्ही टोके ओढल्याबरोबर फास जास्त आवळण्याऐवजी कसा काय सुटला? मायाधरने काय बरे युक्ती केली असेल? त्याने सातसात फूट लांबीच्या दोन दोऱ्या घेतल्या. त्या दोन्ही दोऱ्या जमिनीवर पसरून ठेवल्या. दोरीच्या रंगाच्याच बारीक दोऱ्याने दोन्ही दोऱ्यांची दोन्ही टोके शिवून टाकली. देवादित्याच्या गळ्यात मानेवर दोरीचा फास (चित्रात पहा) जोडून बारीक दोऱ्याने शिवून ठेवण्यात आला. देवादित्याच्या मागे भिंत होती. म्हणून दोऱ्याने दोरीचा फास शिवून ठेवलेला कोणाला दिसत नव्हता. देवादित्याच्या कंठाजवळ समोर दोरीच्या फासाची गाठ ठेवली होती. दोरी ओढल्याबरोबर बारीक दोरा तुटला म्हणून फास आवळला गेला नाही. खालच्या चित्रात पाहून कोणालाही हा खेळ करून दाखविणे शक्य आहे.





# बाप से बेटा सवाई

एका गावी एक दरोडेखोर रहात असे. त्याचे नाव गर्जसिंह होते. त्याला शेरसिंह नावाचा दहा वर्षांचा मुलगा होता. आपला मुलगा आपल्या सारखाच अट्टल चोर व्हावा असे गर्जसिंहाला वाटे. परंतु तो एकाएकी आजारी पडला व मुलाचे पुढे कसे होणार या काळजीत पडला.

एक दिवशी गर्जसिंह शेरसिंहाला बोलावून म्हणाला–"बाळ! तू अजून लहान आहेस. मी आपल्या धंद्यातली काही गुपिते तुला शिकवून ठेवावी म्हणतो. मला ते यापूर्वी शक्य झाले नाही. या आजारात कदाचित मरण ही येईल. मग तुझे कसे होणार? हा विचार मनात आला की जीव कंठापर्यंत येऊन तेथेच अटकून राहतो."

"बाबा! तुमचा मुलगा असून मी तुमचे नाव उज्वाल करणार नाही असे वाटते का तुम्हांला? 'बाप से बेटा सवाई' आहे हे मी सिद्ध करून दाखवीन." शेरसिंह म्हणाला. मुलाचे म्हणणे ऐकून गर्जसिंहाची काळजी दूर झाली नाही, उलट वाढली.

दिवसामागून दिवस लोटत होते. एक दिवशी दुपारच्या सुमारास शेरसिंह गावाबाहेरच्या विहीरीवर जाऊन बसला. गावातल्या बायका विहीरीवर कपडे धुवून व पाणी काढून घेऊन निघून गेल्या. आता विहिरीवर एकदेखील मनुष्य उरला नव्हता. संध्याकाळपर्यंत कोणी त्या विहिरीवर जात ही नसे. त्यावेळी शेरसिंहाला दुरून येत असलेला एक परदेशी दिसला. तो दिसायला ऊंच व आडदांड होता. डोक्याला पागोटे होते. त्याच्या खांद्यावर दोन तीन गाठोडी होती. त्या माणसाला पाहताच शेरसिंहाने तो कोणी वस्ताद चोर असावा व रात्री कोठे तरी चोरी केली असावी हे ओळखले. तो चोरीचा माल कोणत्यातरी बाजारात

सौ. पुष्पलता ब. जोशी

विकायला घेऊन चालला असावा असे शेरसिंहाला वाटले.

त्याला एक उपाय सुचला. तो रडण्याचे सोंग करून विहिरीत वांकून पाहू लागला. मुलाच्या कानात सोन्याची कुंडले आहेत हे चोराला दिसले. जवळपास कोणी नाही हे पाहून चोर त्या संधीचा फायदा घ्यावा म्हणून विहिरीजवळ आला. जवळ येऊन पाहतो तर मुलगा रडत होता. म्हणून चोराने मुलाला विचारले–"काय रे बाळा! कां, रडतोस कां?"

शेरसिंह आणखी जास्त मोठ्याने रडू लागला आणि विहिरीत वांकून पहात म्हणाला–"माझ्या गळ्यातला सोन्याचा हार विहिरीत पडलाय हो! मला विहिरीत उतरता येत नाही. घरी गेल्यावर हार हरवलेला पाहून माझे बाबा मला मारतील."

"रडू नकोस. हा घे खाऊ. मी तुझा हार विहिरीतून काढून देतो. तू बाहेर बसून ही गाठोडी आहेत ना यांच्यावर जरा लक्ष ठेव." असे सांगून चोराने एका गाठोड्यातून मिठाई काढून मुलाला दिली आणि गाठोडी कठड्यावर ठेवून विहिरीत उतरला.

शेरसिंह त्या चोराला विहिरीत उतरलेला पाहून त्याची सर्व गाठोडी उचलून पळून गेला.

मुलाजवळ ती गाठोडी पाहून गर्जसिंहाने त्याला विचारले–"मुला! ही गाठोडी कसली रे?"

शेरसिंहाने आपल्या पराक्रमाचे वर्णन करून सांगितले. बापलेकांनी गाठोडी उघडून पाहिली. त्यात सोन्या चांदीचे दागिने व मूल्यवान कपडे होते. ते पाहून तो नक्कीच चोरीचा माल आहे हे गर्जसिंहाने ओळखले. तो आनंदाने आपल्या मुलाला म्हणाला–"बाळ! तू तर 'बापसे बेटा सवाई' निघालास!" आता मी तुला काय शिक-विणार?






द्रौपदीच्या स्वयंवराची बात ऐकून दूरदूरच्या देशांचे राजकुमार कांपिल्य-नगरी एकत्र जमले. त्यांच्या उतरण्याची व्यवस्था निरनिराळ्या महालात करण्यात आली होती. पांडव व कुंती एका कुंभाराच्या घरी उतरले. आपली ओळख न देता ते गावात माधुकरी मागून राहू लागले.

आपल्या मुलीचे लग्न अर्जुनाशीच व्हावे अशी मनापासून इच्छा असून ही द्रुपदाने ती गोष्ट उघड कोणाला सांगितली नाही. परंतु अर्जुनाशिवाय इतर कोणाला शक्य होणार नाही अशी अट त्याने स्वयंवरासाठी ठेवली. त्याने एक विचित्र धनुष्य तयार करून ठेवविले. नंतर छप्पराला टांगलेल्या मत्स्ययंत्रातील फिरत्या माशाच्या डोळ्याचे प्रतिबिंब पाहून लक्ष्यवेध करील त्यालाच द्रौपदी स्वयंवराची माळा घालील, असे त्याने जाहीर केले.

कौरव, कर्ण, इतर राजे भाग्याची परीक्षा पाहण्यासाठी आले होते. राजाने सर्वांच्या आतिथ्य सत्काराची उत्तम सोय केली होती. कांपिल्यनगराची शोभा अवर्णनीय होती.

राजधानीच्या ईशान्येला स्वयंवराचा मांडव उभा करण्यात आला होता. सर्व राजांना व ऋषीमुनींना बसण्यासाठी योग्य आसनांची व्यवस्था करण्यात आली होती. क्षत्रिय व ब्राह्मण यथास्थानी येऊन बसले. ब्राह्मणांच्या मध्ये ब्राह्मण वेषधारी पांडव बसले होते.



त्या दिवशी द्रौपदीला सुगंधी द्रव्ये व उटणे लावून स्नान घालण्यात आले. नंतर सुंदर वस्त्रालंकार धारण करून व हातात वरमाळा घेऊन ती द्रुपद राजाने दाखविलेल्या जागी येऊन उभी राहली.

द्रुपदाचे पुरोहित सोमक यांनी अग्निकुंड तयार करून अग्निहोत्र झाल्यावर द्रौपदीला आशीर्वाद दिला. द्रौपदी मांडवात येऊन उभी राहतांच सर्व मंगलवाद्ये वाजू लागली.

नंतर द्रौपदीचा भाऊ धृष्टद्युम्न मांडवाच्या मधोमध येऊन उभा राहला व सर्व वाद्ये बंद करायला सांगून आणि सर्व राजकुमारांना धनुष्य बाण व मत्स्ययंत्र दाखवून म्हणाला–"हे पाच बाण आहेत यांपैकी एक घेऊन या धनुष्याने जो कोणी मत्स्यभेद करील त्याला माझी बहीण द्रौपदी वरमाळा घालील."

नंतर त्याने द्रौपदीबरोबर जाऊन सर्व राजे व राजकुमार यांचा परिचय करून दिला. त्या सर्वांबरोबर दुर्योधन आदि कौरव, शल्य, विराट, शकुनी, अश्वत्थामा, अक्रूर, सांब, प्रद्युम्न, कृष्ण, कृतवर्मा, अनिरुद्ध, शिशुपाल, चित्रांगद, भगदत्त, पौंड्रक, वासुदेव इत्यादि राजकुमार होते.

कामदेवाच्या सहाव्या बाणासारखी द्रौपदी सुंदर दिसत होती. तिला पाहून सर्वांचे डोळेच जणुंकाही दिपून गेले. कृष्णाने ब्राह्मणांमध्ये बसलेल्या पांडवांना पाहून ओळखले व ती गोष्ट शेजारी बसलेल्या बलरामाला सांगितली.

मत्स्यभेद करण्यासाठी एकामागून एक कित्येक राजकुमार आले. काही धनुष्य उचलू न शकल्यामुळे, आणि काही त्यावर दोरी चढवू न शकल्यामुळे, अपमानित होऊन परत आपल्या जागेवर जाऊन बसले. अनेक राजकुमारांनी हात टेकल्यावर कर्ण पुढे आला. त्याने धनुष्यावर दोरी चढवून बाण ठेवून नेम धरला. त्यावेळी तो नक्कीच



यशस्वी होईल असे सर्वांना वाटले. भाटांनी कर्णाच्या शौर्याची स्तुती गायली. ती ऐकून द्रौपदी म्हणाली—"मी सूतपुत्राशी विवाहास तयार नाही." कर्ण क्रोधाने हंसत एकदा सूर्याकडे पाहून रागारागाने दूर निघून गेला. कर्ण गेल्यावर शिशुपाल, जरासंध, शल्य आदिकांनी मत्स्यभेद करण्याचा अयशस्वी प्रयत्न केला आणि आपापल्या आसनाकडे निघून गेले. कृष्णाने वृष्णी, भोज, अंधक इत्यादि यादव राजकुमारांना मत्स्यभेद न करण्यास सांगितले.

त्यानंतर एकाही राजकुमाराला पुढे येण्याचे धाडस झाले नाही. प्रेक्षक लोकांत गोंधळ उडून गेला. स्वयंवर मोडले की काय असे सर्वांना वाटले. त्याचवेळी ब्राह्मणांच्या रांगेत बसलेला अर्जुन उठून मत्स्ययंत्राकडे जाऊ लागला. सर्व चकित होऊन त्याच्याकडे पाहू लागले. सर्व ब्राह्मण चकित होऊन परस्परांकडे पाहू लागले. एक तरुण ब्राह्मण म्हणाला—"शल्य, जरासंध, शिशुपाल आदिकांसारख्या पराक्रमी क्षत्रिय वीरांनी माघार घेतली तेथे हा ब्राह्मण कुमार काय करणार?"

पण काही वृद्ध ब्राह्मण म्हणाले—"हा कोणीतरी अद्भुत शक्तिशाली तरुण दिसतो. नाहीतर पुढे येण्याची हिंमत त्याने दाखविलीच नसती."

अर्जुनाने धनुष्याजवळ जाऊन प्रथम त्याला व नंतर सभेत हजर असलेल्या सर्वांना नमस्कार केला. आपल्या गुरुवर्यांचे व श्रीकृष्णाचे मनांतल्या मनांत स्मरण केले आणि ते धनुष्य धनुष्यासारखे सहजी उचलले आणि एक बाण उचलून क्षणार्धात मत्स्यभेद केला. सर्व थक्क होऊन त्याच्याकडे पाहू लागले. ब्राह्मण आनंदाने नाचू लागले. त्याचवेळी युधिष्ठिर नकुल व सहदेवाला घेऊन ते उतरले होते तिकडे निघाला. परंतु द्रुपदाची नजर मात्र संशय



आणि आश्चर्य या भावनांनी अर्जुनावर खिळली होती.

सर्व क्षत्रिय राजकुमारांना, एका ब्राह्मण कुमाराने द्रौपदी सारख्या सुंदर क्षत्रिय राजकन्येला जिंकल्याबद्दल अपमान वाटला. ते म्हणाले—"हा द्रुपद राजा एका ब्राह्मणाच्या पोराशी का राजकन्येचा विवाह करून देणार? द्रुपदाने क्षत्रिय जातीचा अपमान केला आहे. त्याची खोड मोडल्याशिवाय आमच्या मनाचे समाधान होणार नाही. द्रौपदी दुसऱ्या क्षत्रिय राजकुमाराशी विवाहाला तयार असेल तर ठीक, नाही तर आम्ही हा विवाह मंडप जाळून उध्वस्त करू." असे म्हणत सर्व राजे व राजकुमार आपापली शस्त्रास्त्रे घेऊन द्रुपदाच्या अंगावर धावले. द्रुपद धावत जाऊन ब्राह्मणांच्या घोळक्यात उभा राहिला.

भीमार्जुनांनी द्रुपदावर चालून आलेल्या क्षत्रिय वीरांना अडविले. क्षत्रियांनी शरवृष्टी केली. भीमाने एक झाड उपटून सर्व बाण अडवून धरले आणि अर्जुनाच्या शेजारी येऊन उभा राहिला. ब्राह्मणांनी द्रुपदाच्या रक्षणार्थ क्षत्रियांवर दगडांचा वर्षाव सुरू केला. अर्जुनाने त्या सर्वांना तसे न करण्यास सांगून द्रुपदाने स्वयंवरासाठी



तयार करविलेले धनुष्य उचलून क्षत्रियांवर शरवृष्टी सुरू केली. शल्य व कर्ण दोघांनी ते पाहिले आणि ठरविले की ब्राह्मण असला म्हणून काय झाले? त्याने क्षत्रियांचा जो अपमान केला आहे त्याबद्दल त्याला शिक्षा दिलीच पाहिजे. अर्जुनाने कर्णावरच बाण सोडायला सुरवात केली. अर्जुनाचा पराक्रम पाहून कर्ण चकित होऊन उद्गारला—"हे ब्राह्मणा! तुझी अस्त्रविद्या अद्भुत आहे. कारण माझी बरोबरी करू शकणारा अर्जुनाशिवाय दुसरा कोणी आजपर्यंत नजरेस आला नव्हता. खरे सांग, तू कोण आहेस?" परंतु अर्जुन काहींच बोलला



नाही. त्याचे तेज पाहून कर्णाने स्वतःचे युद्ध थांबविले.

मध्यंतरी दुसरीकडे शल्य व भीम यांच्या मध्ये मल्लयुद्ध सुरू झाले. भीमाने शल्याचा बचाव व्हावा व आपल्या हाती त्याला मरण येऊ नये या हेतूने त्याला वर उचलून दूर फेकून दिले. सर्व ब्राह्मण खदखदा हंसून टाळ्या वाजवू लागले. इतर राजकुमारांनी भीमाचा तो पराक्रम पाहून त्याच्या वाटेस जाण्यात अर्थ नाही असे मनातल्या मनात ठरविले.

परंतु या घटनेवरून एक गोष्ट स्पष्ट झाली की हे लोक कोणी सामान्य ब्राह्मण नाहीत. हे कोण असावेत बरं, याविषयी सर्व आपसात कुजबुज करू लागले. कृष्ण म्हणाला–"या ब्राह्मणाने द्रौपदीला स्वयंवराच्या अटीप्रमाणे जिंकले आहे. क्षत्रिय राजकुमारांशी धर्मयुद्धच केले आहे. तेव्हां त्यांच्याशी पुढे युद्ध करण्यात शहाणपण नाही." कृष्णाचा सल्ला मान्य करून सर्व राजकुमार मुकाट्याने निघून गेले.

तिकडे कुंभाराच्या घरी कुंती पांडव परत न आल्यामुळे काळजीत पडली. दुर्योधन आदिक कौरवांनी दगा करून त्यांना ठार तर केले नसेल. परंतु युधिष्ठिराबरोबर नकुलसहदेव परत आले. त्यानंतर थोड्याच वेळाने भीमार्जुन द्रौपदीला घेऊन येऊन पोचले. येतांच आईला म्हणाले–"आई! भिक्षा घेऊन आलो आहो." त्यावेळी कुंती घरात होती तिने बरोबर आलेल्या द्रौपदीला पाहिले नव्हते. परंतु बाहेर येऊन पाहते तर भीमार्जुनांबरोबर द्रौपदी उभी होती कुंती अवाक् होऊन तिचे सौंदर्य पहात उभी राहली.

त्यानंतर कुंती युधिष्ठिराला म्हणाली–"मुला! मी चुकले. भीम व अर्जुन भिक्षा घेऊन आलो, म्हणाले. म्हणून सर्व मिळून वांटून घ्या. म्हटले मी! मी आजपर्यंत कधी



खोटे बोलले नाही. या कन्येशी तुम्ही पांचही जणांनी संसार केलात तर ते धर्मविरुद्ध वर्तन होईल. तसे केले नाहीत तर माझे म्हणणे खोटे ठरेल. म्हणून तुम्हीच विचार करून काय करायचे ते ठरवून करा."

युधिष्ठिर काही वेळ विचार करीत उभा राहला आणि थोड्या वेळाने मातेच्या मनाचे सांत्वन करून अर्जुनाला म्हणाला–"अर्जुना! तू अग्नीला साक्षी ठेवून या कन्येशी विवाह कर."

ते ऐकून अर्जुन म्हणाला–"दादा! हे कसे रे? तू व भीम दादा दोघे अजून अविवाहित आहां. मग मी लग्न करणे कसे शोभेल?"

परंतु त्यावेळी पांचही पांडवांच्या मनात द्रौपदीशी विवाह करून घेण्याची इच्छा उत्पन्न झाली. आई व अर्जुन जे म्हणाले ते सर्व सर्व लक्षात घेऊन युधिष्ठिर म्हणाला–"तर मग ठीक, आपण पांचही जण हिच्याशी विवाहबद्ध होऊ." ते ऐकून सर्वांना बरे वाटले.

त्याच वेळी श्रीकृष्ण बलरामाला बरोबर घेऊन पांडवांचा शोध काढीत तेथे येऊन पोचला. त्याने युधिष्ठिरला व कुंतीला नमस्कार केला. युधिष्ठिराने कृष्णाला



विचारले–"कृष्णा! आम्ही ब्राह्मण वेष धारण करून अज्ञातवासातच राहात आहो. तू कसे काय आम्हांला ओळखलेस आणि इकडे कसा काय आलास?"

कृष्ण स्मित करून म्हणाला–"राजा! पराक्रम कोठे लपविता येतो का? आज भीमार्जुनांनी जो पराक्रम गाजवला तो पाहुन तुम्हांला ओळखणे अशक्य होते असं वाटते का तुला? दुर्योधनाचा दुष्ट हेतू फसला, हे बरे झाले. तुम्ही लोकांच्या नजरेस न पडणेच तूर्त बरे!" असे सांगून कृष्ण पांडवांचा निरोप घेऊन बलरामाबरोबर निघून गेला.










तिकडे मत्स्यभेद करून द्रौपदीला जिंकणारा ब्राह्मण कोण हे धृष्टद्युम्नाला किंवा कोणालाच कळले नाही. तो कोठे उतरला आणि द्रौपदीला घेऊन तो कोठे गेला हे त्याला कळले नाही. म्हणून धृष्टद्युम्न इतर ब्राह्मणांबरोबर गुप्तपणे निघाला आणि अर्जुनाचा शोध काढीत कुंभाराच्या घराजवळ येऊन लपून बसला.

कृष्ण व बलराम निघून गेल्यावर भीम, अर्जुन, नकुल व सहदेव माधुकरी घेऊन आले. कुंतीने त्यातला थोडा भाग पाहुण्यांसाठी काढून ठेवून बाकी माधुकरीचे दोन वाटे केले. एक वांटा भीमाला व दुसरा बाकी चौघांना वांटून देण्याचे काम द्रौपदीला सांगितले. द्रौपदीने तसे केले. जेवणखाण आटोपल्यावर गवत अंथरून त्यावर हरणाचे कातडे घालण्यात आले. त्यावर सर्व झोपले. द्रौपदी पांडवांच्या पायाजवळ झोपली.

पांडव पडल्या पडल्या व्यूहभेद व विभिन्न प्रकारची शस्त्रास्त्रे यांची चर्चा करू लागले. आड लपून धृष्टद्युम्न ते सर्व ऐकत होता. त्यांच्या बोलण्यावरून हे ब्राह्मण नसून क्षत्रियवीर असणार असे त्याला पक्के वाटू लागले. परत येऊन त्याने आपल्या पित्याला जे ऐकले ते सर्व सांगितले. म्हणाला—

"आपल्या कृष्णेला दोघे बरोबर घेऊन गेले होते. पण ते उतरले आहेत तेथे आणखी तिघे आहेत. त्यांची आई पण त्यांच्या बरोबर आहे. मला वाटते हे पंच पांडवच असले पाहिजेत." धृष्टद्युम्न द्रुपदाला म्हणाला.

द्रुपदाला त्याची इच्छा पूर्ण झाल्याबद्दल बरे वाटले. त्या पांच बंधूंविषयी आणखी माहिती काढून आणण्यासाठी द्रुपदाने आपल्या पुरोहिताला कुंभाराच्या घरी पाठविले.



# लेनिनचे बालपण



व्लादिमीर इलिच उल्यानोव (लेनिन) यांचा जन्म २२ एप्रिल १८७० या रोजी सीम्बिर्स्क नावाच्या शहरात झाला. हे नगर व्होल्गा नदीच्या काठी आहे. परंतु नंतर लेनिनच्या नावावर या शहराचे नाव उल्यानोव्हस्क ठेवण्यात आले.

लेनिन यांच्या वडिलांचे नाव इल्या निकोलायेविच उल्यानोव असे होते. त्यांचे घराणे सामान्यपणे मध्यम परिस्थितीतल्या वर्गातले होते. इल्या निकोलायेविच यांनी आपल्या वडील बंधूंच्या मदतीने विद्याभ्यास पुरा केला आणि शिक्षक झाले. विद्यार्थ्यांत एक लोकप्रिय शिक्षक म्हणून त्यांची गणना होत होती. कारण त्यांनी विद्यार्थ्यांना कधी मारले नाही की कोणाविरुद्ध मुख्याध्यापकाकडे तक्रारपण केली नाही. शांतपणे ते आपल्या विद्यार्थ्यांना शिकवीत, त्यामुळे विद्यार्थ्यांना लवकर धडापण चांगला कळे. मागे राहिलेल्या विद्यार्थ्यांना ते घरी बोलावून फुकट शिकवीत. सीम्बिर्स्क येथे गरिबांसाठी व शेतकऱ्यांच्या मुलांसाठी त्यांनी पुष्कळ शाळा काढण्याचे काम केले.

लेनिन यांची आई मारिया अलेक्झांड्रोवना यांचे वडील एक डॉक्टर होते. मारियाचे बालपण जास्त करून खेड्यातच गेले. शेतकऱ्यांची तिच्यावर फार मर्जी होती. तिला उथळ लोकांत मिसळून सामाजिक मनोविनोदकरणे आवडत नसे. ती घराबाहेर फारशी जात नसे. तिचा सर्व वेळ मुलांच्या पालनपोषणात जात असे.

लेनिनला आईचे प्रेम भरपूर मिळाले होते. लेनिन हे आपल्या आईवडिलांचे तिसरे अपत्य. त्यांना ओल्गा नावाची एक बहीण होती. ती लेनिनहून दीड वर्षांनी लहान होती. त्यांच्या खेळामुळे घर जणु काही दुमदुमत असे



लेनिनच्या वडील

लेनिन यांना पांचवे वर्ष लागले तेव्हां त्यांची आई स्वतः त्यांना शिकवू लागली. लेनिनचे वडील बालोपयोगी पुस्तके व नियतकालिके मागवीत. लेनिन व ओल्या ती पुस्तके व मासिके तासन तास वाचीत बसत. हळू हळू त्यांनी रशियाचा इतिहास वाचायला व रशियन भाषेतील कविता पाठ करायला सुरवात केली. थोडा वेळ अभ्यास करून दोघे खेळत. उन्हाळ्यात पळणे आणि झाडावर चढणे यात त्यांना मजा वाटे. हिवाळ्यात बर्फ पडे तेव्हां बर्फावरून घसरणे व बर्फाचे तुकडे फेकण्याचे खेळ दोघे खेळत. थोडा मोठा झाल्यावर बाळ लेनिन स्केटिंग खेळायला जाऊ लागला.

लेनिन लहानपणी थोडा खोडकर व खट्याळ होता. पण त्याच्यात एक चांगला गुण होता. तो कधी खोटे बोलत नसे. कधी त्याच्या हातून चूक घडली की ती तो क़बूल करी. पाच वर्षांचा असताना लेनिन याने आपल्या मोठ्या बहिणीची फुटपट्टी तोडून टाकली आणि जाऊन ती बहिणीला दाखविली. ती चूक आपली असल्याचे सांगितले पण.

"फुटपट्टी कशी रे तुटली?" बहिणीने विचारले.

"अशी गुडघ्यावर ठेवून मोडली!" असे सांगताना त्याने अभिनय पण करून दाखविला.

"लेनिन आपली चूक लपवीत नाही. हा एक चांगला गुण आहे त्याचा!" असे आई नेहमी म्हणे.

लेनिन आठवर्षांचा झाला असेल. तेव्हां एक गोष्ट घडली. एकदां लेनिन आपल्या भावंडांबरोबर कजान येथे आपल्या नातेवाइकांच्या घरी गेला. तेथे खेळता खेळता त्याने चुकून एक टेबल ढकलले. म्हणून टेबलावर ठेवलेली पाण्याची सुरई खाली पडून फुटली.

घरातल्या लोकांनी विचारले–"कोणी केले हे?" सर्व "मी नाही, मी नाही" असेच म्हणाले. लेनिन पण म्हणाला–"मी पण नही पाडली."

दोनतीन महिन्यांनी सर्व सीम्बिर्स्कला परत आले. लेनिनची आई मुलांना झोपवीत होती. तेव्हां लेनिन आईकडे पाहून एकाएकी रडू लागला आणि म्हणाला–"आई! मी खोटे बोललो, मी नाही सुरई फोडली असे म्हणालो होतो. पण मीच पाडली होती सुरई!" असे म्हणत लेनिन आणखी मोठ्याने रडू लागला.

साडे नऊ वर्षांचे वय असेल, लेनिन शाळेत जाऊ लागला. तो एक हुशार विद्यार्थी होता. "आमच्या वडिलांनी अभ्यास आणि सर्व कामे मन लावून करण्यास शिकविले" असे लेनिन सांगत. लेनिनचे शिक्षक सांगत की 'लेनिन लक्ष लावून वर्गात शिकवलेला प्रत्येक धडा ऐकतो म्हणून तो वर्गात पहिला येईल.' तो घरचा अभ्यास इतर मुलांच्या आधी करून टाकी. अभ्यास झाल्यावर उरलेला वेळ गप्पात खेळण्यात



लेनिनची आई

व मुलांच्या खोड्या काढण्यात घालवी. लेनिनचे वडील कधी घरी रहात तर ते त्याला आपल्या खोलीत बोलावून नेत. अशा तऱ्हेने इतर मुलांच्या खोड्या त्याने काढू नये याची ते काळजी घाळगीत. वडील लेनिनचा अभ्यास झाल्यावर तो तपासून पहात. पण एकदेखील चूक निघत नसे. तेव्हां ते लेनिनला दुसरे काही तरी काम देऊन त्यात गुंतवून ठेवीत. नाहीतर दोघे मिळून बुद्धिबळे खेळत. वडिलांच्या गैरहजेरीत लेनिन खूप दंगामस्ती करत असे.

     

लेनिनच्या वडिलांना बुद्धिबळांचा नाद होता. तोच नाद त्यांच्या मुलांना पण लागला.

लेनिन कोणतेही काम करायचे झाले की ते मन लावून करी. त्याने पुस्तके वाचून बुद्धिबळाचा खेळ चांगला शिकून घेतला. तो कोणत्याही गावी गेला किंवा प्रवासात असला की बुद्धिबळांचा डाव बरोबर घेऊन जाई. विद्यार्थी दशेत लेनिन आपल्या मोठ्या भावाशी बुद्धिबळे खेळण्यात रमून जाई. मोठा भाऊ साष जे काम करी, तेच लेनिन पण करी. लहानसहान कामे सुद्धा तो आपल्या मोठ्या भावाची नक्कल करून करी. साष स्वभावाने थोडा गंभीर होता. तो स्वभावाने विचारशील व कर्तव्यपरायण सुद्धा होता. त्याच्या या गुणांचा परिणाम लेनिनच्या मनावर बिंबला. लेनिन याने आपल्या मोठ्या भावाचे मन लावून काम करणे, प्रामाणिकपणा, कर्तव्यपरायणता आणि मेहनत हे गुण उचलले.

लेनिनचे त्याचा मोठा भाऊ साष याच्यावर फार प्रेम होते. "कामातच नव्हे तर लोकांशी कसे वागावे किंवा बोलावे या बाबतीत देखील साष हा आमचा सर्वांचा आदर्श होता. त्याची न्यायशीलवृत्ती, कौशल्य व मन लावून काम करण्याचा स्वभाव ह्या त्याच्या गुणांचा पगडा आमच्या मनावर बसला." असे व्लादीमीर लेनिन म्हणे. लेनिन स्वभावाने तापट होता. परंतु साषचा शांत स्वभाव, आत्मसंयम इत्यादी गुणांमुळे सर्वांच्या स्वभावात मुख्य करून लेनिनच्या स्वभावात बदल झाला. आपल्या मोठ्या भावाचे अनुकरण करून लेनिनने आपल्या उणिवांवर जय मिळविला. मोठा झाल्यावर लेनिनला कधी क्रोध आला नाही. (चालू)

लेनिनच्या जन्मस्थान





# जोन ऑफ आर्कचे चिन्ह

फ्रांसच्या स्वातंत्र्याचे 'जोन ऑफ आर्क' हे चिन्ह आहे. हिला 'ऑर्लियन्स कन्या' असे म्हणतात. पांचशे वर्षांपूर्वी या तरुण मुलीचा सजीव देहच्या जागी जाळण्यात आला त्या रुआ नगरी तिचे स्मारक चिन्ह बनविण्यात आले आहे. ८ मे हा फ्रेंच राज्यक्रांतीचा दिवस आहे. तोच जोन ऑफ आर्कचा पण स्मारक दिवस आहे. ही एक आश्चर्याचीच गोष्ट म्हणावी लागेल की ८ मे १९४३ या दिवशीच ट्यूनिस नगर देखील शत्रूच्या हातातून स्वतंत्र झाले.





# जावें त्याच्या वंशा

एका गावी शिवू नावाचा एक गरीब मुलगा रहात असे. तो नेहमी खुषीत आनंदात असे. तो मेहनत करीत नसे म्हणून गरीबीच त्याच्या वांट्याला आली.

त्याच गावी एक जमिनदार रहात असे. शिवूजवळ खायला प्यायला काही उरले नाही, की तो जमिनदाराकडे जाऊन काम मागे आणि जमिनदाराने सांगितलेले काम मन लावून करी.

एकदा जमिनदाराने त्याला घोड्याला मालिश करायचे काम दिले. शिवू मालिश करतांना मोठ्याने ओरडला–"अहो, पहा, पहा ! हा घोडा खाऊन पिऊन कसा माजला आहे. याचे नशीब तर पहा. मीच जमिनदाराचा घोडा असतो तर मला पोटभर खायला प्यायला मिळाले असते आणि माझ्या सेवेला कित्येक नोकर हजर असते."

तोच विचार त्याच्या मनात बराच वेळ घोळत राहला. पण थोड्या वेळाने त्यालाच आपल्या मूर्खपणाबद्दल हंसू आले. त्याला हसतांना पाहून घोडा चरायचा थांबला आणि शिवूला मनुष्यांच्या आवाजांत विचारू लागला–"तुला खरोखरच घोड्याचा जन्म मिळावा असे वाटत आहे का ?"

घोडा बोलू लागलेला पाहून शिवू चकित होऊन घोड्याकडे पाहू लागला. घोडा पुन्हां म्हणाला–"जमिनदार चाबकाने कसा बडवतो त्याचा अनुभव घ्यावयाचा असेल तर माझे दोन्ही कान पकडून मनातल्या मनात माझा जन्म मिळावा असे देवाजवळ मागणे माग, तुला घोड्याचे रूप येईल. पाहिजे तर मी म्हटले ते खरे की खोटे याची खात्री करून घे !"

शिवूने खात्री करून घेण्यासाठी घोड्याचे दोन्ही कान घट्ट धरले व म्हणाला–"मला जमिनदाराचा घोडा कर." दुसऱ्या क्षणाला तो घोडा झाला व घोड्याच्या जागी एक बैरागी उभा असलेला दिसला आणि घाईघाईने तबेल्याच्या बाहेर निघून गेला.

बैरागी निघून गेल्यावर शिवूला त्याची चूक कळली. आतां त्या अश्वरूपातून आपल्याला सुटका कशी मिळणार व पुन्हां आपल्याला मनुष्यरूप कसे मिळणार हे त्याला कळेना. तशी संधी मिळाली तर लगेच येथून पाय काढायचा, असे त्याने मनाशी ठरविले. आपल्याला अश्वरूप मिळाल्याबद्दल त्याला एका बाजूने आनंद वाटत होता तर दुसऱ्या बाजूने आयुष्यभर घोडा म्हणूनच रहावे लागणार की काय याची काळजीपण वाटत होती.

थोड्या वेळाने जमिनदाराने नोकराला घोड्यावर खोगीर चढवून व त्याला लगाम घालून घेऊन यायला सांगितले. त्याने शिवूला हाक मारली. पण तबेल्यात शिवू नव्हता. म्हणून तोच नोकर घोड्याला सोडून बाहेर घेऊन आला. तेव्हां घोड्याने त्याला लाथ मारली आणि पळू लागला. जमिनदाराचे नोकर त्याचा पाठलाग करू लागले. पण तो पळतच राहला.



शिवू सरळ त्याच्या घरी जाऊन आपल्या आईजवळ उभा राहला. त्याची आई त्याला कोठे तरी लपवून ठेवील असे त्याला वाटले होते. तो आईला तसे म्हणाला देखील. पण त्याची भाषा तिला कळली नाही. उलट घरात शिरून आलेल्या घोड्याला पाहून ती घाबरली आणि त्याला पळवून लावण्याचा प्रयत्न करू लागली. मोठमोठ्याने ओरडून ती त्या घोड्याला, तोंडाला आले ते बोलू लागली.

इतक्यात जमिनदाराचे नोकर येऊन पोचले. सर्वांनी मिळून घोड्याला धरले व बाहेर ओढून घेऊन आले. परंतु अश्वरूप



शिवू त्यांच्या हातातून आपली सुटका करून घेण्याचा प्रयत्न करू लागला. तो मागच्या पायांवर उभा राहिला आणि थोड्या वेळाने जमिनीवर लोळू लागला. नंतर पुन्हा उभा राहून घरात पळून गेला. त्याची आई घाबरून घरातून बाहेर पळून गेली.

दहा जणांनी मिळून शिवूच्या तोंडात लगाम घातला आणि खोगीर पाठीला बांधून त्याला बाहेर घेऊन आले. जमिनदार बराच वेळ वाट पहात उभा होता. त्याला परगावी जायला उशीर झाला होता. म्हणून तो चटदिशी घोड्यावर बसला. घोडा सावकाश उंटासारखा चालू लागला. घोड्याला झाले आहे तरी काय, मालकाला कळेना.

जमिनदाराला वाटले की घोड्याच्या अंगात वारे शिरले असावे. रस्त्याच्या दोन्ही बाजूला गंमत पाहणारांची गर्दी जमली. सर्व चकित होऊन कधी घोड्याकडे तर कधी जमिनदाराकडे पहात होते. त्यांना पाहून शिवूला हंसू आले. तो रस्त्याच्या मधोमध मागच्या पायांचे गुडघे टेकून पुढल्या पायांवर उभा राहिला व हसू लागला. ते घोड्याचे खिंकाळणे नव्हते, ते माणसाच्या हसण्यासारखे सर्वांना ऐकू आले. म्हणून लोकांना जास्तच आश्चर्य वाटले.

जमिनदार जमिनीवर आदळला व धुळीने त्याचे सर्व कपडे व अंग माखून निघाले. तो उठून उभा राहून अंगावरची धूळ झाडू लागला. शिवूला जमिनदाराची दया आली. त्याने समोरचे पाय हातासारखे जोडून जमिनदाराला नमस्कार केला.

"पहा, घोडा जमिनदार साहेबांना नमस्कार करतो आहे." लोक चकित होऊन म्हणू लागले.

आपला पाणउतारा घोड्याने केल्याबद्दल जमिनदाराला भयंकर राग आला. त्याला तेथे थांबून आपले जास्त हंसू करून घेणे



आवडले नाही. नशिबाने घोडा उठून उभा राहिला. जमिनदार त्याच्यावर बसला. तो हातात लगाम धरून स्वतःला सावरून बसणार इतक्यात टाच मारण्यापूर्वीच घोडा भरधांव सुटला. जमिनदार खाली जमिनीवर पडू लागला. त्याने घोड्याच्या मानेला विळखा घालून स्वतःला वाचविण्याचा प्रयत्न केला.

शिवू त्याच स्थितीत बराच वेळ पळत राहिला. शेवटी एका गावानजीक पोचल्यावर त्याने पळण्याचा वेग थोडा थोडा कमी केला. गाववाले घोडेस्वाराची ती दुर्दशा पाहून त्याची कीव करू लागले व त्याच्या मदतीला धावले. धुळीने माखलेले अंग व कपडे असल्याने जमिनदार मान खाली करून बसून होता. त्याने त्या गावकऱ्यांना ओळखण्याचा प्रयत्नदेखील केला नाही. स्वतःचे तोंड लपवू लागला.

जमिनदार घोड्यावरून घाईघाईने खाली उतरण्याच्या प्रयत्नात आपला सर्व भार एका माणसावर टाकून उतरण्याचा यत्न करू लागला. परंतु जमिनदाराच्या हातात एका माणसाचा कानच आला. तो मनुष्य त्या गावचा पाटील होता. त्याला तो त्याचा अपमान वाटला. त्याने त्याला



जमिनीवर खाली पाडले व जोराने त्याला एक लाथ मारली.

शिवूला त्या माणसाचा राग आला. पाटलाचे केस आपल्या दातात धरून शिवू त्याला ओढू लागला. तरी शिवूचा राग शांत झाला नव्हता. जो कोणी समोर दिसला त्याच्या अंगावर शिवू धावून गेला आणि त्याला चावू लागला. म्हणून गावकरी भिऊन पळून गेले. घोड्याची खोड मोडण्याचे ठरवून काठ्या, भाले, बरछी, जे हाती आले घेऊन सर्व घोड्याच्या अंगावर धावून गेले.

शिवू गांवकऱ्यांच्या हातात हत्यारे पाहून थरथर कापू लागला. तो जोरजोराने धावू










लागला आणि सरळ आपल्या गावी जाऊन तबेल्यात स्वस्थ उभा राहिला. जमिनदार साहेब वाटेत कोठे तरी उतरले असावेत असे नोकरांना वाटले. म्हणून त्यांनी घोड्याला चांगली मालीश करून त्याला खायला दाणा घातला. दाणा खात शिवू आपल्या मूर्खपणाबद्दल पश्चात्ताप करू लागला. "देवा! तू मला चांगलीच शिक्षा केलीस. पुन्हा मला मनुष्य रूप तुझ्या कृपेनेच मिळेल. तेवढी कृपा कर."

त्याच वेळी बैरागी तबेल्याचा दरवाजा उघडून बाहेर आला आणि विचारू लागला— "कसं काय शिवू? घोड्याचे जिणे कसे वाटले तुला?"

"का, चांगले आहे. पण मी जे खातो ते मला पचेल की नाही याच गोष्टीची काळजी वाटते." शिवू म्हणाला.

"मग मी होऊ का घोडा पुन्हा?" बैराग्याने विचारले.

"का?" शिवूने विचारले.

"मी, बायकोने पुरेवाट केली म्हणून घोडा झालो आहे. तिने मला या बैराग्याच्या वेषात ओळखले. ती माझा पाठलाग करीत येते आहे. ती पहा, ती कैदाशीण! मला मनुष्य जन्मापेक्षा घोड्याचा जन्म पसंत आहे." असे म्हणत बैराग्याने घोड्याचे दोन्ही कान पकडून "मला पुन्हां जमिनदाराचा घोडा होऊ दे!" असे म्हटले.

त्यानंतर काय झाले हे शिवूला माहीत नाहीं. दुसऱ्या दिवशी तो जागा झाला तेव्हां तबेल्यातल्या गवतावर झोपला असल्याचे त्याच्या लक्षात आले. जमिनदाराच्या नोकरांनी त्याला काही विचारले नाही. त्यांना शिवू परत आला असावा, असे वाटले.

काही लोक म्हणतात की ही गोष्ट कधी घडलेलीच नाही, ते शिवूचे एक स्वप्न होते. कदाचित ते खरे असू शकेल.






# वरदान

एका जंगलाजवळ एक लहानसे गाव होते. त्यात एक लाकूडफोड्या आपल्या मुलांबाळांबरोबर रहात असे. त्या लाकूडफोड्याच्या झोपडीजवळ एका श्रीमंताचे घर होते. त्या श्रीमंताच्या घरी सर्व आनंदात रहात. ते पाहून लाकूडफोड्याच्या कुटुंबियांना हेवा वाटू लागला.

एकदा लाकूडफोड्याची बायको म्हणाली— "काही लोक फार भाग्यवान असतात. देवाची कृपा असते त्यांच्यावर. आपल्या जवळ चार पैसे असते तर आपण किती सुखी झालो असतो नाही?"

"अग! या श्रीमंतांना सुखाचा उपभोग कसा घ्यावा हे आहे कोठे माहीत? माझ्या जवळ इतके पैसे असते तर......!" लाकूडफोड्या म्हणाला.

"प्राचीन काळी देव प्रसन्न होऊन वरदान देत असत. आपल्याला देखील देवाने वर दिला तर किती मजा होईल?" बायको म्हणाली. तिच्या तोंडातून ते वाक्य निघण्याची खोटी, एक बाई झोपडीच्या दारात येऊन उभी राहिली. ती कोणी देवीच असावी असे दोघांना वाटले.

"होय, मी देवीच आहे. मी तुला तीन वर देते. त्याहून ज्यास्त काही मागू नकोस! तुम्ही मागाल त्या तीन वस्तू तुम्हांला मिळतील. असे सांगून देवी अंतर्धान पावली.

देवीकडून मिळालेले ते वर ऐकून लाकूडफोड्या व त्याची बायको दोघांना फार आनंद झाला. पण काय मागावे व कसे हे त्यांना सुचेना.

"मला विचाराल तर श्रीमंती यावी व थोर श्रीमंतांसारखे पुढील आयुष्य जावे." बायको म्हणाली.

"डोस्कं तुझं! फक्त जवळ पैसे असले म्हणजे का काही होते? आजारपणातून











सुटका मिळेल का? चोरांच्या हातून सुट्‌का? म्हणून दीर्घ आयुरारोग्य मिळाले तर चांगले नाही का?" नवरा म्हणाला.

"पण गरीबीत शंभर वर्षे जगावे लागले तर ते आयुष्य म्हणजे एक भारच वाटेल नाही का?" बायको म्हणाली.

"तू म्हणालीस ते देखील बरोबर आहे, म्हणा! म्हणून आपण दोघं विचार करून काय तो वर मागून घेऊ.

त्यानंतर लाकूडफोड्याच्या बायकोने चूल पेटवून "या वेळेला खायला मासे मिळाले तर किती बरे होईल?" असे म्हटले मात्र, छपरातून पटपट मासे खाली येऊन पडले.

नवऱ्याला कळले की तीन वरांपैकी एक संपला. तो आपल्या बायकोला म्हणाला— "अग वेडे! तू तरी काय वर मागून घेतलास? या पेक्षां हे सर्व मासे एका माळेत ओवलेले मागितले असतेस तर ते तुझ्या गळ्यात येऊन पडले नसते का?" दुसऱ्या क्षणाला ते सर्व मासे एका माळेत ओवले गेले आणि लाकूडफोड्याच्या बायकोच्या गळ्यात ती माळा जाऊन पडली.

"तुम्ही तरी काय वर मागितलात? आणि माझ्या वेडेपणाच्या गोष्टी सांगता! तुम्ही सुद्धा आणखी एक वर फुकट घालवलात की नाही?" बायको म्हणाली आणि आपल्या गळ्यातली माळा काढू लागली. पण तिला ती काढता आली नाही. ती तिच्या अंगाला चिकटली होती.

"तुम्ही हा वर मागून माझ्या तोंडचे मासे सुद्धां ओढून घेतलेत. तुम्ही ही माळा काढून घेतली नाहीत तर मी माळेनेच गळ्याला फास लावून जीव देईन." बायको म्हणाली.

शेवटी हताश होऊन लाकूडफोड्याने बायकोच्या गळ्यातली माळा बाहेर निघावी म्हणून वर मागून घेतला.





# पडकें देऊळ

**[२९]**

[त्या दिवशी रात्री वृश्चिक द्वीपावरील रानटी जातीच्या एका टोळीने शिखीमुख व त्याच्या सर्व साथीदारांना कैद केले. त्या जातीच्या नायकाच्या तोंडी उन्मत्त कालाची गोष्ट कळली. ती ऐकून नागसोम त्याच्या शोधार्थ गेला व त्याने तेथल्या पाहरेकऱ्याला बांधून ठेवले. तो खडकाबरोबर, शिखीमुखच्या टोळीतले लोक जेथे झोपले होते, डोंगराच्या त्या पायथ्याच्या बाजूला गडगडत जाऊ लागला. पुढे—]

गुहेत निजलेला वृश्चिक जातीचा नायक आणि गुहेसमोर पंगत बसलेले शिखीमुख व त्याचे अनुयायी, डोंगरावरून गडगडत येणाऱ्या दगडाचा आवाज ऐकून घाबरून गेले. तो पाहरेकरी सुद्धा खडकाबरोबर खाली येत होता. भूकंपामुळे खडक खाली येत असावा असे सर्वांना वाटले. शिखीमुख आपल्या अनुचरांना धीर देऊन सावध करीत असतां वृश्चिक जातीचा नायक गुहेतून बाहेर पळत आला.

"तुम्ही सर्व दूर पळा. हा भूकंप आहे, भूकंप! पळाला नाहींत तर मराल!" तो ओरडून म्हणाला.

नायकाने सावध केल्यावर सर्व पळू लागले त्याच वेळी तो खडक व त्याच्या-बरोबर तो पाहरेकरी खाली येऊन जोराने



आदळले. त्यावेळी जो आवाज झाला तो ऐकून सर्वांच्या अंगाचा थरकाप उडाला. सुदैवाने जेथे तो खडक येऊन पडला होता त्या जागी त्यावेळी कोणी नव्हते. अकस्मात पाहरेकरी किंकाळ्या फोडीत त्या खडका पाठोपाठ त्याच्या जातीच्या लोकांवर जाऊन आदळला.

त्याचा नायक त्याच्या जवळ धावत गेला आणि त्याला विचारले—"ही काय भानगड आहे? तुझे हातपाय कसे काय बांधले गेले?"

पाहरेकरी त्या स्थितीत ही आपल्या नायकाला समोर पाहून लटपटत उभा राहण्याच्या प्रयत्न करू लागला आणि म्हणाला—"आपण इम्बु जातीच्या ज्या लोकांना काल कैद केले होते त्यांच्या पैकी एकाने माझ्या पाठीमागून येऊन माझे हात पाय बांधून ठेवले. ही बातमी आपल्याला कळावी म्हणून मीच आपला जीव धोक्यात घालून या दगडाबरोबर खाली आलो."

पाहरेकरी म्हणाला ते ऐकून वृश्चिक नायक व शिखीमुख दोघे ही चकित झाले. शिखीमुखने पाहिले, नांगसोम दिसत नव्हता. तर मग तोच असावा असे त्याला वाटले व तो ती गोष्ट विक्रमकेसरीला सांगू लागला तेवढ्यात वृश्चिक नायक म्हणाला—"तुमच्या पैकी एक जण उन्मत्त काताच्या शोधार्थ गेला आहे. त्याने धाडस करून ते फळ खाल्ले तर निश्चित मरणार, त्याला आता कोण काय करणार?"

"तरमग लवकर जाऊन आम्ही नांगसोमला ते फळ त्याने खाऊ नये असे सांगतो. पण ते फळ खाल्ल्याने जिवाला कसा काय धोका येतो?" शिखीमुखने विचारले.

"वृश्चिक नायकाव्यतिरिक्त इतर कोणाला ते फळ खाऊन पचविता येणार नाही. मी दोनच दिवसांपूर्वी माझा कैदी—तो शेंडीवाला पुजारी आहे ना—त्याला ते फळ खायला देऊन त्याच्या कडून सर्व खरे काय ते वदवून घेण्याचा विचार केला होता." वृश्चिक नायक म्हणाला.

त्यावर शिखीमुख त्याला म्हणाला—"नांगसोम कोणाला फसवून त्या उन्मत्त काताच्या शोधार्थ गेला नसावा. या प्रदेशातल्या हवापाण्यानेच त्याचे डोके फिरले असावे. आम्ही तर तुझे मित्र आहो. म्हणून पडक्या देवळाचा तुला शोध काढावयाचा असेल तर आम्ही तुला सर्व प्रकारे मदतच करू. चल तर, पहिल्याने नांगसोमला हुडकून काढू."

वृश्चिक नायक आपल्या जातीच्या लोकांना म्हणाला—"आतां पर्यंत त्याने ते फळ खाल्ले असेल तर आपण वृश्चिक मातेच्या समोर त्याचा बळी देऊ." नंतर तो शिखीमुखला म्हणाला—"चल, कात खाऊन आपला जीव धोक्यात घालण्यापूर्वी त्याला आपण पकडून घेऊन येऊ."

सर्व वृश्चिक नायकाच्या पाठोपाठ उन्मत्त काताची झाडे ज्या तलावाच्या काठी होती त्या बाजूला निघाले. परंतु तिकडे नांगसोमने झाडावर चढून फळ



तोडून खाल्ले होते. फळ खाल्ल्यावर त्याला जमीन, झाडे, डोंगर वगैरे फिरत आहेत असे वाटले.

"मी उन्मत्त कात खाल्ला आहे. माझे डोके गर गर फिरू लागल्या सारखे होते आहे. या स्थितीत मी भूगर्भात पडके देऊळ कोठे दडले आहे शोधून काढतो. पडके देऊळ आणि वृश्चिक मातेचे देऊळ एकच तर नसेल? ते पहा, पडके देऊळ. मला सापडले. पहा, ते पहा!" असे मोठमोठ्याने ओरडत नांगसोम हाताने आपलेच केस ओढीत भ्रमिष्टासारखा त्या डोंगरात धावत पळत सुटला.













नांगसोमला पकडण्यासाठी शिखीमुख व त्याचे साथी त्याच्या पाठोपाठ धावू लागले. परंतु डोंगरात त्याचा आवाजच ऐकू येत होता. तो कोणाला दिसत नव्हता. उजाडे-पर्यंत सर्व त्याला शोधत राहले. शेवटी एका डोंगराच्या पायथ्याशी झाडाखाली सर्व दमून भागून पडून राहले.

उन्मत्त काताच्या झाडांच्या तळ्या शेजारी एक जंगल होते. त्या जंगलात वृश्चिक जातीच्या लोकांनी पुजाऱ्याच्या टोळीला बंदी करून ठेवले होते. मध्य-रात्रीच्या सुमारास पुजाऱ्याला नांगसोमचा आवाज ऐकू आला. लगेच नागगिधाडाला व आपल्या इतर अनुयायांना सावध रहायला सांगून तो वृश्चिक पाहरेकऱ्यांना म्हणाला—"तो ओरडणारा मनुष्य आहे ना, त्याच्या अंगात देवी आली आहे. तो देवीचा मोठा भक्त आहे. त्याच्या पाठोपाठ आपण गेलो की वृश्चिक मातेचे देऊळ आपल्याला मिळेल. चला, नको नका म्हणू."

वृश्चिक जातीचे लोक भोळे होते. म्हणून पुजाऱ्याच्या बोलण्यावर विश्वास करून ते सर्व नांगसोमच्या शोधार्थ निघाले. उजाडण्याच्या सुमारास त्यांना नांगसोम एका गुहेसमोर दिसला. गुहेवर कोळिष्टके पुष्कळ जमली होती. त्यांत एक भयंकर मोठा विंचू अडकला होता आणि बाहेर येण्यासाठी धडपड करीत होता.

नांगसोम त्या कोळिष्टकात अडकलेल्या विंचवासमोर एक तलवार घेऊन उड्या मारीत ओरडत होता—"वांचवा, मला वांचवा! एक भयंकर मासा मला गिळणार आहे." नांगसोमचे ते भ्रमिष्टासारखे नाचणे ओरडणे पाहून त्याने उन्मत्त कात खाल्ला असल्याचे पुजाऱ्याने ओळखले. वृश्चिक जातीच्या विश्वासाप्रमाणे त्याच्या मदतीने पडके देऊळ आपल्याला नक्कीच सापडेल, अशी आशा पुजाऱ्याला वाटू लागली.



पुजाऱ्याने नांगसोमजवळ जाऊन त्याला विचारले—"तू इम्पु जातीचा आहेस ना? तुला मी गोलभरा गावात पाहिले होते! तुझे नाव नांगसोम नाही का?"

नांगसोम पुजारी म्हणाला ते ऐकून गर्रकन फिरून त्याच्याकडे पहात म्हणाला—"अरे शेंडीवाल्या सोंगाड्या! कोण रे तू? तू सिद्ध पुरुष असलास तर मला त्या मगरीच्या हातांतून वांचव. मी तुझे उपकार जन्मभर विसरणार नाही." असे म्हणत नांगसोम पुजाऱ्याच्या पायावर लोटांगण घालून रडू लागला.

पुजाऱ्याने त्याला हात धरून उभे केले व म्हणाला—"अरे ही मगर नाही. दोन डोक्याचे एक गिधाड आहे. एका क्षणात पहा या सर्वांना ठार करतो." असे म्हणत त्याने नागगिधाडाला ओरडून म्हटले—"नाग-गिधाडा! त्या भुतिणीला ठार कर पाहू!"

दुसऱ्या क्षणाला नागगिधाडाने त्या विंचवावर तलवारीचा वार केला. विंचवाचे दोन तुकडे झाले व त्याच्या अंगातल्या विचित्र रंगाच्या रसाने सर्व जाळे ओले झाले. नांग-सोम तो रंग पाहून थरथर कापू लागला आणि म्हणाला—"याच्या प्रवाहात वाहू लागलो आहे. मला पोहता येत नाही. मला वांचवा!"



पुजाऱ्याने नांगसोमच्या डोक्यावर व अंगा खांद्यावर हात फिरवून म्हटले—"तू भिऊ नकोस! मी हा रक्ताचा प्रवाह पाण्याचा प्रवाह करतो बघ. तू त्यात शिरून भूगर्भातल्या पडक्या देवळापर्यंत जा."

"सिद्ध गुरूची आज्ञा शिरसावंद्य!" असे म्हणत नांगसोम कोठे तरी भरभर जाऊ लागला.

पुजारी आपल्या अनुयायांना म्हणाला—"याच्या मदतीने आपल्याला देवळापर्यंत जायचे आहे. परंतु कोठे काय व कसा धोका येईल, सांगणे कठीण आहे. हा वेडा पीर आपल्याला कोठे नेतो, कोणास ठाऊक?"











पण याला निसटून जाऊ देता कामा नये? एवढे लक्षात ठेवा." नंतर सर्व नांगसोमच्या पाठोपाठ जाऊ लागले.

नांगसोम डोंगर, टेकड्या व दाट झाडी पार करून पुढे चालला होता व पुजारी आपल्या अनुयायांबरोबर त्याच्या पाठी-मागून अनेक प्रकारे त्रास सोसत जात होता. उन्मत्त काताच्या प्रभावाने नांगसोमला लहानसा किडादेखील हत्तीसारखा वाटे. अशा वेळी तो मोठ्याने ओरडे—"सिद्ध गुरु! वांचवा!"

दुपारपर्यंत सर्व लोक नांगसोमच्या पाठोपाठ एका उंच डोंगरावर येऊन पोचले. खाली एक मोठी दरी होती. त्या दरीत मोठमोठी वडाची झाडे होती. नांगसोमने त्या दरीत पाहून म्हटले—"सिद्ध गुरु! पडके देऊळ याच दरीत आहे. ओ हो, हो! किती सोने! किती रत्ने! ते पहा, देऊळ व त्याच्यावरचा तो सोन्याचा कळस!"

पुजाऱ्याने दरीत दूरवर न्याहाळून बराच वेळ पाहिले. पण त्याला कोठे काही दिसले नाही. मोठमोठ्या वडाच्या झाडांशिवाय व त्यांच्या पारंब्यांशिवाय त्याला काहीच दिसले नाही.

"हे सर्व ह्या वेड्याचे बरगळणे आहे! या दुष्टाने आपल्याला कोठे कोठे व कशी पायपीट करविली पहा. या मूर्खाला या दरीत ढकलून देऊन मोकळे व्हावे झाले." पुजारी संतापून म्हणाला.

पुजारी म्हणाला ते ऐकून नागगिधाड म्हणाला—"गुरुवर्य! आज्ञा करावी, मी या वेड्याला ठार करून त्याचे तुकडे तुकडे करून एका क्षणात त्याला दरीत ढकलून वाटेला लावतो." असे म्हणत त्याने नांग-सोमवर तलवार उगारली.

दुसऱ्या क्षणाला वृश्चिक जातीच्या लोकांनी आपापल्या दगडी कुऱ्हाडी उगारून दरडावून म्हटले—"खबरदार! या इभ्रु जातीच्या माणसाच्या अंगाला हात लावाल तर! हा वृश्चिकमातेचा अनुचर भक्त आहे. तो म्हणाला तसे याच दरीत वृश्चिकमातेचे देऊळ असेल ही!"

पुजारी त्यावर काही बोलणार इतक्यात नागगिधाड मध्येच म्हणाला—"गुरुदेव! मी हवेत उडत त्या दरीत जाऊन पाहून येऊ का काय आहे ते?"

पुजारी नागगिधाडाला दरडावून म्हणाला—"तुला जास्त चढलेली दिसते आहे. म्हणून तुझी वटवट चालू आहे. तुला एक माकड करून या जंगलात झाडावर सोडून निघून जाईन, खबरदार!"

"गुरुवर्य! कृपा करून तेवढे करू नका! या जंगलात झाडावरची फळे खाऊन जिवंत राहणे कठीण होईल मला." नागगिधाड म्हणाला.

नागगिधाडाची वटवट चालूच होती आणि पुजारी दचकून उभा राहला व म्हणाला—"तो पहा, तो शबर शिखी आणि त्याचे साथीदार येऊन पोचले."

शिखीमुख डोंगरावर उभा राहून मोठ्याने ओरडला—"नांगसोमला बाहेर ओढा!" नंतर पुजाऱ्याला म्हणाला—"दुष्टा! किती दिवसानंतर समोर आला



आहेस रे! पळण्याचा प्रयत्न केलास तर, खबरदार, बाण किंवा भाला तुझ्या छातीच्या आरपार जाईल."

पुजारी कसे निसटून पळावे याचा विचार करू लागला. तेवढ्यात त्याला एक शक्कल सुचली. त्याने नांगसोमला उचलून खांद्यावर घेतले आणि डोंगरावरच्या मोठमोठ्या खडकांआड पळू लागला.

परंतु तो सांपाच्या तोंडातून सुटका करून घेऊन सिंहाच्या जबड्यात सांपडल्या सारखा जांगलाच्या तावडीत सांपडला. जांगला लंगडत पुढे आला आणि "दुष्टा! आतां तू निसटून कोठे पळतोस, ते पाहतो."





असे म्हणत त्याने पुजाऱ्याला जाऊन आपल्या मगरमिठीत धरले.

पुजाऱ्याने नांगसोमला जमिनीवर टाकले होते आणि कमरेची कटचार काढून जंगलाला मारण्यासाठी ती उगारली. झटापटीत कटचार जांगलाच्या खांद्याला लागली. पण कटचारीचा वार सहन करून जांगलाने पुजाऱ्याची मान धरून ती आवळण्याचा प्रयत्न सुरू केला. पुजाऱ्याने आपली मान वळवून आपला बचाव केला. परंतु त्याची शेंडी जांगलाच्या हातात आली.

जांगलाच्या जखमेतून रक्त वहात होते. पण त्याने पुजाऱ्याची शेंडी घट्ट धरून ठेवली व त्याला फरपटत डोंगराकडे ओढू लागला. पुजारी आपण दरीत पडतो की काय या भीतीने स्वतःचा बचाव करण्यासाठी धडपड करू लागला.

त्याच वेळी शिखीमुख तेथे येऊन पोंचला आणि म्हणाला—"जांगला! तुझी स्वामिभक्ती खरी ठरली. त्या दुष्टाला आपण वर ओढून घेऊ शकत नाही. नाग जातीच्या नायकाची मुलगी नागमल्ली हिने याची शेंडीच आणायला सांगितली होती," असे म्हणत शिखीमुखने आपल्या तलवारीने त्याची शेंडी छाटून घेतली आणि दुसऱ्या क्षणाला कडेलोट झाल्यासारखा पुजारी ओरडत दरीच्या तळाला जाऊन पोंचला.

त्या गडबडीत नांगसोमकडे कोणाचे लक्षच गेले नाही. पुजाऱ्याने त्याला जमिनीवर टाकल्यावर तो मोठमोठ्या वडाच्या झाडाकडे व त्यांच्या पारंब्यांकडे पहात राहिला. इतक्यात त्याला पुजाऱ्याची किंकाळी व नंतर कण्हणे ऐकू आले. ते ऐकून नांगसोम ओरडू लागला—"ते पहा, पडके देऊळ!" असे म्हणत तो वडाच्या झाडांच्या दिशेने पळू लागला.

(पुढील गोष्ट पुढील अंकी)



# अर्धे राज्य

विक्रमादित्याने हट्ट सोडला नाही. तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि मौनपणे स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा, फक्त मेहनत केल्यानेच मनुष्य आपल्या कामात यशस्वी होतो असे नाही. त्याचे उदाहरण म्हणून मी तुला प्रतापची गोष्ट सांगतो. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

प्राचीन काळी एक अट्टल दरोडेखोर एका देशात रहात असे. त्याने अनेक दरोडे घालून अलोट संपत्ति एका गुप्त स्थानी साठवून ठेवली.

त्या चोराला कधी कोणी पाहिले नव्हते. तरी लोकांनी 'प्रचंड' असे त्याला नाव दिले होते. त्याचे खरे नाव कोणालाच माहीत नव्हते. त्याला पकडण्यासाठी राजाने



अनेक प्रयत्न केले, परंतु शेवटी कंटाळून त्याने अशी दवंडी पिटविली की जो कोणी प्रचंडला पकडून देईल त्याच्याशी राजकन्येचा विवाह करून देण्यात येईल.

राजकुमारी दिसायला फार सुंदर होती. म्हणून तिच्याशी विवाह करण्यास पात्रता मिळावी म्हणून अनेक राज-कुमारांनी प्रचंडला पकडण्यासाठी प्रयत्न सुरू केले.

आता प्रचंडाच्या समोर मोठाच प्रश्न दत्त म्हणून उभा राहिला. अनेक राजकुमार त्याच्यावर आपली नजर रोखून असणार. कोठे चोरी करायला जाणे अशक्यच होते. त्याने, आजपर्यंत जी संपत्ती जमविली होती ती उचलून घेऊन परदेशात निघून जाणे पण सोपे नव्हते. रिकाम्या हातांनी इतकी वर्षे जीव धोक्यात घालून जमविलेली संपत्ती सोडून जायला त्याचे मन मानेना. म्हणून त्याने पुष्कळ विचार करून चोरीचा धंदा काही काळ बंद करण्याचे ठरविले. त्याला कोणी ओळखणे शक्यच नव्हते. राज-कुमारांचा उत्साह ओसरल्यावर व राज-कन्येचा विवाह त्यामुळे होऊ न शकल्यामुळे पुन्हा राज्यात गाफीलपणा दिसू लागला की सर्व संपत्ती घेऊन परदेशात निघून जायचे, असा त्याने आपल्या मनाशी विचार केला. तसे ठरवून तो मजुरी करून स्वत:चा उदर निर्वाह करू लागला.

एक वर्षभर राज्यात कोठे चोरी झाली नाही. प्रजा चोरी नावाची गोष्टच विसरून गेली. प्रचंड कोठे तरी पळून तरी गेला असावा किंवा मेला असावा, असे सर्व म्हणू लागले.

राजाच्या सैन्यात प्रताप नावाचा एक शूर सैनिक होता. अनेक युद्धात त्याने पराक्रम दाखवून राजाची शाबासकी मिळविली होती. त्याने राजकुमारीला जेव्हां अगदी पहिल्याने पाहिले तेव्हांच



त्याने, लग्न करायचे तर हिच्याशीच असे मनाशी ठरवून टाकले होते. पण आपण किती शौर्य गाजवले तरी राजकन्येशी आपल्या सारख्या सामान्य सैनिकाचा विवाह कसा काय होणार, या विचाराने तो हताश झाला होता.

त्याच सुमारास राजाने दवंडी पिटवून प्रचंडला पकडून देणाराशी राजकन्येचा विवाह करून देण्याचा निश्चय जाहीर केला होता. म्हणून प्रतापने डोळयात तेल घालून व पुष्कळ मेहनत करून प्रचंडचा शोध काढण्याचे ठरविले. त्याने प्रचंडला ओळखणारा मनुष्य भेटला तर त्याच्या मदतीने प्रचंडला पकडता येईल असा विचार केला व तसा मनुष्य कोठे मिळतो का, याचा शोध सुरू केला.

प्रताप एवढी मेहनत करीत होता. त्याला आणखी एक कारण होते. त्याला असे वाटू लागले होते की राजकुमारीचे त्याच्यावर मन जडले आहे. कारण एकदा राजा व राजकुमारी यांच्या समक्ष राजाने केलेल्या घोषणेचा उल्लेख करून तो म्हणाला होता की कोणी सामान्य मनुष्याच्या हाती प्रचंड पकडला गेला तर राजकुमारीचा त्यात अपमान नाही का



होणार? त्यावर राजकुमारी म्हणाली होती–"बाबांच्या आज्ञेचे पालन करण्या-पेक्षा जास्त मोठे कर्तव्य पालन मुलीला काय असू शकणार? तसा सामान्य मनुष्य प्रचंडला पकडून देणे शक्यच नाही."

त्या दिवसापासून प्रताप प्रचंडला पकडण्यासाठी दुप्पट मेहनत करू लागला. परंतु त्याची सर्व मेहनत फुकट गेल्यासारखे त्याला वाटू लागले. कारण लोक म्हणतात तसा प्रचंड देश सोडून कोठे पळून गेला असेल किंवा मेला असेल तर त्याला तो काय पकडणार व राज्यकन्येशी विवाह कसा होणार?



तरी प्रतापच्या मनातल्या अगदी कोपऱ्यात आशेचा एक अंकुर जिवंत उरला होता. परंतु ज्या वेळी राजा मंत्र्याला म्हणाला की आता राजकन्येला योग्य वर पाहिला पाहिजे तेव्हां मात्र त्याला पूर्ण निराशा वाटू लागली. राजकन्येला योग्य असे अनेक वर जवळपासच्या राज्यात होते. परंतु प्रश्न होता त्यात निवड कोणाची करावयाची?

अशा परिस्थितीत प्रतापने एक साहसाचे काम केले. एक दिवशी संध्याकाळी राज-कुमारी आपल्या मैत्रिणींबरोबर उद्यानात विहार करीत असता प्रताप वेष पालटून तेथे गेला आणि राजकुमारीला उचलून घेऊन पळून गेला. त्याने तिला आपल्याच घरात गुप्तपणे ठेवून घेतले.

राजकन्येला कोणी उचलून नेल्याची बातमी राजाच्या कानावर काही मिनिटात जाऊन पोचली. म्हणून राजाने असे जाहीर केले की जो कोणी राज-कुमारीला शोधून देईल त्याला अर्धे राज्य मिळेल.

प्रचंडच राजकुमारीला उचलून घेऊन गेला असेल असे कित्येकांना वाटले. परंतु प्रचंडच्या मनात निराळेच विचार येऊ लागले. आपणच राजकन्येला हुडकून आणून दिले तर आपल्याला अर्धे राज्य मिळेल. तसे झाले तर आपल्यावर कोण संशय करील? म्हणून त्याने राजकन्येचा शोध सुरू केला.

राजकुमारीला उचलून नेण्याची शक्ति असणारे तिघाचौघाहून जास्त तरुण राज-धानीत नव्हते. त्या घटनेच्या वेळी त्या मोजक्या लोकांपैकी कोण कोठे होता ह्या गोष्टीची माहिती प्रचंडने सहजी काढली. फक्त प्रताप कोठे होता हे त्याला कळले नाही. म्हणून त्याच्यावर त्याचा संशय होता.

मध्यरात्रीच्या सुमारास प्रचंड प्रतापच्या घरात शिरला. एका खोलीत प्रताप व राजकन्या बोलत असल्याचा आवाज त्याला ऐकू आला.

राजकुमारी म्हणत होती—"माझे तुझ्या-वर प्रेम आहे, हे कसे काय वाटले तुला? प्रचंडला पकडून देणाराशी विवाह करून देण्याचे बाबांनी जाहीर केले होते व ती अट पुरी करणे माझे कर्तव्य होते. अशा परिस्थितीत आणखीं कोणावर माझे प्रेम जडणे शक्य तरी होते का? ,तू मनाचा गैरसमज करून घेऊन उगाच आपला जीव धोक्यात मात्र घालून घेतलास. तू आजच्या आज मला राजवाड्यात पोचती कर. तू तसे केलेस तर मी तुझ्या विरुद्ध कोणाला काही सांगणार नाही."

"मी तुझ्यावर आपला जीव ओवाळून टाकायला देखील तयार आहे. आज तुला मी असे कसे काय सोडू? तू माझ्याशी लग्न करून घे. महाराज आपल्या दोघांना नक्कीच क्षमा करतील. आता प्रचंड आहे कोठे? तो तर केव्हांच मेला? त्याला आता कोण पकडणार व तुझ्याशी विवाह तरी कोणाचा होणार?" प्रताप तिची समजूत घालीत होता.

त्याच वेळी दाराची कडी वाजली. प्रताप राजकुमारीला अडविण्यासाठी पुढे होणार





तेवढ्यात पुढे जाऊन तिने दार उघडले. प्रचंड पुढे येऊन राजकुमारीला म्हणाला–"मी तुझाच शोध काढीत आलो आहे."

प्रतापने प्रचंडाला जाऊन धरले. दोघांची झटापट सुरू झाली. तो आवाज ऐकून प्रतापचे नोकर धावून आले.

"पकडा याला! हाच प्रचंड आहे." प्रताप नोकरांना म्हणाला. तो म्हणाला ते खरे की खोटे हे कोणालाच माहीत नव्हते. पण तसे बोलल्याने राजकुमारी व राजा दोघांच्या मनाचे समाधान होईल. मात्र प्रचंड मेला आहे अशीच त्याची स्वतःची समजूत होती.

प्रतापच्या नोकरांनी प्रचंडला पकडले. त्याला बरोबर घेऊन प्रताप राजाकडे गेला. त्याच्या बरोबर राजकन्या पण होतीच.

प्रताप राजासमोर प्रचंडला उभा करून म्हणाला–"महाराज, हाच प्रचंड चोर!" राजकन्या परत आलेली पाहून राजा खूष होता. परंतु प्रताप म्हणाला ते ऐकून चकित झाला. त्याने प्रचंडला विचारले–"कोण रे तू?"

"माझे नाव यशवीर आहे, महाराज! मी एक मजूर आहे. मजुरी करून मी मोठ्या कष्टाने पोटाची ही खळगी भरतो." प्रताप म्हणाला.

"हा मनुष्य प्रचंड आहे, ही गोष्ट खोटी आहे." असे सांगून राजकुमारी प्रतापकडे बोट दाखवून म्हणाली–"या माणसाने माझ्या इच्छेविरुद्ध मला उचलून नेले होते. प्रचंड मेला आहे, असे ह्यानेच मला थोड्या वेळा पूर्वी सांगितले होते. मला सोडवून आणणारा वीर हा यशवीर आहे!"

"मी जाहीर केल्या प्रमाणे आपले अर्धे राज्य यशवीरला देणार. मी आपले वचन मोडणार नाही. उद्यां या प्रतापला काय शिक्षा करावयाची ते मी ठरवीन. याला प्रथम कैद करा." राजा म्हणाला.





राजाच्या शिपायांनी प्रतापला अटक करून नेले. नंतर प्रचंड राजाला म्हणाला–"मी एक विनंती करावी म्हणतो. आपण प्रचंडला पकडून देणाराशी राजकन्येचा विवाह करून देईन असे जाहीर केले होते. त्याच्या मुळेच कित्येक अन्याय होत आहेत. आपण आपले ते वचन मागे घेतलेत आणि राजकन्येला तिच्या इच्छेप्रमाणे लग्न करायला परवानगी दिलीत तर मी प्रचंड कोण व कोठे आहे हे सांगू शकेन. तो जिवंत आहे व राजधानीबाहेर कोठे ही गेलेला नाही."

"तू खरे बोलतो आहेस का? मग कोठे आहे तो सांग." राजाने विचारले.

"मीच तो प्रचंड आहे, महाराज!" प्रचंड म्हणाला.

राजा चकित होऊन थोडा वेळ त्याच्याकडे पहात राहिला. नंतर म्हणाला–"ठीक! तर तुझ्या राहण्याची मी येथेच व्यवस्था करून देतो. तू जाऊन झोप."

दुसऱ्या दिवशी प्रतापला दरबारात हजर करण्यात आले. राजाने त्याला आयुष्यभर तुरुंगवासाची शिक्षा दिली. त्यानंतर राजाने राजकुमारीला परत आणून देणाऱ्याला अर्धे राज्य देऊन त्याच्याशी तिचा विवाह करून देण्याचा त्याने निश्चय केला असल्याचे जाहीर केले.

येथवर गोष्ट सांगून वेताळाने विचारले–"राजा! साऱ्या गोष्टी त्याच्या बाजूला असून प्रचंडने आपले गुपित असे उघड करून कां सांगितले आणि आपल्यावर स्वतःच्या हाताने संकट कां ओढवून घेतले? प्रचंडला पकडून आणून देणाऱ्या प्रतापशी राजकन्येचा विवाह करून न देता प्रचंड बरोबर तिचा विवाह करून कां दिला? या प्रश्नांची उत्तरे माहीत असून तू ती दिली नाहीस तर तुला त्यांचा परिणाम माहीतच आहे, तुझ्या डोक्याची

शंभर छकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील."

ते ऐकून विक्रमादित्य म्हणाला—"राजाने केले ते बरोबर होते. राजकुमारी म्हणाली त्यावरून प्रचंडला पकडून आणण्याचे श्रेय प्रतापला देणे इष्ट नाही, हे राजाने ओळखले होते. प्रचंडला पकडून आणण्याचे श्रेय प्रचंडलाच दिले पाहिजे. म्हणून राजाने राजकन्येचा विवाह त्याच्याशीच करून देण्याचे ठरविले. कदाचित प्रचंडने सांगितल्याप्रमाणे, त्याला पकडून देणाराशीच राजकन्येचा विवाह होईल, ही अट राजाने काढून घ्यावी व राजकन्येला तिच्या इच्छेप्रमाणे विवाह करण्यास परवानगी द्यावी असे सांगितले त्यावरून कदाचित राजकन्येची इच्छा त्याच्याशीच विवाह करण्याची असावी असे राजाला वाटले असेल. राजकन्येला परत आणून पोंचती केल्याचे श्रेय प्रचंडला होते. म्हणून त्याला अर्धे राज्य देणे आवश्यक होते. अर्ध्या राज्याचा जो अधिकारी, म्हणजे बरोबरीचा राजा त्याला कैद करणे राजाला कसे काय शक्य झाले असते? प्रचंड स्वतःच प्रगट झाला, त्याला पण कारण होतेच. राजा त्याच्या विषयी जास्त माहिती काढण्याचा प्रयत्न करील तेव्हां त्याला आपले गुपित माहिती होईल असे देखील प्रचंडला वाटले. याशिवाय असे दिसले की प्रचंडच्या मनात सुद्धा राजकुमारीशी विवाह करण्याची इच्छा होती. नाहीतर राजकुमारी नाहीशी झाल्याचे ऐकून शोधार्थ आपला जीव धोक्यात द्यायला तो तयार झाला नसता. फक्त राज्यलोभाने तो असा बाहेर आला नसता. त्याने राजकुमारीच्या सुखासाठी आपला जीव धोक्यात घालायला मागे पुढे पाहिले नाही.'

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला व झाडाच्या फांदीला जाऊन लोंबकळू लागला.





# सिंदबादच्या सफरी

सिंदबादला समुद्राच्या प्रवासाचा वीट आला होता. तो उतारवयाकडे वळला होता. आयुष्यात अनेक तऱ्हेच्या हाल अपेष्टा त्याने सहन केल्या होत्या. व्यापारात त्याला अलोट संपत्ती मिळाली होती. बगदाद शहरात सर्वात मोठा श्रीमंत म्हणून त्याची कीर्ती होती. खलीफाशी त्याची मैत्री होती. खलीफा करमणुकीसाठी सिंदबादला बोलावून घेई व त्याच्या प्रवासाची रसभरीत वर्णने ऐके. अशा स्थितीत त्याला पुन्हां प्रवास करण्याची व आपला जीव धोक्यात घालण्याची इच्छाच उद्‌भवणे शक्य नव्हते. त्याला मुला बाळांबरोबर उरलेले आयुष्य आरामात-घालवावे असेच वाटे.

परंतु त्याला स्वतःच्या इच्छेविरुद्ध आणखी एका सफरीवर जावे लागले. खलीफा हारूनुल रशीद यांनी त्याला भेटायला येण्यासाठी निरोप पाठविला. सिंदबाद आल्यावर खलीफा त्याला म्हणाले—"सिंदबाद! मी इथियोपियाच्या राजाच्या पत्राचे उत्तर पाठवावे म्हणतो. नजराणा म्हणून मी काही वस्तू निवडून पण ठेवल्या आहेत. हा नजराणा तू स्वतः माझ्या वतीने सादर करावा असे मला वाटते. तू भेटलास तर त्यांना पण किती आनंद होईल!"

आता मला सफरींचा कंटाळा आला आहे, असे सिंदबाद मान वर करून खलीफांसमोर कसे काय सांगणार? म्हणून तो प्रवासाला तयार झाला.

खलीफांनी त्याला प्रवासखर्चासाठी दहा हजार दीनार दिले. इथियोपियाच्या राजाच्या नावी एक पत्र व नजराणा तयार करवून सिंदबादला दिला. खलीफांनी दिलेल्या नजराण्यात एक लाल मखमली गालीचा, शंभरावर रेशमी ठाणं, श्वेत रत्नांनी मढवलेली एक सुरई व अस्सल अरबी

सातवी सफर



जातीचे घोडे वगैरे वस्तू होत्या. सिंदबाद त्या सर्व वस्तू घेऊन बसऱ्याला आला. एका जहाजात बसून इथियोपियाला निघाला. जहाजाचा प्रवास तीन महिन्याचा होता. नजराणा पाहून व पत्र वाचून इथियोपियाचा राजा फार खूष झाला. त्याने खलीफाच्या सौजन्याबद्दल व उदार विचारांबद्दल खलीफांची फार प्रशंसा केली. इथियोपियाच्या राजाने सिंदबादला त्याच्याच राज्यात कायम राहण्यासाठी फार आग्रह केला. परंतु त्याने परत स्वदेशी जाण्याची इच्छा दर्शवल्यावर खलीफांना अनेक वस्तू भेट म्हणून देऊन त्याला निरोप दिला.

सिंदबाद इथियोपियाच्या राजाचा निरोप घेऊन बसऱ्याला निघाला.

वारा अनुकूल होता, म्हणून प्रवास सुखाचा वाटला. वाटेत सीन नावाचे बेट होते. तेथे व्यापाऱ्यांनी खरेदी विक्री करून घेतली. जहाज पुढल्या प्रवासाला निघाले. एका आठवड्यानंतर जोराचा पाऊस पडू लागला. माल भिजू नये म्हणून मेणकापड मालावर टाकण्यात आले.

तांडेल दांडीवर चढून उतरून खाली आला तेव्हां त्याचा चेहरा पांढरा फट्ट पडला आणि तो कपाळ बडवून दाढीचे केस ओढू लागला. सर्व त्याच्या चारीबाजूला घोळका करून उभे राहिले व त्याला घाबरण्याचे कारण विचारू लागले.

तो म्हणाला–"अल्लाजवळ जीवदान मांगा! आज आपल्याला कोणी वाचवू शकणार नाही. आपण वाट चुकून धोक्याच्या जागी समुद्रात येऊन पोचलो आहो.

नंतर एकदा तपकीर ओढून कोणते तरी पुस्तक वाचून म्हणाला–"नको तेच झाले, पहा. समोर दिसणारा समुद्रतट फार भयंकर आहे. या समुद्रात सबंध जहाज गिळू शकणारे मोठमोठे देवमासे आहेत. त्या



काठावर क्रूर प्राणी आहेत. मला जे काही सांगायचे होते, ते मी सांगितले, त्या पुढे प्रत्येकाच्या भाग्यात जे असेल तेच होणार."

तांडेलाचे बोलणे, जेमतेम संपले असेल, जहाजाला एकदम एक मोठा धक्का बसला. प्रवाशांचा जीव खालीवर होऊ लागला. समुद्रात मोठमोठ्या लाटा येऊ लागल्या. तीन देवमासे समुद्रात तांडव करीत होते. एका देवमाशाने 'आ' पसरून जहाज गिळलेच की. पण त्यापूर्वी सिंदबादने पाण्यात उडी मारली होती. त्यानंतर तिन्ही मासे आल्या वाटेने निघून गेले.

देवमासा गलबत गिळत असता एक फळी फुटून पाण्यात पडली. सिंदबाद त्याच फळीवर बसून पायाने वल्हवीत एका बेटावर येऊन पोचला. त्या बेटावर पुष्कळ फळझाडे होती. सिंदबादला बेटावर एक नदी पण दिसली. त्या नदीचा ओघ फार जोराचा होता. ही नदीच शेवटी आपल्याला वांचविणार असे सिंदबादला वाटले. नाहीतर त्या संकटातून वाचणे शक्यच नाही. मागच्या सफरीत एका नदीच्या प्रवाहामुळेच त्याचे रक्षण झाले होते ते त्याला आठवले. म्हणून त्याने झाडाच्या फांद्या तोडून त्या जंगली



वेलांच्या साह्याने एकीला एक जोडून बांधल्या व एक जुजुबी नाव तयार केली. त्या नावेत बसून प्रवाहाच्या दिशेने नाव नेईल तिकडे जाऊ लागला. नाव बाणासारखी वेगाने चालू लागली.

पाण्याला ओढ जास्त जास्त वाढू लागली. पाण्यातून फेस निघत होता. दुरून वाऱ्याचा एक विचित्र आवाज ऐकू येत होता. समोर एका जागी नदी एकाएकी अदृश्य झाल्यासारखी सिंदबादला दिसली. तेथे एखादा धबधबा असावा असे त्याला वाटले. कारण नदीचा धबधबा खोल पडताना जसा आवाज येतो तसाच आवाज होत होता. आतां



आपण या धबधब्यात नावेबरोबर कोसळणार व आपल्याला कपाळ मोक्ष मिळणार असे त्याला वाटले. त्याने अल्लावर भरंवसा ठेवून डोळे मिटले आणि नावेला पोटाशी घट्ट आवळून धरून पडून राहिला. नाव धबधब्यापर्यंत पोचल्याचे त्याला कळले होते. परंतु आश्चर्य म्हणजे नाव एकाएकी एका जागी एकदम थांबली.

त्याने आश्चर्य चकित होऊन डोळे उघडून पाहिले. तो नावेसकट एका जाळ्यात सापडला होता. जाळे टाकणारे नदीच्या काठावर बसले होते. त्यांनी नाव काठावर ओढून आणली.

सिंदबाद थंडीने थरथर कांपत किनाऱ्यावर निश्चेष्ट पडून होता. एक पांढरी दाढी असलेल्या मनुष्याने जवळ येऊन त्याच्या अंगा खांद्यावर हात फिरवीत सिंदबादच्या अंगावर एक लोकरीचे पांघरूण टाकले. नंतर त्याने सिंदबादचे अंग चोळले.

म्हाताऱ्याने केलेल्या शुश्रूषेमुळे सिंदबादच्या अंगात हळूहळू उष्णता येऊ लागली. तो उठून बसला, परंतु त्याच्या तोंडातून शब्द उमटत नव्हता. त्या परिस्थितीत म्हातारा सिंदबादला आंघोळीच्या खोलीत घेऊन गेला. त्याच्या अंगाला सुगंधी द्रव्ये व तेले चोळून त्याला छान आंघोळ घातली आणि घरात घेऊन जाऊन त्याला जेवायला वाढले. म्हाताऱ्याने व त्याच्या घरच्या सर्व लोकांनी सिंदबादला मोठ्या प्रेमाने वागविले. म्हाताऱ्याच्या गैर हजेरीत देखील त्या म्हाताऱ्याचे नोकर सिंदबादच्या सेवेला हजर असत. सिंदबाद त्या म्हाताऱ्याच्या घरी तीन दिवस राहिला. तीन दिवसात सिंदबादची तब्येत उत्तम सुधारली. चवथ्या दिवशी म्हाताऱ्याने सिंदबादला विचारले–"तुला काही कष्ट असेल तर सांग. अल्लाच्या मेहरबानीने मी त्या वेळी तेथे होतो आणि तुला वांचवू शकलो. कोण तू? कोणत्या देशात राहणारा?"



सिंदबादने म्हाताऱ्याचे मनःपूर्वक आभार मानले आणि थोडक्यात आपली करुण कहाणी सांगितली. पुष्कळ वर्षांनंतर व्यापारासाठी नव्हे तर खलीफाच्या हुकमाचे पालन करण्यासाठी त्याने तो प्रवास केला होता. व्यापारासाठी पण थोडा माल घेऊन निघाला होता. म्हातारा म्हणाला–"असे असेल तर तू आपला माल विकून टाक. त्या मालाला चांगली किमत येईल."

सिंदबाद म्हातारा म्हणाला ते ऐकून चकित झाला. तो कोणत्या मालाची गोष्ट विचारीत आहे, हे त्याला कळेना. कारण त्याच्या जवळ तर माल नव्हताच. तरी सिंदबादने आपले आश्चर्य उघड दर्शविले नाही व म्हणाला–"ठीक आहे, पाहतो."

"उशीर कशाला? चल बाजारात. चांगली किमत मिळेल. चल चवकशी करू, किमत मिळाली नाही तरी हरकत नाही. माल माझ्या कोठारात पडून राहील." म्हातारा म्हणाला.

"आपली मर्जी! आपण म्हणाल ते कबूल! मी आपला पाहुणा आहे. मला विचारण्याची गरजच काय? आपल्याला वाटेल ते करावे." सिंदबाद शांतपणे म्हणाला.



दोघे बरोबर बाजार पेठेत गेले. तेथ आपली जुजबी नाव पाहून सिंदबादला आश्चर्य वाटले. ती नाव दलाल व व्यापारी लक्षपूर्वक पहात होते. एक व्यापारी म्हणाला–"काय पण सुंदर चंदन आहे? असला उत्तम माल मी यापूर्वी कोठे पाहिला नाही."

तेव्हां, त्याची जुजबी नाव चंदनाच्या लाकडांची होती हे सिंदबादच्या लक्षात आले. पण त्याने आश्चर्याची एक रेखा देखील तोंडावर दिसू दिली नाही.

त्याच्या नावेचा लिलाव होऊ लागला. बोली एक हजार दीनारांपासून सुरू झाली



व दहा हजारांपर्यंत वाढत गेली. लिलाव करणाऱ्याने सिंदबादकडे वळून पाहून विचारले–"दहा हजाराची बोली मान्य करायची का?" परंतु सिंदबादने नकारार्थी मान हलविली.

तेव्हां म्हातारा सिंदबादला म्हणाला–"हे पहा, सिंदबाद! याहून जास्त किंमत मिळेलसे मला वाटत नाही. पाहिजे तर मी शंभर दीनार जास्त देऊन विकत घेतो."

"तुम्हांलाच हवी असेल तर मी तरी नकार कसा काय देणार?" सिंदबाद म्हणाला. नोकरांनी म्हाताऱ्याच्या कोठारात नाव नेऊन ठेवली. म्हाताऱ्याने दहा हजार एकशे दीनार एका पेटीत ठेवून सिंदबादला दिले. जेवायला बसल्यावर बोलतां बोलतां म्हातारा म्हणाला–"मुला! मला मुलगा नाही. माझ्याजवळ अलोट संपत्ती आहे. मी मोठमोठ्या हुद्यांवर कामे केली आहेत. मला एकच एक मुलगी आहे. तू तिच्याशी लग्न करून घ्यायला तयार झालास तर माझ्या या अलोट संपत्तीचा वारस तूच होशील."

"मी आपल्या इच्छेविरुद्ध काही एक करणार नाही." सिंदबादचा कंठ भरून आला होता.

लगेच म्हाताऱ्याने काजी व साक्षीदारांना बोलावून आणविले आणि त्या सर्वांच्या समक्ष आपल्या मुलीचे लग्न सिंदबादशी करून दिले. म्हाताऱ्याची मुलगी फार सुंदर होती. तिच्या अंगावर मूल्यवान वस्त्रालंकार होते. त्या मुलीबरोबर सिंदबादने पुष्कळ दिवस आनंदाने संसार केला.

पुढे काही दिवसांनी सिंदबादचा म्हातारा सासरा वारला. सिंदबादने थाटामाटाने त्याची अंत्येष्टी क्रिया संपूर्ण केली. म्हाताऱ्याच्या सर्व संपत्तीला तोच वारस होता. म्हणून तोच त्या प्रदेशाचा प्रमुख नेमला गेला. त्याने त्या देशाच्या रीतिरिवाजांप्रमाणे प्रजेचे पालन केले.

त्या गावात दरवर्षी एक विचित्र गोष्ट घडे. प्रत्येक वर्षी वसंत ऋतुत एका दिवशी त्या देशाच्या रहिवाशांना पंख फुटत. दिवस भर ते आकाशात विहार करीत. फक्त बायकां मुलांना पंख फुटत नसत. ते गावातच जमिनीवर रहात.

आता असे झाले की सर्व पुरुषांना पंख फुटले. पंख फुटले नाहीत ते एकट्या सिंदबादला. म्हणून सर्व पुरुष आकाशात विहार करू लागले तेव्हां तो एकटा बायकांमुलांबरोबर जमिनीवरच राहिला. त्याने अनेकांना विचारले की त्यालाच कां नाही पंख फुटले? परंतु कोणी त्याला उत्तर दिले नाही.

त्याने एका व्यापाऱ्याला एक मोठी रक्कम कर्जाऊ दिली होती. त्याला तो म्हणाला–"मला तू आपल्याबरोबर आकाशात उडवून घेऊन जा." त्या प्रमाणे सिंदबादने त्या व्यापाऱ्याच्या अंगाला स्वतःला बांधून घेतले आणि त्याच्याबरोबर आकाशात उडू लागला. तेव्हां स्वर्ग जवळ आल्यासारखे त्याला वाटले. त्याला गंधर्वांचे गाणे ऐकू येऊ लागले.



तो आनंदाच्या भरात ओरडून म्हणाला–"अल्ला! तुझी लीला अगाध आहे!"

दुसऱ्या क्षणाला सिंदबाद त्या व्यापाऱ्याबरोबर दगडासारखा वेगाने जमिनीकडे खाली जाऊ लागला. परंतु सुदैवाने दोघे एका डोंगराच्या शिखरावर सुखरूप उतरले, व्यापारी रागाने एकदा सिंदबादकडे पाहून पुन्हां आकाशात उडू लागला.

सिंदबाद पश्चात्ताप करूं लागला. त्याला काय करावे, हे सुचेना. त्याच वेळी दोघे तरुण सिंदबादकडे येत असलेले त्याला दिसले. त्यांच्या हातात सोन्याच्या काठ्या होत्या. सिंदबादने त्यांना एक दोन प्रश्न

विचारले. पण त्यांनी त्याला काहीच उत्तर दिले नाही. एकाने आपल्या हातांतली सोन्याची काठी सिंदबादच्या हातात देत एका विशिष्ट दिशेने चालण्यास सांगितले. सिंदबाद त्या प्रमाणे काही बोलल्याशिवाय त्या दिशेने निघाला तेव्हां त्याला एक भयंकर दृश्य दिसले. एक अजगर एका माणसाला गिळीत होते. त्याने त्या सापाला त्या काठीने मारले. साप मेला. सिंदबादने त्या माणसाचा जीव वांचविला. तो मनुष्य दुसरा तिसरा कोणी नसून सिंदबादला आकाशात उडवून घेऊन जाणारा व्यापारीच होता. तो म्हणाला–"क्षमा करा हो मला! तुम्ही माझा जीव वांचविलात. मी तुम्हांला त्या डोंगरावर एकटा सोडून रागारागाने निघून गेलो होतो. त्या बद्दल क्षमा करा. तुम्ही एका नावाचा उल्लेख केला होता त्यामुळे माझी उडण्याची शक्तीच नष्ट झाली होती. आम्ही त्या नावाचा कधी उच्चार करीत नाही."

"मी यापुडे ते नाव पुन्हा घेणार नाही. तू मला माझ्या घरी पुन्हां पोचता कर." सिंदबाद म्हणाला.

त्या गावचे लोक भुतांचे वंशज आहेत. ती गोष्ट सिंदबादला त्याच्या बायको कडूनच कळली होती. त्याच्या बायकोच्या सांगण्यावरून सिंदबादने त्याच्याकडे होती नव्हती तेवढी स्थावर संपत्ति विकून टाकली. त्याने ते पैसे खर्च करून एक गलबत विकत घेतले आणि ते आपल्या बरोबर घेऊन त्या गलबतात बसून तो बगदादला परत आला.

सिंदबाद स्वदेशी सुखरूप आल्याचे कळल्यावर त्याची मित्रमंडळी व नातेवाईक मंडळी त्याला भेटायला आली. त्यांच्यासमोर त्याने शपथ घेतली की तो पुढे कधी समुद्रावर प्रवासाला जाणार नाही आणि आपल्या प्रतिज्ञेप्रमाणे कधी त्याने प्रवास केला नाही. (संपूर्ण)





# भांडकुदळ

एक लाकूडतोड्या होता. त्याची बायको एक मोठी खाष्ट बाई होती. नवऱ्याला कुत्र्यासारखी ती वागवीत असे. लाकूडतोड्याची मिळकत ती गडप करून टाकी. ती आपल्या नवऱ्याला पोटभर खायला पण घालीत नसे. कधी तो वरणात जास्त मीठ पडल्याचे सांगे तर ती दुसऱ्या दिवशी मीठ घालीतच नसे.

अशा खाष्ट बायकोबरोबर संसार करणे अशक्य झाले तेव्हां त्याने आत्महत्या करण्याचे ठरविले. परंतु गळयाला फांस लावून घ्यायला घरात दोरीसुद्धा नव्हती. विकत घ्यावी म्हणावे तर जवळ पैसे नव्हते. म्हणून त्याने एक एक पैसा बायकोची नजर चुकवून जमा करायला सुरवात केली. परंतु त्याच्या बायकोने त्याची ती 'चोरी' सुद्धां पकडली. म्हणाली–"कोठून आले रे इतके पैसे तुझ्या जवळ? तू माझ्या नजरेआड हे पैसे कां जमा करून ठेवीत होतास? गुत्त्यावर ताडी पिण्यात उडविण्याचा विचार तर नाही?"

"तसे काही नाही ग! एक दोर विकत घेऊन गळयाला फांस लावून घ्यावा म्हणतो." लाकुडफोड्याने ते सांगून टाकले.

ते ऐकून बायको तोंडाला आले ते नवऱ्याला बोलली. तेव्हां या बायकोबरोबर दिवस काढणे कठीण आहे, असा विचार करून लाकूडफोड्या दुसऱ्या दिवशी उजाडण्यापूर्वीच जंगलाच्या वाटेने डोंगराळ प्रदेशात निघून गेला.

नवऱ्याला निघून जातांना बायकोने पाहिले. ती त्याच्या पाठोपाठ निघाली.

लाकूडफोड्याला बायको पाठलाग करीत येत असल्याचे कळले. देव मला या बायकोच्या कचाट्यातून सुटका देणार नाही का? तो फार दुःखी झाला.

पां. ना. मोकाशी











लाकूडफोड्या एका जागी थांबला आणि कुऱ्हाड घेऊन लाकडे तोडू लागला. आपण पळून जात नसून लाकडे तोडायला निघालो होतो, हे त्याला दाखवायचे होते.

लाकूडफोड्याची बायको पण महा वस्ताद होती. जंगलात कसला तरी पाला किंवा औषधाची मुळी शोधत ती फिरत असल्याचे दाखवीत होती. लाकूडफोड्याला एकाएकी त्याची बायको एका जुन्या पडक्या विहिरीकडे जात असलेली दिसली. त्या विहिरीच्या कडेला काटेरी झुडपे व गवत उगवलेले होते. त्यामुळे तेथे विहीर असेल असेदेखील कोणाला कळण्यासारखे नव्हते. त्या विहिरीत पडून ती मेली तर तिची पीडा परस्पर मिटेल असे लाकूडफोड्याला वाटले. परंतु तो स्वभावाने मायाळू होता. तो मोठ्याने ओरडून तिला म्हणाला–"तिकडे एक पडकी विहीर आहे, पुढे जाऊ नकोस!"

आपल्याला भीती दाखवून घरी परत पाठविण्यासाठी तिचा नवरा खोटेच काही तरी सांगत असावा असे तिला वाटले व ती हट्टाने पुढे गेली आणि विहिरीत पडली.

"आपल्या पापाची फळे भोग!" असे म्हणत लाकूडफोड्या कुऱ्हाड खांद्यावर टाकून घरी निघून गेला. रात्रभर त्याला शांत झोप आली.

परंतु दुसऱ्या दिवशी उठल्याबरोबर त्याचे मन त्याला खाऊ लागले. ती किती भांडखोर असली तरी देवाला साक्षी ठेवून आपण तिच्याशी लग्न केले आहे. तिला त्या संकटातून वांचविणे हे आपले कर्तव्य आहे. असा विचार करून तो त्या विहिरीकडे निघाला. त्याने विहिरीत डोकावून पाहिले. पण त्याला आत कोणी दिसले नाही. त्याने आपले उपरणे विहिरीत सोडले व म्हणाला–"अग ए! माझे हे उपरणे घट्ट धरून ठेव! मी तुला बाहेर ओढून





काढीन!" असे सांगून त्याने उपरणे आत सोडले.

परंतु विहिरीतून त्याला काहीच उत्तर मिळाले नाही. तरी विहिरीत सोडलेले उपरणे जड वाटू लागले तेव्हां त्याने ते वर ओढले.

उपरणे वर आल्यावर त्याला त्याची बायको दिसली नाही. तिच्या ऐवजी एक पिशाचीण उपरणे धरून वर आली. तिला पाहून त्याला भोंवळ आल्यासारखे झाले. पिशाचीण लाकूडफोड्याला म्हणाली–"भिऊ नकोस! तू आज केवढे मोठे पुण्यकार्य केले आहेस त्याची तुला कल्पनादेखील नसेल. मी एका मोठ्या संकटातून वांचले. मी तुझे हे उपकाराचे ऋण फेडण्याचा प्रयत्न करीन."

"मी उपकार केला? तो कसा काय?" लाकूडफोड्याने घाबरत चकित होऊन विचारले.

"मी काय सांगू? मी कित्येक वर्षांपासून या विहिरीत पडून होते. पण मला कधी कोणी त्रास दिला नाही. काल एका भयंकर भांडखोर बाईशी माझी गाठ पडली. ती भेटली तेव्हांपासून माझ्या मनाला शांती नव्हती. तू मला देवासारखा पावलास व आज माझे रक्षण केलेस! तुला माहीतच असेल, या देशाच्या राजाची मुलगी अप्सरेसारखी सुंदर आहे. मी तिच्या मानेवर जाऊन बसते. राजा तिच्या मानेवरचे भूत उतरविण्यासाठी मंत्रतंत्र व औषधोपचार करील. पण त्याला त्यात यश येणार नाही. राजा हताश होऊन गेला की तू त्याच्याकडे जाऊन, तू भूत उतरवून द्यायला तयार असल्याचे सांग. भूत उतरविण्याच्या कामी मी तुला मदत करीन. राजा तुला त्या उपकाराबद्दल काही तरी बक्षिस देईल. समजले?" पिशाचिणीने विचारले.



"पण पिशाचिणीला उतरवायचे कसे हे मला कोठे माहीत आहे?" लाकूडफोड्याने विचारले.

"तू आल्याबरोबर मी राजकन्येच्या मानेवरून पळून जाईन. तू एखाद्या मोठ्या मांत्रिकासारखा आव आणून मंत्र म्हणू लाग." पिशाचीण म्हणाली.

लाकूडफोड्या आनंदाने घरी निघून गेला. पिशाचीण राजवाड्याकडे निघाली. लाकूडफोड्याच्या बायकोचे काय झाले, कोणी विचारपूस सुद्धा केली नाही.

पिशाचीण तिकडे, राजकन्येच्या मानेवर जाऊन बसली. राजकुमारी मोठ्याने ओरडून डोके आपटू लागली. काही वेळाने ती बेशुद्ध होऊन पडली तेव्हां दासींनी तिला एका पलंगावर नेऊन निजविले.

राजाने राजवैद्यांना बोलावून इलाज करायला सांगितले. पण काही फायदा झाला नाही. नंतर राजाने मांत्रिकांना बोलाविले. पण मांत्रिकांचे प्रयत्न पण फुकट गेले. राजकुमारीच्या मानेवरचे भूत कोणीच उतरवू शकले नाही.

राजाने त्यानंतर काही ज्योतिष्यांना निरोप पाठवून बोलाविले. त्यांनी पंचांग पाहून मुलीची जन्मकुंडली पण पाहिली. त्यांनी वेदोक्त पद्धतीने शांत करविली. परंतु ते सर्व प्रयत्न पण फुकट गेले. आता राजाने शेवटचा उपाय म्हणून राज्यभर दवंडी पिटविली की जो कोणी राजकुमारीचे भूत उतरवून देईल त्याच्याशी राजकन्येचा विवाह करून देण्यात येईल. या शिवाय तोच गादीला वारस पण होईल."

लाकुडफोड्याला बायको निघून गेली, त्या दिवसापासून शांती मिळाली होती. त्याची गरीबी त्याला कधी सोडणार नव्हतीच. परंतु एका भांडकुदळ बायकोच्या कचाट्यातून सुटका मिळाल्याबद्दल त्याला फार आनंद झाला होता. त्या आनंदात तो, त्याला पिशाचिणीने जे काही सांगितले होते ते सर्व विसरून गेला होता.

अशा स्थितीत त्याने दवंडी ऐकली तेव्हां त्याला सर्व आठवले. तो दवंडी पिटणाऱ्याला म्हणाला–"मी राजकुमारीचे भूत उतरवून तिची तब्येत ठीक करून देतो. तिचा जीव धोक्यात आहे, तू मला ताबडतोब राजाकडे घेऊन जा."

लाकूडफोड्याला त्यांनी राजवाड्यात नेले. हा गरीब लाकूडफोड्या राजकन्येचा इलाज काय करणार, असे राजाला वाटले. तरी पाहू या, असा विचार करून राजाने त्याला होकार दिला.

लाकूडफोड्याला राजकन्येच्या महालात नेण्यात आले. पाणी मागवून त्याने हातपाय धुवून हातात पाणी घेतले व मंत्र म्हटल्यासारखे दाखविले. ओठातल्या ओठात त्याचे पुटपुटणे ऐकून सर्वांना तो खरोखरच मांत्रिक असावा असे वाटले. त्याने राजकन्येच्या कपाळावर व गालावर हात फिरवून हात झाडले, त्याबरोबर राजकन्या उठून बसली आणि चारीबाजूला बसलेल्या लोकांकडे चकित होऊन हसू लागली. तिला काही झालेच नव्हते असे सर्वांना वाटले. राजवाड्यातल्या



लोकांना त्यामुळे जो आनंद झाला तो काय वर्णावा?

राजाने वचन दिल्याप्रमाणे लाकुडफोड्याला उत्तमोत्तम वस्त्राभूषणे देऊन एक मोठी मेजवानी दिली आणि राजकन्येचा लाकुडफोड्याशी विवाह करून दिला.

राजकुमारीच्या संगतीत लाकूडफोड्याच्या आयुष्यात एकदम बदल झाला. त्याला तेथे स्वर्ग मिळाल्यासारखे सुख मिळाले. पहिल्या बायकोने त्याला जे कष्ट दिले होते ते तो जणूकाही विसरून गेला.

राजकुमारीला सोडून पिशाचीण शेजारच्या आणखी एका राजकन्येच्या मानेवर

बसली. ते भूत उतरविण्याचे अनेक प्रयोग करून त्या देशाचा राजा हताश झाला. तेव्हां त्याला आपल्या शेजारच्या राजाच्या राजकन्येचे भूत एका माणसाने उतरविल्याचे आणि राजाने त्याच्याशी आपल्या त्या मुलीचे लग्न करून दिल्याचे कळले.

त्याने लाकूडफोड्याच्या सासऱ्याकडे दूत पाठवून मुलीचे भूत उतरविण्यासाठी आपल्या जांवयांना पाठवावे अशी विनंती केली. राजाचा दूत म्हणाला–"महाराज! आमच्या महाराजांनी आपल्या जांवयाशी द्वितीय पत्नी म्हणून आपल्या कन्येचा विवाह करून देण्याचे कबूल केले आहे."

सासऱ्याच्या आज्ञेप्रमाणे लाकूडफोड्या शेजारच्या राजाकडे गेला. तो हातपाय धुवून मंत्र म्हटल्यासारखे पुटपुटला आणि त्याने राजकन्येच्या कपाळावर हात फिरविला.

या खेपेस पिशाचीण पळून गेली नाही. गुप्तपणे तिने लाकूडफोड्याच्या कानात सांगितले की मी उपकाराची फेड केली आहे. मी या राजकुमारीला सोडून जाणार नाही. तू हट्टच धरलास तर मी हिला सोडून जाईन व तुझ्या बायकोच्या अंगात शिरून बसून तुझी खोड मोडीन."

लाकूडफोड्या म्हणाला–"या राजकन्येशी माझा काही एक संबंध नाही. तुला पाहिजे तर तू माझ्या बायकोला धर. मी आपल्या पहिल्या बायकोपासून स्वतःचा बचाव व्हावा म्हणून तर एका राजकन्येशी लग्नाला तयार झालो. ती भांडकुदळ विहिरीतून निघून माझा शोध काढीत इकडे सुद्धा आली आहे."

पिशाचीण लाकूडफोड्याचे बोलणे संपण्यापूर्वीच तेथून गेली होती. ती कोठे गेली, पुढे कोणाच्या मानेवर जाऊन बसली हे कळले नाही.

लाकूडफोड्याचा विवाह दुसऱ्या राज-कन्येशी झाला. दोन्ही राजकन्येबरोबर त्याचे पुढील आयुष्य सुखाने गेले.





# अंड्यांची किंमत

एक तरुण नोकरीच्या शोधार्थ आपल्या गावाहून निघाला. संध्याकाळच्या सुमारास तो एका गावी येऊन पोचला. एका म्हातारीच्या घरी जाऊन म्हणाला– "काकी! मला फार भूक लागली आहे. मी फार दुरून आलो आहे, काही तरी खायला द्या."

"बाळ! तू अशा वेळी आला आहेस की तुला खायला द्यायला घरात काही उरले नाही रे! सहा अंडी आहेत. पाहिजे तर ती उकडून देते." ती म्हातारी म्हणाली.

तो तरुण मुलगा त्या गोष्टीस कबूल झाला. म्हातारीने सहा अंडी उकळून त्याला खायला दिली. त्याची भूक भागली. त्याने तिला विचारले–"काकी! अंड्यांची किंमत काय देऊ?"

"अरे! तू काय देणार? एक पै दे पाहिजे तर!" म्हातारी म्हणाली.

"माझ्याजवळ सोन्याचे एक नाणें आहे. तुझ्याकडे त्याची मोड मिळेल का?" त्याने विचारले.

"अरे! मी एक गरीब म्हातारी! माझ्याकडे इतके पैसे कोठून येणार? तू परत येते वेळी आठवण ठेवून दिलेस की पुरे!" म्हातारी म्हणाली.

तो तरुण पुढे निघाला. कित्येक देश फिरत फिरत समुद्र पार करून एका बेटात येऊन पोचला. तेथे त्याने व्यापार करून अलोट पैसा मिळविला. कित्येक वर्षांनंतर तो स्वदेशी परतला तेव्हां त्या म्हातारीच्या गावी आला आणि तांब्याची एक पै काढून म्हातारीला अंड्याची किंमत देऊ लागला.

म्हातारी हुशार बाई होती. तिने दोन तीन मिनिटांच्या बोलण्यावरूनच तो पुष्कळ श्रीमंत झाला असल्याचे ओळखले व

म्हणाली—"बाळ! अंड्यांचा हिशोब कोठे एक दमडी असतो का?

त्या तरुणाने चकित होऊन विचारले— "हिशोब बिशोब कसला काकू?"

"तू त्या दिवशी जी सहा अंडी खाल्लीस ती तू तशीच ठेवून दिली असतीस तर त्यांची सहा कोंबडी झाली असती त्यांनी पुन्हां अंडी दिली असती. त्या अंड्यांच्या पुन्हां कोंबड्या झाल्या असत्या. अशा प्रकारे हिशोब करीत गेलो तर पांच सहा लाख तरी अंडी नक्कीच होतील. मला अंदाजे एक हजार सोन्याची नाणी दे आणि हिशोब पुरा कर, संपले." म्हातारीने हिशोब सांगितला.

"काकी! मी इतके पैसे कोठून आणू हो?" त्या तरुणाने विचारले.

म्हातारीने न्यायाधिशाकडे जाऊन फिर्याद केली की या तरुणाकडून मला एक हजार सोन्याची नाणी मिळाली पाहिजेत, पण त्याने साफ नकार दिला आहे.

न्यायाधिशाने शिपायांना पाठवून त्या तरुणाला बोलावून घेतले. त्याला कैदेत ठेवून घेऊन दुसऱ्या दिवशी निकाल देतो असे सांगितले.

दुसऱ्या दिवशी या तरुणाला जेव्हां पुन्हां न्यायालयात बोलाविण्यात आले तेव्हां दुसऱ्या एका तरुणाने जवळ



येऊन त्याला म्हटले—"अहो, मी आतांच न्यायशास्त्राचा अभ्यास केला आहे. आपल्या तर्फे वकीलपत्र घ्यायला मला संधी द्यावी."

त्या तरुणाला आश्चर्यच वाटले. म्हणाला—"मला त्यात काही हरकत नाही."

थोड्या वेळाने न्यायाधिशाने वादी प्रतिवादींना बोलाविले.

न्यायशास्त्राचा अभ्यास करणारा विद्यार्थी न्यायाधिशाजवळ जाऊन म्हणाला—"न्याय-मूर्ती! मला एक निवेदन करावयाचे आहे. आपण थोडा वेळ हा खटला तहकूब करावा. कारण मी या तरुणाच्या वतीने वकीलपत्र घेतले आहे. परंतु त्याच्या बरोबर बोलायला मला पुरेशी सवड मिळाली नाही."

"काल संध्याकाळी तुम्ही काय करीत होता हो?" न्यायाधिशाने रागाने विचारले.

"क्षमा करा! काल मी भुइमुगाच्या शेंगा पेरण्यासाठी त्या भाजत बसलो होतो." न्यायशास्त्राचा विद्यार्थी म्हणाला.

"तू तर महामूर्ख दिसतोस! पेरायला आणलेले बी कोणी भाजतो का रे? भाजलेल्या भुइमुगाच्या शेंगा उगवतील कशा?" म्हातारीने चकित होऊन लगेच विचारले.

न्यायशास्त्री विद्यार्थ्याने म्हातारीकडे आश्चर्य करीत पहात विचारले—"उकडलेल्या अंड्यांतून कोंबड्या निघतात ना तशा उगवतील. उकडलेल्या अंड्याची पिढ्यान् पिढ्या वाढ होऊन कोंबड्या वाढत असतील तर भाजलेल्या शेंगाना अंकुर कां फुटणार नाहीत?"

न्यायाधिशाच्या लक्षात त्याचा तर्क आला. म्हातारीची फिर्याद फुकट गेली. न्यायाधिशाने तिच्या विरुद्ध निकाल दिला. त्या तरुणाने न्यायशास्त्र्याला बक्षिस दिले आणि आपल्या गावी निघून गेला.





# अमरवाणी

परिगत परमार्थान् पंडितान् मावमंस्था:,
तृणमिव लघु लक्ष्मी नैवतान् संरुणद्धि;
अभिनवमदरेखाश्यामगंडस्थलानां
न भवति बिसतंतु वारणं वारणानाम् ।। ।। १ ।।

[ज्ञानी पंडितांचा अपमान करू नकोस. तुझी संपत्ति व वैभव त्यांच्यासमोर तृणवत्, म्हणजे गवतासारखे आहे. मदोन्मत्त हत्तीला कमलनाळांनी बांधून ठेवण्याचा प्रयत्न करणे कधी शक्य होईल का ? ]

अंभोजिनी वनविहार विलासमेव
हंसस्य हंतु नितरां कुपितो विधाता,
नत्वस्य दुग्धजलभेदविधौ प्रसिद्धां
वैदग्ध्यकीर्तिमपहर्तुमसौ समर्थः ।। ।। २ ।।

[ब्रह्मदेव हंसावर रागावला तर त्याला कमळे भरून असलेल्या सरोवरात विचरण न करण्यास आज्ञा करू शकेल पण दूध व पाणी निरनिराळे करून दाखविण्याची त्याची जी शक्ती आहे ती दूर करू शकेल का ? ]

जयंति ते सुकृतिनो रससिद्धाः कवीश्वराः
नास्ति तेषां यशःकायै जरामरणजं भयं ।। ।। ३ ।।

[उत्तम कृतींची रचना करून रससिद्धी ज्यांनी मिळविली आहे अशा कवीश्वरांच्या यश म्हणजे कीर्ति रूपी देहाला वार्धक्य किंवा मृत्यूचे भय नसते.

पंडित



# डाकू

एका दिवशी एक व्यापारी एका शहरात व्यापार करण्यासाठी आला आणि आपला माल विकून त्याने एक हजार रुपये मिळविले. त्या दिवशी तो एक खोली भाड्याने घेऊन त्या खोलीत झोपला.

व्यापाऱ्याने उठून पाहिले तर रुपयांची पिशवी नाहीशी झालेली. लगेच त्याने ती गोष्ट धर्मशाळेच्या मालकाला सांगितली.

धर्मशाळेच्या मालकाने धर्मशाळेत उतरलेल्या सर्व यात्रेकरूंना एकत्र केले आणि सर्व सामान तपासून घेण्यासाठी आपल्या नोकरांना सांगितले.

त्याच वेळी कल्लेदार मिशा असलेला एक आडदांड मनुष्य एक गाठोडे घेऊन समोर आला. त्याने ते गाठोडे धर्मशाळेच्या मालकाच्या पायाजवळ ठेवले व म्हणाला– "मालक! हे गाठोडे आहे! सर्व पैसे बरोबर आहेत की नाही नीट तपासून पहावे. मीच पैसे चोरून नेले होते. या सर्व मंडळींचा अपमान होऊ नये यासाठी मी स्वतः होऊन आपली चूक कबूल करतो आहे."

त्याचे म्हणणे ऐकून व्यापारी खूष झाला. त्याने सर्व पैसे मोजून पाहिले आणि म्हणाला–"बरोबर आहेत. तू सामान्य चोर दिसत नाहीस. हे घे इनाम!" असे सांगून तो व्यापारी चोराला काही पैसे देऊ लागला.

पण त्या चोराने नकार दिला व म्हणाला–"चोराला दंडच करावयाचा असतो. त्याला बक्षिस किंवा इनाम द्यावयाचे नसते. मी चोरी कशी केली हे नाही विचारलेत ? तुम्ही आपला माल विकून पैसे घेऊन निघालात तेव्हां मी तुमच्या पाठोपाठ निघालो. तुम्ही खोली भाड्याने घेण्यासाठी मालकाजवळ बोलत होता तेव्हां कोणत्या खोलीत कोण उतरणार आहे हे मी लक्ष देऊन ऐकून घेतले. मी त्या खोलीत आधीच

तुकाराम वि. जाधव

       





जाऊन खाटेखाली लपून बसलो. तुम्ही झोपल्यावर घोरू लागलात तेव्हां मी तुमची पैशाची पिशवी अशी उचलून घेतली व मांजराच्या पावलांनी शेजारच्या काळोख असलेल्या खोलीत असा निघून गेलो." असे म्हणत चोर व्यापाऱ्याच्या समोरून पैशाची पिशवी उचलून घेऊन काळोखाच्या खोलीत शिरला आणि क्षणार्धात आंघोळीच्या खोलीच्या भितीवरून उडी मारून जंगलात निघून गेला.

चोर पुन्हां परत येईल असे वाटून ते चोराची वाट पहात बसले. परंतु तो बराच वेळ न आलेला पाहून खरी वस्तुस्थिती त्यांच्या लक्षात आली. तो सामान्य चोर नव्हताच, सर्वांसमक्ष त्याने चोरी केली होती.

त्या चोराचा एक शिष्य होता. त्या शिष्याने एका श्रीमंत माणसाचा तसाच पाठलाग केला होता. त्या श्रीमंत मनुष्याच्या हातात पिवळया रंगाची एक पिशवी होती. त्या पिशवीत सोन्याची नाणी होती. तो श्रीमंत मनुष्य पिशवीत सोन्याची नाणी भरत होता त्यावेळी त्या शिष्याने त्या श्रीमंत मनुष्याला पाहिले होते. म्हणून तो त्याच्या पाठोपाठ गेला होता.

श्रीमंत मनुष्याने घरी आल्यावर नोकराला पिशवी घरात ठेवून तांब्याभर पाणी आणायला सांगितले. नोकराने टेबलावर पिशवी ठेवली, धन्याला पाणी आणून दिले आणि फराळाचे सामान आणायला निघून गेला. मालक पाय धुवायला तांब्या घेऊन बाहेर गेला. तो बाहेर पाय धुवीत असतां चोर आत शिरून पिशवी घेऊन सरळ त्याच्या गुरूकडे जंगलात निघून गेला. त्याने पिशवीची चोरी कशी केली ते आपल्या गुरूला सांगितले.

ते ऐकून गुरू म्हणाला–"तू चुकलास? मालकाला नोकरावर संशय येईल व तो त्याला मारहाण करू लागेल. आपल्यामुळे इतरांना कष्ट होता कामा नये."

"चूक झाली, कान धरतो! नोकराला काही कष्ट होऊ नये असा काही तरी उपाय करतो!" असे सांगून तो पिशवी घेऊन तो त्या श्रीमंताच्या घरी गेला.

चोराच्या गुरूला वाटले होते अगदीं तसाच तो श्रीमंत मनुष्य आपल्या नोकरावर संशय घेऊन त्याला खांबाला बांधून विचारीत होता–"बोल! कोठे ठेवली आहेस पिशवी लपवून, नाही तर तुझी चामडी लोळवीन."

"मला काही माहित नाही मालक! मी पिशवी घरात टेबलावर ठेवून पाणी आणून दिले." नोकर रडत उत्तर देत होता. इतक्यात चोराच्या शिष्याने हाक मारली आणि पिशवी त्या श्रीमंत माणसासमोर ठेवीत म्हणाला–"मालक! मी सुभानसिंहाचा नोकर आहे. आपण थोडया वेळापूर्वी त्यांच्याशी बोलतांना पिशवी तेथेच टाकून दिली होती. सुभान साहेबांनी ही पिशवी आपल्याला देऊन यायला मला पाठविले होते. बरे तर येतो." असे सांगून चोराचा शिष्य निघून गेला.

श्रीमंत मनुष्य घरी परत येते वेळी सुभानच्या घरी गेला होता. परंतु त्याने पिशवी बरोबर घरी आणली होती हे त्याला नक्कीच आठवत होते. श्रीमंत मनुष्याने नोकराला सोडले व विचारले–"मूर्खा! मी पिशवी घरी आणलीच नव्हती तर तू पिशवी टेबलावर ठेवली होती असे कसे कबूल केलेस?

"साहेब! आपण म्हणालात की आपण पिशवी माझ्या हातात दिलीत, म्हणून मी देखील म्हणालो." नोकर म्हणाला.

श्रीमंताने पिशवी उघडून पाहिली तर आत सोन्याची नाणी नव्हती. त्यांच्या ऐवजी पितळी तुकडे होते. चवकशी केल्यावर कळले की सुभानकडे तसा कोणी नोकरच नव्हता.













# सोपा प्रश्न

एका गावी एक श्रीमंत मनुष्य रहात असे. त्याला एकुलती एक मुलगी होती. त्या श्रीमंताच्या घरी एक अनाथ मुलगा होता. तो गुरे चरायला घेऊन जाई, पण हुशार होता. त्याचे नाव दीनानाथ असे होते.

त्या श्रीमंताची मुलगी जानकी वयानें दीनानाथाहून लहान होती. तिला समवयस्क कोणीच नव्हते. म्हणून जानकी त्याच्याशी बोलत असे. दोघांची खूप मैत्री जमली. तो श्रीमंत मनुष्य दीनानाथाला नोकरासारखा वागवीत नसे, आपल्याच घरच्या लोकांपैकी एक मानीत असे.

दीनानाथ व जानकी वयात येऊ लागली तसतशी त्यांची मैत्री परस्पर प्रेमात बदलत गेली. त्या दोघांनी विवाह करून घेण्याचे रविले. त्या श्रीमंत मनुष्याला ती गोष्ट कळली तेव्हां त्याने दीनानाथाला खूप मारले. अशा बाबतीत दया दाखविली तर मुलगा बिघडेल असे देखील त्याला वाटले. जानकी आपल्या बाबांना म्हणाली–"बाबा! यात दीनानाथाची काय चूक! मला या जगात आणखी दुसरा कोणी पसंत पडेल असे वाटत नाही. मी त्याला सोडून इतर कोणाशी लग्न करायला तयार नाही. पाहिजे तर मलाच त्याच्या बद्दल पाहिजे तितके मारा."

त्या श्रीमंत माणसाने त्या पुढे दीनानाथाला घरी ठेवून घेण्यात शहाणपण नाही असे ठरविले व म्हणाला–"आतापर्यंत मी तुला संभाळले आणि आतां तूच मला सांपासारखा चावायला धावलास? माझी पोरगीच मूर्ख निघाली. तुला माझ्या मुलीशीच लग्न करावयाचे असेल तर धन व कीर्ती संपादन करून मग ये. तुला मी एका वर्षाची सवड देतो. धन व कीर्ती मिळविल्याशिवाय माझ्या डोळ्यासमोर आलास तर तुला उभा चिरून खाईन. लक्षात ठेव! चालता हो माझ्या डोळ्यासमोरून."

जानकी रडू लागली. दीनानाथ गाव सोडून निघून गेला. खेडे गावात राहून धन किंवा किर्ती मिळणे अशक्य हे त्याला माहीत होते. म्हणून तो सरळ राजधानीच्या गावी निघून गेला.

दीनानाथ राजधानीत पोचला तेव्हां दरबारात पंडितांची सभा चालू होती. राजा दर वर्षी तीन दिवस पंडितांची सभा करीत असे. त्यांची परस्पर शास्त्रार्थाची चढाओढ चाले. त्या चढाओढीत वाटेल त्याला प्रवेश मिळत असे.

त्या वर्षी तीन दिवसांपासून सभा चालू होत्या. परंतु कोणी कोणाला जिंकू शकला नाही. मोठ्यात मोठ्या समस्येची पूर्ती कोणीतरी करीत असे. संध्याकाळपर्यंत एक न एक पंडिताला जय मिळविणे आवश्यक आहे. राजाने पंडितांना पुष्कळ प्रोत्साहन दिले. पण काही एक फायदा झाला नाही. सभा फुकट जाणार असे वाटू लागले.

राजाने निराश होऊन विचारले–"प्रेक्षकांपैकी कोणाला काही प्रश्न विचारावयाचा आहे का? खुशाल विचारावा."

पंडितच हात पाय गाळून बसले होते तर इतरांपैकी कोण काय प्रश्न विचारणार?











म्हणून कोणीच काही बोलला नाही. फक्त दीनानाथ उभा राहून म्हणाला—"महाराज? मी एक सामान्य मनुष्य आहे. म्हणून मी एक सामान्य प्रश्नच विचारणार आहे."

राजाने दीनानाथाला परवानगी दिली.

दीनानाथाने तीन प्रश्न विचारले—"एका रस्त्याच्या दोन विरुद्ध दिशेने दोघे जण चालत होते. त्यांचे काय होते? दोघे भेटतात तेव्हां काय होते ते परस्परांना भेटून पुढे जातात तेव्हां काय होते?"

ते प्रश्न ऐकून सर्व पंडित चकितच झाले. काही लोकांनी हे प्रश्न निरर्थक असल्याचे सांगितले. राजाला पण तसेच वाटले. कोणी पंडित या प्रश्नांचे उत्तर देणार नाहीत असे राजाला वाटले. म्हणून राजा दीनानाथाला म्हणाला—"फक्त प्रश्न विचारून काम भागत नाही, त्या प्रश्नांची उत्तरे पण देण्याची शक्ती असली पाहिजे. तू बरोबर उत्तरे दिली नाहीस तर मी तुला शिक्षा करीन."

दीनानाथ स्मित करून म्हणाला—"माझे प्रश्न सरळ आहेत. परस्पर विरुद्ध दोन्ही दिशांनी चालणारे समोरासमोर येतात, भेटल्यावर जवळ येतात व भेटून पुढे गेल्यावर दूर जातात?"

सभेत हजर असलेले सर्व लोक त्या सोप्या प्रश्नांची सोपी उत्तरे ऐकून हसू लागले. प्रश्नांची काही गूढ उत्तरे असणार असे त्यांना वाटत होते. राजाने दीनानाथाच्या हुशारी बद्दल खूष होऊन त्या वर्षाचे बक्षिस त्यालाच देऊन टाकले.

दीनानाथाने आपल्या गावी परत येऊन साऱ्या गोष्टी आपल्या श्रीमंत मालकाला सांगितल्या. दीनानाथ धन व कीर्ती संपादन करून आल्यावर त्या श्रीमंत मनुष्याने आपल्या मुलीबरोबर त्याचा विवाह करून दिला.






द्रुपद राजाच्या आज्ञेने राजपुरोहित पांडव उतरले होते तेथे आले आणि म्हणाले—"महाराजांनी आपल्याला भेटून आपली ओळख करून घेण्यासाठी मला पाठविले आहे. आमचे महाराज पांडु राजाचे मित्र आहेत. आपल्या एकुलत्या एका मुलीचे लग्न मध्य पांडवांशी व्हावे अशी त्यांची फार इच्छा होती. पण आता ते कोणाशी होत आहे हे कळावे म्हणून मी आलो आहे. तरी आपण आपले कुळ गोत्र इत्यादींची माहिती सांगण्याची कृपा करावी."

युधिष्ठिराने पुरोहिताचा यथा प्रकारे सत्कार करून त्यांना बसायला आसन दिले व म्हणाला—"आमच्या कुळ गोत्राचा परिचय आपल्या महाराजांना कशासाठी हवा आहे? आपल्या महाराजांनी राजकन्येचे स्वयंवर रचून मत्स्यभेद करील त्याचे राजकन्या वरण करील असे जाहीर केले होते. माझ्या भावाने मत्स्यभेद करून राजकन्येला जिंकले आहे. मला वाटते, एवढ्यावर तुमच्या महाराजांचे समाधान व्हायला हवे."

इतक्यात पांडवांना घेऊन जाण्यासाठी द्रुपद राजाने पाठविलेले रथ येऊन पोचले. पांडव निरनिराळ्या रथात बसले. द्रौपदी व कुंती एका रथात बसल्या. रथ राजवाड्याच्या दारात येऊन उभे राहिले. द्रुपद राजाने नजराणे देऊन त्यांचे स्वागत केले. पांडवांनी फक्त क्षत्रियोचित नजराणे तेवढे ग्रहण केले व बाकी परत पाठवून दिले. द्रुपदाने पांडवांकडे ध्यान देऊन पाहिले व

हे नक्कीच कोणी क्षत्रिय असले पाहिजेत अशी त्याच्या मनाची खात्री पटली.

एका मांडवात सर्वांना बसण्याची व्यवस्था केली होती. राजा द्रुपद युधिष्ठिराजवळ येऊन म्हणाला–"आपण सर्व कोण, आम्हांला माहीत नाही. आपला पूर्ण परिचय मिळाल्या शिवाय आपल्या मुलीचा विवाह शास्त्रोक्त पद्धतीने कसा काय करावयाचा हाच माझ्या समोर प्रश्न आहे. तशी मुलगी तुमची आहे, हे मी मान्य केलेच आहे.

ते ऐकून युधिष्ठिराने आपला सर्व परिचय दिला. तो ऐकून राजाच्या डोळ्यात आनंदाश्रु आले. कारण त्याच्या इच्छेप्रमाणे मध्यम पांडव अर्जुनाशीच तिचा विवाह होणार होता. नंतर द्रुपद पांडवांना म्हणाला–"लाक्षागृहातून निसटून तुम्ही सुखरूप बाहेर पडलात हे माझेच महद् भाग्य मी मानतो. तुमचे राज्य पुन्हां परत मिळवून देईन अशी मी प्रतिज्ञा करतो."

त्यानंतर कुंती, पांडव आणि द्रौपदीला राहण्यासाठी उत्तमोत्तम महालांची व्यवस्था करण्यात आली. त्यात सर्व प्रकारे आराम होता.

आणखी काही दिवस लोटल्यावर द्रुपद पांडवांना म्हणाला–"आतां द्रौपदी व अर्जुन यांचा विवाह करून द्यावा म्हणतो."

"ते कसे काय शक्य होईल? मी व भीम त्याचे दोघे मोठे भाऊ अविवाहित असतां अर्जुनाचा विवाह कसा काय होईल?" युधिष्ठिराने शंका केली.

"तसे असेल तर मी आपल्या मुलीचे लग्न तुमच्या बरोबर करून द्यायला तयार आहे." द्रुपद म्हणाला.

"आपली मुलगी म्हणजे एक कन्यारत्न आहे. त्या रत्नाची पारख व आवड सर्वांना सारखीच आहे. आमच्या आईचा शब्द राखण्यासाठी आम्ही पांच जण तिच्याशी विवाह करणार आहो." युधिष्ठिर म्हणाला.



द्रुपदाला ते ऐकून आश्चर्यच वाटले. म्हणाला–"एका पुरुषाचा विवाह अनेक कन्यांबरोबर होतो. पण एका कन्येचा विवाह पांच जणांबरोबर करणे शक्य नाही. या संबंधी आपण सर्व कुंतीमाता व धृष्टद्युम्न एकत्र बसून काय ते उद्यां ठरवू." द्रुपदाने त्या विषयी चर्चा तेथेच थांबविली.

त्याच वेळी काळ्या हरणाचे कृष्णाजिन धारण करून कृष्ण द्वैपायन तेथे आले. सर्वांनी त्यांना सामोरे जाऊन त्यांचे स्वागत केले. त्यांना यथोचित आसन देऊन सर्व आपापल्या जागी येऊन बसले.



द्रुपद कृष्ण द्वैपायनाला म्हणाला–"महात्मन्! सर्व धर्मांची व कर्तव्यांची जाणीव असणाऱ्या युधिष्ठिराचे म्हणणे आहे की माझ्या मुलीशी पांचही भावांचे लग्न झाले पाहिजे. आपण सर्व धर्मांचे ज्ञाते व त्रिकाल ज्ञानी आहां. आपणच सांगावे कोणत्याही युगात अनेक पुरुषांनी एका कन्येशी विवाह केला आहे का? ही गोष्ट धर्मविरुद्ध नाही काय?"

त्यावर युधिष्ठिर म्हणाला–"माझ्या तोंडून कधी अधर्माची किंवा अकर्तव्याची गोष्ट येत नाही. आम्ही सर्वजण आपल्या कन्येशी एक मुखाने विवाहास तयार आहो. तेव्हां आपल्याला हरकत कां असावी? या शिवाय आमच्या मातेची आज्ञापण तशीच आहे. मातेची आज्ञा पालन करण्यापेक्षा श्रेष्ठ धर्म दुसरा कोणता होऊ शकेल? प्राचीन काळातील गोष्ट विचाराल तर आमचेच म्हणणे बरोबर असल्याचे आपल्याला आढळून येईल. प्राचीन काळात गौतम वंशात जन्मलेल्या जटिला नामक एका कन्येचा विवाह सात पुरुषांशी झाला होता. दाक्षायणी नामक मुनिकन्या प्रचेतस नामक दहा मुनींची पत्नी होती. या गोष्टी आपल्याला पुराणांवरून स्पष्ट कळतात."

त्यावर धृष्टद्युम्नाने आणखी एक शंका काढली. धाकटा भाऊ अर्जुन याने आपल्या



अद्भुत कौशल्याने ज्या कन्येला जिंकले तिच्याशी त्याच्या मोठ्या भावाचा विवाह कोणत्या आधारे होऊ शकेल? माझी बहीण कृष्णा इतक्या पुरुषाबरोबर कसा काय विवाह करणार?"

कुंती म्हणाली—" माझ्या तोंडून निघालेला शब्द खोटा ठरता कामा नये."

तेव्हां कृष्ण द्वैपायनांनी कुंतीला धीर दिला व द्रुपदाला म्हणाले—"राजन्! युधिष्ठिर म्हणाला त्यात अधर्म असे काही नाही. तुम्ही या पांचही भावंडांबरोबर आपल्या मुलीचा विवाह करून देण्यात गैर असे काहीच नाही."

त्यानंतर कृष्ण द्वैपायनांनी द्रुपदाला एकांतात बोलावून नेऊन द्रौपदीच्या पूर्व जन्माची गोष्ट सांगितली.

प्राचीन काळी मौद्गल्य नांवाच्या मुनींना इंद्रसेना नावाची बायको होती. मौद्गल्यला कुष्टरोग झाला म्हणून इंद्रसेनेला पतिसुख मिळाले नाही. आयुष्यभर ती पतीच्या सेवेत कष्ट करीत राहली. पुढल्या जन्मी ती काशीराजाच्या पोटी जन्मली. ती दिसायला फार सुंदर होती. तरी तिचा विवाह झाला नाही. म्हणून दु:खी होऊन तिने शंकराचे स्मरण करून तपश्चर्या केली. शंकराने तिच्या तपश्चर्येवर प्रसन्न होऊन तिला दर्शन दिले व विचारले—"मुली तुला काय हवे ते माग. तिने "पति, पति, पति, पति, पति" असे पांच वेळा घाई-घाईने म्हटले. पुढल्या जन्मी तुला पाच पती मिळतील असा शंकराने तिला आशीर्वाद दिला.

त्यानंतर काशीराजाच्या कन्येने शंकराजवळ विनंती केली की तिला पाच पती मिळाले तर त्या सर्वांची सेवा तिच्या हातून एकाच सारखी घडावी व पतींना पत्नीसुख समान मिळेल असा वर द्यावा. शंकराने तसा आशीर्वाद दिल्यावर शंकर अंतर्धान पावला. तीच मुलगी द्रौपदीच्या रूपाने आज पंच पांडवांची पत्नी होणार आहे."

द्रौपदीच्या पूर्वजन्माचा वृत्तांत सांगून कृष्ण द्वैपायन द्रुपदाला म्हणाले—"प्राचीन काळी असे विवाह होत असल्याची उदाहरणे आहेत. नितंत नामक एका राजर्षीला साल्वेय, शूरसेन, श्रुतसेन, सार व अतिसार नामक पाच पुत्र होते. त्यांचे परस्परांवर फार प्रेम होते. त्या पाच भावंडांनी उशीनरची राजकन्या अजिता हिच्याशी विवाह केला होता व तिला त्या पांचजणांपासून पाच पुत्र झाले होते. थोडक्यांत सांगावयाचे म्हणजे ही रीत पूर्वी होती.

व्यास मुनींनी द्रौपदीचा पूर्व जन्म वृत्तांत व जुन्या काळातील एका कन्येशी पांच पुरुषांच्या विवाहाची गोष्ट सांगितल्यावर द्रुपदाने पांचही पांडवांशी द्रौपदीचा विवाह करून देण्यास संमती दिली.

त्याच दिवशी चांगला मुहूर्त होता. चंद्र-पुष्य नक्षत्राची युती होती. म्हणून कृष्ण द्वैपायनांनी त्याच दिवशी हा विवाह समारंभ करवून घेण्याचा सल्ला दिला. द्रुपदाने त्या प्रमाणे विवाहाची तयारी सुरू केली. कांपिल्य नगरीभर सर्वत्र केळ्याचे खांब



उभे करून तोरणें बांधण्यात आली. सर्व शहर भर रस्त्यावर चंदनाचा सडा घालण्यात आला आणि मोत्यांच्या रांगोळ्या काढण्यात आल्या. सर्व शहरात जिकडे पहावे तिकडे या मंगल कार्यासाठी लोकांची गर्दी जमा झाली. ब्रह्मवृंद वेदमंत्र म्हणू लागला. मंगलवाद्ये वाजू लागली. राजवाड्याच्या ईशान्य दिशेला विवाह मंडप उभा करण्यात आला. प्रत्येक स्तंभाला हिरव्या रंगाची वस्त्रे गुंडाळण्यात आली. मांडव फुलांच्या माळांनी व पताकांनी सजविण्यात आला होता. सुवर्णाच्या ओटाचावर अग्निकुंड तयार करविण्यात


चांदोवा



आले. स्वर्णपात्रात पवित्र तीर्थाचे पाणी ठेवण्यात आले.

बोहल्याजवळ पाच पांडव स्नानादि करून व नवीन वस्त्रे परिधान करून आले. सुंदर वस्त्रालंकारांनी सजवून द्रौपदीला तिच्या सखींनी बोहल्यावर आणून उभे केले. धौम्य मुनींनी पुण्याहवाचन आदि करून घेऊन प्रथम द्रौपदी व युधिष्ठिराला बोहल्यावर बसविले व होम करून प्रथम त्या दोघांचा विवाह करून दिला. त्यानंतर अनुक्रमे भीम, अर्जुन, नकुल व सहदेव यांच्याशी द्रौपदीचा विवाह झाला. द्रुपद राजाने आपल्या जामातांना निराळी आभूषणे, धन, रथ, घोडे, हत्ती, दासदासी, गाई इत्यादींचा अहेर केला. पाच पांडवच त्याचे जामाता झाल्यावर देवांची देखील वक्रदृष्टि आपल्याकडे वळणे शक्य नाही असे द्रुपदाला वाटले.

विवाहानंतर द्रौपदी अंत:पुरात आली. अंत:पुरांतील स्त्रियांच्या मध्यभागी तिला एका उच्च आसनावर बसविण्यात आले. तिने उठून प्रथम कुंतीला नमस्कार करून आशीर्वाद घेतला.

पंचपांडवांबरोबर द्रौपदीचा विवाह झाल्याची वार्ता ऐकून कृष्ण सर्वांना अहेर करण्यासाठी आला. त्यानंतर कृष्ण पंच पांडवांबरोबर कांपिल्य नगरीत पुष्कळ दिवस राहिला.

काही दिवस लोटल्यावर इतर राजांप्रमाणे कौरवांना पण कळले की मत्स्यभेद करणारा तो कोणी ब्राह्मण तरुण नसून स्वत: अर्जुनच होता. शल्याचा गदायुद्धात भ्रमनिरास करणारा दुसरा तिसरा कोणी नसून स्वत: भीमच होता. अशा तऱ्हेने लाक्षागृहात पांडवांना जाळून टाकण्याचा कट फिसकटला.

दुर्योधन हस्तिनापूरच्या वाटेवरच असतांना त्याला ही गोष्ट कळली. पांडवांचे

नशीब बलवत्तर असलेले पाहून दुर्योधन हताशच झाला. तेव्हां दुःशासन आपल्या वडील भावाला म्हणाला–"दादा! अर्जुन ब्राह्मणाचा वेष धारण करून आला नसता तर द्रौपदी त्याच्या हाती लागली असती का? तो अर्जुन आहे हे आपल्याला पूर्वीच कळले असते तर आपण पांडवांना जिवंत सोडले असते का? पण आता त्या गोष्टी-बद्दल मनाला लावून घेण्यात अर्थच काय? बाहुबलापेक्षा दैवबल त्यांच्या बाजूला जास्त आहे." अशा तऱ्हेने कौरव दुःखी मनाने पुरोचनची निंदा करीत हस्तिनापुरी परत आले.

विवाहाची वार्ता कळल्यावर सर्वात जास्त आनंद झाला तो विदुराला. त्याने ती आनंदाची वार्ता सर्व प्रथम धृतराष्ट्राला जाऊन सांगितली.

द्रौपदीचा विवाह दुर्योधनाशी झाला असे चुकीने समजून धृतराष्ट्राने द्रौपदीला वस्त्राभूषणे लवकर नेऊन द्यायला आज्ञा केली. पण धृतराष्ट्राने ऐकण्यात काही तरी चूक केली असल्याचा विदुराला संशय आला. म्हणून त्याने पुन्हा द्रौपदीने अर्जुनाला वरल्याचे सांगितले आणि पांचही पांडवांशी तिचा विवाह झाल्याचे पण सांगितले.

ते सर्व ऐकून धृतराष्ट्र म्हणाला–"तर मग त्यात काय? मी खरे सांगू का? दुर्योधन आदिकांपेक्षा माझे पांडवांवरच जास्त प्रेम आहे. ते पराक्रमी आहेत. वडिलांचा आदर कसा करावा हे त्यांना कळते. नीतिअनीति त्यांना कळते. द्रुपदाशी त्यांचा संबंध झाल्याने त्यांची शक्ती व कीर्ती वाढली आहे. मला सर्वात जास्त आनंद झाला तो या बद्दल की पांडव जिवंत आहेत."

"राजा! तुझी बुद्धी सर्वदा अशीच राहो!" विदुर एवढेच म्हणाला.



# लेनिनचे बालपन



[२]

लेनिनने मेहनत करण्यापुरेशी शक्ती कमावली. आम्ही पूर्वीच लेनिन वर्गात कसा मन लावून अभ्यास करी हे सांगितले आहे. लेनिन हुशार विद्यार्थी होता, हे तुम्हांला माहीतच आहे. म्हणून त्याला विद्याभ्यासात प्राविण्य मिळविण्यासाठी जास्त मेहनत करावी लागली नाही.

लेनिन आपल्या घरच्या व इतर लोकां-संबंधी खूप गंभीरपणे विचार करून आपले मत बनवी. म्हणून त्याला आपल्या उणिवा छान कळू लागल्या होत्या. ती संवय त्याने पाडून घेतली होती. विश्वविद्यालयात तो ग्रॅज्युएट व्हायच्या सुमारास असेल, त्या वेळी त्याच्या स्वभावात हेच एक विशेष लक्षण दिसून येऊ लागले. मोठा झाल्यावर त्याचा हा गुण जास्त जास्त विकसित होत गेला.

व्लादिमीर लहान होता, तेव्हांपासूनच तो आपल्या चारीबाजूच्या प्रदेशाचे सूक्ष्म निरीक्षण करीत असे. मी नेहमी त्याच्या या गुणाकडे लक्षपूर्वक पहात आले आहे. तो मोठ्या चाणाक्षपणाने दुसऱ्यांचे दोष व उणिवा ओळखत असे व त्यांना खूप रडवून त्यात आनंद मानत असे. तो इतर गोष्टी पण विसरत नसे. दुसऱ्यांचे चांगले गुण तो उचलीत असे. चांगली गोष्ट कोठे दिसून आली की ती शिकून घेण्यासाठी तो प्रयत्न करी. मला असे वाटते की लेनिनमध्ये हाच एक मोठा गुण होता.

लहानपणी तो कधी कोणत्याही गोष्टी बद्दल घमेंड करीत नसे की आत्मप्रशंसापण करीत नसे. मोठेपणीदेखील या दुर्गुणांचा त्याला भयंकर तिटकारा होता. १९२० मध्ये काम्समालच्या तिसऱ्या अधिवेशनात

ए. उल्यानोव



# देवाचा भरंवसा

फार पूर्वी इराण देशातल्या एका गावी एक फकीर रहात असे. तो महा आळशी व मूर्ख होता. अंगाने हट्टाकट्टा होता, काम करायला त्याच्या अंगात भरपूर शक्ती होती, परंतु स्वभावाने तो कामचोर होता. पोट भरण्यासाठी तो भीक मागे. बाकी वेळ तो झोपण्यात व जागेपणी गावभर भटकण्यात घालवी. पोळासारखा असा भटकतोस कां, असे कोणी त्याला म्हटले की तो हंसे आणि त्या बोलण्याकडे दुर्लक्ष करी.

हळूहळू त्याच्या या वागण्यामुळे त्याला गावात कोणी भीक घालीनासा झाला. एक वेळ पोट भरणेदेखील त्याला कठीण होऊ लागले. आता गावात निभाव लागणे कठीण आहे, असा विचार करून तो शेजारच्या गावी निघून गेला.

परगावी जात असता त्याला वाटेत एक जंगल लागले. त्या जंगलात त्याला एक लंगडा कोल्हा दिसला. त्या निर्जन स्थानी एका जिवंत लंगडया कोल्ह्याला पाहून फकीराला आश्चर्य वाटले.

ओहो! देवाची लीला काय पण अगाध आहे? या कोल्ह्याला हातपाय नाहीत आणि हा या जंगलात कसा काय जगतो आहे बुवा? त्याला खायला प्यायला कसे काय मिळते? 'देव तारी त्याला कोण मारी!' फकीर असा विचार करीत असता एक वाघ हरणाला ठार करून त्या बाजूला ओढीत घेऊन आला.

वाघाला पाहून फकीर भ्याला आणि झाडीत एका जागी लपला.

वाघ आपली भूक भागवून उरलेले हरणाचे मांस तेथेच टाकून निघून गेला. त्या मांसावर कोल्ह्याने हात मारला.

कु. मीना खांडके

आज आपल्याला एका सत्याचा शोध लागला. सर्व प्राण्याचे रक्षण करणारा तो परमेश्वर सर्वांची काळजी वाहतो आहे. देवाची कृपा अपार आहे.

देव दररोज या लंगडया कोल्ह्याच्या पोटाची जशी तरतूद करतो आहे तसाच देव माझी फिकीर कां करणार नाही? मी कोणाकडे भीक मागण्याची गरजच काय? काय वाटेल ते होवो, आजपासून मी कोणाकडे भीक मागायला जाणार नाही. देवावर सर्व भिस्त टाकून स्वस्थ बसून राहीन. कोल्ह्यासारखा मी सुद्धा कोणत्या तरी कोपऱ्यात पडून राहीन. देव स्वतः माझे पोट भरण्यापुरेसे खाणे माझ्याकडे पाठवून देईल. असा विचार करून तो फकीर एका गावाकडे वळला. तो एका गावी गेला. त्या गावात एक जुनी मशीद होती. मशिदीजवळच्या झाडाला आपली झोळी बांधून ठेवून तो समोर उभा राहिला.

तेथे एक वृद्ध गृहस्थ येऊन उभा राहिला. बराच वेळ पहात राहिल्यावर तो फकिराला म्हणाला—"येथे कोणी भीक घालणारा नाही. तू गावात जाऊन भीक माग. कोणी भीक घालील."

"येथे मशीद आहे ना! घर असेल तेथे घरवाला पण असणार. या मशिदीत



राहणारा माझ्यावर कृपा करणार नाही का?" फकीर म्हणाला.

तो म्हातारा थोडासा रागाने म्हणाला–"येथे राहणारा कोण आहे, माहीत तरी आहे का तुला? तुला व मला जन्म देणारा व सर्वांचे पालन पोषण करणारा परवरदिगार अल्ला राहतो इथे. त्याची थट्टा करतोस का रे?"

"अल्लाच्या दारासमोरुन भीक घेतल्याशिवाय रिकाम्या हाताने कोठे जाऊ? मी भीक घेतल्याशिवाय येथून गेलो तर देव रागावेल!" असे म्हणत फकीर देवाची प्रार्थना करू लागला–"हे दीनदयाळा देवा! तू आपल्या अदृश्य भांडारातून माझ्या पोटापुरते अन्न पाठवून दे." असे सांगून फकीर तेथेच बसला. प्राण गेला तरी तेथून हालायचे नाही, असे त्याने मनाशी ठरविले.

फकीर त्या गावात नवा होता. म्हणून कोणी त्या बाजूला फिरकला सुद्धा नाही. कोणी त्याला खायला दिले नाही की विचारपूस केली नाही.

काही दिवसांनी तो उपासमार झाल्यामुळे अशक्त झाला. त्याची गालफडे बसली, डोळे खोल गेले. फक्त हाडांचा सांगाडा काय तो उरला. आज मरतो की उद्यां, अशी त्याची स्थिती झाली.

त्या वेळी मशीदीतून एक आवाज ऐकू आला–"मूर्खा! तू हात पाय नसलेला कोल्हा आहेस का? अंगात शक्ती असून भीक मागणे मूर्खपणा आहे. मेहनत करुन जो असहाय गरिबांना मदत करतो त्याच्यावर मी कृपा करतो."

ते ऐकून फकीर शरमेने मान खाली घालून बसला. अंगात अगदी थोडी शक्ती उरली होती. तरी तसाच तेथून उठला. त्या दिवसापासून त्याने मेहनत मजुरी करुन आपले पोट भरायला सुरवात केली.






क्षुत् क्षामोपि, जरा कृशोपि, शिथिल प्रायोपि, कष्टांदशा
मापन्नोपि, विपन्न दीधितिरपि, प्राणेषु नश्यत्स्वपि,
मत्तेभेन्द्र विभिन्नकुंभ पिशितग्रासैक बद्धस्पृहः,
किं जीर्णं तृणमत्ति मानमहता मग्रेसरः केसरी ॥ १ ॥

[अत्यंत मानी सिंह, भुकेने जीव कासावीस झाला असला, म्हातारपण आले असले, संकटात सापडला असला, अशक्त असला, जीव कंठाशी येऊन ठेपला असला, तरी हत्तीचे कुंभस्थळ फाडून त्याचा ग्रास करण्याचीच इच्छा करणार, वाळलेले गवत खाण्याची इच्छा करील का? शक्यच नाही.]

लांगूलचालन मधश्चरणावधातं,
भूमौ निपत्य वदनोदर दर्शनं च,
श्वा पिंडदस्य कुरुते गजपुंग वस्तु
धीरं विलोकयति चाटु शतैश्च भुंक्ते ॥ २ ॥

[कुत्रा खायला घालणाराकडे पाहून शेपटी हलवीत जमिनीवर पडून आपले पोट दाखवितो. परंतु हत्ती माहूताच्या तोंडून गोड गोड बोलवून सुद्धा गप्प व गंभीर असतो.]

परिवर्तिनि संसारे मृतः को वा न जायते?
स जातो येन जातेन याति वंशस्समुन्नतिम् ॥ ३ ॥

[जन्म व मृत्यूच्या चक्रात मरणारा कोण पुन्हां जन्मत नाही. ज्याच्यामुळे वंशाचा विकास आणि यशवृद्धि होते त्याचा जन्मच धन्य होय!]



# दुःखाचे मूळ कारण

एका गावी राजहंस नावाचा एक तरुण युवक रहात असे, त्याला आईबाप किंवा इतर कोणी नातेवाईक नव्हते. आपल्या बापाची सारी इस्टेट अंधाधुंद खर्च करून हातात करवंटी आली तेव्हां त्याचे डोळे उघडले व तो पश्चात्ताप करू लागला. शहाणपण नेहमीच उशिरा येते? म्हणून त्याने परगावी कोठेतरी राहून मेहनत मजुरी करून मानाने पुढील आयुष्य घालवावे असा विचार केला.

दूरवर पायी चालत गेल्यावर राजहंस अगदी दमून गेला. एका झाडाखाली विश्रांतीसाठी बसला असता एक श्रीमंत त्या रस्त्याने आला. त्याच्या अंगावर उंची वस्त्रे होती व डोक्याला एक पगडी होती. त्याने राजहंसाजवळ येऊन विचारपूस केली आणि म्हणाला–"तू माझ्याबरोबर घरी चल. माझ्याच घरी रहा, मी स्वतःच्या भावासारखा तुला वागवीन. तुला कोणत्याही गोष्टीची कमतरता भासू देणार नाही. माझ्या घरची मंडळी नेहमी कशासाठी तरी दुःख करीत असतात. तू त्याचे कारण कळून घेण्याचा प्रयत्न करू नकोस."

राजहंसने ती अट कबूल केली. त्याने त्या श्रीमंताचे आभार मानले आणि त्या श्रीमंताबरोबर निघाला.

त्या श्रीमंताचे घर एखाद्या राजवाड्यासारखे होते. घरची मंडळी राजहंसाला नोकरासारखी वागवीत नसत. परंतु सर्वांच्या चेहऱ्यावर नेहमी दुःखकळा दिसे. त्याचे कारण विचारण्याची इच्छा त्याला फार होई, परंतु त्याने आपल्या मनाला आवरले.

नेहमी रडत बसणाऱ्यात कोणीतरी मरे तेव्हां श्रीमंत मनुष्य त्याची अन्त्येष्टी वगैरे करी.

एक दिवशी तो श्रीमंत मनुष्य राजहंसला म्हणाला–"मी तीर्थयात्रेला जातो आहे. मी परत येईन की नाही माझे मलाच माहीत नाही. म्हणून तूच यापुढे या घराचा मालक होऊन रहा."

"आता तरी सांगाल का या घरच्या लोकांच्या दुःखाचे मूळ कारण?" राजहंसने विचारले.

"नाही, मी नाही सांगणार. ते कळल्याने तुझे हित होणार नाही. दुसरे एक सांगून ठेवतो, तू पूर्वेकडील हा दरवाजा कधी चुकूनसुद्धा उघडू नकोस. तू तो दरवाजा उघडून बाहेर गेलास तर तुला पश्चात्ताप करावा लागेल." मालकाने त्याला समजावून सांगितले.

अशातऱ्हेने राजहंसाला सावध करून तो श्रीमंत मनुष्य तीर्थयात्रेला निघाला. एक दिवशी राजहंसच्या मनात पूर्वेकडचा दरवाजा उघडण्याची अनावर इच्छा उत्पन्न झाली. तो दरवाजा उघडल्यावर एक खोली त्याला दिसली. त्यात एक भुयार होते. तो त्या भुयाराच्या वाटेने समुद्रकाठी येऊन पोचला.

तेथे एक फार मोठा पक्षी बसला होता. तो उडत राजहंसजवळ आला आणि त्याला आपल्या पंज्यात धरून समुद्रपार एका निर्जन बेटावर सोडून निघून गेला.



राजहंस समुद्रकाठी उभा राहून एखादे गलबत किंवा जहाज दिसते का, पाहू लागला. थोड्या वेळाने त्याच्या सुदैवाने तिकडे एक जहाज येत असलेले दिसले. ते गलबत वल्हवीत आणणाऱ्या सर्व स्त्रियाच होत्या. त्यांनी राजहंसाला त्या जहाजात बसवून घेतले आणि निघाल्या.

जहाजाची मालकीण राजहंसाला एका राजवाड्यात घेऊन गेली आणि म्हणाली– "मी या देशाची राणी आहे. मी तुझ्याशी स्वयंवर करून घ्यायचे ठरविले आहे. तू या देशाचा राजा होशील."

"ठीक, मी तयार आहे. मला त्यात आनंदच वाटेल." त्यानंतर राजहंसाने त्या राणीशी विवाह करून घेतला आणि सुखपूर्वक राहू लागला. एक दिवशी तो आपल्या बायकोबरोबर राजवाड्यात हिंडत असता एका बंद दरवाज्याजवळ येऊन विचारू लागला–"या खोलीत काय आहे ?"

"काय आहे, कोणाला माहीत नाही. थोरामोठ्यांनी कधी हे दार उघडू नका असे सांगितले आहे." राणी म्हणाली.

एकदा राजहंसाने संधी पाहून आपल्या बायकोला सांगितल्याशिवाय तो दरवाजा उघडला. त्यात एक भुयार होते. त्या भुयारातून गेल्यावर तो समुद्रकाठी येऊन पोचला. तेथे फिरत असता त्याला एक मोठा पक्षी उचलून घेऊन गेला आणि पहिल्या घरात त्याला टाकून गेला.

राजहंस आपल्या राणीची आठवण काढून रडू लागला. तेव्हां त्या घरचे लोक कां रडत होते हे त्याच्या लक्षात आले.

तीर्थयात्रा संपवून घराचा मालक परत येऊन पाहतो तर राजहंसाच्या वागण्यात त्याला फरक दिसून आला. तो म्हणाला– "तू देखील आतां त्यांच्यापैकीच एक आहेस. तुला स्वतःचे हित कशात आहे, हे कळत नाही. म्हणून त्याचे फळ भोग."





# पडकें देऊळ

[ ३० ]

[ उन्मत्त कात खाल्ल्यामुळे नांगसोम वेड्यासारखा ओरडू लागला. पुजाऱ्याने त्याला धरले व पडक्या देवळाच्या शोधार्थ निघाला. डोंगरावर शिखीमुख वगैरेंनी त्याला अडवून त्याला आव्हान केले. त्या वेळी जंगला घायाळ झाला तरी त्याच्याशी झटापट चालू असतां पुजारी दरीत पडला. नांगसोमने दरीत उडी टाकली. पुढे— ]

नांगसोमने 'पडके देऊळ', 'पडकें देऊळ' असे ओरडत दरीत उडी टाकली. ते पाहून शिखीमुख व विक्रमकेसरी थक्कच झाले. गोलभरा गावाहून नांगसोम मोठी हुशारी दाखवून त्यांना वृश्चिक द्वीपापर्यंत सुखरूप घेऊन आला होता. तेथे पोचल्यावर सुद्धा त्याने पुष्कळ मदत केली होती. अशा एका हुशार व साहसी बहाद्दर साथीदाराचा शेवट अशा अनपेक्षित रीतीने व्हावा याचे त्यांना फार फार दुख झाले. काय करावे, कोणाला काही सुचेना.

"शिखी! आपला एक फार चांगला साथी गेला, बघ. त्याने उन्मत्त कात खाऊन कोणत्या विश्वासाने ह्या भयंकर धोक्यात स्वतः होऊन उडी घेतली असावी ?" विक्रमने शिखीला विचारले.

शिखीमुख काही उत्तर देणार इतक्यात जांगला जोराने कण्हत म्हणाला–" शिखी



घनी! नांगसोम मेला नसावा. दरीत उडी मारली असली तरी तो कोणत्या तरी मोठ्या झाडाला अडकून राहला असावा. पडके देऊळ सापडल्याच्या वेडात त्याने दरीत उडी टाकली होती. कदाचित तो म्हणाला ते खरेदेखील असू शकेल, असे नाहीं का वाटत आपल्याला?"

जांगला म्हणाला ते ऐकून शिखीच्या मनातदेखील आशेचा अंकुर उपजल्यासारखा दिसला. तो जांगलाच्या अगदी जवळ गेला व हळुवारपणाने त्याच्या पाठीवर व खांद्यावर हात फिरवीत त्याने त्याला विचारले—"जांगला! तुझी स्वामिभक्तीच नव्हे, तर तुझी हिंमतपण पाहून मी थक्क झालो, बघ! तू पकडला नसतास तर तो पुजारी या खेपेसदेखील हातातून निसटून गेला असता." त्यानंतर जांगलाच्या जखमेतून वहात असलेले रक्त पाहून चारी बाजूला नजर फिरवीत म्हणाला—"अरे! आम्ही तरी कसे मूर्ख आहो! याची जखमदेखील आम्ही आतापर्यंत बांधली नाही. किती रक्त वाहाते आहे पहा."

वृश्चिक जातीचा नायक जवळच्या झाडीत शिरला. कसला तरी पाला आणून त्याने त्याचा रस जखमेवर लावला व पट्टी बांधली. तेव्हां विक्रमकेसरी जांगलाला म्हणाला—"जांगला! तू म्हणतोस तसा नांगसोमच नव्हे, तो पुजारीसुद्धां झाडाला अडकून जिवंत नसेल कशावरून? तुला काय वाटते शिखी?"

"बरोबर आहे तुमचे म्हणणे! तो जिवंत असला तर त्यात आश्चर्य करण्याचे कारण नाही." जांगला म्हणाला.

ते ऐकून वृश्चिक नायक रागाने म्हणाला—"जिवंत असेल तर त्या दोघा बेरडांना पौर्णिमेच्या दिवशी वृश्चिक मातेच्या चरणावर बली देईन. सोडीन वाटले होय तुम्हांला? दोघांपैकी एक लबाड आहे व



दुसऱ्याने उन्मत्त कात खाऊन वृश्चिक मातेचा अपमान केला आहे."

वृश्चिक नायक म्हणाला ते ऐकून विक्रमला राग आला. त्याने लगेच तलवार उपसली व म्हणाला—"तू या वृश्चिक द्वीपाचा जणुकाही राजा असल्यासारखा बोलतो आहेस की रे! आम्हांला देवीसमोर बळी देणे तुला इतके सोपे वाटले होय? जरा मीदेखील तुझी शक्ती किती आहे ते पाहतो. हिंमत असेल तर शस्त्र घेऊन ये माझ्यासमोर!"

विक्रमकेसरी म्हणाला ते ऐकून वृश्चिक जातीचे लोक आपल्या नायकाच्या रक्षणासाठी त्याच्या चारी बाजूला घोळका करून उभे राहले. पांच एक मिनिटांनी वृश्चिक नायक आपली दगडाची कुऱ्हाड घेऊन एकटा विक्रमकेसरीसमोर मस्त हत्तीसारखा डोलत येऊन उभा राहला.

शिखीने प्रसंग ओळखला. आतां वृश्चिक मातेसमोर बळी कोणी जातो किंवा नाही त्यापूर्वी रक्तपात मात्र मोठ्या प्रमाणावर होणार हे निश्चित होते. विक्रमसमोर वृश्चिक नायक टिकाव धरू शकणार नाही हे शिखीला माहीत होते. तलवारीचा एक वार वृश्चिक नायकाचे मुंडके उडवायला पुरे होता.



शिखीमुख दोघांच्या मध्ये येऊन उभा राहला. बरोबर जांगला पण होता. इम्यु-जातीच्या मोडक्या तोडक्या भाषेत म्हणाला—"वृश्चिकनायका! तू अशी घाई करू नकोस! विक्रमकेसरीच्या तलवारीसमोर तुझी दगडाची कुऱ्हाड कुचकामाची आहे. अरे! हे निरर्थक भांडण कशासाठी? वृश्चिक मातेचे देऊळ आहे कोठे हेसुद्धां तुम्हांला कळले नाही. नांगसोम जिवंत आहे की मेला हेदेखील आपल्याला अजून माहीत नाही. मग फुकटाचे भांडण कशाला करता?"

जांगलाने शिखी म्हणाला ते इम्यु जातीच्या भाषेत वृश्चिक नायकाला



समजावून सांगितले. वृश्चिक नायक मोठ्याने ओरडून म्हणाला–"हे बेट माझे आहे. येथे आलेले सर्व माझे गुलाम दास आहेत!"

ते ऐकून विक्रम वेड्यासारखा तलवार घेऊन त्याच्या अंगावर धावणार इतक्यात शिखीमुख त्याला अडवून म्हणाला–"कोणी स्वतः कोणाचा गुलाम होत नसतो. तू आमच्याहून जास्त शक्तिवान आहेस हे दाखवून दिलेस तर आम्हांला गुलाम करून घेशील याची आम्हांला खात्री पटेल. मी तुझ्या भल्या करता सांगतो आहे, ही तलवार तुझ्या दगडाच्या कुऱ्हाडी पेक्षा जास्त तीक्ष्ण आहे व बळकट पण आहे हे विसरू नकोस. या तलवारी-पेक्षा जास्त बळकट व तीक्ष्ण हत्यार तुला ज्या दिवशी मिळेल त्या दिवशी कदाचित आम्ही तुझे गुलाम होऊ. तोंपर्यंत तुझ्या उड्या व हा आरडाओरडा फुकट आहे."

शिखीमुख म्हणाला ते जांगलाने थोड्क्यात वृश्चिक नायकाला सांगितले. त्याने, विक्रमच्या हातातली तलवार घेऊन आपल्या मनगटावर तिचे पाते ठेवले. नंतर तलवार बाजूला सारून पाते ठेवले होते तेथे रक्ताचे थेंब होते ते दाखवून जांगला म्हणाला–"पाहिलीस तलवारीची धार? आता शिखीधनी म्हणतील तसे कर. नाहीतर आपला जीव फुकट घालवून बसशील."

वृश्चिक नायकाचे डोळे रागाने लाल झाले. तो जोराने एकदा ओरडला आणि हातातली कुऱ्हाड दूर फेंकून देऊन दंड ठोकून ताठ उभा राहून म्हणाला–"ठीक! तर ये, शस्त्र फेंकून देऊन मी द्वंद्वाला आव्हान करतो आहे. चल ये पुढे."

तलवार फेकून देऊन विक्रम कुस्तीला तयार झाला. शिखी त्याला अडवून म्हणाला–"या वृश्चिक जातीच्या नायकाशी युद्ध करण्याचा अधिकार दुसऱ्या अशाच एका जातीच्या नायकाच्या मुलाचा आहे. याच्या अनुयायांवर कडक नजर ठेवा." असे म्हणत शिखीमुखने वृश्चिक नायकावर झडप मारली.

दोघांचा परस्परांवर मुष्टिप्रहार सुरू झाला. वृश्चिक नायक शिखीमुखहून निश्चितच जास्त बलवान होता. परंतु शिखी वृश्चिक नायकाहून जास्त चपळ होता व त्याला डावपेचांची चांगली माहिती होती. शिखीने स्वतःचा बचाव करीत वृश्चिक नायकाच्या छातीत व डोक्यात ठोश्यांवर ठोसे दिले आणि तो घाबरला आहे हे ओळखून त्याला इतक्या जोराने ढकलले की वृश्चिक नायक दूर जाऊन पडला. नंतर धावत जाऊन त्याच्या उरावर बसला व एका हाताने गळा आवळून दुसऱ्या हाताने त्याची शेंडी धरली. दोनतीनदां त्याचे डोके जमिनीवर आदळले तेव्हां वृश्चिक नायकाचे डोळे बाहेर आले. वृश्चिक नायक धापा टाकीत "सोड रे, बाबा! मी हारलो!" असे म्हणू लागला. जांगलाने, वृश्चिक नायक म्हणाला ते शिखीला सांगितले व म्हणाला–"शिखीधनी!



तो माफी करा, म्हणतो आहे. तो आयुष्य-भर आपला गुलाम व्हायला तयार आहे. सोडा त्याला."

शिखीमुख त्याला सोडून उभा राहला. त्याच्या पाठोपाठ वृश्चिक नायक पण उभा राहला. तो शिखीच्या पायां पडून काही तरी पुटपुटला. नायकाला शिखीचे पाय धरून बसलेला पाहून त्याच्या अनुयायांनी शिखीला साष्टांग नमस्कार केला.

शिखीमुख वृश्चिक नायकाला दोन्ही हात धरून उभा करून म्हणाला–"माणसाने माणसाला कुत्र्या मांजरासारखे गुलाम करून ठेवलेले मला पसंत नाही. झाले गेले आपण



विसरून जाऊ या. आजपासून आपण सर्व मित्र!"

वृश्चिक नायकाच्या डोळ्यातून झरा झरा अश्रू वाहू लागले. त्याने शिखीमुख व विक्रम दोघांची माफी मागितली व त्यांचे आभार मानून आपल्या अनुयायांना म्हणाला–"आजपासून शिखी धनी आपल्या सर्वांचे नायक आहेत. त्यांच्या हुकमाप्रमाणे वागणे आपले कर्त्तव्य आहे."

त्यानंतर सर्वांनी झाडाखाली बसून खाऊन पिऊन घेतले. शिखी व विक्रम दोघांनी पुढे काय करायचे याविषयी परस्परांचा सल्ला घेतला. नांगसोम, जांगलाने सांगितल्याप्रमाणे कोठेतरी सुरक्षित अडकून राहला असावा, असेच दोघांना वाटत होते. ते ऐकून जांगलाने पुजारी पण मेला नसावा हे लक्षात ठेवायला सांगितले.

वृश्चिक नायकाने त्याला वाटत असलेला संशय प्रगट केला. म्हणाला–"उन्मत्त काताचा प्रभाव अद्भुत आहे. दरीत उडी मारण्यापूर्वी नांगसोम 'पडके देऊळ' असे ओरडत होता. ती गोष्ट वेडेपणामुळे नव्हे तर त्याला पडके देऊळ खात्रीने दिसले असणार!"

"पडक्या देवळाची गोष्ट देव जाणे! प्रथम आपण त्या दरीत जाऊन नांगसोमला वाचवू या. जांगला म्हणतो तसा पुजारी झाडाच्या फांद्यांत अडवून कोठे जिवंत असेल तर त्याला ठार करू या. काळोख पडायच्या आत हे काम पुरे झाले पाहिजे." शिखीमुख म्हणाला.

"आपला हुकूम मान्य आहे मालक! पण या दरीत विंचूच नव्हेत तर मोठमोठे साप, हत्ती, सिंह, चित्ते......"

वृश्चिक नायकाला मध्येच थांबवून शिखी म्हणाला–"हे बेटच भयंकर आहे हे कोणाला माहीत नाही. वृश्चिक मातेचे देऊळपण याच दरीत आहे, नाही का? त्या



देवळाचा शोध काढून त्या देवीची पूजा करण्याचे तुमचे कर्त्तव्य नाही का?"

"त्या मातेसाठी आम्ही आपला जीव देऊ. मी उन्मत्त कात खाल्ला असता तर पौर्णिमेच्या दिवशी देवीसमोर नरबली दिला असता. नरबली शिवाय देवी प्रसन्न होणार नाही." वृश्चिक नायक म्हणाला.

"अरे! नरबली देण्याची गोष्ट पुढे पाहून घेऊ. प्रथम दरीत तर उतरू या." शिखी म्हणाला.

सर्व डोंगर माथ्यावरून दरीत उतरू लागले. वृश्चिक नायक सर्वांच्या पुढे वाट दाखवायला चालू लागला. त्याने सांगितल्याप्रमाणे ती दरी खरोखरच भयंकर होती. त्या दरीत अधिकांश झाडे वडाची होती. ती दूरवर पसरलेली होती व त्यांच्या पारंब्या खाली जमिनीपर्यंत लोंबत होत्या. त्यांच्या खाली हत्ती फिरत होते. दुरून सिंहांची गर्जना ऐकू येत होती. झाडांच्या फांद्याना जागोजागी अजगर लोंबत असलेले आणि त्यांच्या बुंद्यांवर मोठमोठे विंचू चढत उतरत असलेले दिसत होते.

शिखीमुख व त्याचे साथी आपापली हत्यारे सज्ज करून हळूहळू उतरत होते.



ज्या जागी नांगसोमने उडी टाकली होती त्या बाजूला वृश्चिक नायक झपाझप पावले टाकीत जात होता. त्या बाजूला वृक्षवेली दाट होत्या.

वृश्चिक नायक वर मान करून फांद्यांकडे पहात थोडे अंतर चालून गेल्यावर एकदम एका जागी थांबला आणि पाठीमागून येणाऱ्या शिखीमुखला म्हणाला–"धनी! नांगसोमने उडी मारली होती त्या जागी आपण येऊन पोचलो आहो. वर झाडावर पहा, कोणीतरी तेथे दिसतो आहे. पण तेथवर जाण्यात धोका आहे. कारण त्या झाडाखाली हत्तींचा कळप आहे."

शिखी व विक्रमने त्या बाजूला पाहिले. त्यांना सुद्धां झाडावर एक मनुष्याकृती दिसली. वृश्चिक नायक शिखीला म्हणाला– "मालक! प्रथम तो नांगसोमच आहे का याची खात्री करून घेऊ या. नंतर हत्तींच्या कळपाला पळवून लावण्याचा विचार करू या. नाहीतर ते एखादे अस्वल सुद्धा असू शकेल."

शिखीमुख व विक्रम ती आकृति माणसाची वाटते, मग अस्वल कसे असेल, या विचारात असता, कुत्रा भुंकू लागला. म्हणून दोघांनी जास्त न्याहाळून पाहिले तेव्हां तो नांगसोमच असला पाहिजे, असे त्यांना वाटले.

"विक्रम! पहिल्याने तो हत्तींचा कळप तेथून गेला पाहिजे! नंतर आपल्या पैकी कोणीतरी झाडावर चढून नांगसोमला उचलून खाली घेऊन येऊ." शिखी म्हणाला.

त्याच वेळी दोन हत्ती त्यांच्या अंगावर धावून आले. तेव्हां वृश्चिक नायक म्हणाला– "तुम्ही सर्व त्या खडकाआड जाऊन लपून बसा. तेथून खडक ढकलून हत्तींना पळवून लावता येईल."

वृश्चिक नायकाच्या सूचनेप्रमाणे सर्व खडकाआड जाऊन उभे राहले. हत्ती जोरजोराने कान फडफडवीत सोंडा जोरजोराने हलवीत त्यांच्या अंगावर धावून आले, पण दोन खडकांमधून त्यांना आत शिरता येईना तेव्हां परत जाऊ लागले. त्याच वेळी शिखीच्या साथीदारांनी खडक हलवून हत्तीवर ढकलला. सर्व हत्ती ओरडत दूर पळून गेले.

हत्ती निघून गेल्यावर सर्वजण त्या झाडाखाली आले. वृश्चिक नायकाच्या आज्ञेने त्याचा एक अनुयायी झाडावर चढण्यासाठी पुढे सरसावला. तेव्हां जांगला हातातली काठी फेकून देऊन माकडासारखा झपझप झाडावर चढू लागला. (चालू)



# तीन राण्या

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही. तो पुन्हा झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौनपणे स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला– "राजा! तू कोणावर इतका विश्वास करून हे करीत आहेस हे मला माहीत नाही. परंतु त्यांच्या विश्वासपात्रतेबद्दल सुद्धा तू खात्री करून घ्यावीस असे मला वाटते. नाही तर तू देखील मयंकदेशाचा राजा सुजितवर्मा याच्यासारखा संकटात सापडशील. तुला कंटाळा येऊ नये म्हणून त्याच्या राण्यांची गोष्ट सांगतो. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

मयंक देशाच्या राजकुमाराचे नाव सुजितवर्मा असे होते. मयंक देशाच्या राजकुमाराचे विवाह पिढ्यान् पिढ्या



प्रथगा नावाच्या देशाच्या राजकन्यांशी होत आले होते व त्याच त्या देशाच्या पट्टराण्या होत आल्या होत्या. म्हणून प्रथगाची राजकन्या सौदामिनी ही वयात आल्यावर तिचा विवाह सुजितवर्माबरोबर झाला. त्या वेळी त्याचे वय अवघे चवदा वर्षांचे होते. सौदामिनी वयाने त्याच्याहून थोडी मोठी होती.

सुजितवर्मा पंचवीसाव्या वर्षी गादीवर बसला तेव्हां सौदामिनीसुद्धां त्याच्याबरोबर गादीवर बसली व पट्टराणी झाली. सुजितवर्मा गादीवर बसल्यानंतर काही दिवसांनी विदर्भाची राजकुमारी सौम्यलतेचे स्वयंवर झाले. त्या स्वयंवराच्या वेळी अनेक राजकुमारांबरोबर सुजितवर्म्याने पण भाग घेतला.

स्वयंवराच्या मांडवात पाऊल टाकताच सौम्यलतेला पाहून सुजितवर्मा तिच्या रूपावर भाळला. परंतु सौम्यलता वरमाळा घेऊन एकेक राजकुमारांना पहात सुजितवर्म्याजवळ आली व त्यालासुद्धा वरमाळा घातल्याशिवाय पुढे गेली. त्याचे कारण तिचे दुसऱ्याच एका राजकुमारावर प्रेम होते आणि त्याच्या गळ्यात वरमाळा घालायचा विचार तिने केला होता.

परंतु सुजितवर्म्याला सौम्यलतेने त्याला वरमाळा घातली नाही याबद्दल अपमान वाटला. त्याने तिचा हात घट्ट धरला आणि म्हणाला—"मी या राजकन्येला धरून घेऊन जात आहे. कोणाला माझ्याशी त्याबद्दल द्वंद्व करावयाचे असेल तर त्याने यावे." त्याने आव्हानच केले.

सुजितवर्म्याशी युद्धाला कोणी तयार झाला नाही. परंतु तिचा प्रेमी तरुण तलवार उपसून म्हणाला—"राजकुमारीच्या मानरक्षणासाठी मी तयार आहे. माझ्या मदतीला कोणी यायला तयार असेल तर त्याने यावे."



परंतु त्या तरुणाच्या मदतीला कोणी धावला नाही. तो एकटा सुजितवर्म्याशी द्वंद्वयुद्ध करीत असता मरण पावला. त्यानंतर सुजितवर्मा सौम्यलतेला घेऊन आपल्या राजधानीत परतला आणि तिच्याशी विवाह करून तिलादेखील आपली राणी करून घेतले.

ही गोष्ट घडल्यानंतर काही वर्षांनी सुजितवर्मा शिकारीसाठी जंगलात गेला होता. त्याला एका सरोवरात स्नान करीत असता एक रानटी जातीची तरुण स्त्री दिसली. तिच्या रूपावर मुग्ध होऊन त्याने तिचा हात धरला. आपल्या जातीच्या एका मुलीचा मानभंग झालेला त्या रानटी जातीच्या लोकांना खपला नाही. शेकडो तरुण लोक धावले आणि त्यांनी राजाला घेरले. राजाचे सैनिक कमी होते म्हणून काही करू शकले नाहीत.

सुजितवर्म्याने त्या जंगली जातीच्या कन्येशी विवाह करून घेऊन तिला पण आपली राणी करून घेतले. जंगली तरुणांनी मोठ्या औदार्याने राजाची मित्रता मान्य केली.

सुजितवर्मा आपल्या तीनही राण्याबरोबर सुखाने राहू लागला. एक दिवशी त्याच्याकडे एक सिद्धयोगी आला.



जेवणाच्या वेळी तिन्ही राण्या वाढायला आल्या. परंतु त्या योग्याने राण्यांच्या हातचे जेवण नाकारले आणि नोकरांनी वाढले तेव्हांच जेवला. जेवण झाल्यावर एकांतात राजाने विचारले—"योगीराज! मीच राण्यांना जेवण वाढावयास सांगितले होते. परंतु आपण ते कां नाकारले?"

योगी म्हणाला—"राजा! तुझ्या राण्यांचा स्वभाव कदाचित तुझ्यापेक्षा मलाच जास्त माहीत आहे असे दिसते. एका राणीवर तर विश्वास करणेच चूक!"

ते ऐकून राजा चकितच झाला. तिघी राजाशी प्रेमाने वागत. तिघी राण्या



परस्परांशी सवतीमत्सरदेखील करीत नसत. म्हणून राजा म्हणाला–"योगिराज! मला हे विचित्रच वाटते. माझ्या तिन्ही राण्यात अविश्वसनीय राणी कोणती?"

"राजा! याचे उत्तर देणे मला रास्त वाटत नाही. परंतु एवढे मात्र सांगू शकतो की तिघींपैकी एक त्यागण्यायोग्य आहे. तूच ती राणी कोण हे ओळखून तिचा त्याग कर." योगी म्हणाला.

"मला एकीवरदेखील शंका करायला जागा दिसत नाही. आपणच विश्वास करण्यायोग्य कोण आहे हे सांगण्याची कृपा करावी." राजा म्हणाला.

"राजा! हे सिद्ध करणे तेवढे कठीण नाही. मी सांगतो ते कर." योग्याने राजाला एक उपाय सांगितला.

थोड्याच वेळात राजवाड्यात बातमी पसरली की राजा एकाएकी पोटशूलाने आजारी पडला आहे. लवकर औषध पाणी केले नाही तर महाराज वांचणे कठीण.

सर्वांनी योगिराजांकडे जाऊन विचारले–"योगिराज! या आजारला काही इलाज नाही का?"

"राजाच्या राण्यांनी आपले चरण धुवून ते पाणी राजाकडे प्यायला पाठवावे. ते प्याल्याने राजाची तब्येत सुधारेल." योगिराजांनी इलाज सांगितला.

लगेच एक दासी तीन सुवर्ण कलश घेऊन तिघां राणींच्या महालात गेली. ती परत आली तेव्हां दोनच कलश तिच्या हातात होते. म्हणाली–"महाराज! थोरल्या राणी सरकारांनी पाय धुवून पाणी द्यायला नकार दिला आहे."

राजाने दासीला पाठवून देऊन योगिराजाला विचारले–"योगिराज! तरमग आमच्या पट्टराणीच का अविश्वसनीय म्हणावयाच्या? तिने आपल्या पायाचे पाणी



देण्यास नकार कां बरे दिला? मी या आजारात मेलो तर तिला त्याची फिकीर नाही असेच म्हणावयाचे का?"

"राजा! अशी घाई करू नकोस. दोन कुत्री घेऊन यायला सांग." योगी म्हणाला. दोन्ही तांब्यातले पाणी दोन ताटात ओतून कुत्र्यांना प्यायला दिले. त्यांच्या पैकी एक कुत्रे पाणी पिऊन थोड्याच वेळात तडफडून मेले."

"राजा! कळले का ह्या तांब्यातले पाणी पाठविणारी राणी परित्यागयोग्य आहे. तिच्यामुळे तुझ्या जिवाला सतत धोका आहे." योगीराज म्हणाले.

राजाने पुष्कळ विचार करून ते पाणी पाठवणारी दुसरी राणी होती हे ओळखले. म्हणून त्याने आपल्या दुसऱ्या राणीला सोडून दिले आणि आपल्या दोघां राणीं-बरोबर आनंदाने पुढील आयुष्य घालविले.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला–"राजा! माझ्या मनात एक दोन शंका आहेत. राजाला मोठ्या राणीवर संशय आला तेव्हां त्या योग्याने ती शंका चुकीची असल्याचे कां सांगितले? तिने आपले पाय धुवून ते पाणी राजाकडे कां नाही पाठविले? दुसऱ्या राणीने पाय धुतलेल्या पाण्यात विष मिळविले आहे हे राजाला कसे कळले?



उत्तर माहीत असून या शंकाचे समाधान तू सांगितले नाहीस तर परिणाम तुला माहीतच आहे. तुझ्या डोक्याची शंभर छकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील."

तेव्हां विक्रमार्क म्हणाला—"मोठ्या राणीने पाय धुतलेले पाणी पाठविलेच नाही ती निर्दोष होती हेच ठरते. याशिवाय राजा आपल्या आजारानेच मेला असता तरी तिने पाठविलेल्या पाण्यामुळेच तो मेला असा आरोप तिच्यावर विनाकारण लागला असता. आपल्या पायाचे पाणी प्याल्याने राजाचा आजार बरा होईल असे फक्त सर्वात धाकट्या राणीलाच वाटले. कारण ती रानटी जातीची होती. अशा गोष्टीवर तिचा विश्वास बसणे शक्य होते. मधल्या राणीचा असल्या अंधविश्वासांवर विश्वास नव्हता. परंतु राजाला ठार करायला एक साधन सहजी मिळाले असे तिला वाटले. तिने विष घालून दिलेले पाणी पिऊन राजा मेला असता तर राजा आजारानेच मेला असे लोकांना वाटले असते व ती निर्दोषच ठरली असती. विष कालविले असल्याची गोष्ट कोणा वैद्याने ओळखून सांगितली असती तर ते अमुक राणीने पाठविलेले पाणी होते हे तो सांगू शकला नसता. दोघा राण्यां पैकी मधलीनेच ते पाणी पाठविले हे राजाला सहजी कळले. कारण तिसरी एका रानटी कुळात जन्मलेली होती व राजाबरोबर विवाह झाल्यामुळे तिला समाजात मानाचे फार मोठे स्थान मिळाले होते तेव्हां ती असले घृणित काम करणे शक्यच नव्हते. मधल्या राणीला तिच्या प्रियकराशी तिचा विवाह न होऊ शकल्याबद्दल राजावर राग होता. तेव्हां सुडाच्या भावनेने तिने हे काम केले असल्यास नवल नाही."

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेताबरोबर अदृश्य झाला व झाडाला जाऊन लोंबकळू लागला. (कल्पित)





# कुरूप राजकुमारी

एका गावी एक शेतकरी रहात असे. त्याला तीन मुलगे होते. ते वयात आले तेव्हां शेतकऱ्याने त्यांना जवळ बोलावून सांगितले, मुलांनो! तुम्ही तिघे निरनिराळे देशाटनाला जा. पैसे मिळवा, आणि स्वतःच्या ऐपती-प्रमाणे व आवडीप्रमाणे लग्न करून घ्या.

बापाचा उपदेश ऐकून मोठा मुलगा सर्वात प्रथम देशाटनाला निघाला. बापाने वाटखर्चा-साठी त्याला थोडे पैसे दिले. मोठा मुलगा देशाटन करीत फिरू लागला. वाटेत त्याला एक मनुष्य भेटला. त्याने त्याला खेळायला बोलाविले. तो एक जुगारी होता. मोठ्या मुलाला वाटले की जुगार खेळण्यात सहजी पुष्कळ पैसे मिळतील. खूप पैसे मिळाल्यावर एखाद्या सुंदर मुलीशी लग्नपण होईल.

परंतु जुगारीत तो बापाकडून प्रवासा-साठी म्हणून आणलेले पैसे घालवून बसला. अगदी रिकाम्या हाताने त्याला पुढला प्रवास करावा लागला. दुपारी तो एका तलावाच्या काठी आईने दिलेली मीठभाकर खायला बसला. त्याने खायला म्हणून आपले गाठोडे उघडले आणि इतक्यात एक बाई समोर आली व म्हणाली—"मला सुद्धां थोडे खायला देता का?"

ती बाई दिसायला कुरूप होती. तरी मोठा मुलगा म्हणाला—"ये बस! देतो, माझ्याजवळ असेल ते."

दोघे खायला बसले तेव्हां त्या बाईने विचारले—"कोण तुम्ही, कोठे निघालात आणि कोणत्या कामासाठी?"

"मी एका श्रीमंताच्या मुलीशी लग्न करण्याच्या हेतूने जात आहे, तसे दुसरे काम मला नाही." मोठा मुलगा म्हणाला.

"तू माझ्याशी लग्नाला तयार आहेस का? मी एक राजकन्या आहे." ती स्त्री म्हणाली.

मोठा मुलगा तिच्याकडे पाहून तोंड फिरवून बसला व म्हणाला–"तुझ्याशी? कोणत्या देशाची राजकन्या आहेस तू? मी सुस्वरूप श्रीमंत मुलीशी लग्न करणार आहे. आहे का तुझ्या पाहण्यात अशी एखादी मुलगी?"

त्या कुरूप स्त्रीने बोटाने एक दिशा दाखविली व म्हणाली–"तू सरळ या दिशेने जा. सूर्यास्ताच्या सुमारास तुला एक जुनाट किल्ला दिसेल. त्याचे दरवाजे बंद असतील. बाहेर एक घंटा लोंबत असलेली दिसेल. तू ती घंटा वाजविलीस तर दरवाजा उघडेल. त्या किल्ल्यात अप्सरेसारख्या सुंदर दोन राजकन्या आहेत. त्यांच्यापैकी एकीशी लग्न करून घे.

मोठा मुलगा लगेच निघाला. संध्याकाळच्या सुमारास तो त्या ओसाड जुनाट किल्ल्याजवळ येऊन पोचला. त्याने घंटा वाजवल्याबरोबर दरवाजा उघडला.

मोठा मुलगा आत गेला. त्याला आत कोणी मनुष्य दिसला नाही. कित्येक दगडाच्या मूर्ती मात्र दिसल्या. त्या मूर्ती पुरुषांच्या व बायकांच्या होत्या. त्याने विचार केला की या मूर्ती घडवणारा कोणी मोठा कारागीर असणार. तो ध्यान देऊन मूर्ती पहात होता तेव्हां त्याला पाठीमागून कोणीतरी हाक मारली आणि विचारले–"कोण रे तू? काय पाहिजे तुला?"

मोठ्या मुलाने दचकून मागे पाहिले. समोर एक कुरूप म्हातारी होती. तिच्या हातात एक काठी होती.

"मी लग्न करण्यासाठी सुंदर मुलींच्या शोधार्थ आलो आहे. येथे सुंदर मुली आहेत असे ऐकून आलो आहे." मोठा मुलगा म्हणाला.

"मी तुझ्या लग्नाची व्यवस्था करून देईन, पण मी विचारते त्या प्रश्नांची प्रथम उत्तरे दे." ती म्हातारी म्हणाली.



समुद्राहून खोल वस्तू कोणती? कांट्याहून तीक्ष्ण बोचणारी वस्तू कोणती? भुकेहून जास्त मूल्यवान वस्तू कोणती?" म्हातारीने विचारले.

मोठा मुलगा त्या प्रश्नांची उत्तरे देऊ शकला नाही. म्हातारीने आपल्या काठीचे टोक त्याच्या अंगाला लावले मात्र, तो लगेच दगडाची मूर्त होऊन जागच्या जागी उभा राहिला.

मोठा मुलगा परत न आलेला पाहून त्याचा धाकटा भाऊ प्रवासाला निघाला. त्याची सुद्धा त्या जुगाऱ्याशी भेट झाली. त्याने दुसऱ्या मुलाला खेळायला बोलाविले. "मला जुगार खेळताच येत नाही, पाहिजे तर माझ्याजवळचे अर्धे पैसे मी देऊन टाकतो." दुसरा म्हणाला.

जुगाऱ्याने दुसऱ्या मुलाकडून अर्धे पैसे घेतले व म्हणाला–"तू जिंकलास. भुकेहून जास्त किमतीची वस्तू आशीर्वाद आहे. ही गोष्ट विसरू नकोस." असे सांगून तो निघून गेला.

दुपारच्या सुमारास दुसरा मुलगा त्या तलावाच्या काठी खायला बसला. ती कुरूप स्त्री नेमकी त्या वेळी आली आणि



"काही खायला देतोस का?" तिने त्याला विचारले.

"पाहिजे तर खा!" दुसरा मुलगा म्हणाला.

त्या बाईने दुसऱ्या मुलाला तेच प्रश्न विचारले जे तिने पहिल्याला विचारले होते.

"मी पैसे मिळवायला व एका सुंदर स्त्रीशी विवाह करायला जात आहे." दुसरा म्हणाला.

"मी एक राजकुमारी आहे. माझ्याशी लग्न करतोस का?" त्या कुरूप स्त्रीने विचारले.



"तू राजकुमारी असलीस म्हणून काय झाले? तुझ्यासारख्या कुरूप स्त्रीशी कोण लग्न करील?" तो म्हणाला.

"तर मग मी तुला अप्सरांसारखे सौंदर्य असलेल्या मुली एका जागी राहतात ती जागा सांगते." ती स्त्री म्हणाली आणि तिने त्या जुन्या ओसाड किल्ल्याची गोष्ट त्याला सांगितली.

दुसरा मुलगा त्या किल्ल्याजवळ गेला. घंटा वाजवल्याबरोबर दार उघडले गेले. त्याने आत पाऊल टाकल्याबरोबर त्याला दगडाच्या सुंदर मूर्ती आणि त्यात त्याच्या भावाची मूर्त दिसली. तो थक्क होऊन तिकडे पहात राहला.

त्याच वेळी जादुगारिणीने येऊन अनेक प्रश्न विचारले. त्याला भुकेहून जास्त मूल्यवान वस्तू कोणती या प्रश्नाचे उत्तर माहीत असल्यासारखे वाटले. परंतु एकामागून एक विचित्र घडत गेलेल्या गोष्टी पाहून उत्तर आठवले नाही. जादुगारीण आपली काठी घेऊन जवळ आली. तेव्हां तो तेथून पळाला. परंतु त्याच्या दुर्दैवाने जादूगारणीच्या काठीचे टोक त्याला लागलेच आणि तो दगडाची एक मूर्त होऊन गेला.

दुसरा भाऊ पण परत न आलेला पाहून तिसरा भाऊ प्रवासाला निघाला.

त्याची भेट पण त्या जुगाऱ्याशी झाली व त्याने त्यालादेखील खेळायला बोलाविले.

"हे पहा मी पुष्कळ पैसे मिळविण्यासाठी घराबाहेर पडलो आहे. माझ्याजवळ जे चार पैसे आहेत त्यांच्यावर तुझा डोळा आहे. तेव्हां तू हे सर्व पैसे घे आणि सुखी हो." असे सांगून तिसऱ्याने आपल्या पैशांची पिशवी त्या जुगाऱ्याला दिली.

जुगारी त्याला म्हणाला–"मित्रा! तूच जिंकलास, मी हारलो. पण लक्षात ठेव, भुकेहून जास्त मूल्यवान वस्तू आशीर्वाद आहे." असे सांगून जुगारी निघून गेला.

तिसरा मुलगा दुपारपर्यंत तलावाजवळ येऊन पोचला आणि खाण्यासाठी त्याने गाठोडे सोडले. कोठून तरी ती कुरूप स्त्री जवळ आली व तिने विचारले–"मला फार भूख लागली आहे, काही खायला देतोस का?"

"खा! कारण भूक काट्याहून जास्त बोचते माणसाला." तिसरा म्हणाला.

त्यानंतर त्या स्त्रीने तिसऱ्या मुलालापण, दोघांना पूर्वी विचारलेले प्रश्न विचारले.

"माझ्या वडिलांनी आम्हां तिघां भावंडांना स्वतःच्या पायावर उभे राहून पैसे मिळवायला व स्वेच्छेने लग्न करून घरी यायला पाठविले आहे. माझे भाऊ आतांपर्यंत आपल्या त्या प्रयत्नात यशस्वी झाले असतील." तिसरा म्हणाला.

"माझ्याशी कां नाही लग्न करून घेत? मी एक राजकन्या आहे." ती कुरूप स्त्री म्हणाली.

"एक राजकुमारी स्वतःच माझ्यासारख्याशी लग्न करण्याची इच्छा करीत असेल तर मी तरी नकार कसा काय देऊ? तू मला आपल्या घरी घेऊन चल. मी तुझ्या घरच्या वडील धाऱ्यांना ती गोष्ट विचारतो." तिसरा म्हणाला.





# चांदीचे अंडे

एका लहानशा राज्याचा एक राजा होता. त्याला एक सुंदर मुलगी होती. तिचे नाव प्रमदा असे होते. ती नेहमी काहीतरी विचित्र विचित्र गोष्टीचा विचार करी तिला नेहमी विचित्र स्वप्ने पडत. प्रमदा वयात आली तेव्हां राजा व राणी तिचा विवाह करून देण्याच्या काळजीत पडले.

"ही मुलगी तरी विचित्रच आहे. नेहमी काल्पनिक जगात हिंडत असते. अगदी भोळी भाबडी आहे. हिला कसा नवरा मिळतो, न जाणे." प्रमदेचे आईवडील याच काळजीत असत. याच सुमारास प्रमदाला एक विचित्र स्वप्न पडले. तसे विचित्र स्वप्न तिने त्यापूर्वी कधी पाहिले नव्हते.

स्वप्न पहात असता प्रमदा एका विचित्र लोकात होती. तेथील वृक्षलता सोन्याच्या होत्या. त्यांना लागणारी फळे माणिक्याची व नील मण्याची होती. तेथे नेहमी मोर नाचत. त्यांच्या पिसात चित्र विचित्र रंगाचा बहुमूल्य रत्ने होती. चंदनाच्या फळ्यांच्या रस्त्यावर फिरत असता प्रमदाला किती आनंद होत होता.

त्याच वेळी आणखी एक गोष्ट घडली. कोठून तरी एक सोन्याचे बदक उडत आले आणि प्रमदाच्या जवळपासच उतरले. एक तरुण त्या बदकाजवळ आला. लगेच ते बदक उडून गेले. बदक उतरले होते तेथे एक अंडे पडले होते. तो तरुण मुलगा अंडे उचलून घेऊन आला. प्रमदाच्या हातात ते अंडे देऊन तो तरुण मुलगा निघून गेला. प्रमदाने ते अंडे पाहिले, ते चांदीचे अंडे होते.

दुसऱ्या दिवशी प्रमदाने स्वप्नात पाहिले ते सर्व वर्णन करून सांगितले आणि म्हणाली—"ते अंडे सामान्य अंडे नव्हते. ते स्वप्नदेखील कल्पित स्वप्न नव्हते. मला स्वप्नात जो प्रदेश दिसला तो अवश्य कोठे तरी आहे. स्वप्नात भेटून ज्याने मला ते अंडे दिले तोच माझा पती होणार." असे सांगून तिने प्रतिज्ञा केली की चांदीचे अंडे देणारा तरुण सोडून ती इतर कोणाशी लग्न करणार नाही.

प्रमदेचे आईवडील तिला तिच्या प्रेमामुळे तिला रागावले नाहीत. ते तिला म्हणाले—"बाळ! स्वप्नात तुला दिसला तो मुलगा कसा काय होता हे तरी सांगशील. आम्ही त्याच्याशीच तुझे लग्न करून देऊ."

"मला ठीक ठीक आठवत नाही. पण मला चांदीचे अंडे आणून दिले तर मी त्याला ओळखीन." प्रमदा म्हणाली.

तिच्याशी लग्न करण्याची इच्छा असणाऱ्या राजकुमारांना प्रमदेच्या प्रतिज्ञेची गोष्ट कळली तेव्हां त्यांनी तिच्याशी लग्न करण्याचा विचारच आपल्या मनातून काढून टाकला. काहीजण चांदीचे अंडे देणाऱ्या बदकांचा शोध करू लागले.

प्रमदाशी विवाह करण्याची इच्छा असणारा विजय नावाचा एक तरुण राजकुमार होता. त्याला प्रमदाच्या स्वप्नाची गोष्ट कळली तेव्हां त्याने आपल्या दरबारी जादुगाराला बोलावून विचारले—"काय हो! मला बदकाचे चांदीचे अंडे पाहिजे. ते कसे काय मिळेल ते सांगा!"



ए. सी. सरकार, जादुगार



# चांदीचे अंडे

एका लहानशा राज्याचा एक राजा होता. त्याला एक सुंदर मुलगी होती. तिचे नाव प्रमदा असे होते. ती नेहमी काहीतरी विचित्र विचित्र गोष्टीचा विचार करी तिला नेहमी विचित्र स्वप्ने पडत. प्रमदा वयात आली तेव्हां राजा व राणी तिचा विवाह् करून देण्याच्या काळजीत पडले.

"ही मुलगी तरी विचित्रच आहे. नेहमी काल्पनिक जगात हिंडत असते. अगदी भोळी भाबडी आहे. हिला कसा नवरा मिळतो, न जाणे." प्रमदेचे आईवडील याच काळजीत असत. याच सुमारास प्रमदाला एक विचित्र स्वप्न पडले. तसे विचित्र स्वप्न तिने त्यापूर्वी कधी पाहिले नव्हते.

स्वप्न पहात असता प्रमदा एका विचित्र लोकात होती. तेथील वृक्षलता सोन्याच्या होत्या. त्यांना लागणारी फळे माणिक्याची व नील मण्याची होती. तेथे नेहमी मोर नाचत. त्यांच्या पिसात चित्र विचित्र रंगाचा बहुमूल्य रत्ने होती. चंदनाच्या फळ्यांच्या रस्त्यावर फिरत असता प्रमदाला किती आनंद होत होता.

त्याच वेळी आणखी एक गोष्ट घडली. कोठून तरी एक सोन्याचे बदक उडत आले आणि प्रमदाच्या जवळपासच उतरले. एक तरुण त्या बदकाजवळ आला. लगेच ते बदक उडून गेले. बदक उतरले होते तेथे एक अंडे पडले होते. तो तरुण मुलगा अंडे उचलून घेऊन आला. प्रमदाच्या हातात ते अंडे देऊन तो तरुण मुलगा निघून गेला. प्रमदाने ते अंडे पाहिले, ते चांदीचे अंडे होते.

दुसऱ्या दिवशी प्रमदाने स्वप्नात पाहिले ते सर्व वर्णन करून सांगितले आणि म्हणाली—"ते अंडे सामान्य अंडे नव्हते. ते स्वप्नदेखील कल्पित स्वप्न नव्हते. मला स्वप्नात जो प्रदेश दिसला तो अवश्य कोठे तरी आहे. स्वप्नात भेटून ज्याने मला ते अंडे दिले तोच माझा पती होणार." असे सांगून तिने प्रतिज्ञा केली की चांदीचे अंडे देणारा तरुण सोडून ती इतर कोणाशी लग्न करणार नाही.

प्रमदेचे आईवडील तिला तिच्या प्रेमामुळे तिला रागावले नाहीत. ते तिला म्हणाले—"बाळ! स्वप्नात तुला दिसला तो मुलगा कसा काय होता हे तरी सांगशील. आम्ही त्याच्याशीच तुझे लग्न करून देऊ."

"मला ठीक ठीक आठवत नाही. पण मला चांदीचे अंडे आणून दिले तर मी त्याला ओळखीन." प्रमदा म्हणाली.

तिच्याशी लग्न करण्याची इच्छा असणाऱ्या राजकुमारांना प्रमदेच्या प्रतिज्ञेची गोष्ट कळली तेव्हां त्यांनी तिच्याशी लग्न करण्याचा विचारच आपल्या मनातून काढून टाकला. काहीजण चांदीचे अंडे देणाऱ्या बदकांचा शोध करु लागले.

प्रमदाशी विवाह् करण्याची इच्छा असणारा विजय नावाचा एक तरुण राजकुमार होता. त्याला प्रमदाच्या स्वप्नाची गोष्ट कळली तेव्हां त्याने आपल्या दरबारी जादुगाराला बोलावून विचारले—"काय हो! मला बदकाचे चांदीचे अंडे पाहिजे. ते कसे काय मिळेल ते सांगा!"



ए. सी. सरकार, जादुगार

त्या जादुगाराने जादूवर लिहिलेले अनेक ग्रंथ उलटून पाहिले आणि एक उपाय शोधून काढला. तो एक सामान्य बदकाचे अंडे घेऊन विजयच्या बरोबर आपल्या प्रयोगशाळेत आला. अंडे स्वच्छ पुसून काढले. ते वाळवून तेलाच्या दिव्याच्या वातीवरची काजळी त्याच्यावर चढवली. त्याने ते अंडे चिमटयात ज्योतीवर धरून ते उलट सुलट छान फिरविले तेव्हां अंडे छान काळे झाले. त्यानंतर एका काचेच्या भांडयात पाणी घालून चिमटयातच धरून ते अंडे पाण्यात बुडविले काही वेळाने ते अंडे चांदीच्या अंडयासारखे चमकू लागले.

"राजकुमार! हे अंडे नेऊन राजकुमारीला द्या. तिला एवढे मात्र सांगून ठेवा की ह्या अंडयाला हात लावला किंवा हे पाण्यातून बाहेर काढले तर याचे महत्व नाहीसे होते. नंतर त्या राजकन्येशी विवाह करून सपत्नीक घरी परत या." असे सांगून त्याने विजयला पाठवून दिले.

बदकाचे चांदीचे अंडे पाहून प्रमदा देहभान विसरून गेली. ती पाण्यातून अंडे बाहेर काढू लागली. तेव्हां विजय तिला अडवून म्हणाला–"हे अंडे या जगातले नाही. आपण याला हात लावला किंवा पाण्यातून बाहेर काढले तर त्याचा प्रभाव नाहीसा होईल."

राजकुमारी त्या राजकुमाराला म्हणाली–"बरोबर! मी तुम्हांलाच स्वप्नात पाहिले होते."

प्रमदेच्या आईवडिलांना परमानंद झाला. त्यांनी विजय बरोबर प्रमदाचा विवाह करून दिला. विवाह झाल्यानंतर विजयने आपल्या बायकोला ती युक्ती सांगितली. प्रमदाने त्याला त्याच्या हुशारीबद्दल क्षमा केली.

विजयने जी युक्ती केली होती .ती आपल्याला सुद्धा करतां येईल.





# धूर्त म्हातारी

हारूनूल रशीद जेव्हां बगदादचे खलीफा होते तेव्हां एका गावाहून दुसऱ्या गावाला टपालाची नेआण कबूतर करीत. टपाल खात्याची व्यवस्था करण्यासाठी खलीफांनी एका योग्य व्यक्तीला व्यवस्थापक नेमले होते. त्याला एक हजार दीनार पगार देण्यात येत असे.

काही वर्षे काम केल्यावर तो अधिकारी मरण पावला. तेव्हांपासून कबूतरांकरवी होणारी टपालाची व्यवस्था पण बंद पडली. टपालाची व्यवस्था करण्यासाठी जी कबूतरे, शिकारी कुत्री आणि नीग्रो गुलाम नेमलेले होते ते सर्व खलीफांकडे परत आले.

कबूतरांचे टपाल पाहणाऱ्या अधिकाऱ्याच्या बायकोचे नाव दिलैला होते व मुलीचे जीनाब असे होते. पती वारल्यावर दिलैलाने खलीफांच्या दरबारात विनंती केली की कबूतरांकरवी टपालाची व्यवस्था करण्याचे काम तिला द्यावे. आणि तिच्या पतीला जो पगार देण्यात येत होता तो तिला देण्यात यावा. परंतु खलीफांनी तिचा अर्ज नामंजूर केला. कारण दिलैला ते काम करू शकेल की नाही, या गोष्टीवर खलीफांना शंका होती.

ही गोष्ट घडल्यानंतर खलीफांनी दोन कुप्रसिद्ध दरोडेखोरांना कोतवालाच्या पदावर नेमले. एकाचे नाव अहमद व दुसऱ्याचे हसन होते. खलीफांनी त्या दोगां दरोडेखोरांना पकडण्याचा पुष्कळ प्रयत्न केला होता, परंतु त्यांना कोणी पकडू शकले नाहीत. तेव्हां खलीफांनी त्यांनाच कोतवालाच्या पदावर नेमले म्हणजे निदान त्यांच्याकरवी तरी इतर दरोडेखोरांचा बंदोबस्त चांगला करता येईल.

खलीफांनी दिलैलाची विनंती नामंजूर करून दोघां दरोडेखोरांना मोठ्या पदांवर











नेमले म्हणून तिला राग आला. ती आपली मुलगी जीनाब हिला म्हणाली—"या देशात चोर आणि लुटेऱ्यांना मोठमोठ्या पदांवर नेमत आहेत आणि आम्हीच नालायक ठरलो का? हा अहमद आणि हसन माझ्या-समोर किती टिकतात हे पाहते."

दिलैला वयाने चाळीशी उलटलेली हुशार व चलाख बाई होती. जीनाबसुद्धा आईहून कोणत्याही बाबतीत कमी नव्हती.

दिलैलाने एक दिवशी आपल्या गळ्यात जपमाळा घातल्या व तोंडावर बुरखा घालून आणि हातात सुफी लोकांचा झेंडा घेऊन सुफी फकीरांच्या वेषात घराबाहेर पडली.

मुस्तफा नावाचा एक मनुष्य बगदादचा एक मोठा अधिकारी होता. तो खलीफांच्या अंगरक्षकांचा प्रमुख होता. त्याला फार मोठा पगार मिळत असे. त्याची बायको फार सुंदर होती. तिचे नाव खातून होते. मुस्तफाचे बायकोवर स्वतःच्या जिवापलीकडे प्रेम होते. म्हणून त्याला मूलबाळ नव्हते तरी त्याने दुसरे लग्न केले नाही. परंतु त्याला नेहमी इतर दरबाऱ्यांसारखा बरोबर दरबारात नेण्यासारखा स्वतःचा मुलगा नाही या गोष्टीबद्दल दुःख होते.

पतीला मुलगा नसल्याबद्दल फार दुःख असल्याचे खातूनला माहीत होते. तिने मूलबाळ नाही म्हणून पुष्कळ औषधोपचार केले, परंतु काही उपयोग झाला नाही.

दिलैला सुफी फकीराच्या वेषात बगदादच्या गल्ल्यात 'अल्लाह' 'अल्लाह' म्हणत फिरत होती. तिने मुस्तफाच्या घरासमोर बुरखा बाजूला सारून वर पाहिले. महालाच्या खिडकीत सुंदर वस्त्राभूषणे घालून खातून एखाद्या नवरीसारखी उभी होती.

"त्या तरुण स्त्रीच्या अंगावरचे सर्व दागिने लुबाडू शकले नाही तर माझी हुशारी कोणत्या कामाची?" दिलैलाने मनात विचार केला.

दिलैलाला पाहून खातूनला वाटले की या फकीरणीच्या कृपेने आपल्याला मूल होईल. म्हणून तिने तिला बोलावून आणण्यासाठी एका दासीला पाठविले. दासी त्याप्रमाणे दिलैलाला बोलावून घेऊन आली. खातूनने दिलैलाचे पाय धरून मूल व्हायला काही तरी मंत्रतंत्र करायला सांगितले.

"ते काही मोठेसे काम नाही. या गावात अपत्य देणारा एक फकीर आहे. तू त्याच्या दर्शनाला गेलीस तर तो तुझी इच्छा पुरी व्हायला काही उपाय सांगेल." दिलैला म्हणाली.

खातून मोठ्या दुःखाने म्हणाली—"मी कधी घराचा उंबरठा ओलांडला नाही."

"काही हरकत नाही. तू माझ्याबरोबर चल. मी तुला त्या फकिराकडे घेऊन जाते. नवरा परत यायच्या आत तुला परत येता येईल." दिलैला म्हणाली.

फकिराच्या दर्शनाने तिची इच्छा पुरी होईल, या विचारानेच खातूनला आनंद झाला. तिने निघण्यापूर्वी आणखी चार दागिने घातले आणि दिलैलाबरोबर निघाली.



थोडे अंतर चालून गेल्यावर सिद्दी मोहसिन नावाच्या माणसाचे दुकान आले. सिद्दी मोहसिन एक अविवाहित तरुण होता. त्याला पाहताच दिलैलाच्या मनात दुसराच एक विचार आला. तिने खातूनला बाहेर ओटयावर बसायला सांगितले आणि ती दुकानात निघून गेली.

दिलैला मोहसिनला म्हणाली—"काय रे मुला! बाहेर ओटयावर बसलेल्या बाईला पाहिलेस ना? ती माझी मुलगी आहे. तुझ्यासारख्या हुशार तरुण मुलाबरोबर तिचे लग्न करून द्यावे म्हणते मी. तिच्या बापाने पुष्कळ पैसे मिळवून ठेवले आहेत












तू मागशील तो हुंडा द्यायला मी तयार आहे. याच्यासारखी आणखी दोन दुकाने पाहिजे तर तुला काढता येतील."

मोहसिनला परमानंद झाला. म्हणाला–"मी तयार आहे लग्नाला. केव्हांचा मुहूर्त धरायचा?"

"तू माझ्याबरोबर आलास तर आताच करून देईन लग्न!" दिलैला म्हणाली.

मोहसिन दीनारांची पिशवी खाकेत दाबून घेऊन दिलैलाच्या मागून निघाला. दिलैला खातून आणि मोहसिन दोघांना बरोबर घेऊन पुढे निघाली. वाटेत हज मुहंमद रंगाऱ्याचे दुकान होते.

दिलैलाने खातून व मोहसिन यांना दूर थांबायला सांगितले व दुकानात जाऊन महंमदला म्हणाली–"महंमद? माझे घर पडायला झाले आहे, म्हणून मी त्याची दुरुस्ती करवीत आहे. ते दोघे माझा मुलगा व मुलगी आहेत. आम्हांला रहायला चार पाच दिवसांपुरते तुझ्या ओळखीपैकी कोणाचे घर रिकामे असेल तर रहायला देववतोस का?"

"माझ्या घराचा वरचा मजला रिकामाच आहे. चला, चार पांच दिवस पाहिजे तर तुम्ही त्यात रहा." असे सांगून महंमदने तिला किल्ली दिली.

दिलैला खातून व मोहसिनला घेऊन हज महंमदच्या घरी गेली. खालच्या एका खोलीत मोहसिनला बसायला सांगून ती खातूनला घेऊन वरच्या मजल्यावर गेली आणि खातूनला म्हणाली–"मुली! तो फकीर या घराच्या खालच्या मजल्यावर राहतो आहे. मी त्यांना भेटून येते. तोपर्यंत तू आपले सर्व दागिने काढून सुरक्षित एका फडक्यात बांधून फकिराच्या दर्शनाला तयार होऊन बस. त्यांच्यासमोर नट्टापट्टा करून जाणे शोभणार नाही." असे तिला समजाऊन सांगून दिलैला खाली उतरून आली. तिला पाहताच मोहसिनने तिला विचारले–"काय हो मग लग्नाच्या गोष्टी काही ठरवून टाकू या का?"

दिलैला रडण्याचे सोंग करून म्हणाली–"अरे! मी तरी काय सांगू? कोणी तरी दुष्ट माणसाने तुझ्या विषयी माझ्या मुलीला खोटे नाटे काही तरी सांगून तिच्या मनात विष कालवले आहे. कोणी तरी तिला सांगितले की तुला कोड झाले आहे. म्हणून तिने तुझ्याशी लग्नाला नकार दिला आहे. तू अंगातला सदरा काढून बस. मी तिची समजूत घालते की प्रत्यक्ष जाऊन पाहून घे, कोड बीड काही आहे का. तू आपला सदरा व ती पिशवी माझ्याजवळ ठेऊन दे. मी संभाळून ठेवते."

मोहसिनला दिलैला म्हणाली ते सर्व खरे वाटले आणि त्याने आपली एक हजार दीनारांची पिशवी आणि सदरा दिलैलाला दिला. दिलैला सदरा व पिशवी घेऊन वरच्या मजल्यावर गेली व खातूनला म्हणाली–"जा खाली, फकीर खालच्या खोलीत तुझी वाट पहात आहेत. तुझे भाग्य समज, ते दर्शन द्यायला तयार झाले. जा, खाली जा. मी तुझ्या दागिन्याचे गाठोडे संभाळून ठेवते आणि तुझ्या पाठोपाठ येते."



खातून खाली उतरून खोलीत निघून गेली. तिच्या पाठोपाठ दोन्ही गाठोडी घेऊन दिलैला खाली उतरून गेली आणि सरळ रस्त्यावर जाऊन कोणत्या तरी गल्लीत अदृश्य झाली. खातून खाली खोलीत जाऊन फकिराची वाट पहात बसली. तेथे तिला फक्त मोहसिन दिसला. त्याने तिला विचारले–"कोणी सांगितले तुला की माझ्या अंगावर कोड आहे? डोळे उघडून पहा आणि खात्री करून घे."

खातूनला ते सर्व विचित्र वाटले. ती घाबरून वरच्या मजल्याकडे धावली.



परंतु तेथे ती सुफी फकीरीण नव्हती की तिचे दागिन्यांचे गाठोडेपण नव्हते.

दिलैलाने दोन्ही गाठोडी एका ओळखीच्या दुकानदाराच्या दुकानात ठेवून दिली आणि परत हज महंमदच्या दुकानात जाऊन त्याला म्हणाली–"तुमचे घर खरोखरच चांगले आहे. मी आपले सामान आणायला घरी जाते. माझी दोन्ही मुले उपाशी आहेत. तुम्ही हे दोन दीनार घ्या आणि मुलांना काही तरी खायला आणून द्या. त्यांच्याबरोबर तुम्ही सुद्धा खाऊन घ्या."

हज महंमदने दिलैलाजवळून दीनार घेऊन आपल्या नोकराला दिले आणि बाहेर जातांना दुकानाकडे लक्ष ठेव असे सांगून निघून गेला.

दिलैला गाठोडी घेऊन रंगाऱ्याच्या दुकानात आली आणि दुकानातल्या नोकराला म्हणाली–"तुझा मालक डबलरोटीवाल्याच्या दुकानात आहे, तुला बोलावले आहे. लवकर जा. तू परत येईपर्यंत मी दुकानात बसते."

नोकर, दिलैला म्हणाली त्यावर विश्वास करून निघून गेला. दिलैलाने तिला हव्या असलेल्या वस्तू दुकानातून घेतल्या. त्याच वेळी दुकानासमोरून एक मुलगा गाढवावर सामान लादून घेऊन जात असलेला दिसला. त्याला थांबवून दिलैला त्याला म्हणाली–"अरे ए मुला! तुला हा दुकानदार माहीत आहे का रे? हा माझा मुलगा आहे. त्याला कर्ज झाले होते. हे सर्व सामान गावकऱ्यांचे आहे. हे त्यांना परत करावयाचे आहे. हे गाढवावर ठेवून जरा मी घरी घेऊन जाऊ का? हे घे दोन दीनार. मी परत येईपर्यंत दुकानात उरलेले सर्व सामान तोडूनफोडून टाक. नाहीतर ते लोक उचलून घेऊन जातील."

तो मुलगा त्याला कबूल झाला.

दिलैला सर्व सामान त्या गाढवावर घालून तेथून निघून गेली.





आईला परत आलेली पाहून जीनावने विचारले–"आई! काय काय आणले आहेस ग?"

"अग, आणखी काय? चार जणांच्या डोळ्यात धूळ फेकून हाती लागले ते घेऊन आले आहे. हे दागिने एका अधिकाऱ्याच्या बायकोचे आहेत. दीनारांची पिशवी व सदरा एका तरुण दुकानदाराचा आहे. गाढवावरचे सामान एका रंगाऱ्याच्या दुकानातले आहे. हे गाढव आणखी एकाचे आहे." दिलैलाने जग जिंकून आल्यासारखे ऐटीत सांगितले.

"तू केलेस ते ठीकच केलेस. पण आता घरातून बाहेर पडू नकोस. ते चारही जण तुझ्या शोधार्थ हिंडत असतील." जीनाब म्हणाली.

"अग, एवढ्यात काय? जे व्हायचे आहे ते आणखी पुढे आहे."

रंगारी खरोखरच त्या वेळी डबलरोटी वाल्याकडे रोटी व भाजी विकत घेत होते. त्याच्या नोकराने येऊन विचारले–"मालक! मला कशासाठी बोलाविले होते? रंगाऱ्याने लगेच परत येऊन आपले दुकान पाहिले. गाढववाला तरुण मुलगा दुकानात तोडफोड करीत होता. रंगाऱ्याने त्याला दरडावून विचारले–"ए मूर्खा! तू हे काय चालविले आहेस रे?"

"कर्ज देणारांनी तुम्हांला सोडले का?" त्या तरुणाने रंगाऱ्याला विचारले.

तो तरुण म्हणाला ते रंगाऱ्याला कळेना. शेवटी सर्व गोष्टी त्याला कळल्या. तेव्हां त्या रंगाऱ्याने विचारले–"आहे कोठे ती फकीरीण?"

"पण माझे गाढव कोठे आहे हे तर सांगशील!" तरुणाने चकित होऊन विचारले. दोघे डोळे बडवून ओरडू लागले. तेथे लोकांची गर्दी जमली. सर्व रंगाऱ्याच्या स्वतःच्या घरी गेले.

रंगाऱ्याने दाराची कडी वाजवली तेव्हां मोहसिनने दार उघडले. त्याच्या अंगात सदरादेखील नव्हता.

"बदमाश! कोठे रे गेली तुझी आई?" रंगाऱ्याने दरडावून विचारले.

"माझी आई? हे काय विचारता? ती कोठे जाईल? ती मरून किती तरी वर्षे झाली!" मोहसिन चकित होऊन म्हणाला. कोण काय म्हणतो आहे हे कोणालाच कळले नाही. मोहसिन पुढे म्हणाला– "ती फकीरीण माझी आई नाही हो! ती मला हे सांगून बोलावून घेऊन आली की ती आपल्या मुलीचे माझ्याशी लग्न करून देणार आहे. मायलेकी वरच्या मजल्यावर आहेत." मोहसिन म्हणाला.

रंगाऱ्याने वरच्या मजल्यावर जाऊन दारावर थाप दिली तर खातूनने दरवाजा उघडला.

"तुझी आई कोठे आहे?" रंगाऱ्याने विचारले.

"माझी आई? ती तर केव्हांच मेली!" खातून म्हणाली.

प्रत्येकाने प्रत्येकावर गुजरलेल्या प्रसंगाचे वर्णन करून खरी गोष्ट सांगितली. तेव्हां म्हातारीने सर्वांना फसवल्याची गोष्ट त्यांच्या लक्षात आली. खातूनला तिच्या घरी पोचवून बाकी तिघांनी नगररक्षक खालिद याच्याकडे जाऊन सर्व गोष्टी त्यांच्या नजरेस आणून दिल्या.

सर्व गोष्टी ऐकून खालिद म्हणाला– "या राजधानीत कित्येक म्हाताऱ्या आहेत. त्यांत तुम्ही म्हणतां ती म्हातारी कोणती हे कसे ओळखायचे? तुम्हीच तिला पकडून आणून द्या. तिला कडक शिक्षा केली जाईल."

शेवटी निरुपाय होऊन फसलेले तिघेजण दिलैलाच्या शोधार्थ निघाले.

(पुढील गोष्ट पुढील अंकी)





# धीर नारी वाणी

पतंगपूरचा राजा भाग्यसिंह हा एक नालायक शासक होता. तो पहिल्या नंबरचा मूर्ख आणि भितरा होता. प्रजा नेहमी उघड उघड त्याची निंदा करी. पण या राजाला गादीवरून कसे काढून टाकायचे हे कोणाला कळेना. कारण त्याचा मंत्री, दुर्जय हा, राजाहून जास्त अत्याचारी होता. मंत्र्याला काही दुष्ट शक्ती अवगत होत्या. म्हणून लोक व राजा त्याला भीत. राजाला राज्यकारभाराची माहिती मुळीच नाही हे मंत्र्याला चांगले माहीत होते. त्या मंत्र्याला काढून दुसऱ्या मंत्र्याला नेमण्याची हिम्मत राजात नव्हती. त्याला लोक अभाग्यवर्मा व मंत्र्याला दुर्जन मंत्री या नावाने ओळखतात हे राजाला देखील माहीत होते.

पतंगपूरलगत आणखी एक राज्य होते. त्या देशाच्या राजाचे नाव करालध्वज असे होते. तो एक क्रूर राजा होता. तो पराक्रमी पण तसाच होता. पराजय ही वस्तू त्याला माहीत नव्हती.

करालध्वजाने भाग्यसिंहाकडे एक दूत पाठविला व कळविले की संधी करून माझे वर्चस्व मान्य कर नाहीतर तुझे राज्य आपल्या राज्याला जोडून टाकतो.

भाग्यसिंह दूताने सांगितलेला निरोप ऐकून थरथर कापू लागला. त्याने आपल्या मंत्र्याचा सल्ला घेतला. दुर्जय मंत्री त्याला म्हणाला– "महाराज! अशा दुष्ट व पराक्रमी शत्रूशी संधी करून घेणेच हिताचे ठरेल. माझ्या मंत्रशक्तीचा प्रयोग त्याच्या सैन्यावर होणे शक्य नाही. कारण त्याला वेताळाची मदत आहे."

भाग्यसिंह कराल याच्याशी संधी करून घ्यायला तयार झाला. संधीच्या अटीप्रमाणे प्रत्येक दिवाळीला भाग्यसिंहाने पंधरा वर्षांहून लहान बारा मुली व एक हजार



गाई नजराणा म्हणून करालसिंहाकडे पाठवायचे कबूल केले.

हा तह गुप्तपणेच झाला होता, परंतु हळू हळू प्रजेला तहाच्या अटी कळल्या. त्या अपमानजनक तहाबद्दल प्रजेने राजाची खूप निंदा केली. काही लोक असेदेखील म्हणाले—"यापेक्षा हा मूर्ख राजा रणांगणावर मेला असता तर याला स्वर्ग तरी मिळाला असता आणि याची कीर्ती अजरामर झाली असती.

दिवाळीच्या आधी काही दिवस राजाने पंधरा वर्षांहून लहान मुलींची निवड करायला सुरवात केली. राजाचे अधिकारी शेतकऱ्यांकडून गाई कर म्हणून वसूल करू लागले.

रघूजी नावाचा एक श्रीमंत शेतकरी राजधानीत आणि डोंगराळ प्रदेशातील एका गावी रहात असे. राजा बळजबरीने गाई वसूल करतो आहे हे जेव्हां त्याला कळले तेव्हां त्याने आपल्या सर्व गाई विकून बकऱ्या विकत घेतल्या. तो एक स्वाभिमानी शेतकरी होता. तरी त्याच्यावर प्रत्यक्ष अत्याचार होईपर्यंत काही करायला तो तयार नसे.

एक दोन वर्षे करालध्वजला नजराणा मिळत राहला. तिसऱ्या वर्षी भाग्यसिंहाला एक शंका वाटू लागली. त्याला एकुलती एकच मुलगी होती. तिचे नाव वाणी असे होते. वाणी एक रूपवती व हुशार मुलगी होती. चौदाव्या वर्षात तिने नुकतेच पाऊल टाकले होते. पुढल्या दिवाळीला इतर मुलींबरोबर करालध्वजाने "तुझ्याच मुलीला" पाठव असे म्हटले तर काय करायचे? त्याच काळजीत त्याची भूकतहान सर्व उडून गेली.

भाग्यसिंहाने आपल्या मंत्र्याला बोलावून त्याचा सल्ला घेतला. म्हणाला—"पुढल्या दिवाळीला आपण ज्या बारा मुलींना पाठवायचे आहे त्यात 'वाणीला पाठव' असे करालध्वज म्हणाला तर काय करायचे? गेल्या खेपेला आपण ज्या कन्यांना पाठविले होते त्यांच्यापैकी दोघी सुंदर नाहीत म्हणून तो किती रागावला होता हे तुला आठवतच असेल. आपल्या या लहानशा राज्यात दरवर्षी बारा मुली आणि त्या सुद्धा सुंदर कोठून मिळणार?"

मंत्र्याने त्या प्रश्नाचे उत्तर विचार करून आधीच ठरविले होते. मंत्री दुर्जय याला विलंब नावाचा एक नालायक मूर्ख मुलगा होता. तो पंधरा सोळा वर्षांचा असेल. विद्याभ्यासांत तो शून्यच होता. तरी मंत्र्याने सल्ला दिला—

"राजकन्येचा विवाह दिवाळीच्या आत करून टाकू या. या शिवाय दुसरा उपाय मला दिसत नाही. हे लग्न गुप्तपणे उरकून घेतले पाहिजे. आपण निरनिराळ्या देशांच्या राजांकडे आमंत्रण पाठवून त्यांना बोलावले तर करालध्वजला ती गोष्ट कळेल आणि तो ऐन वेळी काही तरी विघ्न घालील. म्हणून आपली आज्ञा मिळाली तर या संकटातून सुटका मिळू शकेल. आमच्या विलंबशी राजकन्येचा विवाह करून द्यावा."



ते ऐकताच राजाच्या अंगावर शहारे उभे राहिल्यासारखे झाले. परंतु दुसरा उपाय त्याला पण सुचला नाही. म्हणून त्याला मंत्र्याने सुचविलेला उपाय मानण्या-शिवाय दुसरा मार्ग उरला नाही. परंतु सरळ होकार न देता म्हणाला—

"मी मुलीला पण विचारून घेतो. तिला हरकत नसेल तर तसेच करू या."

"ह्या बाबतीत आपण सांगाल तसेच राजकन्या करणार." मंत्री म्हणाला.

राजकुमारी विलंबशी विवाहास तयार झाली नाही. ती म्हणाली—"इतक्या लवकर माझा विवाह करण्याची गर्दी कशाला? मी



कधी लग्न करायचे ठरविलेच तर विलंब-सारख्या नालायक माणसाशी कशाला करीन? तुम्ही जो घातक तह केला आहे तो मोडणाऱ्या वीर पुरुषाशी मी लग्न करीन."

राजा करालध्वजच्या आठवणीनेच थर-थर कापत म्हणाला–"पुढल्या दिवाळीच्या आधी तुझे लग्न करून दिले नाही तर कदाचित तुला सुद्धा करालध्वजाकडे नजराणा म्हणून जावे लागेल. त्या पेक्षा, मी सांगतो तसे, तू मंत्र्याच्या मुलाबरोबर लग्न करून घेऊन आपली सुटका करून घेणे बरे नाही का?"

"तुम्हांला त्याची इतकी भीति वाटत असेल तर त्या राक्षसाकडे तुम्ही मला सुद्धा एक नजराणा म्हणून पाठवा. मी आनंदाने जाईन. आजपर्यंत तुम्ही जितक्या जणींना पाठविलेत आणि पुढे तुम्ही ज्या कन्यांना पाठविणार आहां, त्या माझ्याच सारख्या कन्या असणार नाही का?" वाणीने बापाला विचारले.

तुझ्या मुलाशी राजकन्या लग्नाला तयार नाही हे मंत्र्याला सांगण्याची हिंमत राजाच्या अंगात नव्हती. म्हणून तो मंत्र्याला बोलावून त्याला म्हणाला–"एकदा विलंब व राज-कुमारी दोघांनी परस्परांना भेटून बोलून घ्यावे, हे बरे होईल नाही का?"

परंतु विलंब राजकुमारीला भेटायला गेला तेव्हां वाणीने त्याचा अपमान करून त्याला परत पाठवून दिले.

ते कळल्यावर दुर्जय फारच संतापला. राजकन्येबरोबर आपल्या मुलाचे लग्न झाल्यावर राज्याला वारस होण्याची आप- त्या मुलाला संधी मिळणे कठीण हो लागल्याचे दुर्जयने ओळखले. म्हणून कराल-ध्वजाकडे पुढल्या दिवाळीत पाठविल्या जाणाऱ्या बारा कन्यात एक राजकन्या असावी अशी मागणी करण्यास कराल-ध्वजाला कां सुचवू नये असाही एक दुष्ट विचार दुर्जयच्या मनात आला. परंतु तसे झाले तर राजकन्या आपल्या हातातून कायमचीच जाईल. त्या पेक्षा राजकन्येवर मंत्र प्रयोग करून कां पाहू नये, म्हणजे ती केव्हां तरी आपली सून होईलच, असाही आणखी एक विचार त्याच्या मनात आला.

पुष्कळ विचार केल्यावर त्याला एक उपाय सुचला. मनुष्याला साप करून टाकण्याचा एक मंत्र दुर्जयला अवगत होता. वाणीला साप करून तिला त्याच रूपात काही दिवस ठेवून द्यावे आणि संधी पाहून तिला पुन्हां मनुष्य रूप द्यावे म्हणजे आपण सांगू तशी वागायला ती तयार होईल. सर्प रूपात बदललेल्या माणसास पुन्हां मनुष्य रूप यायला हवे असेल तर सर्प रूपात त्याचे चुंबन घेणे आवश्यक होते. हे काम स्वत: विलंबने केले तर विलंबशी लग्नाला राज-कन्या तयार होईल.

दुर्जयला ही युक्ती सर्वांत जास्त पसंत पडली. त्या प्रमाणे त्याने एक दिवशी रात्री राजकन्येला सर्प रूप देऊन टाकले. सकाळी उठून लोकांनी राजकन्येच्या पलंगावर एक साप पाहिला. राजकुमारी तेथे नव्हती.

सापाला पाहून दासी घाबरून गेल्या. आरडा ओरडा ऐकून राजा व राणी धावून आली. वाणी साप झाली असल्याचे सर्वांना





कळले. राजाने मंत्र्याला बोलावून घेतले. मंत्र्याला पाहतांच साप फण उभा करून फूत्कार सोडू लागला.

दुर्जय घाबरून गेला कारण वाणी सामान्य सर्प न होता एक विषारी साप झाली होती. तेजस्वी प्रकृतीच्या लोकांवर साप होण्याचा मंत्र टाकला तर ते विषारी साप होतात. मंत्राचा हा गुण दुर्जयला माहीत नव्हता. या सापाचे चुंबन मुलाकडून कसे घ्यावयाचे? साप त्याला चावून ठार करील.

"महाराज! हा तर नाग साप, नव्हे ही नागीण आहे. हिला तावडतोब ठार करावे." दुर्जय म्हणाला.

"ही नागीण असली तरी माझी मुलगी आहे. मी हिला ठार करणार नाही. दुर्दैवाने माझी मुलगी साप झाली आहे. पुन्हा भाग्य पालटले तर ती मनुष्य रूपात जिवंत झाली की पुरे." राजा म्हणाला.

नागिण पलंगावरून उतरून कोठे तरी निघून गेली. त्यानंतर ती राजवाड्यात कोठे दिसली नाही.

रघूजीसमोर, राजासारखाच कठीण प्रश्न उभा राहला. त्याने गाई विकून बकऱ्या विकत घेतल्या होत्या आणि गाईंचा कर देण्याच्या संकटातून वाचला होता. परंतु त्याला वाणीच्या वयाचीच एक मुलगी होती. राजाचे शिपाई रघूजीच्या घरी गाईंचा कर वसूल करायला आले तेव्हां त्यांनी रघुजीच्या गोमती नावाच्या सुंदर मुलीला अंगणात पाहिले. त्यांनी "ह्या मुलीचे वय काय हो?" विचारले.

म्हणून करालध्वजाकडे मुलीला पाठविण्यासाठी कधी न कधी आपल्या मुलीला पकडून नेतील ही भीती त्याला वाटू लागली. त्याने त्याचा मुलगा सुनंद याला बोलावून विचारले—"काय रे सुनंद! करालच्या हातून तुझ्या बहिणीची सुटका व्हायला काही उपाय आहे का?"

सुनंद एक साहसी तरुण होता. त्याने आपल्या तरुण मित्रमंडळींच्या मदतीने एक छोटे खानी सैन्य उभे केले. त्याने सर्वांना सावधपणे एक दिवशी करालच्या झोपण्याच्या खोलीत हल्ला करायचा असल्याचे सांगितले. सर्वांनी करालध्वजला ठार करण्याची प्रतिज्ञा केली. एकालादेखील जिवंत परत येण्याची आशा नव्हती. पण मित्राच्या शब्दाखातर ते जिवावर उदार होऊन लढण्यास तयार झाले.

सुनंद आपल्या त्या छोटेखानी सैन्यानिशी करालच्या राजवाड्यात मध्यरात्रीच्या सुमारास दाखल झाला. पाहरेकरी त्यांच्यासमोर टिकाव धरू शकले नाहीत. काही पळून गेले व उरले त्यांना सुनंदने कैद करविले. सुनंदच्या मित्रांपैकी एकदेखील मेला नाही की घायाळ झाला नाही. सर्व करालच्या झोपण्याच्या खोलीजवळ कोणाच्या नकळत दाखल झाले.

त्याच वेळी खोलीतून एक किंकाळी ऐकू आली. काही वेळाने कराल दरवाजा उघडून बाहेर आला. त्याच्या तोंडातून फेस येत होता व तो सुनंदच्या पायासमोर बेशुद्ध होऊन पडला आणि काही वेळ तडफडून मेला.

त्याच वेळी एक नागिण करालच्या खोलीतून बाहेर येत असलेली दिसली.












सुनंदने तिला पाहिले व सर्व घटना त्याच्या लक्षात आली. तीच नागीण करालला चावली होती.

सुनंद साप धरण्याच्या कलेत प्रवीण होता. त्याने खाली वाकून सापाचे डोके धरले आणि त्याने फार मोठे उपकाराचे काम केल्याबद्दल जणु काही चुंबन घेतल्या-सारखे जवळ तोंड नेले.

दुसऱ्या क्षणाला ती नागीण अदृश्य झाली व तिच्या जागी एक राजकन्या प्रगट झाली. सुनंद चकित होऊन तिच्याकडे पाहू लागला.

"मी सर्व काही सांगते. आपण येथे फार वेळ राहणे धोक्याचे आहे. पहिल्याने आपण ह्या राज्याची सीमा पार करून बाहेर आपल्या राज्यात जाऊ या." राजकुमारी म्हणाली.

सर्व रघुजीच्या घरी येऊन पोचले. राजकुमारीने सर्व वृत्तांत सांगितला आणि म्हणाली—"पुढे आपल्याला आणखी पुष्कळ कामे करावयाची आहेत. आमच्या राज्यात तूच एक खरा वीर दिसतो आहेस. तुझ्या मुळे मला मनुष्य रूप मिळाले. म्हणून मी तुझ्याशीच विवाह करणार आहे. परंतु आपल्या राज्यात दोघे दुष्ट आहेत. एक माझे वडील भाग्यसिंह व दुसरा त्यांचा मंत्री दुर्जय. या दोघांना हाकलून लावल्या-शिवाय आपल्या राज्यात कोणी सुखी होणार नाही. म्हणून तू आपले सैन्य घेऊन सरळ राजधानीवर चालून जा."

भाग्यसिंह गादी सोडायला सहजी तयार झाला. पण दुर्जय पळून गेला. पुष्कळ शोध केला तरी तो सांपडला नाही. तो वटवाघूळ होऊन कोठेतरी उडून गेला असेल असे लोक सांगू लागले.

सुनंदने वाणीशी विवाह केला. राज्या-भिषेक झाल्यानंतर त्याने उत्तम प्रकारे राज्य कारभार पहायला सुरवात केली. त्याच्या कारकीर्दीत प्रजा सुखी झाली.






विदुर निघून गेल्यावर दुर्योधन आपल्या वडिलांकडे जाऊन म्हणाला—"बाबा! विदुर कांका नेहमी तुमच्याजवळ असतात, म्हणून मला तुमच्याजवळ मनमोकळेपणाने बोलता येत नाही. ते नेहमी माझे शत्रू, हे जे पांडव आहेत, त्यांचे गोडवे गात असतात. तुम्ही त्यांच्या 'हो' ला 'हो' देता. आपण आपल्या शत्रूचा नाश केला पाहिजे आणि त्यासाठी काही तरी युक्ती योजली पाहिजे."

त्यावर धृतराष्ट्र म्हणाला—"बाळ! माझे मत तुझ्या इच्छेविरुद्ध कसे असू शकेल? विदुर पांडवांची वाखाणणी करतो तेव्हां मी त्याच्या विरुद्ध काही बोलत नाहीं याचा अर्थ काही निराळा आहे असे समजू नकोस. तू व कर्ण दोघांनी विचार करून काही ठरविले असल्यास सांग. ऐकू तर दे."

"द्रुपदराजाचे जावई झाल्यामुळे पांड-वांची शक्ती जास्त वाढली आहे. द्रुपद धन, पुरुषार्थ आणि शक्ती या सर्वात काही कमी नाही. पांडवांना द्रुपदाची मदत मिळू नये असा काही तरी उपाय आपण योजला पाहिजे. मांत्रिक किंवा तांत्रिक यांची मदत घेऊन दोघांमध्ये परस्पर वैर होऊन ते कसे वाढेल आणि पांडवांना पांचाल देशातून बाहेर कसे पिटाळून लावता येईल हे पाहिले पाहिजे." दुर्योधन म्हणाला.

दुर्योधनाने आणखी एक उपाय योज-ण्याचे ठरविले होते. द्रौपदीला पांच पती

१६. पांडवांना राज्यप्राप्ती



होते. म्हणून ती व तिचे पती यांच्यात परस्परांशी मत्सर व द्वेष वाढावा या साठी वस्ताद दासदासी नेमून परस्परां-विरुद्ध कान भरावयाचे. त्यात यश मिळाले तर पांडवांचे आपसात भांडण होईल व ते पांचाल सोडून हस्तिनापूरला येतील.

दुर्योधनाने आणखी एक युक्ती सुचविली. म्हणाला–"पांडवात सर्वात जास्त पराक्रमी भीम आहे. त्याला गुप्तपणे वाटेला लावू या. भीमाचा काटा दूर झाला की अर्जुनाचा टिकाव कर्णासमोर लागणार नाही. उरलेल्या चार पांडवांना आपण सहजी आपले दास करून घेऊ."

कर्ण, दुर्योधन म्हणाला ते ऐकून म्हणाला–"तू सुचविलीस ती युक्ती शक्य आहे का? पांडवांचे काही बिघडणार नाही. पैशाच्या लोभाने किंवा इतर उपायांनी महा पराक्रमी अशा आपल्या जांवयांविरुद्ध द्रुपद काही करील असे वाटते का तुला? पांडव माधुकरी मागत होते तेव्हां द्रौपदीने त्यांना वरले. आतां त्यांची स्थिती चांगली आहे. ती त्यांना सोडून जायला कशी काय तयार होईल? याशिवाय सर्व पांडवांचे तिच्यावर स्वतःच्या जिवापलीकडे प्रेम आहे. म्हणून तुझे हे सर्व बेत फोल ठरतील. आता भीमाला गुप्तपणे ठार करण्याचे म्हणशील तर तुला हे माहीतच आहे की कित्येकदां तुझे प्रयत्न फसले आहेत. हस्तिनापुरातली परिस्थिती फार बिघडली असल्याचे हेरांनी जाऊन पांडवांना सांगितले तर पांडव त्यांच्या गप्पांवर विश्वास करतील असे का तुला वाटते? साम, दाम, व भेद यांपैकी एकही पांडवांच्या बाबतीत यशस्वी होणार नाही. आता उरला दंड आपल्याकडे पांडवांहून मोठे सैन्य आहे. यादव, पांचाल, मगध वगैरे त्यांच्या मदतीला येण्यापूर्वी आपण त्यांच्यावर स्वारी करू या. त्यात अधर्मपण नाही."



ते ऐकून धृतराष्ट्र म्हणाला–"कर्ण म्हणतो ते सर्व बरोबर आहे. भीष्म, द्रोण व विदुर यांचे या संबंधी विचार समजून घेणे पण आवश्यक आहे."

भीष्मद्रोणादींकडे त्या प्रमाणे निरोप पाठविण्यात आला. त्यांनी धृतराष्ट्राच्या तोंडी सर्व वृत्त शांतपणे ऐकून घेतले.

भीष्माने आपले मत सांगितले, म्हणाला–"माझ्यासमोर पांडव आणि दुर्योधन वगैरे कौरव सारखेच आहेत. आमच्या आजोबांच्या काळापासून चालत आलेल्या रिवाजाप्रमाणे ते अर्ध्या राज्याचे मालक आहेत. म्हणून त्यांना बोलावून तू स्वतःच त्यांचा वांटा त्यांना देऊन टाक. तसे तुम्ही केले नाही तर तुम्ही दोषी ठराल. दुर्योधना! तू आजपावेतों पांडवांवर अनेक अत्याचार केले आहेस. पण तू त्यांचे काही वाईट करु शकला नाहीस. लाक्षागृहात पुरोचन मात्र जळून मेला. कुंती व पांडव लाक्षागृहात जळून गेल्याचे ऐकले तेव्हां-पासून तुमच्यापैकी कोणाचा चेहरा सुद्धा पाहण्याची माझी इच्छा नव्हती. ते जिवंत आहेत म्हणून तुझी लाज राखली गेली. निदान यापुढे तरी नीतीधर्म यांचा विचार करून वाग आणि सुखी हो."



"भीष्माचार्य म्हणाले ते माझ्यामते बरोबर आहे. पांडवांना बोलावून त्यांना अर्धे राज्य देऊन टाकावे. द्रुपद, त्याचा मुलगा धृष्टद्युम्न, कुंती, पंचपांडव आणि द्रौपदीसाठी वस्त्राभूषणे पाठवून द्या. दुःशासनाच्या किंवा विकर्णाच्या हाती कांपिल्यनगरीस ती वस्त्राभूषणे पाठवून द्या. त्यांनी पांडवांजवळ प्रेमाने बोलावे व वागावे. तेथे काही दिवस राहून पांडवांना आदरपूर्वक हस्तिनापुरी त्यांना बोलावून घेऊन यावे. द्रुपदाला सुद्धां आदरपूर्वक बोलावून घेऊन यावे." द्रोणाचार्यांनी सल्ला दिला.



कर्णाला ते पटले नाही. तो म्हणाला– "राजा! ही वृद्ध मंडळी नेहमीच शत्रूची वाखाणणी व आपली निंदा करीत आली आहेत. यांच्या म्हणण्याकडे मुळीच लक्ष देण्याची गरज नाही."

कर्णाचा तो उर्मटपणा द्रोणाचार्यांना मुळीच खपला नाही. ते म्हणाले–"तू पांडवांचा नेहमी मत्सर करीत आला आहेस. तुला वाटत असेल की कौरवांचे चांगले व्हावे ह्याची काळजी आमच्यापेक्षा तुलाच जास्त आहे. पण आम्ही सांगत आहो त्याप्रमाणे दुर्योधन वागला नाही तर कौरवांचे अहितच होईल!"

विदुर आतापर्यंत शांत चित्ताने ते सर्व ऐकत बसला होता. म्हणाला–"राजा! आम्ही तुझ्या व तुझ्या मुलांच्या हिताचे ते सांगितले. ते करणे किंवा न करणे हे तुझे तूच पहा. भीष्माचार्य व द्रोणाचार्य दोघांनी कौरवांच्या हिताची गोष्ट सांगितली आहे. पण कर्णाला त्यात हित दिसत नाही. काही असो भीष्म व द्रोण यांच्याहून मोठा कौरवांचा हितैषी दुसरा कोणी नाही, एवढे मात्र खरे. ते तुझ्या मुलांचे अहित होईल असा सल्ला देतीलच कसा? तुझ्या मनात पुत्रप्रेम इतके जास्त आहे की मुलांचा चुकीचा सल्लादेखील तुला हिताचा वाटतो. यांच्या सल्ल्याप्रमाणे वागशील तर निश्चितच तुझे अहित होईल, एवढेच नव्हे तर तुझा वंश नाश होईल. पांडवांना जिंकणे शक्य नाही. त्यांना कृष्णाची मदत आहे. द्रुपदाची पण मदत आहे. भीमार्जुन असामान्य पराक्रमी वीर आहेत. त्यांना प्रेमानेच जिंकता येईल या शिवाय हस्तिनापुरातली प्रजा पांडवांच्या दर्शनासाठी फार उत्सुक आहे. म्हणून त्यांना बोलावून सर्वांना सुख देणे श्रेयस्कर होईल."

सर्वांचे मत व सल्ला ऐकून धृतराष्ट्राने मनाशी काहीतरी ठरविले व म्हणाला–





"भीष्माचार्य, द्रोणाचार्य व तू (विदुर) जे काही म्हणालात ते मला पण ठीक दिसते आहे. माझ्या नजरेसमोर पण कौरव व पांडव यांच्यात काही भेद नाही. म्हणून विदुरा, तू स्वत: माझ्या वतीने जाऊन पांडवांना सपत्नीक इकडे घेऊन ये. नशिबाने ते लाक्षागृहातून वाचले आहेत. द्रुपदाची मुलगी त्यांची बायको झाली हीदेखील एक नशिबाचीच गोष्ट म्हणायला हवी. म्हणून माझ्या मनाची ओढाताण आता थांबल्यासारखी आहे."

अनेक रत्नाभूषणे, सुंदर वस्त्रे व अन्य नजराण्याच्या बहुमोल वस्तू घेऊन विदुर कांपिल्य नगरी पोचला. द्रुपद, धृष्टद्युम्न, कृष्ण, पांडव इत्यादिकांना भेटून त्यांची कुशलवार्ता विचारून कौरवांची खुशाली कळविली आणि सर्वांना वस्त्रालंकार दिले.

नंतर सभेत विदुराने द्रुपदाला भेटून धृतराष्ट्राचा निरोप सांगितला. म्हणाला– "महाराज! आपल्याशी पांडवांचे जमलेले नाते पाहून धृतराष्ट्र महाराज व भीष्माचार्यांना फार आनंद झाला. त्यांनीच मला आपली कुशलवार्ता विचारून यायला पाठविले आहे. आपले मित्र द्रोणाचार्य यांनी त्यांच्या वतीने मुद्दाम नमस्कार सांगितला आहे. आपल्या पुत्रीचा विवाह पांडवांशी झाला हे त्यांचे महत् भाग्य. राज्यप्राप्तीहून ही जास्त आनंदाची ही गोष्ट आहे. पांडवांनी फार पूर्वी हस्तिनापुर सोडले. कौरव त्यांना भेटण्यासाठी फार उत्सुकतेने वाट पहात आहेत. अंत:पुरातील स्त्रिया द्रौपदीला भेटण्यासाठी फार उत्सुक आहेत. धृतराष्ट्र महाराजांची अशी आज्ञा आहे की आपल्या परवानगीने पांडव, कुंती व द्रौपदीला मी हस्तिनापुरी न्यावे. म्हणून आपण आज्ञा करावी."

विदुर म्हणाला ते ऐकून द्रुपद म्हणाला– "कुरुकुळाशी माझे नाते अनपेक्षित रीतीने



जमून आले याबद्दल मला जो आनंद झाला तो मी काय सांगू? धृतराष्ट्र महाराजांची आज्ञा व आपल्या सारख्या दूरदर्शी ज्ञानी पुरुषाचे आमच्या घरी आगमन यामुळे आम्हांला किती मान मिळाला? आम्ही आपल्या इच्छेविरुद्ध काही करायला धजूच कसे? परंतु बलराम व कृष्ण येथे हजर आहेत तेव्हां त्यांचे मतदेखील काय आहे हे समजून घ्यावे, म्हणतो."

द्रुपदाचे म्हणणे पुरे होण्यापूर्वीच युधिष्ठिर म्हणाला–"महाराज! आम्ही आपल्या आज्ञेबाहेर नाही. आपण विचार करून जे ठरवाल ते आम्हांला मान्य आहे."

कृष्ण सर्व सभासदांना संबोधन करून म्हणाला–"विदुराच्या इच्छेप्रमाणे मला वाटते पांडवांनी हस्तिनापुरी जावे. परंतु पांडवांचे हितैषी द्रुपद महाराज यांचे या विषयी काय मत आहे तेदेखील आपण ऐकले पाहिजे."

त्यावर द्रुपद म्हणाला–"पांडव आज आमचे इतक्या जवळचे नातेवाईक झाले आहेत. परंतु ते बालपणापासून कृष्णाचे आप्तबंधू आहेत. दूर असूनही ते सदा पांडवांच्या हिताचीच काळजी करीत आले आहेत. म्हणून त्यांचे मत तेच आमचे मत."

द्रुपदाची परवानगी मिळाली. पांडव, द्रौपदी व कुंतीला घेऊन विदुराबरोबर हस्तिनापुरी गेले. कृष्ण व बलराम देखील त्यांच्या पाठोपाठ निघाले. विदुराने पाठवलेल्या दूताने पांडव येत असल्याचे पूर्वीच जाऊन हस्तिनापुरी कळविले होते. धृतराष्ट्राने पांडवांच्या स्वागतार्थ विकर्ण, चित्रसेन, द्रोणाचार्य व कृपाचार्य या चौघांना पुढे पाठविले.

विकर्ण आदींसह पांडव हस्तिनापूरला येऊन पोचले. सर्व शहर छान सजवलेले होते. धृतराष्टाने पांडव परत आलेले पाहून सर्व प्रजा फार सुखी झाली. प्रजेचा आशी-

र्वाद घेत पांडव राजवाड्यात येऊन पोचले. धृतराष्ट्र, भीष्माचार्य वगैरे सर्व थोर वडील मंडळींना त्यांनी नमस्कार केला.

काही दिवसांनी धृतराष्ट्र पांडव व श्रीकृष्ण यांना बोलावून म्हणाला–"मुलांनो! तुम्ही व कौरव दोघांमधले वैर वाढू नये यासाठी मी राज्याचे दोन वांटे करावयाचे ठरविले आहे. एक वांटा मी तुम्हांला आतांच देऊन टाकतो. आजपासून तुम्ही खांडव वनात कायमचे जाऊन रहा व तुमच्या वांट्याचे जे राज्य आहे त्याच्यावर राज्य करा.

धर्मराजाने धृतराष्ट्राच्या आज्ञेप्रमाणे सर्व थोर वडीलधाऱ्या मंडळींना नमस्कार करून त्यांचा आशीर्वाद व निरोप घेतला आणि आपल्या भावंडांना, पत्नीला व माता कुंतीला बरोबर घेऊन बलराम व श्रीकृष्णासह खांडव वनात आला. श्रीकृष्णाने इंद्राचे स्मरण केल्यावर इंद्राने श्रीकृष्णाची इच्छा ओळखून विश्वकर्म्याला पाठविले.

विश्वकर्म्याने एक चांगलासा सपाट व उंच जागी असलेला प्रदेश निवडून एका सुंदर नगराचा निर्माण केला. नगराबाहेर उंच कोट बांधून त्याच्या चारीबाजूला एक खोल खंदक खणून तयार केला. नगराच्या मध्यभागी स्वच्छ पांढऱ्या रंगाचे महाल, गरुडाकृती नगरद्वार, विशाल राजपथ दरबार मंडप, जागोजागी उद्याने निर्मित केली. या नगराचे नाव इंद्रप्रस्थ असे ठेवण्यात आले. एका मध्यवर्ती जागी पांडवांच्या राहण्यासाठी सुंदर राजवाडे बांधण्यात आले. चारही वर्णाचे लोक, शिल्पकार, कारागीर, सुतार, लोहार इत्यादी इंद्रप्रस्थ नगरी येऊन राहू लागले.

युधिष्ठिर सपत्नीक पांडवांसह इंद्रप्रस्थास येऊन राहू लागला आणि राज्यकारभार पाहू लागला. काही दिवस पांडवांबरोबर राहून श्रीकृष्ण पांडवांचा निरोप घेऊन द्वारकेला गेला.





# लेनिनचे चरित्र

[ ३ ]

बालपणीच लेनिनला संकटांना तोंड द्यावे लागले. १८८६ च्या जानेवारी महिन्यात त्याचे वडील वयाच्या ५४ व्या वर्षी अकस्मात् स्वर्गवासी झाले. त्यानंतर एकाच वर्षाने, म्हणजे १८८७ च्या मार्च महिन्यात लेनिनचा भाऊ अलेक्झांडर (साष) याला सेंट पीटर्स बर्ग येथे अटक झाली. झार बादशाहचा वध करण्यासाठी जो कट झाला होता त्यात तो सामील होता. ॲलेक्झांडरला अटक झाल्यानंतर काही दिवसांनी त्याची मोठी बहीण अन्ना हिला पण अटक झाली.

ॲलेक्झांडर एक शूर व हुशार तरुण होता. कोर्टात त्याने स्वत: आपल्या विरुद्धचा खटला लढण्यात आपल्या कुशाग्र बुद्धीची चुणूक दाखविली होती. तो म्हणाला होता–"झारशाहीचे पतन शक्यच काय, आवश्यक पण आहे." मे महिन्यात इतर चार क्रांतिवीरांबरोबर स्किस्सेलबर्गच्या किल्ल्यात ॲलेक्झांडरला फाशी झाली. त्या वेळी त्याचे वय अवघे २१ वर्षांचे होते.

मोठ्या भावाचे हुतात्म्य, त्याचा लेनिनच्या मनावर फार मोठा परिणाम झाला. तो प्रत्येक बाबतीत आपल्या मोठ्या भावाचा आदर्श डोळ्यासमोर ठेवीत असे. परंतु लेनिनने खोल विचार करून असे ठरविले की झारशाहीला तोंड द्यावयाचे तर त्याला झार किंवा त्याच्या अधिकाऱ्याचा समूळ नाश हा खरा मार्ग नव्हे.

भावाच्या मृत्यूचा शोक मनाला चटका बसवून देणारा होता तरी लेनिनने आपले माध्यमिक शिक्षण (हायस्कूल) यशस्वीरीत्या पुरे केले.



१८८७ च्या उन्हाळ्यात लेनिन परिवार सिंबीर्स्क सोडून कजानला निघून गेला.

लेनिन तेथील कॉलेजात शिकू लागला. तेथे कायद्याचे शिक्षण घेत असता लेनिनची ओळख क्रांतिकारी विद्यार्थ्याशी झाली.

१८८७ च्या डिसेंबर महिन्यात विद्यार्थ्यांनी बंडाचे निशाण उभारले. या संदर्भात विश्वविद्यालयाच्या अधिकाऱ्यांनी कॉलेजातून लेनिनचे नाव काढून टाकले. त्यानंतर त्याला अटक झाली. लेनिनला कजान राज्याच्या कोकुश्किनो नामक गावी पाठविण्यात आले व त्याच्यावर कडक नजर ठेवण्यात आली.

एक वर्षभर लेनिन स्तानबद्ध राहला. तो काळ लेनिनने वाचनात घालविला. एका वर्षानंतर त्याला कजान राज्यात प्रवेशाला परवानगी मिळाली, परंतु त्याला विश्वविद्यालयात प्रवेश मिळाला नाही.

त्या काळात लेनिनने मार्क्सच्या ग्रंथांचा उत्तम अभ्यास केला आणि मार्क्सिस्ट व कम्यूनिस्ट व्हायला त्याच्या जीवनात चांगला पाया पडला.

पुढे काही दिवसांनी लेनिन कुटुंब कजानहून समारा प्रदेशात गेले. १८९१ मध्ये लेनिनने सेंट पिटर्स बर्ग विश्वविद्यालयाची परीक्षा खाजगी अभ्यास करून दिली व पहिल्या वर्गात पास झाला. त्यानंतर लेनिनने क्रांतिकारी कार्यक्रमात जास्त उत्साहाने भाग घेतला आणि मार्क्सच्या 'कम्यूनिस्ट मॅनिफेस्टो'चे जर्मन भाषेतून रशियन भाषेत भाषांतर केले.

सुनियंत्रित शासनाविरुद्ध बंड करण्यास लेनिनला समारा अनुकूल क्षेत्र दिसले नाही. म्हणून तो १८९३ मध्ये झार बादशहांची राजधानी सेंट पीटर्स बर्ग येथे येऊन पोचला.

राजधानीत लेनिन १८९३ ते ९७ अशी चारपाच वर्षे राहाला. ती महत्वाची व होती. तेथे त्याने मजुरांची संघटना व कम्यूनिस्ट पार्टीची स्थापना करण्याचा प्रयत्न केला.

१८९४च्या प्रारंभी नदेज्द क्रूपस्काया नामक तरुण युवतीची व लेनिनची ओळख झाली. ती रविवारी रात्रीच्या एका शाळेत प्रौढांना शिकवीत असे. ती मार्क्सिस्ट संघटनेत सामील झाली. म्हणून लेनिनशी तिची जास्तच ओळख झाली. दोघे विवाह करून वैवाहिक जीवन व क्रांतिकारी जीवन दोन्हीत परस्परांचे सहकारी झाले.

लेनिनने अनेक चुकीचे वाद खोडून काढले व त्यासाठी अनेक पुस्तके लिहिली. काही प्रगतिवादी व्यक्तींनी रशियात भांडवलशाही विकासाचा विरोध करीत असता शासनाचे खंडन करता कामा नये असे प्रतिपादले होते. पण लेनिनने असा सिद्धांत मांडला की सुनियंत्रित शासन, जमिनदार व 'बोर्जुवा' च्या संयुक्त शक्तीला तोंड द्यावयाचे झाले तर शेतकरी व कामगार वर्गात मैत्री स्थापन झाली पाहिजे. खऱ्या अर्थाने समाजाचा निर्माण त्यांनाच शक्य आहे.

काही निश्चित सिद्धांतांचे प्रतिपादन व चुकीच्या सिद्धांतांचे खंडन करून लेनिनने



अनेक पुस्तके लिहिली आणि तो सेंट पीटर्स बर्गच्या मार्क्सवाद्यांचा पुढारी झाला.

१८९५च्या वसंत ऋतूत लेनिनने स्वित्सरलंड, फ्रांस व जर्मनी या देशांचे पर्यटन केले आणि तेथील मजूर पुढारी व क्रांतिकारी यांच्याशी रशियाच्या मजूर चळवळीचा व क्रांतीचा संबंध जोडला. त्याच वर्षी हेमंत ऋतूत तो रशियात परत आला आणि राजधानीच्या मार्क्सवादी संगठनांचा एक संघ स्थापन करून शेतकऱ्यांच्या मुक्तीची चळवळ करण्यासाठी एका समितीची स्थापना केली. मॉस्को, कीव्ह सारख्या काही इतर नगरातही अशा संस्था व युनिअन स्थापित झाली.

या चळवळीच्या निमित्ताने 'रबोचिय द्वेल' (मजुरांचे कर्तव्य) नामक एक नियतकालिक प्रसिद्ध करण्याचापण निश्चय झाला. पण या पत्रिकेचा पहिला अंक प्रसिद्ध झाला त्या वेळी पोलीसांनी कार्यालयावर जप्ती आणून लेनिन व त्याच्या साथीदारांना कैद करून तुरुंगात टाकले.

परंतु अशा तऱ्हेचे अडथळे आलेले पाहून लेनिन हताश होऊन स्वस्थ बसणारी व्यक्ती नव्हता. तुरुंगात असतांना त्याने मुक्ती आंदोलन समितीचे संचालन केले. समितीसाठी करपत्रे आणि सूचनापत्रे काढली. ही सर्व बाहेर गुप्तपणे प्रसिद्ध होत. लेनिन त्या वेळी १४ महिने तुरुंगात राहला.

त्याच काळात लेनिनने 'रशियात भांडवलशाही पद्धतीचा विकास' नामक अत्यंत महत्वपूर्ण ग्रंथ लिहायला सुरवात केली.

१८९७च्या सुरवातीला लेनिनला पूर्वीय सायबेरियात तीन वर्षे राहण्याची शिक्षा देऊन त्याला शुशेनस्काय नामक गावी ठेवण्यात आले. ते गाव रेल्वे मार्गापासून सुमारे ४०० मैलावर असलेले गाव होते. लेनिनला सायबेरियात पाठविल्यानंतर एका वर्षाने क्रुपस्कयाला विमुक्ति आंदोलनाच्या संदर्भात अटक झाली. सरकारने तिला लेनिनबरोबर राहण्यास परवानगी दिली. त्यांचा विवाह सायबेरियातच झाला.

सायबेरियात रहात असता लेनिनने पक्षाच्या कार्यक्रमाची रूपरेषा तयार केली आणि सुमारे तीस पुस्तके लिहिली.

२२ जानेवारी १९०० या रोजी लेनिनची हद्दपारी संपली. तो पुन्हां आपल्या गावी परतला. परंतु त्याला सरकारने मास्कोला, राजधानीत अगर इतर प्रमुख औद्योगिक नगरात कायम राहण्यास परवानगी दिली नाही. म्हणून तो सेंट पीटर्स बर्गजवळ राहता यावे यासाठी 'त्सोव' नामक गावी राहू लागला.



# १०३. प्राचीन मूर्ती

तुर्कस्तानांच्या दक्षिण-पश्चिमेकडे असलेल्या कोन द्वीपात ॲस्किल पियोस नामक देऊळ होते. हे औषधी द्रव्यांच्या देवाचे देऊळ होते. आज ते ओसाड पडलेले आहे. त्या ओसाड प्रदेशात एक शेतकरी शेत नांगरीत असतां हे प्राचीन शिल्प नजरेस पडले. अंदाजे १८०० वर्षे पूर्वीचे हे देऊळ असावे. ही मूर्ती सुप्रसिद्ध ग्रीक धन्वन्तरी हिपोक्रटीसची असावी असे तज्ज्ञांचे मत आहे. त्याचा जन्म याच द्वीपात झाला होता.





# अमरवाणी

जातिर्यातु रसातलं, गुणगणस्तत्राप्यधोगच्छतात्,
शीलं शैलतटात्पत, त्वभिजनस्सन्दह्यतां वह्निना,
शौर्ये वैरिणि वज्रमाशु निपत, त्वर्थोस्तुनः केवलं,
येनैकेन विना गुणास्तृणलव प्रायास्समस्ता इमे ॥ १ ॥

[जातगोत रसातळाला जावो, सद्‌गुणांचा लोप होवो, शीलाचा अधःपात होवो, वंशाची राखरांगोळी होवो, शौर्य नष्ट होवो, परंतु आम्हांला धन मिळाले की पुरे. त्याच्या शिवाय हे सर्व गुण तृणवत्, नव्हे त्याहून ही कमी किमतीचे आहेत.]

यस्यास्ति वित्तं सनरः कुलीनः, सपंडितः सश्रुतवान् गुणज्ञः,
स एव वक्ता, सच दर्शनीयः; सर्वेगुणाः कांचनमाश्रयंति ॥ २ ॥

[धनवान मनुष्यच कुलीन असतो, पंडित असतो, पंडित विद्वान असतो, गुणवान, वाक् पटु व रूपवान असतो, हे सर्व गुण कांचन, म्हणजे धनावर अवलंबून असतात.]

दानं, भोगो, नाशः त्रिस्त्रो गतयो भवन्ति वित्तस्य,
य नददाति, न भुंक्ते, तस्या तृतीया गतिर्भवति ॥ ३ ॥

[दान, भोग व नाश ह्या धनाच्या तीन अवस्था आहेत. जे धन दान किंवा भोग या कामासाठी वापरले जात नाही, त्याला तिसरी गति प्राप्त होते.]





# सुखाची गुरुकिल्ली

पश्चिमी किनाऱ्यावर गणेश व गंगाधर नावाचे दोघे तरुण युवक रहात असत. लहानपणापासून दोघांची मैत्री होती. वयात आल्यावर दोघांनी कामधंदा करण्याचा विचार केला. परंतु त्यांच्या दुर्दैवाने त्यांच्या गावी दुष्काळ पडला. म्हणून त्यांनी पूर्व किनाऱ्याच्या देशात जाऊन पोटापाण्यासाठी काही तरी खटपट करण्याचे ठरविले.

गंगाधर म्हणाला—"माणसाचे पोट भरायला तसे अन्न लागते तरी किती? मूठभर तांदूळ आणि मासे मिळत राहले की त्यावर वर्षानुवर्षे जगता येईल. हात राखून खर्च करीत राहलो व नित्य नियमितपणे चार पैसे बांचवीत राहलो तर लहानसे भांडवल उभे होईल व त्यावर व्यापारधंदा करून आयुष्यभर सुखाने राहता येईल."

"ठीक, तर मग आपण मितव्ययाने रहायचे आणि पैसे मिळवीत रहायचे." गणेश म्हणाला.

दोघे आपापल्या घरून निघाले आणि काही दिवसानी पूर्व किनाऱ्यालगतच्या प्रदेशात येऊन पोचले.

दोघे मित्र एका गावी येऊन पोचले. तेथे व्यापारधंद्याची भरभराट होती. दोघांनी निरनिराळ्या पेठेत रहायचे ठरविले. दोन वर्षे दोघांनी स्वतंत्रपणे धंदा करून कोणाला किती फायदा होतो हे पहावयाचे ठरविले. असा विचार करून दोघे निरनिराळ्या दिशेने निघाले.

गणेश मेहनत करून पैसे मिळवू लागला. गंगाधरने सुचविल्याप्रमाणे त्याने फक्त थोडा भात व मासे खाऊन अगदी कमी खर्चात भागवायचे ठरविले.

परंतु गणेश फार दिवस तसा राहू शकला नाही. खाण्यापिण्याच्या बाबतीत

किफायत त्याला पसंत पडली नाही. जवळ पैसे असून उपाशी मरणे त्याला आवडले नाही. म्हणून त्याने एक दिवशी एक कोंबडी विकत घेतली आणि तिचे मांस शिजवून त्यावर खूप हात मारला. न खाता मेहनत करून फक्त पैसे जमविण्यात काय शहाणपण, असा त्याने विचार केला.

परंतु त्याचे मन त्याला वारंवार खात होते. म्हणून त्याने पुन्हा फक्त भात व मासे खाऊन मितव्ययाने रहायचे ठरविले व काही दिवस कडकपणाने त्या नियमाचे पालन केले. परंतु त्याला मधून मधून कोंबडीच्या चवदार मांसाची आठवण होई.

शेवटी तो कोंबडीच्या मांसाचा मोह आवरू शकला नाही. त्याच्याजवळ जे चार पैसे जमा होऊ लागले होते ते त्याने स्वादिष्ट पदार्थ खाण्यात खर्च करायला सुरवात केली. त्यामुळे त्याच्या जवळ जमा झालेले सर्व पैसे खर्च होऊन गेले. अंगात सुस्ती वाढत गेली व शेवटी भात व मासे खाण्यालायकदेखील पैसे मिळतनासे झाले.

परंतु गंगाधर सावधगिरी बाळगत गेला व स्वत: घालून घेतलेला नियम पाळीत राहला. तो फक्त भात व मासे खाई. कोंबडीच्या किंवा इतर मांसाच्या मोहाला तो बळी पडला नाही. त्याने खूप अंग



मेहनत करून नियमितपणे चार पैसे शिलकेत टाकले व थोडेसे भांडवल जमा झाल्यावर व्यापार करू लागला. त्याची प्राप्ती वाढत गेली. त्याने जमीनजुमला विकत घेतला. एक घर विकत घेतले आणि लग्न करून सुखाने राहू लागला.

गंगाधर त्याच्या सारखाच कफल्लक होता व त्याच गावात मेहनत करून व मितव्ययाने राहून तो सुखी झाल्याचे व गावातल्या श्रीमंत व्यापाऱ्यात त्याची गणना होऊ लागल्याचे गणेशला कळले. तेव्हां तो आपल्या मित्राला भेटायला त्याच्या घरी गेला व म्हणाला–"माझ्या नशिबाने पाठ फिरविली म्हणून मला एक वेळ भात व मासेदेखील खायला मिळत नाहीत."

"मी तुला नियमितपणे भात व मासे मिळतील याची व्यवस्था करून देतो. परंतु तुला स्वत:च्या पायावरच उभे राहले पाहिजे." असे सांगून गंगाधरने गणेशला आपल्या घराच्या आवारातच एक झोपडी बांधून दिली आणि दररोज त्याच्याकडे भात व मासे पाठवू लागला.

आणखी काही दिवस लोटले. एक दिवशी गंगाधरने गणेशला बोलावून म्हटले, दररोज भात व मासे खाऊन तुला कंटाळा









आला असेल नाही? म्हणून मी माझे एक लहानसे चिंचेचे झाड दाखवतो. त्याची कोवळी पाने काढून माशाबरोबर घालून शिजवून घेत जा."

गणेश आपल्या मित्राबरोबर चिंचेच्या झाडाखाली गेला. दररोज कोवळी कोवळी पालवी काढून माशाबरोबर शिजवून तो खात गेला. हळू हळू चिंचेच्या झाडाला पानेच उरली नाहीत. तेव्हां त्याने गंगाधरला जाऊन 'आणखी एखादे झाड आहे का रे' विचारले. तेव्हां गंगाधरने त्याच्याकडचे सर्वात मोठे चिंचेचे झाड होते ते त्याला दाखविले.

काही दिवसांनी गंगाधरने गणेशला बोलावून विचारले—"काय रे बुवा! तू ज्या झाडाची पाने तोडून नेतो आहेस त्या झाडाला पाने आहेत ना अजून?"

"अरे त्या झाडाची पाने संपतीलच कशी? मी मूठभर पालवी तोडून घेतो तर दुसऱ्या दिवशी दोन मुठीभर नवीन पालवी आलेली असते." गणेश म्हणाला.

"मित्रा! तू व मी जे काम केले त्यात एवढाच फरक आहे की तुला प्राप्ती फार कमी होती तेव्हां तू सढळ हाताने खर्च करीत गेलास. मी प्राप्ती चांगली वाढेपर्यंत सावधगिरी बाळगली आणि चांगली वाढल्यावर त्याचा उपभोग करू लागलो. तुझ्या आयुष्याची स्थिती त्या लहानग्या चिंचेच्या झाडासारखी झाली आहे. माझ्या आयुष्यात चिंचेच्या मोठ्या झाडाच्या पालवीसारखी स्थिती आहे." गंगाधर म्हणाला.

"मित्रा! आतां माझे डोळे उघडले. आजपासून मी सावधगिरी बाळगीन व स्वतःच्या मिळकतीवरच स्वावलंबनाने राहण्याचा प्रयत्न करीन." असे सांगून गणेशने आपल्या मित्राच्या सल्ल्याप्रमाणे वागण्याचा निश्चय केला.





# घाबरट भटजी

एका गावी सोमनाथ नावाचे एक भटजी रहात असत. ते प्रत्येक लहान सहान गोष्टीबद्दल घाबरून जात. एकदा शेजारच्या गावी लग्न होते. सोमनाथ भटजींनाच पौरोहित्यासाठी बोलाविले होते. पण ते होते घाबरट. म्हणून पहाटे कोंबडा आरवण्यापूर्वीच त्यांची झोप मोडली. शेजारच्या गावी निघण्यापूर्वी बायकोला हाक मारून दार बंद करून घ्यायला सांगितले. म्हणाले—"जरा सावधगिरी बाळग. दार लावून घे. चोर आहेत, लक्ष ठेव!" सोमनाथ भटजींच्या बायकोने उठून दारबंद करून कडी लावली व पुन्हां झोपली.

चोरांनी भटजी म्हणाले ते ऐकले. त्या दिवशी त्यांच्या हाती काही लागले नाही. सोमनाथ भटजी निघून गेले. घरात फक्त त्यांची बायको होती. उजाडायला अजून एक प्रहर रात्र बाकी होती. चोरांनी विचार केला या भटाच्या घरी फार तर तांदूळ मिळतील. तरी त्यांनी भिंतीला भोक पाडले.

इतक्यात सोमनाथ भटजी परत आले. त्यांनी दाराची कडी बाहेरून वाजविली आणि बायकोला दार उघडायला सांगितले. बायकोने कडी काढली तेव्हां ते म्हणाले—"मी आपली पगडी विसरून गेलो होतो." असे सांगून पगडी डोक्याला घालून भटजी पुन्हां निघून गेले. त्यांच्या बायकोने पुन्हा दार बंद करून कडी लावून घेतली आणि झोपली. सोमनाथ भटजींची बायको झोपेपर्यंत चोरांनी काही हालचाल केली नाही. नंतर काळोखात चाचपडत तांदुळाचे पिंप शोधू लागले. ते त्यांना सापडले. त्यांनी एक चादर जवळ अंथरली आणि तीत तांदूळ बांधून न्यायचा विचार केला.

इतक्यात सोमनाथ भटजी पुन्हां आले आणि बायकोला उठविलें. तिने उठून विचारले–"आतां काय विसरलात ?"

"मी पिशवी विसरून गेलो होतो. तेवढी आणून दे." भटजी म्हणाले.

त्या प्रमाणे त्यांच्या बायकोने घरात तांदुळाच्या पिंपाजवळून जाऊन काळोखातच खुंटीवरची पिशवी काढून नेऊन भटजीबुवांना दिली आणि पुन्हा दरवाजा बंद करून घेतला. पिशवी साठी सोमनाथ भटजींची बायको तांदुळाच्या पिंपाजवळ येत असलेली पाहून चोर जरा कोपऱ्यात सरकून उभे राहले होते. त्यांनी अंथरून ठेवलेली चादर पायाला लागली ती उचलून नेऊन भटजींची बायको पांघरुणासारखी अंगावर घेऊन झोपली.

थोडा वेळ सोमनाथ भटजींची बायको झोपी जाईपर्यंत त्यांनी वाट पाहिली आणि पुढे येऊन पिपातून तांदूळ काढून जेथे त्यांनी चादर अंथरून ठेवली होती तेथे ओतू लागले. पिंप जवळ जवळ रिकामे होत आले होते. गाठोडे बांधण्यासाठी चादरीची चार टोंके ते पाहू लागले, पण तेथे चादरच नव्हती. तेव्हां, आपण जमिनीवरच तांदूळ ओतल्याचे त्यांच्या लक्षात आले. आता पुढे काय करावे या विचारात चोर पडले असतां नेमके त्याच वेळी सोमनाथ भटजी पुन्हा आले आणि त्यांनी पुन्हां दाराची कडी वाजविली. बायकोने उठून दार उघडत विचारले–"उजाडले का हो? मी आंघोळ करून सैपाकाला लागते."

ते ऐकून चोर घाबरले आणि आलेल्या वाटेने पळून गेले. त्या गर्दीत ते बरोबर आणलेली पैशांची पिशवी पण सोमनाथ भटजींच्या घरात विसरून गेले.

सोमनाथ भटजी त्यांना हव्या असलेल्या सर्व वस्तू घेऊन शेजारच्या गावी पोचले. त्यांच्या घाबरटपणाचा त्यांना फायदाच झाला.






# पडकें देऊळ

## [ ३१ ]

[ वृश्चिक नायक शिखीमुखशी द्वंद्वयुद्धात हारला. परंतु शिखीमुखने त्याला क्षमा करून आपला मित्र करून घेतले. त्यानंतर सर्व दरीत उतरू लागले. सर्वांनी मिळून हत्तींच्या कळपाला पळवून लावले. जांगलाला वाटले की झाडावर अडकून असलेली मनुष्याकृती अस्वलाची किंवा नांगसोमची असावी. पुढे– ]

जांगला झपझप झाडावर चढू लागला व बाकी सर्व झाडाखाली उभे राहून तो काय म्हणतो याकडे उत्कंठेने पाहू लागले. जांगला झाडावरून सर्वांना ऐकू जाईल एवढ्या मोठ्याने म्हणाला–"शिखी धनी! नांगसोमच बेशुद्ध होऊन पडला आहे. त्याचा श्वासोच्छ्वास चालू आहे. एका दोघां जणांना पाठवून या वर, म्हणजे याला खाली उतरवून आणतां येईल."

जांगलाच्या तोंडून ते वाक्य बाहेर येण्याची खोटी, वृश्चिक जातीचे दोघे वीर झाडावर चढून गेले. त्यांनी नांगसोमला वेलांच्या दोरखंडांनी छान बांधून खाली जमिनीवर सोडले.

शिखीमुख व विक्रमने नांगसोम मेला की जिवंत आहे याची खात्री करून घेतली. त्याच वेळी वृश्चिक नायक काही रानटी वनस्पती घेऊन आला व त्यांचा रस चोळून

नांगसोमच्या नाकात घातला. दुसऱ्या क्षणाला नांगसोम जोराने शिंकला.

तो शुद्धीवर आला असावा असे समजून शिखी म्हणाला–"नांगसोम! तू डोंगराच्या टोकावरून खाली पडलास, पण देवाच्या कृपेने झाडावर अडकून राहिल्याने तुला जास्त लागले नाही. आम्हांला हायसे वाटले."

शिखीमुखने त्याची कंबर धरून बळजबरीने त्याला खाली बसविले आणि म्हणाला–"विक्रम! मला वाटते, उन्मत्त काताचा नशा अजून उतरलेला नाही. काय करावे बुवा!"

विक्रमकेसरी त्याचे उत्तर म्हणून काही बोलणार इतक्यात त्यांना "वांचवा! वांचवा!" असा केविलवाणा आवाज ऐकू आला.

सर्वांनी तिकडे पाहिले. कुत्रा जोरजोराने भुंकू लागला. शिखीमुख चकित होऊन म्हणाला–"हा आवाज त्या राक्षसाचा तर नाही? पुजारीच असावा!"

त्यानंतर तो आपली तलवार सावरून त्या आवाजाच्या दिशेने निघाला. शिखीमुख वडाच्या झाडाच्या सावलीतून जास्त उजेडात आला. ज्या बाजूने आवाज येत होता त्या बाजूला त्याने जास्त लक्ष देऊन पाहिले. त्याचवेळी पुन्हां त्याला तोच आवाज ऐकू आला–"वांचवा! वांचवा!" या वेळी त्यांना त्या आवाजात जणुंकाही शेवटच्या आरोळीचा भास झाला..

"विक्रम! हा आवाज निश्चितच त्या पुजाऱ्याचा आहे, मला तरी त्यांत शंका नाही. तो कोणत्या तरी भयंकर संकटात सांपडलेला दिसतो आहे." शिखीमुख म्हणाला.

विक्रम बोलणार इतक्यात कुत्रा झुडपांवरून उड्या मारीत पुढे जाऊन भुंकू लागला. सर्व त्याच्या पाठीमागून झाडीतून बाहेर आले. तेथे त्यांच्या नजरेस एक भयंकर दृश्य पडले. ते पाहून सर्व भयभीत व थक्क होऊन किंकर्तव्यविमूढ स्थितीत जागच्या जागी उभे राहिले.

एका अजगराने पुजाऱ्याला गुडघ्यापर्यंत गिळले होते. पुजारी आपल्या दोन्ही हातांनी जमिनीवरची कोणती तरी वस्तु घट्ट धरून स्वत:ला सोडविण्याचा प्रयत्न करीत असलेला दिसला.

"हा पुजारी किती दुष्ट असला तरी तो मनुष्य आहे आणि त्याला या अजगराच्या तोंडातून वाचविण्यात माणुसकी आहे." असे म्हणत शिखीमुख झपझप पावले टाकीत पुढे गेला. त्याने तलवारीने सापाचे दोन तुकडे केले. त्या आकस्मिक घटनेमुळे साप तोंड वासून तडफडू लागला त्यामुळे पुजारी वांचला. शिखीमुख व वृश्चिक जातीच्या लोकांनी दगडाधोंड्यानी सापाला ठार केले.

शिखीमुख व विक्रमकेसरी पुजाऱ्याच्या जवळ गेले. पुजारी सांपाच्या तोंडातून वांचला होता तरी त्याच्या दोन्ही पायांतून रक्ताच्या धारा येत होत्या. त्याच्या पायांकडे पाहवत नव्हते. इतके भयंकर दृश्य होते ते दोन्ही पायांचे मांसच काय ते दिसत होते. तो तडफडत होता. त्याने



दोन्ही हातांनी काही तरी घट्ट धरून ठेवले होते.

शिखीमुख खाली वांकून त्याला धरून बसवू लागला तेव्हां पुजारी कण्हत म्हणाला– "शिखी! मला येथेच मरू दे. मरण येण्यापूर्वी मला कसा का होईना, पडक्या देवळाचा शोध लागला. माझी मंत्रशक्ती आणि शिथिलेश्वरीवरची माझी भक्ती फुकट गेली नाही."

"तुला खरोखरच पडक्या देवळाचा शोध लागला का? कोठे आहे ते? मरणापूर्वी तरी आपला घमेंडखोरपणा सोड!" शिखी म्हणाला.

शिखीमुख थोडा दरडावूनच ते वाक्य म्हणाला होता. म्हणून पुजाऱ्याने शिखीमुखकडे आर्जवी नजरेने पाहून विचारले– "तुझ्या नजरेत मी एक दुष्ट, लुच्चा आणि दगा करणारा मात्र आहे, एवढेच ना? त्या शिथिलेश्वरीची कृपा संपादन करण्यासाठी मला, नको ते सर्व करावे लागले, काही लोकांना कष्ट द्यावे लागले. त्या देवीसमोर मला मनुष्याची काही किंमत वाटत नाही. हे पहा, पडक्या देवळाचे शिखर! असे म्हणत त्याने आपले दोन्ही हात बाजूला केले.

त्यापूर्वी पुजाऱ्याने दोन्ही हातात काय धरले आहे हे शिखीमुख किंवा विक्रम दोघांपैकी कोणीच पाहिले नव्हते. आतां त्यांना सूर्यप्रकाशात डोळे दिपवून सोडणारा कलश दिसला. सर्व थक्क होऊन तिकडे पहात राहिले. वृश्चिक जातीच्या लोकांनी त्या कलशाला पाहून साष्टांग नमस्कार केला.

एक दोन मिनिटे कोणीच कोणाशी काही बोलला नाही. शिखीमुखला वाटले की पुजाऱ्याने मंत्रबित्र तर टाकला नाही सर्वांवर? विक्रमकेसरीला काय वाटले नकळे, तो घाई घाईने कलशाजवळ पुढे गेला, दोन्ही हातांनी तो कलश धरला व हालवण्याचा प्रयत्न करू लागला. पण तो मुळीच हलला नाही.

ते पाहून पडक्या देवळाचा पुजारी त्या मरणासन्न स्थितीतही जोराने हसला आणि म्हणाला–"धाकट्या विक्रमा! तुला ही एक उपडी परात किंवा पितळी तसराळे आहे असे वाटले का? ऐक, मी तुम्हांला खरी गोष्ट काय ती आता सांगतो. मी तुझ्या आजोबांना चांगला ओळखत होतो. त्यांचा हट्टी स्वभाव तुझ्यात पुरेपूर उतरला आहे."



"पुजाऱ्या! म्हणजे सर्व देऊळ जमिनीखाली खचले आहे, असे का तुझे म्हणणे आहे?" शिखीमुखने विचारले.

कित्येक वर्षांपूर्वी भूकंपात हे देऊळ जमिनीखाली धसले आहे. काही फूट हे जमिनीत धसले व त्यानंतर माती आणि दगड दरड कोसळून त्यावर जमा झाले. हे दगड व माती काढून दूर केली तर देऊळ शाबूत वर येईल आणि शिथिलेश्वर देवीचे दर्शन घडेल. शिखी! पण तुम्हां शबर जातीच्या लोकांना या देवीशी काय करायचे आहे? तुम्हांला त्या देवळांतला सोन्याचा सांठा हवा आहे, होय ना?" पुजारी जणुकाही त्यांच्या तुच्छ वृत्तीचे वर्णन करण्यासाठीच जणुकाही हे सर्व म्हणाला.

शिखीमुखने विक्रमकडे सहेतुक एकदाच पाहिले. पुजाऱ्याचा हेतु इभ्य जातीच्या लोकांच्या व वृश्चिक जातीच्या लोकांच्या नजरेस ती तुच्छता आणून देण्याचा असावा. आता या पुजाऱ्याविषयी काय करावयाचे या विचारात सर्व असता नागसोम एकेक पाऊल पुढे टाकीत पुढे गेला आणि कलश हातात धरून त्याच्याकडे पाहू लागला. त्याला एकाएकी जणु काही अंगात आल्यासारखे झाले.



नांगसोम सुस्कारा सोडून म्हणाला–"विक्रम धनी! उन्मत्त काताचा नशा आता उतरला आहे. या कलशाचा काही तरी महिमा असावा. याच्या खाली देऊळ आहे यात मलादेखील शंका नाही. हे दगड व माती आपण काढू या."

"हे काम वाटते तेवढे सोपे नाही. तरी करावे लागणारच. काय शिखी! तुला काय वाटते?" विक्रमने विचारले.

"वाटेल तितके कष्ट सहन करावे लागले व वाटेल तितके दिवस लागले तरी हे काम आपल्याला करावे लागणारच. इतक्या दूर येऊन पडक्या देवळात प्रवेश केल्याशिवाय आपण परत कसे काय जायचे? तुझ्या आजोबांच्या आत्म्याला शांती कशी मिळेल? तुझ्या वडिलांच्या आज्ञेचे पालन नाही का करावयाचे?" असे म्हणत शिखी विक्रमला हळूच म्हणाला–"पण या पुजाऱ्याचे काय करायचे? आपल्या जातीच्या लोकांची मने हा आपल्या विरुद्ध बिथरवण्याचा प्रयत्न करतो आहे."

नांगसोमने शिखीमुख म्हणाला ते ओळखल्यासारखे दिसले. तो स्मित करून पुढे येत म्हणाला–"या पुजाऱ्याच्या दोन्ही पायांची चटणी झाली आहे. त्याला वात होईल व आपल्या पापाची फळे भोगत हा मरेल. त्याच्या बोलण्याकडे कशाला लक्ष देता? हा कलश पडक्या देवळाचाच आहे, मला मुळीच शंका नाही."

"आपण सर्वांनी मिळून हे दगड व माती काढून हे देऊळ उजेडात आणले नाही तर काय उपयोग? हे काम एक दोन दिवसात होणारे नाही. आपणा सर्वांना येथे जवळच वस्ती करावी लागेल. त्यासाठी चला, आपण झोपड्या बांधू या आणि नंतर हे काम करू या." शिखीमुख म्हणाला.

नांगसोमने होकारार्थी मान हलवून वृश्चिक जातीच्या लोकांकडे पाहिले.





वृश्चिक नायक हात जोडून शिखीमुख-समोर येऊन उभा राहिला. शिखीमुखने, त्याने काय करायचे ते त्याला सांगितले. शिखीमुख म्हणाला ते सर्व ऐकून वृश्चिक नायक म्हणाला–"शिखी धनी! येथे झोपड्या बांधून तयार करणे तेवढे कठीण नाही. हे दगड व धोंडे बाजूला सारणे हेच मोठे काम आहे एका दोघा हत्तींना माण-साळवून तेवढे काम करवून घेणे कठीण नाही." नंतर पुजाऱ्याकडे बोट दाखवून म्हणाला–"हा तर आता थोड्या वेळाने मरणारच आहे, परंतु औषधपाणी केल्या-शिवाय ह्याला मरू देणे बरोबर होईल का?"

"बरोबर आहे तुझे म्हणणे तुला काही औषधी वनस्पतींची माहिती असेल तर कर औषध पाणी. मी ती गोष्ट पार विसरून गेलो होतो." शिखीमुख म्हणाला.

वृश्चिक नायकाच्या आज्ञेने त्याचे अनुयायी झाडीतून काही वनस्पती घेऊन आले आणि त्या वाटून पुजाऱ्याच्या पायांना बांधू लागले. पण पुजारी त्यांना औषध लाऊ देईना. म्हणाला–"मला एखाद्या झाडाला पाळणा बांधून त्यात बसवून ठेवा."

त्यानंतर नम्रपणे तो पुन्हां म्हणाला–"आता आणखी चार दिवसांपेक्षां जास्त दिवस मी जगेनसे वाटत नाही. तोंपर्यंत तुम्ही पडके देऊळ शोधून काढा. मी शिथिलेश्वरीचे दर्शन करून प्राण सोडीन."

मरणासन्न व्यक्तीची इच्छा पुरी करणे आपले कर्तव्य आहे, असे समजून शिखीमुख व विक्रमने तशी व्यवस्था करण्यास वृश्चिक अनुयायांना सांगितले. त्यांनी पुजाऱ्याच्या पायाला औषधी वनस्पती लावून वर पट्टी बांधली आणि जवळच्या एका झाडाला एक जुजुबी पाळणा टांगून त्याला त्यात बसविले.

त्या दिवशी संध्याकाळपर्यंत सर्वांनी मिळून पडक्या देवळाच्या शिखराच्या आजू-













बाजूची झाडे झुडपे तोडून फांद्या व पानांच्या झोपड्या बांधून तयार केल्या. त्या दिवशी रात्रभर कोणालाच झोप लागली नाही. कारण रात्रभर हत्तींच्या आणि रानटी श्वापदांच्या ओरडण्याचा आवाज ऐकू येत होता. झोंपड्यांच्या चारी बाजूला शेकोट्या पेटवून व मोठा जाळ करून त्यांनी रात्र कशीबशी घालविली.

दुसऱ्या दिवशी सूर्योदय होताच सर्वांनी वेलांचे दोरखंड तयार केले आणि मोठमोठे दगड व शिळा ओढून बाजूला सारण्याचे काम सुरू केले. त्यांच्या कामात मधून मधून हत्ती विघ्न घालीत होते. त्यांना डफ वगैरे वाजवून दगड गोटे फेंकून व आरडा ओरडा करून ते पळवीत पण होते. सूर्यास्त होई-पर्यंत त्यांच्या कामात तसे मोठे विघ्न आले नाही. शिखीमुखने त्या दिवसाचे काम थांबवून सर्वांना खायची प्यायची तयारी करायला सांगितले. ठीक त्याच वेळी त्यांच्या चारी बाजूच्या उंचवट्यावर त्यांना चार हत्ती दिसले. त्यांच्या पाठीवर एकेक त्रिशूलधारी भयंकर वेष धारण करून बसलेला होता.

शिखीमुख आणि विक्रमकेसरीने आपल्या अनुयायांना सावध केले. सर्व शस्त्रास्त्रे घेऊन सज्ज उभे राहले. पण हत्तीवर बसलेले लोक ओरडून म्हणाले—"तुम्ही सर्व आहांत तेथेच उभे रहा. एक पाऊल देखील पुढे टाकलेत तर आमच्या पाठीमागे शंभर हत्तींवर आणखी अघोरी तयार उभे आहेत. तुम्ही कोणी पळण्याचा प्रयत्न केलात तर तुमचा जीव धोक्यात पडेल हे विसरू नका."

शिखीमुख व विक्रमकेसरीने, आतां पुढे काय अशा प्रश्नार्थी वृश्चिक नायकाकडे पाहिले. ते दोघे आपापली हत्यारे सावरून त्रिशूलधारी अघोरी उभे होते तिकडे निघाले.

(चालू)



# विचित्र स्वभाव

विक्रमादित्याने हट्ट सोडला नाही. तो पुन्हां झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले व स्मशानाच्या दिशेने मौनपणे चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा! तू अवेळी या मध्यरात्रीच्या सुमारास इतके कष्ट कां करतो आहेस, हे मला कळत नाही. पण मला त्यात आश्चर्य वाटत नाही. कारण काही लोकांच्या वागण्याचा काही अर्थच नसतो. त्याचे एक उदाहरण म्हणून मी तुला तरुण नावाचे एका तरुणाची गोष्ट सांगतो. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

तरुणाला कोणी जवळच्या नात्यातले नव्हते. गुरुकुलात विद्याभ्यास संपवून तो आपले जन्मस्थान विभास या गावी निघाला. तेथे लग्न करून रहावे व काहीतरी उद्योग-धंदा करावा, असा त्याने विचार केला.



विभास हे एक मोठे तीर्थक्षेत्र होते. त्या गावाच्या पूर्वेला एका ऊंच डोंगरावर चामुंडीचे देऊळ होते. देवीच्या दर्शनासाठी दररोज लोकांची गर्दी असे. अशा जागी तरुण सारख्या सुशिक्षित तरुणांना काम मिळणे कठीण नव्हते. या शिवाय ते क्षेत्र तरुणच्या वाडवडिलांचे मूळ गावपण होते.

तरुण गुरुकुलातून परत आपल्या गावी येत असतां त्याला गावाबाहेर लोकांची गर्दी दिसली. सर्व लोक आश्चर्यचकित होऊन काही तरी पहात होते. तरुणदेखील गर्दीत सामील होऊन गंमत पाहू लागला. ते दृश्य पाहून तरुणने आपले तोंड फिरविले. त्याला ते घृणित दृश्य पाहवेना.

एक रानटी जातीचा मनुष्य एका काठीने सांपाला दाबून ठेवून मधूनमधून त्याला मारीत होता आणि पुन्हां सापाला सोडून देत होता. साप थोडे अंतर चालून गेला की पुन्हां काठीच्या टोकाखाली त्याला धरून पुन्हां मारीत होता. त्याचा तो क्रूर खेळ पाहून लोकांना गंमत वाटत होती आणि सर्व टाळया वाजवून हसत होते.

परंतु तरुणला त्या रानटी मनुष्याचा तो क्रूर खेळ पाहून राग आला. तरी तरुणने स्वतःचा राग थोडा आवरून त्याला विचारले–"काय रे तू हा साप विकायला तयार आहेस का?"

त्या रानटी मनुष्याने तरुणकडे चकित होऊन पाहिले आणि थट्टेने विचारले–"हा ब्रह्मचारी कोण आहे? हा साप विकत घेणार आहे, म्हणे!"

तरुणने जवळचे काही पैसे त्या जंगली माणसासमोर फेकले. त्याने ते पैसे उचलून घेतले आणि तरुणला म्हणाला–"या सांपाशी तुला खेळायचे आहे का, तर घे, खेळ!" असे म्हणत त्याने सापाची मुंडी धरली आणि तरुणला देत म्हणाला–"धर, हा घे साप."



सापाबद्दल दया दाखवून तो स्वतः लोकांच्या दृष्टीने मूर्ख ठरला की काय, असे थोडा वेळ तरुणाला वाटले. याशिवाय त्याच्या जवळ जे चार पैसे होते ते त्या जंगली माणसाला त्याने देऊन टाकले होते. म्हणून तो काही बोलल्याशिवाय सापाला घेऊन तेथून निघून गेला. तरुणच्या हातून सुटल्याबरोबर साप झुडपात निघून गेला.

तो साप म्हणजे एक नागकन्या होती. कोणत्या तरी कारणास्तव नागराजाने तिला शिक्षा केली होती. म्हणून तिला जमिनीवर सरपटत चालावे लागत होते. शिक्षेचा अवधी संपल्यावर ती नागकन्या आपल्या घरी परत गेली.. नागकन्येच्या बापाला मुलीकडून तरुणने तिचा जीव कसा वांचविला हे कळले. तो तिला म्हणाला–"मुली! त्या तरुण मुलाने तुझा जीव वांचवून तुझ्यावर जो उपकार केला आहे त्या उपकाराची फेड करावयाची झाली तर तुला भूलोकात जावे लागेल."

"मी त्या तरुण युवकाशी लग्न करून आयुष्यभर त्याची सेवा करण्याचे ठरविले आहे." नागकन्या आपल्या बापाला म्हणाली. ते कळल्याबर तिच्या बापाने तिच्याबरोबर एका दासीला पाठवून तिला आनंदाने निरोप




दिला. दोघी विभास नगरी येऊन पोचल्या. तरुणला नागकन्या भेटली. तरुणने तिच्याशी विवाह करून घेण्यास कबूल केले.

नागकन्येने आपले नाव रूपवती असे ठेवून घेतले. दोघांचा विवाह झाला. रूपवतीचे सौंदर्य तिच्या नावाला साजेल असेच होते. तिच्या बरोबर तरुणचा संसार सुखाचा झाला कित्येक वर्षे तिच्या सहवासात तो राहला तरी रूपवतीच्या रूपात काहीच बदल झाला नाही, या गोष्टीचे त्याला आश्चर्य वाटे.

रूपवतीची दासी रूपवतीबरोबरच, तिचे लग्न झाल्यावरदेखील, कां कोणास ठाऊक, रहात असे.



एक दिवशी चामुंडीच्या पुजाऱ्याने रूपवतीला पाहिले. तो एक मांत्रिक होता. त्याने रूपवतीला पाहल्याबरोबर ती एक नागकन्या असल्याचे ओळखले. म्हणून तो एक दिवशी तरुणला आपल्या बरोबर बाहेर बोलावून घेऊन गेला आणि म्हणाला– "मुला, तू एका नागकन्येशी विवाह केला आहेस, तुला हे कळले नाहीसे दिसते. पण हा विवाह झाला कसा?"

तरुणला ते ऐकून डोक्यावर वीज पडल्यासारखे वाटले. म्हणाला–"गुरुजी! तुम्ही माझी थट्टा तर करीत नाही? तुम्ही म्हणता ते सर्व खरे आहे का?"

"मुला! मी तुझी अशी थट्टा कां करीन? तू एक सुशिक्षित मुलगा आहेस, तरी ती एक मानव स्त्री नाही हे तुझ्या लक्षात कसे काय नाही आले याचेच मला आश्चर्य वाटत आहे." पुजारी म्हणाला.

ते ऐकल्यावर मात्र तरुणच्या हृदयाचा थरकांप उडाला. त्याने अनेक वेळां ऐकले होते, नागलोक विनाकारण मानव जातीशी आपला संबंध जोडीत नाहीत. म्हणून तो पुजाऱ्याला म्हणाला–"गुरुजी! आता मी घरीच जात नाही. मला देवळातच तुमच्या बरोबर रहायला परवानगी द्या."

"ठीक! तूर्त तू एवढेच कर. पुढे काय करावयाचे ते नंतर ठरवू." असे सांगून पुजारी तरुणला आपल्या बरोबर चामुंडी टेकडीवर घेऊन गेले.

पती घरी परत न आलेला पाहून रूपवती घाबरून गेली. ती आपल्या दासीबरोबर पतीच्या शोधार्थ निघाली. शेवटी तिचा पती चामुंडी पर्वतावर गेला असल्याचे तिला कळले. तेव्हां ती पतीच्या शोधार्थ डोंगर चढू लागली. ऊन कडक पडले होते तरी तिकडे दुर्लक्ष करून ती डोंगर चढून गेली. तिने पुजाऱ्याच्या घरी जाऊन, पतीला भेटायला व त्याला घरी घेऊन जायला ती आली असल्याचे सांगितले.

पुजारी तिला म्हणाला–"मुली! तू आता आपल्या पतीचा मोह सोड. त्याची व तुझी भेट या जन्मात तरी शक्य नाही."

रूपवतीच्या तोंडावाटे एक शब्ददेखील बाहेर पडला नाही. ती मान खाली करून आपल्या दासीबरोबर पायऱ्या उतरू लागली. आड उभा राहून तरुण तिला पहात होते.

रूपवती आपल्या दासीबरोबर डोंगर उतरून खाली गेली आणि एका झाडाच्या सावलीत बसून रडू लागली. त्याच वेळी कोणीतरी धावत तिकडे येत असल्याचा आवाज त्यांना ऐकू आला. दोघींनी माना वर करून कोण येत आहे, पाहिले. तो तरुण होता. तरुण, धावत आल्याने जवळ पोचल्यावर धापा टाकीत उभा राहला. कोणी पाहिले तर काय म्हणेल याचा थोडा देखील विचार मनात आणू न देता त्याने आपल्या बायकोला रडतच मिठी मारली.

त्यानंतर तिघे घरी परतले. त्यांचे पुढील आयुष्य आनंदाचे झाले व संसार सुखाचा झाला.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला– "राजा! तरुणच्या या विलक्षण वागण्याचा अर्थच काय? त्याची बायको नागजातीची





आहे हे कळल्यावर त्याने तिला टाकण्याचे ठरविले होते नाही का? रूपवती त्याचा शोध काढीत डोंगरावर आली तेव्हांदेखील ती आली असल्याचे माहीत असून तो समोर आला नाही आणि आता एकाएकी त्याचे मन कसे काय बदलले कळत नाही. या प्रश्नांचे उत्तर माहीत असून तू दिले नाहीस तर तुला परिणाम माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर छकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील."

ते ऐकून विक्रमादित्य म्हणाला–"तरुण हा सामान्य मनुष्य नसला तरी त्याचा स्वभाव मात्र सामान्य माणसासारखाच होता. रानटी माणसाच्या हातातून सापाला वाचविण्याची इच्छा सामान्य माणसात असणेच शक्य नाही. परंतु ते काम केल्यावर त्याला त्या चांगल्या कामाबद्दल लोकहास्याची भीती वाटली. त्याच प्रमाणे त्याची बायको नागजातीची आहे हे कळल्यावरदेखील त्याचा स्वभाव सामान्य माणसासारखाच असल्याचे प्रत्ययास आले. परंतु त्याची बायको त्याचा शोध काढीत डोंगर चढून गेलेली पाहून आणि तिला आपण न भेटल्यामुळे तिला झालेले दुःख पाहून आणि ती जरासुद्धां न रागवतां परत गेलेली पाहून तरुणमधील सामान्य माणसाहून निराळा मनुष्य जागा झाला. रूपवती फक्त नागजातीच्या स्त्रीसारखी वागली असती तर तिने तरुणला कधीच सोडले असते, तिने त्याच्यावर सूड उडवला असता. परंतु तरुणला त्याच्या बायकोच्या सुस्वभावाची व सुशीलपणाची पारख पटल्यावर त्याचा विचार बदलला. त्यात आश्चर्य वाटण्यासारखे काहीच नाही."

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि पुन्हा झाडाला जाऊन लोंबकळू लागला.

(कल्पित)





# आकाशाचे खुंट

एका गावी हणमंत नावाचा एक मनुष्य रहात असे. तो स्वभावाने अगदी म्हणजे अगदी भोळा होता. त्याचे लग्न झाले नव्हते. लहानसहान कामे करून तो आपले पोट भरी. त्याची शरीरयष्टी बळकट होती.

एकदां रात्री हणमंत जेवणखाण आटोपून खाटेवर पडल्या पडल्या आकाशाकडे पाहू लागला. त्याच्या मनात एक भयंकर कल्पना आली–'लोक म्हणतात की हे आकाश म्हणजे देवाने या जगातल्या लोकांसाठी बांधलेला एक मोठा मांडव आहे. प्रत्येक मांडवाला खांब किंवा खुंट असतात. पण इतक्या मोठ्या मांडवाला एकदेखील खुंट नाही हे कसे काय? एका-एकी हे आकाश आपल्या डोक्यावर कोसळले तर?'

तो विचार मनात आल्याबरोबर हणमंत दचकल्यासारखा उठून खाटेवर बसला. आकाश कोसळले तर आपण त्याच्या खाली चिरडून मरणार. हणमंत धावत सुटला आणि गावाबाहेर येऊन उभा राहला. त्याला एक मोठे वडाचे झाड दिसले. त्या झाडाला पारंब्या होत्या व त्या जमिनीला टेकल्या होत्या. तो त्या झाडाखाली येऊन बसला. त्याला वाटले की आता आकाश कोसळले तरी वडाला ते अडून राहील. तो रात्रभर त्या झाडाखाली बसून राहला.

उजाडल्यावर तो गावात परतला. त्याला जो जो भेटला, त्या प्रत्येकाला त्याने विचारले–"काय हो! प्रत्येक लहान मोठ्या मांडवाला खुंट असतात तर आकाशाच्या इतक्या मोठ्या मांडवाला किती तरी खुंट असले पाहिजेत नाही का? पण एकदेखील नाही. आकाश कोसळले तर आपण त्याच्या खाली चिरडून मरून जाऊ? म्हणून आकाश नाही अशा जागी आपण जाऊ या."

"अरे, याचे तर डोकं फिरल्यासारखं दिसतं आहे!" सर्व असे म्हणत हसू लागले. काहींनी त्याला वेड्यात काढले.

परंतु हणमंतने त्या सर्वांना वेड्यांत काढले. यांना आपल्या जिवाची पर्वा नाही. यांच्याशी काय बोलायचे? आपण मात्र आकाश नसेल अशा जागी जाऊन रहायचे, असे मनाशी ठरवून हणमंत आपल्या गावाहून निघाला.

वाटेत त्याला एक दोघे जण भेटले. त्यांना त्याने त्याला वाटत असलेल्या भीतीची गोष्ट सांगितली. 'या माणसाचे डोके नक्कीच फिरले असावे.' असे मनातल्या मनात म्हणत दोघे पुढे निघून गेले.

ही सामान्य गोष्ट या लोकांना कळू नये, या गोष्टीबद्दल आश्चर्य करीत हणमंत पुढे निघून गेला. बराच वेळ चालत राहिला तरी एक जंगल संपले नाही. हणमंतने वर मान करून पाहिले. त्याला झाडांच्या वरच्या बाजूला आकाश दिसले. त्याने मनात विचार केला की आकाश दिसणार नाही अशा जागीच गेले पाहिजे आणि त्याप्रमाणे तो थांबला नाही, चालत राहिला.

काळोख पडेपर्यंत तो चालत राहिला. रात्रभर एका झाडाखाली राहण्याचे त्याने ठरविले. कारण आकाश पडले तरी झाडावर ते अडकून राहील असे त्याला वाटले. त्या झाडाखाली एक मनुष्य डोळे मिटून बसलेला होता. हणमंत आल्याचा आवाज ऐकून त्या माणसाने डोळे उघडून पाहिले. तो एक योगी पुरुष होता.

हणमंतने त्याला विचारले—"काय हो, आकाश डोक्यावर कोसळू नये म्हणून का तुम्ही या झाडाखाली बसला आहात?"

हा कोणीतरी वेडापीर दिसतो आहे, हे योग्याने ओळखले. त्याने स्मित करून विचारले—"आकाश कां कोसळेल रे?"

"लहानात लहान मांडवाला देखील चार खांब किंवा खुंट असतात. मग हे एवढे मोठे आकाश खांब व खुंट काही नसतां किती दिवस अधांत्री लोंबत राहील?" हणमंतने विचारले.

"ओहो! असं म्हणतोस होय? अरे मुला, आकाशाला खांबखुंट नाहीत असे कोण म्हणतो? आहेत की नाहीत हे मी तुला सकाळी सांगेन. आता तू स्वस्थपणे झोप." योगी म्हणाला.

योगीबुवा म्हणाले ते मान्य करून हणमंत निश्चिंतपणे रात्रभर झोपला. उजाडल्यावर योगीबुवांनी हणमंतला जागे केले व म्हणाले—"मुला! तू आकाशाला खांबखुंट नाहीत असे म्हणाला होतास नाही का? तुझी शंका दूर करण्यासाठी मी एक






गोष्ट सांगतो तसे कर. तू सरळ गेलास म्हणजे तुला एक गाव लागेल. त्या गावात जाऊन प्रत्येक घरासमोर उभा रहा. घर मालकाला पोटभर शिव्या दे आणि त्याच्या कडून भीक मागून आण."

हुणमंत योगीबुवांनी सांगितल्याप्रमाणे गावात जाऊन प्रत्येक घरासमोर उभा राहून घर मालकाला शिव्या देऊ लागला. नोकरांचाकरांनी येऊन त्याला खूप बडविले व हाकलून लावले. कोणी त्याला भीक घातली नाही. तो अगदी निराश झाला. अगदी शेवटचे घर असे मनाशी ठरवून तो एका घरासमोर जाऊन ओरडू लागला. पण आतून कोणीच बाहेर आले नाही. हुणमंतने शिव्यांचा भडिमार सुरू केला.

इतक्यात एक बाई मूठभर तांदूळ घेऊन धावत धावत बाहेर आली आणि म्हणाली– "होय रे बाबा! उशीर झाला मला बाहेर यायला. ही घे भीक." असे सांगून तिने ओंजळीत आणलेले तांदूळ हुणमंतच्या झोळीत टाकले आणि घरात निघून गेली.

हुणमंतला फारच आश्चर्य वाटले. तो ते तांदूळ घेऊन जंगलात परत आला आणि योगीबुवांना जे घडले ते सांगितले.

योगीबुवा स्मित करून म्हणाले– "पाहिलेस? तू शिव्या दिल्यास तरी त्या बाईने तुला भीक घातली. असे लोक हजारात, नाही लाखात जरी एकदोघे निघाले तरी पुरे. असेच लोक आकाशाला धरून उभे राहणारे खुंट होत. मांडवाला चार किंवा सहाच खुंट असतात, पण आकाशाला असे अनेक खुंट असतात. म्हणूनच आकाश डोक्यावर कोसळत नाही.

योगी म्हणाला ते हुणमंतला समजले असावे. त्याने त्या योगीबुवांना नमस्कार केला व त्यांचे आभार मानून त्यांच्याच बरोबर त्यांची व जगाची सेवा करण्यासाठी जंगलातच राहू लागला.






एका गावी दोघे लबाड रहात असत. एकाचे नाव वक्रबुद्धी होते व दुसऱ्याचे दुर्बुद्धी. दोघे लोकांना फसवीत. तोच त्यांचा उदर निर्वाहाचा धंदा होता. दोघे प्रवासाला निघाले. वाटेत जी गावे लागत त्या गावात फसवेगिरी करून ते पैसे मिळवीत व पुढे निघून जात. ते एका गावी येऊन पोचले. त्यांना शेतात एकच एक बैल चरत असलेला दिसला. त्यांनी त्या बैलाला हांकून नेऊन दुसऱ्या एका जागी बांधून ठेवले आणि गावातल्या धर्मशाळेत येऊन बसले. थोड्या वेळाने दुर्बुद्धी गावात निघून गेला.

बैल नाहीसा झाल्याचे बैलाच्या मालकाला कळले. तो बैलाच्या शोधार्थ निघाला. त्याने त्याच्या बैलाला कोणी पाहिला का विचारले. हळू हळू त्याच्या चारीबाजूला लोकांची गर्दी जमा झाली. त्याच वेळी दुर्बुद्धी तेथे आला व म्हणाला–"अहो, धर्मशाळेत माझे गुरु ज्योतिषाचार्य उतरले आहेत. त्यांना जाऊन विचारा, ते तुमची वस्तु कोठे आहे, बरोबर सांगतील."

ते ऐकून बैलाच्या मालकाला देव पावल्यासारखे वाटले. तो इतर गावकऱ्यां-बरोबर धर्मशाळेत गेला. वक्रबुद्धीने शांतपणे सर्व ऐकून घेतले व पेटीतून ताडपत्रे काढून पाहिली, बोटे मोजली आणि डोळे मिटून काही वेळ बसल्यानंतर बैलाच्या मालकाला म्हणाला–"धर्मशाळेच्या उत्तरे-कडे गेलास तर तुला चिंचेचे एक उंच झाड दिसेल. तेथून डाव्या हाताला वळलास की एक आंब्याचे झाड लागेल. तेथेच जवळपास कोठेतरी तुला तुझा बैल नक्की मिळेल."

बैलाच्या मालकाबरोबर दुर्बुद्धी व इतर लोक निघाले. वक्रबुद्धीने सांगितल्या जागी बैल मिळाला. आपल्या गुरूला

ब्रह्मदेशातील एक लोककथा



दक्षिणा म्हणून दुर्बुद्धीने बैलाच्या मालका-जवळून दहा रुपये घेतले.

दोघां लबाडांचा तो धंदा जोराने चालू झाला. दोघे ते गाव सोडून दुसऱ्या गावी निघाले. त्याच वेळी गावचा पाटील धावत त्यांच्याकडे आला आणि हात जोडून म्हणाला—"मी आपल्याच दर्शनासाठी आलो होतो." असे सांगून त्याने येण्याचे कारण सांगितले. पाटलाची पानांच्या विड्यांची सोन्याची डबी चोरीला गेली होती. ती डबी कोणी नेली हे सांगून परत मिळविण्याची युक्ती ज्योतिष्यांनी सांगावी, अशी पाटलाने विनंती केली.

वक्रबुद्धी थोडा वेळ चकित होऊन पाहू लागला. पण तो वस्ताद होता. म्हणाला—"ही वेळ वर्ज्य आहे. या वेळी ज्योतिष सांगणे कठीण. मी पंचांग वगैरे काही पाहू शकत नाही. म्हणून तुम्ही उद्यां सकाळी या. मी कोणी चोरी केली व चोरीचा माल कोठे मिळेल, सर्व सांगतो." म्हणून पाटीलबुवा निघून गेले.

त्यानंतर दोघां लबाडांनी परस्पर सल्ला घेतला. दुर्बुद्धी म्हणाला—"मित्रा! या गावातून पाय काढला पाहिजे."

"होय रे, पण आतांच निघालो तर लोकांना कळेल. मध्य रात्र उलटून गेल्यावर जाऊ." वक्रबुद्धी म्हणाला.

तिकडे पाटलाने घरी पोचल्यावर ज्योतिषीबुवांनी चोरीचा पत्ता लावून देण्याचे कबूल केल्याचे सांगितले आणि म्हणाला—"उद्या सकाळपर्यंत डबी नक्कीच परत येईल."

पाटलाकडे 'प्रारब्ध' नावाचा एक नोकर राहात असे. त्यानेच ती डबी चोरली होती. ज्योतिषी म्हणाला ते ऐकून त्याच्या छातीत धडकीच भरली. त्या दिवशी रात्री तो धर्मशाळेच्या बाजूला फिरत फिरत निघाला व ते दोघे लबाड आपल्या खोलीत काय बोलत होते हे खिडकीला कान लावून ऐकू लागला.

"आपण तेव्हांच निघून जायला पाहिजे होते. काळोखात चोरांसारखे पळून जाणे मला नाही आवडत." दुर्बुद्धी म्हणाला.

"अरे "प्रारब्ध' आहे, हे 'प्रारब्ध'! आणखी कोणाला नावे ठेवण्यात काय अर्थ आहे?" वक्रबुद्धी म्हणाला.

नोकराला इतर गोष्टी स्पष्ट ऐकू आल्या नाहीत. 'प्रारब्ध' शब्द त्याला छान ऐकू आला. तो थर थर कापू लागला. तो दोघां लबाडांच्या खोलीत जाऊन त्यांचे पाय धरून म्हणाला—"मला जीवदान द्या. मीच चोरली होती पानाची डबी. मला लोकांनी संशयावरून इतर नोकरांबरोबर खूप मारले होते. पण मी चोरी कबूल केली नाही. पण आता तुम्ही मला पकडवून देण्यापेक्षां माझ्या धन्याला ती डबी कोठे आहे हे सांगा. मी डबी कोठे ठेवली आहे ते दाखवितो. मला जीवदान द्या."

"अस्सं! सांग तर!" वक्रबुद्धी म्हणाला. प्रारब्धने पानाची डबी त्याने कोठे पुरून ठेवली होती ते सांगितले आणि निघून गेला.

दुसऱ्या दिवशी उजाडताच पाटील बुवांनी येऊन विचारले तेव्हां वक्रबुद्धी म्हणाला—"तुमची पानांची डबी एका















जागी पुरून ठेवलेली आहे. स्मशानातल्या छतरीच्या पायऱ्यांजवळ खणून पहा."

पाटलाने लगेच स्मशानातल्या छतरीच्या पायऱ्यांजवळ खणून पाहिले तर तेथे त्याला ती डबी सापडली. त्याने खूष होऊन ज्योतिष्याला शंभर रुपये बक्षिस दिले व त्या दिवशी रात्री त्या दोघां भामट्यांच्या सत्कारार्थ एक मेजवानी ठेवली.

सर्व जेवायला बसले असता राजाच्या एका अधिकाऱ्याने पाटलाला राजाचा निरोप पोंचता केला. तो असा तीन दिवसांपूर्वी राजधानीच्या बंदरात सात व्यापारी गलबते येऊन पोंचली. त्यांवर फार मूल्यवान वस्तू आहेत. गलबतांच्या मालकाने राजाजवळ एक पैज लावली होती. गलबतांच्या मालका-जवळ एक लोखंडी डबी आहे. ती डबी उघल्याशिवाय डबीत काय आहे हे राजाने सांगितले तर मालासकट सर्व गलबते राजाला मिळतील. पण राजा सांगू शकला नाही तर राजाने आपले सर्व राज्य गलबतांच्या मालकाला दिले पाहिजे.

राजाच्या दरबारात पुष्कळ ज्योतिषी होते. त्याशिवाय सर्व गलबते मालासकट फुकटात मिळत आहेत, तेव्हां राजाचे मन लोभाला बळी पडले. म्हणून राजा त्या पैजेला तयार झाला. परंतु राजाच्या ज्योतिष्यांनी जेव्हां पैजेच्या अटी ऐकल्या तेव्हां त्यांच्या तोंडचे पाणीच उडाले. ते म्हणाले—"आम्ही वर्तमान, भूत, भविष्य काही ही सांगू शकतो. पण एका बंद पेटीत काय आहे हे नाही सांगता येणार आम्हांला." एकंदर चार दिवसांचा अवधी होता. म्हणून राजाला आपले राज्य हातचे जाणार असे वाटू लागले. म्हणून त्याने राज्यातल्या सर्व पाटलांकडे निरोप पाठविला की त्यांच्याकडे जो कोणी ज्योतिषी असेल त्याला घेऊन यावे. त्या प्रमाणे राजाच्या अधिकाऱ्याने मेजवानीच्या वेळी पाटलाला कोणी ज्योतिषी आहे का विचारताच त्याने वक्रबुद्धीला विचारले आणि नाइलाजाने दोघां लबाडांना पाटलाबरोबर राजधानीत जावे लागले.

राजधानीत दोघांचे आदरातिथ्य राजसी थाटाने झाले. पैजेचा अवधी संपायला एकच रात्र उरली होती. दुसऱ्या दिवशी राजाने उत्तर सांगितले नाही तर त्याचे राज्य जाणार हे निश्चित होते. ज्योतिष्यांनी बंद डबीत काय आहे हे बरोबर सांगितले नाही तर दोघांची डोकी उडविण्यास राजाने आज्ञा करून ठेवली होती. म्हणून दुर्बुद्धी आपल्या मित्राला म्हणाला—"मित्रा! रात्रीच्या रात्री सर्वांची नजर चुकवून पाय काढला पाहिजे."

"अरे पण पळून जाणे शक्य आहे का आपल्याला? राजाचे नोकर आपल्याला हुडकून काढतीलच आणि आपल्याला कुत्र्या मांजरासारखे मरावे लागेल. या पेक्षा आपण समुद्रात उडी टाकून जितका वेळ पोहतां येईल, पोहत राहू. नंतर जलसमाधी ही आहेच." वक्रबुद्धी म्हणाला.

असा विचार करून दोघे काळोख पडल्यावर समुद्रकाठी गेले. समुद्रात पोहोत पुढे जाऊ लागले. थोड्या अंतरावर गलबते



उभी होती. एका गलबतात कोणी बोलत असल्याचा आवाज ऐकून दोघे कानोसा घेत तेथेच गलबताला धरून उभे राहले.

एका मुलीचा आवाज होता—"आजोबा! सांगा न! त्या लोखंडी डबीत काय आहे?"

"पोरी! तुला ग काय करायचे आहे? जाऊन झोप कशी!" गलबताचा मालक आपल्या नातीला म्हणाला.

"पेटीत काय आहे, हे सांगितलेत तरच मी झोपेन. नाही तर नाही झोपणार." मुलीने हट्टच धरला.

"अग! उजाडल्यावर मी तुला पेटीच उघडून दाखवितो. तूच पहा, आत काय

       

आहे ते." आजा तिची समजूत घालीत होता. पण मुलगी हट्टालाच पेटली तेव्हां आजा म्हणाला–"अग त्या लोखंडी पेटीत आणखी एक पितळी डबी आहे. पितळी डबीत एक चांदीची डबी आहे. चांदीच्या डबीत एक सोन्याची डबी आहे आणि त्या डबीत अत्तराची बाटली आहे. कळलं ना? आतां स्वस्थ जाऊन झोप कशी!" मुलगी ते ऐकल्यावर जाऊन झोपली.

दोघां लबाडांनी पण ते सर्व ऐकून घेतले आणि पोहोत परत किनाऱ्यावर येऊन आपल्या खोलीत रात्र भर स्वस्थ झोपले. उजाडतांच त्यांनी लोखंडी डबीचे गुपित राजाला सांगितले. गलबताच्या व्यापाऱ्याला पैज हारल्याबद्दल सर्व गलबते राजाला द्यावी लागली.

राजाने वक्रबुद्धीला आपल्या सर्व ज्योतिष्यांचा प्रमुख म्हणून नेमले. परंतु दोघां लबाडांना ते पद आवडले नाही. कारण कधी न कधी तरी त्यांचा रहस्यस्फोट होणार हे त्यांना माहीत होते. म्हणून त्यांनी एक युक्ती केली.

त्या दिवशी रात्री वक्रबुद्धी राजाजवळ बोलत उभा असता दुर्बुद्धी रडत रडत आला व म्हणाला–"गुरुवर्य! आपले घर जळले हो! ज्योतिषशास्त्रावरचे सर्व ग्रंथ जळून त्यांची राखरांगोळी झाली." असे सांगत त्याने आपले हात दाखविले. हात पोळलेले होते.

"म्हणजे माझे सर्वस्वच गेलं की! आता मी ज्योतिष् शास्त्र काय सांगणार?" वक्रबुद्धी दुःख झाल्याचे दाखवून मान खाली करून बसून राहिला.

"तुम्ही दोघे काळजी कां करता? मी तुम्हांला दोघांना दुसऱ्या चांगल्या हुद्द्यावर नेमतो." राजा म्हणाला. त्यांची ती युक्ती यशस्वी झाली व दोघांनी राजदरबारी मोठ्या हुद्द्यावर कित्येक वर्षे मजेत काढली.





# धूर्त म्हातारी

[२]

दिलैलाने सुफी फकीरणीचा वेष बदलून एका दासीचा वेष धारण केला आणि आपल्या चातुर्याने बगदाद शहरात गोंधळ उडवून देण्यासाठी घराबाहेर पडली.

एका गल्लीच्या टोकापलीकडे जाऊन तिने एकदा चारी बाजूला नजर फिरवून पाहिली तेव्हां तिला एका घरात नाच गाणे चालू असल्याचे दिसले. दिव्यांच्या उजेडात ते घर जास्तच शोभिवंत दिसत होते. घराच्या उंबरठ्यात एक स्त्री एका मुलाला कडेवर घेऊन खेळवत उभी होती. मुलाच्या अंगाखांद्यावर जरीचे मूल्यवान कपडे व हिऱ्या माणकांनी मढवलेले सोन्याचे दागिने होते ते घर बगदादच्या सर्वात मोठ्या व्यापाऱ्याचे होते. व्यापाऱ्याची बायको अतिथिसत्कार करण्यात मग्न होती. मुलगा रडत होता, म्हणून तिने आपल्या दासीला मुलाला खेळवायला बाहेर पाठवून दिले होते. या सर्व गोष्टी दिलैलाने दासीला विचारून तिच्याकडून काढून घेतल्या आणि त्या मुलाच्या अंगावरचे सर्व दागिने व कपडे लुबाडून न्यायचे मनाशी ठरविले.

दिलैला दासीला एक खोटे नाणे सोन्याचे म्हणून सांगून देत म्हणाली–"तुमची जुनी दासी सुलतानाने मालकिणीला सलाम सांगायला पाठविले आहे मला. जरा आत जाऊन सांगून येतेस का?"

ती दासी नाणे कनवटीला ठेवून म्हणाली–"मुलाला घेऊन आत गेले तर मुलगा आईला पाहून रडू लागेल."

"मी पाहते मुलाला, तू जाऊन आत सांगून ये." दिलैला म्हणाली.

रा. ना. सावंत



दासी घरात गेल्यावर दिलैला मुलाला घेऊन एका निर्जन स्थानी गेली. त्याच्या अंगाखांद्यावरचे कपडे व दागिने काढून एका फडक्यात बांधून घेतले आणि मुलाला घेऊन हिऱ्याच्या व्यापाऱ्याकडे गेली. त्या व्यापाऱ्याने मुलाला ओळखले व दिलैलाला विचारले–"काय पाहिजे ग तुझ्या मालकिणीला? इथे मुलाला घेऊन कशी काय आलीस? म्हणून विचारतो."

"मालकिणीच्या मोठ्या मुलीच्या लग्नाच्या गोष्टी चालू आहेत. मुलाकडची मंडळी आली आहेत मुलीला पाहायला. म्हणून बिलवरांच्या दोन जोड्या, पैंजण, हिऱ्याच्या कुड्या आणि एक सोन्याचा कंबरपट्टा मागून आणायला मालकिणीने पाठविले आहे. सर्व मिळून एक हजार दीनारांहून त्यांची किमत कमी असता कामा नये. मी वस्तू मालकिणीला नेऊन दाखविते. पसंत पडतील त्या ठेवून घेतील, बाकी मी परत आणून देईन. मी लवकर जाऊन येते. तोपर्यंत मुलाला येथेच ठेवून जाते." दिलैला म्हणाली.

"मुलाला येथे ठेवून जायची गरजच काय? तसा तो राहला म्हणून हरकतपण नाही." असे तो व्यापारी तिला म्हणाला आणि तिने मागितलेल्या सर्व वस्तू तिला दिल्या. दिलैला त्या सर्व वस्तू घेऊन आपल्या घरी घेऊन गेली.

तिकडे व्यापाऱ्यांच्या प्रमुखाच्या घरी मुलगा हरवल्यामुळे खळबळ उडून गेली. त्याची बायको ओरडत जमिनीवर लोळत होती. पुष्कळ शोध केल्यावर मुलगा जव्हेऱ्याच्या दुकानात मिळाला.

व्यापाऱ्यांच्या प्रमुखाने जव्हेऱ्याला खूप झाडले व म्हणाला–"मुलाच्या अंगावरचे कपडे आणि दागिने कोठे आहेत रे लबाडा? तुला तुरुंगात पाठवीन तेव्हां माझ्या मनाचे समाधान होईल."



"अहो पण, मी काय केले? मी एक हजार दीनार किमतीचे दागिने तुमच्या दासी बरोबर पाठविले. तिनेच तुमच्या मुलाला येथे ठेवून दिले होते. त्याला आता मी काय करू?" जव्हेरी म्हणाला.

जव्हेऱ्याला कोणीतरी धोका दिल्याचे बऱ्याच वेळाने व्यापाऱ्याच्या लक्षात आले. ते आपसात बोलत असता दिलैलाने पूर्वी ज्या तिघांना फसविले होते ते तिघे तेथे तिचा शोध काढीत आले. तेव्हां एकाच म्हातारीने सर्वांना ठगविल्याचे कळले. "त्या दुष्ट म्हातारीची चांगली खोड मोडल्याशिवाय मला चैन पडणार नाही." असे व्यापाऱ्यांचा प्रमुख म्हणाला.

"त्या म्हातारीला पकडायला मी पण बरोबर येतो." जव्हेरी म्हणाला. सर्वांनी विचार करून निरनिराळ्या दिशेने जाऊन म्हातारीला शोधत जायचे आणि हज मसूद नामक न्हाव्याच्या दुकानाजवळ भेटायचे ठरले. दुपारच्या सुमारास त्या तरुण गाढववाल्याला हज मसूदच्या दुकानाकडे जात असता दिलैला दिसली. तिचा वेष पालटलेला होता. तरी त्याने तिला ओळखले आणि म्हणाला–"ए म्हातारे! आता कशी सुटतेस माझ्या हातून, पाहतो!"



"अरे मुला! तू माझ्यावर कोणाचा राग काढतो आहेस?" म्हातारीने त्याला ओळखले नसल्याचे सोंग केले.

"पहिल्याने माझे गाढव कोठे आहे सांग!" गाढववाला म्हणाला.

"कोणावर ओरडतोस रे? मला काय करायचे आहे तुझं गाढव? मी त्याला मसूद न्हाव्याकडे बांधून ठेवले आहे. चल माझ्याबरोबर अन् घेऊन जा आपले गाढव." दिलैला म्हणाली.

दोघे न्हाव्याच्या दुकानात पोचले. त्या गाढववाल्याला बाहेर उभा करून दिलैला न्हाव्याच्या दुकानात गेली आणि मसूदला



म्हणाली—"मुला! आतां तूच मला वांचविलेस तर वांचेन मी."

"मावशी! काय झालं काय हो? सांगाल तरी." हज मसूदने विचारले.

"बाहेर बसला आहे ना, तो माझा मुलगा आहे. तो नुकताच आजारातून उठला. त्याचं डोकंच बिघडलं आहे. त्याच्या लहानपणी आमच्या घरी एक गाढव होते. त्याची आठवण काढून तो सारखा ओरडत असतो. त्याला ठीक करण्याची जबाबदारी तुझी." म्हातारीने विनवण्या करीत त्याच्या हातात एक दीनार दिला.

दीनार मिळाल्यावर न्हाव्याला म्हातारी म्हणाली ते सर्व खरे वाटले, तो म्हणाला—"मावशी! मी त्याचं मुंडण करून डोक्यावर लिंबू चोळतो. दोन तीन वेळा असे केले की डोकं ठीक होईल."

असे सांगून मसूदने दुकानाबाहेर येऊन त्या गाढववाल्या तरुणाला आत बोलाविले.

"माझं गाढव कोठे आहे रे?" त्याने विचारले.

"अरे गाढव कोठे जाते? माझ्याकडेच आहे!" न्हावी म्हणाला.

तो तरुण मुलगा दुकानात आल्याबरोबर न्हाव्याच्या नोकरांनी त्याला धरून त्याचे हातपाय बांधून ठेवले. मसूदने त्याचे मुंडन करून डोक्याला लिंबू चोळले. मुलगा मोठमोठ्याने ओरडू लागला.

मसूद त्या तरुण मुलाच्या डोक्याला लिंबू चोळून आत गेला तर तेथे दिलैला नव्हती. दुकानातले वस्तरे, कात्र्या, आरसे, अत्तराच्या बाटल्या सर्व नाहीसे झाले होते.

मसूद तरुण मुलाजवळ आला व त्याची मान धरून म्हणाला—"काय रे पोरा! कोठे गेली तुझी आई?"

"माझी आई! तिला मरून कितीतरी वर्षे झाली. माझे गाढव परत देतो, म्हणाला होतास ना? दे मग!" तरुण मुलगा म्हणाला. त्याच वेळी इतर लोक दुकानाजवळ येऊन पोचले. सर्व गोष्टी ऐकून घेतल्यावर त्या म्हातारीने मसूदलापण फसविल्याचे सर्वांना कळले. म्हातारीला पकडण्यासाठी जे लोक निघाले होते त्यांच्याबरोबर मसूद न्हावी आणि तो तरुण मुलगा पण निघाले.

ते सर्व गल्लीतून म्हातारीला शोधीत जात असतां गाढववाल्या तरुण मुलाला दिलैला पुन्हां दिसली आणि तो ओरडून म्हणाला—"ती पहा, ती म्हातारी! तिला पळू देऊ नका."

सर्वांनी मिळून दिलैलाला पकडले आणि तिला खालिदच्या घरी घेऊन गेले. त्यांनी खालिदच्या नोकरांना विचारले—"खालिद साहेब आहेत का? त्यांना भेटायचे आहे आम्हांला!"

नोकर म्हणाले—"खालिद साहेब झोपले आहेत. त्यांची झोप मोडेपर्यंत सर्वांनी बसावे. नोकरांनी त्या पांच जणांना बाहेर बसविले आणि दिलैलाला एका खोलीत नेऊन बसविले. दिलैलाला ज्या खोलीत बसविले होते त्या खोलीला





घरात जायला एक दार होते. त्या दाराने दिलैला घरात गेली तेथे एक जिना लागला त्या जिन्याने ती वर गेली. खालिदच्या बेगमला सलाम करून ती म्हणाली–"आपल्या यजमानांनी माझ्याकडून बाराशे दिनारांना माझे गुलाम विकत घेतले आहेत. मी त्यांना घेऊन आले आहे. खालिद साहेब झोपले आहेत ना? त्यांना उठायला वेळ होईल."

"मला ते काही माहीत नाही हो. पण एकदा गुलाम विकत घ्यायचे असल्याचे म्हणाले होते, खरे. आहेत कोठे ते गुलाम?" खालिदच्या बेगमने विचारले.

"ते सर्व बाहेर आहेत. खिडकीतून पहा, दिसतील. सर्व नीट नीटके आहेत." दिलैला म्हणाली.

खालिदच्या बायकोने खिडकीतून डोकावून पाहिले सर्व लोक नीटनेटके दिसले. ती दिलैलाला म्हणाली–"मीच सर्व पैसे दिले असते, पण आतां माझ्याजवळ एक हजार दीनारच आहेत."

"एक हजार दीनार ना? मग बरोबरच झाले. कारण मला खालिद साहेबांनी दोनशे दीनार पूर्वीच दिले होते." दिलैला म्हणाली.

खालीदच्या बेगमजवळून दिलैलाने एक हजार दीनार घेतले व तिला सलाम करून म्हणाली–"मला जास्त वेळ न थांबवून ठेवता तुम्ही पैसे देऊन मोकळे केलेत याबद्दल मी तुमची फार आभारी आहे. गुलामांना कायमचे सोडून जावे लागणार म्हणून मला फार वाईट वाटत आहे. समोरून जायला मला बरे वाटणार नाही. म्हणून मागच्या दारानेच जावे म्हणते."

खालिदच्या बेगमने तिला मागच्या दाराने निरोप दिला.

खालिद उठल्याबरोबर त्याच्या बेगमने गुलाम विकत घेतल्याची गोष्ट सांगितली.



खालिदने चकित होऊन विचारले–"गुलाम खरेदी केले? मी? मी नाही बुवा कोणाला दोनशे दीनार दिले."

"असं काय बोलता हो? मी त्या म्हातारीला एक हजार दीनार देऊन तिच्याकडून विकत घेतलेल्या गुलामांना बाहेर बसवून ठेवविले आहे." बेगम म्हणाली.

खालिद घाईघाईने खाली उतरुन गेला. त्याची वाट पहात दुकानदार, रंगारी, जव्हेरी, न्हावी, मसूद आणि गाढववाला तरुण मुलगा बसलेले दिसले. त्याने चकित होऊन त्यांनाच विचारले. तेव्हां सर्व रागारागाने खालिदला म्हणाले–"काय म्हणतां? आम्ही गुलाम? चला, खलीफांकडे."

त्याच वेळी तेथे मुस्तफा आला. त्याच्या बायकोला म्हातारीने फसविले होते. तो खालिदला म्हणाला–"तुझ्या राज्यात ही पाताळयंत्री म्हातारी कोणा कोणाला कशी फसवीत आली आहे हे माहीत आहे का तुला? माझ्या बायकोला तिने कसे फसविले हे मी काय सांगू?"

खालिद घाबरून गेला व म्हणाला–"हुजूर! त्या म्हातारीला पकडून शिक्षा करण्याची जबाबदारी माझी. तुमचे सर्वांचे जे नुकसान झालं आहे त्याची भरपाई करून देण्याची जबाबदारी पण मी घेतो." असे सांगून त्याने इतर लोकांकडे वळून विचारले–"तुमच्या पैकी कोणी त्या म्हातारीला ओळखू शकेल का?"

"आम्ही सर्व तिला छान ओळखतो. आमच्या बरोबर दहा शिपायांना पाठवा. आम्ही तिला पकडून देतो." सर्व म्हणाले.

दहा शिपाई बरोबर घेऊन पांच ही जण निघाले. थोडे अंतर चालून गेले असतील, त्यांना समोरच दिलैला दिसली. त्यांना पाहून ती पळू लागली. परंतु सर्वांनी मिळून तिला धरले आणि तिचे हात बांधून तिला खालिदसमोर हजर केले. (चालू)



# लग्नाची अट

एका राजकन्येने आपल्या लग्नासाठी एक अट ठेवली. तिच्याशी लग्न करण्याची इच्छा असणाराने तिने विचारलेल्या प्रश्नांची उत्तरे द्यावी आणि उलट प्रश्न विचारून राजकन्येला जिंकावे. राजकुमारी फार सुंदर होती. म्हणून तिच्याशी लग्न करण्याच्या हेतूने अनेक राजकुमार आले व तिच्या प्रश्नांची उत्तरे देऊ न शकल्यामुळे हार मानून परतले.

शेवटी महेंद्र नावाचा एक राजकुमार आला. राजकन्या व महेंद्र यांची प्रश्नोत्तरे होती ती अशी. राजकुमारीने विचारले–"प्राणिमात्राचा मित्र कोण ?"

महेंद्राचे उत्तर होते "सूर्य !"

"आपल्या मुलाचे लालन-पालन करून शेवटी त्याला गिळणारी माता कोण ?"

"भूमाता."

"अर्धी काळी आणि अर्धी पांढरी पाने कोणत्या झाडाला असतात ?"

"पळस ! त्याला तीन पाने असतात." आता प्रश्न विचारण्याची पाळी महेंद्राची होती.

"पुरुषाला कोणत्या गोष्टीबद्दल गर्व वाटतो ?" महेंद्राने विचारले. राजकुमारी आत गेली व परत येऊन म्हणाली–"आपल्या मुलाच्या हाती हारल्याबद्दल."

"स्त्रीला भूषण वाटणारी गोष्ट कोणती ?" महेंद्रने विचारले. राजकन्या यावेळी देखील आत गेली व परत येऊन म्हणाली–"आपल्या पतीच्या हातून हारणे."

"तू माझ्या प्रश्नाची उत्तरे कोणाला विचारून देत आहेस ?" महेंद्रने विचारले. राजकन्या म्हणाली–"तिची आजी सर्व प्रश्नांची उत्तरे देत आहे.

"बरे तर आजीला जाऊन विचार की तू माझ्या प्रश्नाची उत्तरे न देऊ शकल्याबद्दल हारलीस. म्हणून माझ्या बरोबर तू लग्न करशील की नाहीस ?" महेंद्रने विचारले.

यावेळी आजी स्वतः बाहेर आली व म्हणाली–"होय बाळ, तुझे लग्न हिच्याशीच होणार. हारलेली स्त्री त्या पुरुषाशी विवाह करण्यातच भूषण मानते."





# पोलादी किल्ला

एका राजाला एकच एक मुलगा होता. तो लग्नाला योग्य झाला होता तरी त्याने आपल्या लग्नासंबंधी कधी विचारच केला नाही. एकदा राजाने त्याला विचारले– "मुला! तुझे विवाह करण्यास योग्य वय झाले आहे. पण तू लग्नाचा विचारच करीत नाहीस हे कां ?"

"विवाह करण्या योग्य मुलगी कोठे आहे, बाबा!" मुलगा म्हणाला.

"ठीक, तर मी सांगतो ते कर. ही किल्ली घेऊन जा. राजवाड्यावरच्या मजल्यावर एक खोली आहे. ती खोली उघडून पहा. तेथे तुला कदाचित लग्नायोग्य मुलगी मिळेल." राजा म्हणाला.

राजकुमार वरच्या मजल्यावर गेला. ती एक गोल खोली होती. त्या खोलीच्या भिंतीवर अनेक राजकुमारींच्या तसबिरी टांगलेल्या होत्या. त्यातली प्रत्येक तसवीर पहात राजकुमाराने खोलीला जणु काही एक प्रदक्षिणा घातली. त्या सर्व राजकन्या एकीहून एक सुंदर वाटल्या राजकुमाराला. तेवढ्यात त्याला एका कपड्याखाली झाकलेली तसबीर दिसली. त्याने वरचा पडदा बाजूला सारला आणि तसबिरीतल्या राजकन्येच्या रूपाकडे पहात राहीला. ती एक अपूर्व सुंदरी होती. विवाह करा-वयाचा तर तिच्याशीच असे राजकुमाराने ठरविले.

राजकुमार जिना उतरून खाली आला. त्याने राजाला आपला निश्चय कळविला. राजा चिडून जाऊन म्हणाला–"तू पड्या-खालच्या मुलीचे चित्र कां पाहिलेस ? ती एक राजकन्याच आहे, पण एका दुष्ट मांत्रिकाने तिला पळवून नेऊन एका पोलादी किल्लयात टाकले आहे. तिला सोडविण्यासाठी अनेक लोक गेले. परंतु त्यांच्यापैकी एकदेखील



परतला नाही. तू तिच्याशीच विवाह करण्याचे मनाशी ठरविले असलेस तर, जा तिच्या शोधार्थ!"

दुसऱ्याच दिवशी राजकुमार घोड्यावर बसून त्या पोलादी किल्ल्याच्या दिशेने निघाला. तो एका दाट अरण्यात पोचला. कित्येक दिवस घोड्यावर मजल दर मजल करीत राहला तरी जंगल संपेना. वाटेत त्याला एक उंच मनुष्य भेटला. त्याने राजकुमाराला विचारले—"मला आपला नोकर म्हणून ठेवून घेतां का?"

राजकुमाराने त्या उंच मनुष्याला विचारले—"तुला काय काम येते रे?"

"माझे नाव लंबू आहे. मला पाहिजे तितके उंच होता येते. पहा, पाहिजेतर." असे सांगून तो मनुष्य पाहता पाहतां झाडा-एवढा मोठा झाला आणि झाडाच्या फांद्यांत एक दोन पक्ष्यांची घरटी होती त्यांतली अंडी काढून राजकुमाराला दाखवू लागला.

राजकुमार ते पाहून म्हणाला—"ठीक, तू हे जंगल पार कसे होईल याचा काही उपाय सांगशील तर तुझी योग्यता कळेल.

तो लंबू सर्व झाडांहून उंच झाला आणि चारी बाजूला नजर फिरवून म्हणाला—"आपण दक्षिणेकडे गेलो तर लवकर जंगलाबाहेर पोहचू."

त्याने सांगितल्याप्रमाणे राजकुमार त्याच्या बरोबर दक्षिणेकडे निघाला. दोघे जंगलाबाहेर एका मैदानात येऊन पोचले. त्यांना दूर एक मनुष्य दिसला.

"तो मनुष्य माझ्या ओळखीचा आहे. त्याला देखील तुम्ही काम दिलेत तर तो चांगला उपयोगी पडेल." लंबू म्हणाला.

"ठीक, तर मग त्याला बोलाव." राजकुमार लंबूला म्हणाला.

"मी त्याला आपल्या जवळ आणून ठेवले तर?" असे सांगून लंबू उंच लांब झाला. दोन तीन पावले पुढे टाकून त्याने त्या माणसाला उचलले व त्याला राज-कुमाराजवळ क्षणार्धात आणून उभे केले.

तो एक गिड्डा खुजा होता. त्याला पाहून राजकुमाराने विचारले—"कोण रे बुवा तू? तुला काय काय काम करता येते?"

"माझे नाव 'गुंडू' आहे. मला पाहिजे तितके जाड होता येते." तो म्हणाला. त्याने जोराने एक श्वास घेतला आणि जाड होऊ लागला. राजकुमार व लंबू वेळीच बाजूला झाले नसते तर त्याच्या धक्क्याने खाली पडून गेले असते.

"ही विद्या जगात इतर कोणाला अवगत असेलसे मला तरी माहीत नाही. म्हणून तू देखील माझ्याबरोबर चल." राजकुमार गुंडूला म्हणाला. गुंडू श्वास सोडून पुन्हा पहिल्यासारखा गिड्डू झाला.

तिथे ते मैदान पार करून एका डोंगराच्या पायथ्याशी येऊन पोचले. त्याच वेळी त्यांना आणखी एक मनुष्य दिसला. "अरे 'दीर्घ-दर्शी' तो काय तेथे उभा आहे." दोघे लंबू व गुंडू एकदम म्हणाले. त्या दीर्घदर्शीच्या डोळ्यावर पट्टी बांधलेली होती. राज-कुमाराने त्याला विचारले—"काय रे बुवा! तू डोळ्यावर अशी पट्टी बांधून कां ठेवली आहेस? तुला वाट कशी दिसेल?"



"मला सर्व काही स्पष्ट दिसते. मी पट्टी बांधून ठेवली नाही तर माझी नजर पडेल ती वस्तु तत्काळ जळून राख होऊन जाईल." दीर्घदर्शी म्हणाला. असे म्हणताच त्याने एका विशिष्ट दिशेला वळून डोळ्या-वरची पट्टी बाजूला सारली. त्याची नजर एका दगडावर पडली. क्षणार्धात त्या दगडाचा चुरा होऊन गेला. त्या चुऱ्यात त्याला एक सोन्याची कणी दिसली.

राजकुमाराने दीर्घदर्शीला पण आपल्या बरोबर घेतले आणि त्याला विचारले—"काय रे पोलादी किल्ला तुला दिसतो का? येथून किती दूर आहे? त्या किल्ल्यात



काय काय चालले आहे हे सर्व पाहून सांग."

"सूर्यास्तापूर्वी आपण त्या किल्लचात पोहचू. तेथे आपणां सर्वांसाठी सैपाक होतो आहे. राजकुमार एका बुरुजात बंद आहे." दीर्घदर्शी म्हणाला. त्याने सांगितल्याप्रमाणे राजकुमार आपल्या तिघां साथीदारांबरोबर पोलादी किल्लचात संध्याकाळपर्यंत येऊन पोचला किल्लचातून कोणी त्यांच्यासमोर आला नाही. चहूकडे सर्व कसे शांत होते.

राजकुमाराने किल्लचात प्रवेश करून आपला घोडा तबेल्यात बांधून ठेवला आणि त्याला चारा घातला. त्यानंतर सर्व किल्लचातल्या वाड्यात गेले. आत कोणी नव्हते. परंतु एका मोठ्या दालनात त्यांना दगडाच्या काही मूर्ती दिसल्या. त्या मूर्तींवर धूळ सांचलेली होती.

जेवणाच्या खोलीत दिवा होता. चौघां-साठी जेवण तयार होते. चौघांनी जेवून घेतले व काही वेळ विश्रांती घ्यावी असे त्यांना वाटले. तेवढ्यात एक कुबडा तेथे आला. तो म्हातारा होता. त्याच्या डोक्याला टक्कल होते. परंतु त्याची दाढी कंबरेपर्यंत लांब होती. त्याच्या अंगात एक काळा अंगरखा होता. त्यावर तीन पोलादी पट्ट्या होत्या. तो एका स्त्रीचा हात धरून घेऊन येत होता. राजकुमाराने त्या स्त्रीला पाहतांच ओळखले. त्याला पड्याखालच्या तसबिरीत दिसली होती, तीच ती स्त्री होती. तिच्याशीच लग्न करण्याचा विचार करून तो आला होता.

राजकुमार मुलीकडे वळणार हे पाहून म्हातारा कुबडा म्हणाला—"तू कोण आणि कशासाठी आला आहेस हे मला चांगले माहीत आहे. तू हिला घेऊन जाण्यासाठी आला आहेस. आपल्या इच्छेप्रमाणे हिला घेऊन जा. पण एक अट आहे. तीन रात्री तू पहारा दिला पाहिजेस. ही पळून जाता कामा नये. तसे तू करू शकला नाहीस तर तू व तुझे हे तिघे साथीदार दगडाच्या मूर्ती होऊन जातील." राजकुमाराने म्हाताऱ्याची अट मान्य केली. म्हातारा मनुष्य त्या स्त्रीला एका जागी बसवून निघून गेला.

राजकुमार त्या मुलीशी बोलू लागला. पण ती काहीच उत्तर देईना. ती एखाद्या दगडाच्या मूर्तीसारखी एका जागी निश्चल बसली होती. तिला त्या स्थितीत पाहून राजकुमाराला तिची कीव आली. त्या स्त्रीला वाटेल ते कष्ट सहन करावे लागले तरी ते सहन करून तिला सोडवून नेण्याचा राजकुमाराने निश्चय केला.

ती पळून जाऊ नये म्हणून लंबूने आपले शरीर लांब केले व तिच्या बाटेआड चारीबाजूला घेरून पडून राहीला. गुंडूने आपले अंग फुलवून दार असे घट्ट अडवून ठेवले की आत मुंगीला सुद्धा प्रवेश मिळणे शक्य नव्हते. दीर्घदर्शी खोलीच्या मध्य भागी बसून राहीला. राजकुमार स्वतः रात्रभर जागत राहण्याचे ठरवून डोळ्यात तेल घालून व राजकन्येवर दृष्टी ठेवून एका जागी निश्चल बसून राहीला.

काही वेळाने चौघे झोपी गेले. त्यांची झोप मोडली तेव्हां छान उजाडले होते. सर्वात प्रथम राजकुमाराची झोप मोडली.





समोर राजकन्या नव्हती. तो किंकर्तव्य विमूढ स्थितीत आपल्या तिघां साथी-दारांकडे पाहू लागला. तेव्हां दीर्घदर्शी म्हणाला–"मालक! तुम्ही बेफिकीर रहा. मी ती कोठे आहे हे आतां सांगतो." त्याला शंभर मैलावर एका जंगलातल्या वडाच्या झाडाला एका फळाच्या रूपाने लोंबत असलेली राजकन्या दिसली. लंबू दीर्घदर्शीला खांद्यावर बसवून निघाला आणि थोडयाच वेळाने ते फळ घेऊन दोघे परतले. ते फळ जमिनीवर ठेवतांच त्या फळाच्या जागी त्यांना राजकन्या दिसली.

त्याच वेळी म्हातारा मिस्किलपणे हंसत तेथे आला. राजकुमारीला पाहतांच त्याचे स्मित मावळले. त्याच्या कमरेला ज्या पोलादी तीन पट्टया होत्या, त्यांपैकी एक तुटून खाली पडली. राजकुमारीचा हात धरून तो म्हातारा आला होता तसा परत निघून गेला.

दिवसभर राजकुमार व त्याचे साथीदार हिंडत फिरत होते. त्यांना अनेक लोक व घोडे दगडी रूपात जागोजागी दिसले, पण जिवंत प्राणी एकही दिसला नाही. त्यांच्या खाण्यापिण्याची उत्तम व्यवस्था होती.

दुसऱ्या दिवशी रात्री पुन्हां तो म्हातारा कुबडा राजकन्येला हात धरून घेऊन आला आणि "पहा हं, राजकन्या कोठे पळून जातां कामा नये!" असे सांगून निघून गेला. त्या दिवशी रात्री सुद्धां ते जागून पाहारा द्यायचे ठरवून आपल्या जागी गेले. पण जेवणात भूल येणारा काही पदार्थ घातला होता की काय नकळे, त्यांना इतकी झोप आली की चौघे छान झोपी गेले आणि सकाळी उजाडल्यावर पाहतात तर राज-कन्या नाहीशी झालेली.

दूरदर्शीने डोळ्यावरची पट्टी काढून खिडकीतून दूरवर पाहिले आणि म्हणाला–"येथून दोनशे मैलांवर एका डोंगरात एका खडकात ती एक मणीचे रूप घेऊन दडून बसली आहे. लंबू मला तेथपर्यंत घेऊन गेला तर मी तिला नक्कीच सुखरूप घेऊन येईन."

त्याप्रमाणे दोघे गेले व तो मणी घेऊन लवकर परत आले, जमिनीवर तो मणी ठेवताच त्या जागी त्यांना राजकन्या दिसली. त्याच वेळी मिस्किलपणे स्मित करीत म्हातारा कुबडा खोलीत आला आणि राजकन्येला पाहताच त्याचा चेहरा उतरला आणि त्याच्या कंबरेला बांधलेली आणखी एक पोलादी पट्टी तुटून खाली पडली. म्हातारा थोडासा संतापल्यासारखा काही तरी पुटपुटत राजकन्येचा हात धरून निघून गेला.

तिसऱ्या दिवशी रात्री राजकुमार व त्याच्या साथीदारांचे जेवणखाण झाल्यावर म्हातारा राजकन्येला घेऊन आला आणि तिला खोलीत बसवून निघून गेला.

राजकुमाराने निदान त्या दिवशी तरी जागरण करायचेच असे मनाशी ठरविले होते. परंतु त्याचा डोळा केंव्हा लागला हे त्याचे त्यालाच कळले नाही आणि झोप मोडली तेव्हां उजाडण्याची वेळ झाली होती. राजकन्या डोळ्यासमोर नव्हती.



राजकुमाराने दीर्घदर्शीला जागे करून विचारले–"राजकन्या कोठे आहे? त्याने खिडकीबाहेर डोळ्यावरची पट्टी काढून पाहिले व म्हणाला–"येथून तीनशे मैलांवर एका तलावाच्या तळाशी एका शिंपल्यात अंगठीच्या रूपात लपून बसली आहे. तिला येथे आणावयाचे झाले तर आमच्याबरोबर गुंडूने आले पाहिजे." दीर्घदर्शी म्हणाला.

लंबूने या खेपेस आपले अंग आणखी जास्त वाढवले आणि दीर्घदर्शी व गुंडूला खांद्यावर बसवून घेऊन लांब लांब पावले टाकीत निघाला. तलावाजवळ पोचताच गुंडू आपली जाडी वाढवू लागला. त्याने















तलावाचे अर्धे अधिक पाणी पिऊन टाकले, तेव्हां लंबूने खाली वाकून शिपल्यातली अंगठी काढून घेतली.

सूर्योदयाची वेळ होत आली होती. अंगठीच्या शोधार्थ गेलेले तिघे अद्याप परत आले नव्हते. राजकुमार घाबरून गेला. डोंगराच्या माथ्यावरून पांढरे फुटू लागले होते. दार उघडून म्हातारा ब्रह्मानंद झाल्यासारखा राक्षसी स्मित करीत दार उघडून खोलीत आला. इतक्यात खिडकीतून अंगठी आत येऊन पडली आणि दुसऱ्या क्षणाला राजकुमारी प्रगट झाली.

म्हातारा संतापून ओरडू लागला. त्याच्या कंबरेची तिसरी पोलादी पट्टी पण तुटून खाली पडली. म्हातारा एक कावळा होऊन गेला. आणि 'काव' 'काव' करीत खिडकीतून बाहेर पळून गेला.

राजकुमाराने राजकन्येकडे पाहिले. तिला सुटका मिळाल्याचा आनंद तिच्या तोंडावर स्पष्ट दिसत होता. ती आनंदाने राजकुमाराजवळ आली. आता कोठे अगदी पहिल्याने ती बोलली. तिला सुटका मिळाली होती, म्हणून तिने राजकुमाराचे आभार मानले.

त्याच वेळी किल्लयात चारीबाजूला आनंदीआनंद झाल्याचा आवाज ऐकू आला. म्हाताऱ्याने आपल्या मंत्रबळाने ज्यांना ज्यांना दगडाच्या मूर्ती करून टाकले होते ते सर्व स्वस्वरूप मिळाल्याने आनंदात होते. सर्वांनी राजकुमाराचे आभार मानले. राजकुमाराने या सर्वांचे श्रेय त्याच्या तिघां साथीदारांना आहे असे नम्रपणे सांगितले.

राजकुमाराचे साथीदार त्याचा निरोप घेऊन आपापल्या घरी निघून गेले. राजकुमार राजकन्येला घेऊन आपल्या घरी परत आला. राजकुमारीशी त्याचा विवाह थाटामाटाने झाला. पुढे तोच राजा झाला. त्याच्या राज्यात प्रजा सुखी झाली.






विश्वकर्म्याने निर्मिलेल्या इंद्रप्रस्थ नगराला आपली राजधानी करून पांडव नीतिधर्माप्रमाणे राज्य करू लागले. दिवसेदिवस त्यांच्या राज्याची उन्नती होऊ लागली.

एक दिवशी अचानक नारदमुनी युधिष्ठिराला भेटायला आले. युधिष्ठिर आपल्या भावंडांबरोबर सामोरा गेला. सर्वांनी त्यांचे अभिवादन केले. अंतःपुरातून द्रौपदीने येऊन त्यांना नमस्कार केला व बाजूला उभी राहिली. नारदाने द्रौपदीला "सौभाग्यवती भव!" असा आशीर्वाद दिल्यावर ती अंतःपुरात निघून गेली. त्यानंतर भीम, अर्जुन, नकुल व सहदेव यांच्यासमोर नारद युधिष्ठिराला म्हणाला— "तुम्हां पांच भावंडांना एकच पत्नी. तुमचे आपसात वैर वाढू नये यासाठी तुम्ही परस्पर वागण्याचे काही नियम घालून घ्यावे. कारण पुष्कळदा गैरसमज होतो आणि वितुष्ट वाढते." असे सांगून नारदाने सुंद व उपसुंद यांची गोष्ट सांगितली.

हिरण्यकश्यपूच्या कुळात निकुंभ नावाचा एक राक्षस होता. त्याला सुंद व उपसुंद असे दोन मुलगे होते. त्यांचे परस्परांवर फार प्रेम होते व दोघे नेहमी बरोबरच रहात असत. दोघांनी त्रिलोक जिंकायचे मनाशी ठरविले. त्यासाठी त्यांनी तपश्चर्या करून तशी शक्ती मिळविण्याचा विचार केला. विन्ध्य पर्वतात एका निर्जन स्थानी जाऊन त्यांनी घोर तपश्चर्या आरंभ केली. त्यांच्या तपश्चर्येमुळे विंध्य पर्वतातल्या

गुहेत अग्नि उत्पन्न झाला व दशदिशा धुराने व्यापिल्या गेल्या.

त्यांची तपश्चर्या पाहून देव घाबरले. त्यांनी सुंद व उपसुंद यांचा तपोभंग करण्यासाठी त्यांच्यासमोर अनमोल रत्नांच्या राशी व सुंदर सुंदर स्त्रियांचे भ्रम पाडणारे एक दृश्य उभे केले. पण सुंद व उपसुंद त्या भ्रमजालात सापडले नाहीत. तेव्हां देवांनी भ्रम पाडणारे आणखी एक दृश्य उभे केले. त्यात सुंद व उपसुंद यांच्या माता, बायका व पुत्र यांना राक्षस त्रास देत आहेत व त्यांच्यापासून आपले रक्षण करण्यासाठी सर्व विनवण्या करीत आहेत असे दिसत होते. तरीदेखील सुंद व उपसुंद ढळले नाहीत. तेव्हां ब्रह्मदेवाने प्रगट होऊन त्यांना सर्व प्रकारची माया, अस्त्र-शस्त्र, असामान्य बळ व पराक्रम आणि त्रिलोक जिंकण्यास पुरेशी शक्तीचा वर दिला. त्यांनी ब्रह्मदेवाजवळ अमरत्वाचा वर देखील मागितला. पण ब्रह्मदेव त्याला तयार झाला नाही. त्याने एवढाच वर दिला की इतरांच्या हातून त्यांना मरण येणार नाही. ते परस्परांचा वध करू शकतील ही गोष्ट त्यांच्या ध्यानीमनीही आली नाही. म्हणून त्यांना वाटले की दुसऱ्यांच्या हाती मरण आले नाही म्हणजे त्यांना अमरत्व मिळाले.



अशातऱ्हेचा वर मिळविल्यावर सुंद व उपसुंद यांनी सैन्य एकत्र केले आणि इंद्रलोकावर स्वारी करून ते जिंकले. पुन्हा पाताळ लोकात जाऊन ते ही काबीज केले. शेवटी भूलोकात जाऊन अत्याचार करू लागले. तेव्हां ब्रह्मदेवाने विश्वकर्म्याला बोलाविले आणि त्याला सांगून तिलोत्तमा नांवाच्या एका त्रिलोकसुंदरीची सृष्टी केली आणि सुंद व उपसुंद यांच्याजवळ पाठविले. तिलोत्तमा एका नदीच्या काठी फुले निवडत फिरत होती. तिचे सौंदर्य पाहून दोघे तिच्यावर मोहित झाले. दोघांनी तिचा एकेक हात धरून तिला आपल्याकडे ओढायला सुरवात केली. दोघे तिला विचारू लागले दोघांपैकी तू कोणाला पती म्हणून वरणार ?"

ते ऐकून तिलोत्तमा म्हणाली—"तुम्हां दोघात जो जास्त बलवान असेल त्याला."

तेव्हां दोघांनी जास्त बलवान कोण आहे याचा निर्णय व्हावा म्हणून गदायुद्ध सुरू केले व त्यात दोघे परस्परांच्या डोक्यात गदा मारून ठार झाले.

पांडवांना सुंद व उपसुंद यांची गोष्ट सांगून नारद म्हणाला—"तुमचे आपसांत



क्षुल्लक कारणावरून भांडण होऊ नये यासाठी काही नियम करून घ्या."

म्हणून पांडवांनी नारदासमक्ष त्यालाच साक्षी ठेवून एक नियम केला. त्या नियमा-प्रमाणे द्रौपदीने पाळीपाळीने एकेक वर्ष एकेकाकडे रहावयाचे. ती ज्याच्या महालात असेल त्याच्या महालात दुसऱ्या कोणी त्या अवधीत जाता कामा नये. जर कोणी गेला तर त्याने एक वर्षभर तीर्थयात्रा करावी लागेल.

पांडवांनी स्वतःवर असा नियम करून बंधन घातल्यावर नारद मुनी प्रसन्न झाले व म्हणाले—"या नियमाचे तुम्ही कडक-



पणाने पालन केलेंत तर तुमचे आपसांत कधी वैर होणारच नाही." असे सांगून नारदमुनी निघून गेले. द्रौपदी पाळी-पाळीने एकेकाकडे एक वर्षभर राहू लागली.

एकदां द्रौपदी युधिष्ठिराच्या महालात रहात असतां एक ब्राह्मण त्याच्या महाला-समोर उभा राहून रडू लागला. म्हणून अर्जुनाने जवळ जाऊन त्यांना विचारले–
"काय हो, काय पाहिजे आपल्याला?"

"माझ्या होमासाठी आणलेल्या गाई चोर चोरून घेऊन गेले. गाई गेल्याने माझ्या धर्मकार्यात विघ्न आले आहे. कृपा करून माझ्या गाई मला परत मिळवून द्या." ब्राह्मण म्हणाला.

"मी आपल्या गाई लवकर परत आणून देतो. आपणसुद्धा माझ्याबरोबर यावे. चोर कोणत्या दिशेने गेले, हे सांगावे." असे सांगून अर्जुन धनुष्यबाण आणण्यासाठी युधिष्ठिराच्या महालात गेला.

त्याच वेळी अर्जुनाला त्यांनी सर्वांनी केलेला नियम आठवला. द्रौपदी युधिष्ठि-राच्या महालात रहात होती. आपल्या हातून नियम भंग होत आहे. धनुष्य बाण आणायला उशीर झाला तर कर्तव्य पालनात उशीर होणार. नियम मोडला तर त्यासाठी जी शिक्षा भोगावी लागेल ती भोगण्यात हरकत नाही. परंतु जर कर्तव्य पालन वेळेवर झाले नाही तर ती फार मोठी चूक होईल. असा विचार करून अर्जुनाने द्रौपदी व युधिष्ठिरांच्या महालात युधिष्ठिराच्या परवानगीने प्रवेश केला आणि धनुष्य बाण घेऊन ब्राह्मणाबरोबर निघून गेला. त्याने चोरांचे शासन करून ब्राह्मणाच्या गाई सोडवून त्या ब्राह्मणाला परत केल्या.

अर्जुन परत घरी आल्यावर सर्वांनी त्याला शाबासकी दिली. त्याने सर्वांना नमस्कार केला व नम्रपणे युधिष्ठिराला म्हणाला–"दादा! मी कर्तव्य पालनासाठी नियमभंग केला आहे. त्याबद्दल जी शिक्षा भोगावी लागणार ती भोगण्यास मनाची तयारी करूनच मी नियम मोडला होता. म्हणून मला तीर्थ प्रवासाला जाण्याची परवानगी द्यावी."

युधिष्ठिर फार दुःखी होऊन म्हणाला–"अर्जुना! वडील माणसे बोलत असता लहानांनी कर्तव्यपालनार्थ प्रवेश केला तर तो अपराध मानला जात नाही. तू जे केलेस त्यामुळे एकाचे हितच झाले आहे. म्हणून ही चूकच नव्हे. म्हणून तू चूक केली आहेस असे समजून दुःखी होण्याचे मुळीच कारण नाही. माझे ऐक, आणि प्रवासाचा विचार सोड."

ते ऐकून अर्जुन म्हणाला–"कोणी चूक केली तर आपण राज्याच्या नियमा-प्रमाणे त्याला शिक्षा देतोच की नाही? मग आपणच नियम घालून तो मोडला व त्या बद्दल शिक्षा भोगायची वेळ आली असता मागेपुढे करू लागलो तर प्रजेला एकचुकीचे उदाहरण घालून दिल्यासारखे होईल. म्हणून मला तीर्थप्रवासास जाण्यास परवानगी द्यावी."

युधिष्ठिराला अर्जुनाचा तर्क मानावा लागला. अर्जुन प्रवासायोग्य वेष धारण





करून निघाला. त्याच्या बरोबर अनेक ब्राह्मण प्रवासाला निघाले. त्या सर्वां-बरोबर अर्जुन नदी नाले व जंगल पार करीत तीर्थक्षेत्रांत स्नानादि करीत गंगा-द्वारी येऊन पोंचला.

तेथे अनेक मुनि गंगास्नान करून होमाग्नीत आहुती देत होते. अर्जुनदेखील गंगेत स्नानाला उतरला. सूर्याला अर्घ्य देऊन त्याने तर्पण आदि केले. त्या वेळी उलूपी नावाची नागकन्या तेथे आली. तिने अर्जुनाचे रूप पाहिले व त्याला मनाने वरले. तिने पाण्यातच त्याला ओढले व त्याला धरून घेऊन ती नागलोकात गेली.

नागराजाच्या राजवाड्यात पोचल्यावर अर्जुनाने नागकन्येला विचारले–"तू हे फार मोठे साहसाचे काम केले आहेस. तू कोण? कोणाची मुलगी?"

"स्वामि! मी ऐरावत कुळातील कौरव्य नामक नागराजाची कन्या आहे. माझे नाव उलूपी. कामदेवासारखे आपले सुंदर रूप पाहून मी आपल्याला मनाने वरले आम्हां नागलोकात जी अत्यद्भुत शक्ती आहे त्या शक्तीच्या सहाय्याने मी आपणांला येथवर आणू शकले. आपण विवाहास संमती द्यावी." उलूपी म्हणाली.

"उलूपी! मी काही कारणास्तव तीर्थयात्रा करीत आहे. माझा व्रतभंग होईल. ती इच्छा मनात आणणेदेखील एक फार मोठे पातक ठरेल." अर्जुनाने निरनिराळ्या प्रकारे तिची समजूत घालण्याचा प्रयत्न करून पाहिला.

ते ऐकून उलूपी अर्जुनाला म्हणाली–"द्रौपदीच्या विषयी तुम्ही सर्वांनी जो नियम केला आहे तो मला माहीत आहे. तरी आपण ब्रह्मचर्य व्रताचा उल्लेख करणे बरोबर होणार नाही. आपण माझी इच्छा पुरी केली नाहीत तर त्या दुःखाने झुरून मी शेवटी जीव देईन. ते पातक आपणांला

लागेलच. एका व्यक्तीचा जीव वांचविण्या-पेक्षा पुण्यकार्य दुसरे असूच शकत नाही. म्हणून मला अभयदान, नव्हे जीवदान देण्याची कृपा करावी.'' असे सांगून उलूपीनें अर्जुनाचे पाय घट्ट पोटाशी आवळून धरले.

अर्जुनाने उलूपीची इच्छा पुरी करण्याचे ठरविले. ती रात्र अर्जुनानें उलूपीच्या महालात काढली. उलूपीनें अर्जुनाला सकाळी उजाडण्यापूर्वी गंगाद्वारी पोचते केले. तिने अर्जुनाला वर दिला की त्याला कोणत्याही जलचर प्राण्यापासून इजा होणार नाही. नंतर ती नागलोकात निघून गेली. उलूपीला नऊ महिन्यांनी एक मुलगा झाला. तो अर्जुनाचाच मुलगा होता. त्याचे नाव ऐरावत असे ठेवण्यात आले.

गंगाद्वाराहून निघाल्यावर अर्जुन अनेक तीर्थांचे स्नान करीत तेराव्या महिन्यात मणिपुर येथे येऊन पोंचला. त्या नगरात चित्रवाहन नावाचा राजा राज्य करीत असे. त्याला चित्रांगदा नावाची मुलगी होती. तिला पाहून अर्जुनानें चित्रवाहनला भेटून चित्रांगदाशी विवाह करण्याची इच्छा असल्याचे सांगितले.

तेव्हां चित्रवाहन म्हणाला—'' याहून जास्त महत्‌भाग्य ते काय असणार माझे? पण एक अट आहे. आमच्या कुळात प्रत्येक पिढीत एकच एक मुलगा होत आला आहे. पण मला एक कन्याच आहे. तिला मुलगा होईल त्याला मी आपला मुलगा मानून त्यालाच गादीला वारस करणार आहे. ही अट तुला मान्य असेल तर मी आपल्या मुलीचा विवाह आनंदाने तुझ्याशी करून देईन.''

अर्जुनाने चित्रवाहनाची अट मान्य केली आणि चित्रांगदाशी त्याचे लग्न झाले. चित्रांगदाशी विवाह झाल्यावर फक्त तीन रात्री तिच्या महालात राहून अर्जुन दक्षिणे-कडील समुद्र किनाऱ्याकडे निघाला.





# लेनिनचे चरित्र

[४]

लेनिनच्या देखरेखीखाली इ. स. १९०० च्या डिसेंबर महिन्यात 'इस्का' (ठिणगी) नावाचे नियतकालिक सुरू झाले. रशियाच्या पार्टीच्या कमेटयांना जास्त सचेतन करण्याच्या कामी या नियत कालिकाचा चांगलाच उपयोग झाला.

१९०३ साली रशियन सामाजिक लोक-शाही मजूर पार्टीचे दुसरे अधिवेशन झाले. याच अधिवेशनात क्रांतिकारी मार्क्सिस्ट पार्टीचा जन्म झाला. या पार्टीचे संस्थापक व पुढारी लेनिनच होते.

'इस्का' नियतकालिकात लेख लिहित म्हणून 'लेनिन' हे नाव प्रसिद्ध झाले. १९०३ च्या अधिवेशनात जे मतभेद होते त्याच मुळे अल्पसंख्याक पक्ष व बहुसंख्याक पक्ष असे दोन पक्ष स्थापित झाले. अल्पसंख्याक पक्ष 'मंशेव्हिक' व बहुसंख्यक पक्ष 'बोल्शेव्हिक' म्हणून ओळखला जाऊ लागला. हाच 'बोल्शेव्हिक' पक्ष पुढे प्रसिद्ध झाला.

१९०५च्या जानेवारी महिन्यात हरताळ करणारे मजूर आपले गाऱ्हाणे झारकडे घेऊन गेले तेव्हां त्यांच्यावर गोळीबार करण्यात आला. त्यात एक हजार लोक ठार झाले आणि पांच हजार जखमी झाले.

ही घटना झारशाहीचे डोळे उघडायला कारण झाली. देशात सर्वत्र खळबळ उडून गेली. मजुरांनी क्रांति केली, पण ती अयशस्वी झाली. या अयशस्वी क्रांतीपासून लेनिनने धडा घेतला. झारशाहीचे हेर लेनिनचा पाठलाग करू लागले. लेनिनने स्वदेश सोडला व ९ वर्षे विदेशात राहला. त्या काळात लेनिन व त्यांच्या पत्नी दोघांना फार कष्ट सहन करावे लागले.

ऑक्टोबरची क्रांति

      



तरी लेनिन आपल्या राजकीय ध्येयापासून परावृत्त झाले नाहीत. परदेशात असतांनाच त्यांनी 'प्रावदा' (सत्य) नावाचे वर्तमानपत्र (१९१२) सुरू केले. हे वर्तमानपत्र आजदेखील चालू आहे. झार सरकारची या वर्तमानपत्रावर कडक नजर होती. या वर्तमानपत्रावर ३६ खटले झाले व ४१ अंक जप्त झाले.

१९१४च्या ऑगस्ट महिन्यात जागतिक युद्ध सुरू झाले. युद्धाच्या सुरवातीला लेनिन पोलंडमध्ये होते. या युद्धामुळे क्रांतीच्या प्रसारास अनुकूल वातावरण तयार होईल असे लेनिनचे अनुमान होते.

युद्ध सुरू झाल्यानंतर दहा दिवसांच्या आत पोलंडच्या सरकारने हेरगिरीचा आरोप लावून लेनिनना अटक केली. परंतु आरोप निराधार होते आणि पोलंडच्या प्रगतिशील लोकांनी विरोध केल्यावर लेनिनना सोडून देण्यात आले.

सुटका मिळताच लेनिन स्वित्सर्लंडला गेले. रशियाच्या विरोधी शक्तींचे लेनिनने अनुमोदन केले. लेनिन यांच्या प्रयत्नानेच स्वित्सर्लंड मध्ये अंतर्राष्ट्रीय सोशलिस्ट कॉन्फरन्स यशस्वी झाली. या सभेला ११ देशांचे प्रतिनिधी हजर होते. युद्धात होणाऱ्या हत्यांचा शेवट करावयाचा असेल तर जगातल्या सर्व मजुरांनी एक झाले पाहिजे, असे लेनिनचे मत होते.

लेनिन स्वित्सर्लंडहून रशियात जाण्यासाठी उत्सुक होते. ती संधी त्यांना ३ एप्रिल १९१७ या रोजी रात्री मिळाली. त्या दिवशी रात्री ते पेट्रोग्रॅड (आजचे लेनिनग्रॅड) येथे जाऊन पोचले. असंख्य लोकांनी त्यांचे स्वागत केले आणि मोठ्या उत्साहाने रणगाड्यावर त्यांना उभे करून त्यांची मिरवणूक काढली.

युद्धामुळे देशाची स्थिति फार बिघडली होती. देशाचा जवळजवळ सर्वनाशच झाला होता. असंख्य लोक हताहत झाले होते. देशात अन्नाची टंचाई होती व उपासमारीने लोक बेहाल झाले होते. अशा परिस्थितीत लेनिनने मजूर व शेतकरी यांनी एक होऊन श्रीमंत भांडवलदारांच्या हातून सत्ता हिसकावून घेतली तर त्यांना शांति, अन्न आणि स्वातंत्र्य तिन्हींचा लाभ होईल असे सांगितले. ही सत्ता शेतकरी व कामकरी यांच्या सोव्हिएटच्या हाती आली पाहिजे असेदेखील त्यांनी सांगितले. (सोव्हिएट या शेतकरी, कामगार आणि सैनिक यांच्या प्रतिनिधींच्या संस्था होत.)

आपल्या या नव्या विचारांचा प्रचार लेनिनने देशभर केला. १९१७च्या जून महिन्यात अखिल रशियाच्या सोव्हिएटांची सभा झाली. त्या सभेत सर्व पक्षांच्या पुढाऱ्यांची भाषणे झाली. सभेत कोणी, देशात सरकार काबीज करू शकणारा क्रांतिकारी पक्ष नाही असे म्हटल्यावर लेनिनने थोडक्यात उत्तर दिले—"तसा पक्ष आहे." पण त्यावरून ज्यांच्या हातात सत्ता आहे ते नालायक आहेत एवढे स्पष्ट झाले. देशाची अर्थव्यवस्था विस्कळित झाली होती. किमती आटोक्याबाहेर वाढत होत्या व त्यांवर नियंत्रण नव्हते. प्रजेत



असंतोष वाढत होता. कामगार एक विरोधी प्रदर्शन करण्यासाठी तयार होऊ लागले होते.

१८ जून रोजी पाच लाख कामगारांनी व सैनिकांनी पेट्रोग्रॅड शहरात एक मोठी मिरवणूक 'युद्ध बंद व्हावे', 'शांति स्थापन व्हावी' व 'सर्व अधिकार सोव्हिएटच्या हाती आहेत', असे घोष करीत काढली. ३ जुलै रोजी आणखी एक मिरवणूक निघाली.

रशियन सरकारने लेनिनवर जर्मनांसाठी हेरगिरी करणारा म्हणून आरोप लावून त्यांना पकडण्यासाठी त्यांचा शोध सुरू







केला. लेनिनने आपली दाढी काढून टाकली, टोप लावून अनेक घरे बदलत शेतकऱ्याच्या वेषात अज्ञातवास करू लागले.

पहिल्या ऑक्टोबर रोजी लेनिन यांनी क्रांती किंवा बंडाशिवाय सत्ता काबीज करणे शक्य नाही असे सांगितले. क्रांतीची तयारी फॅक्टरीतून व सैनिक दलातून होऊ लागली. स्मोलनीची इमारत क्रांतीचे केंद्र होते. ऑक्टोबर २४च्या रात्री त्या इमारतीत गडबड दिसून आली. इमारती-समोर युद्ध सामग्री येऊन पोचली होती. त्या दिवशी रात्र संपत आल्यावर उजाड-तांच नीवा नदीचे सर्व पूल, टेलीफोन केंद्रे, रेल्वे स्टेशन, विजेचे केंद्र व बँका क्रांतिकाऱ्यांनी काबीज केल्या.

या क्रांतिकाळातच अखिल रशिया सोव्हिएटांची महासभा (कॉन्फरन्स) भरली. सोव्हिएट सरकारची पहिली डिक्री 'शांति डिक्री' होती.

लेनिनच्या क्रांतिकारी सिद्धांतांना सोव्हिएट रशिया प्रत्यक्ष प्रमाण झाले. परंतु त्यासाठी अनेक संकटांना तोंड द्यावे लागले. नया रूपात जन्मलेल्या रशिया राष्ट्राला नष्ट करण्यासाठी अनेक पाश्चात्य देश एक झाले. त्यानंतर गृहयुद्ध झाले. लेनिनने जगातल्या पहिल्या सोशलिस्ट देशाचा जो पाया घातला तो अत्यंत बळकट होता. म्हणून सोव्हिएट रशिया सर्व संकटांमधून आपली सुटका करून घेऊन आपली भरभराट करू शकला व जगातल्या अग्रगण्य राष्ट्रात तो एक गौरवनीय देश म्हणून मान्य झाला आहे.

१९१८ या वर्षी क्रांतिविरोधी लोकांच्या हाती जखमी होऊन लेनिनची प्रकृति बिघडली. २१ जानेवारी १९२४ या रोजी 'सेरिब्रल हॅमोरेज' या आजाराने लेनिनने या जगाची यात्रा संपविली.



# १०४. पिरिनीजच्या बर्फाच्या गुहा

फ्रान्स व स्पेन या दोन्ही देशांच्या सरहद्दीवर पिरिनीज पर्वत आहे. या पर्वतावर समुद्राच्या पातळी पासून ९००० फुट उंचीवर अत्यद्भुत बर्फाच्या गुहा आहेत. इतक्या उंचीवर इतरत्र कोठेही बर्फाच्या गुहा नाहीत. या गुहात खोल्या आहेत व पायऱ्यादेखील आहेत. नेहमी थंडगार हवा या गुहांतून वाहाते. ओले कपडे या हवेत त्यांच्यातील पाणी गोठल्याने क्षणार्धात कडक होऊन जातात. ऐन उन्हाळ्यात सुद्धा या गुहांतील बर्फ वितळून जात नाही. व्यूहासारख्या पसरलेल्या या गुहात शेवटच्या टोकापर्यंत फिरणे अशक्य आहे. या चित्रात दिसत असलेले नोर्बर्ट कास्टेरेट व त्यांची मुलगी माड आहेत. या दोघांनी नव्या गुहांचा शोध लावला आहे.














# अमरवाणी

क्षीरोदधेश्च गांभीर्यं जानाति मथनाद्हरि:;
लेहनाय तटं प्राप्त: कथं विद्याद्बिडालक:?        ॥ १ ॥

[क्षीरसागर किती खोल आहे हे त्याचे मंथन करणाऱ्या विष्णूला माहीत आहे. परंतु नुसते दूध पिणाऱ्या भाटीला ते काय कळणार? ]

न भवति, न चिरं भवति, चिरंचेत्फले विसंवादी,
कोपस्सत्पुरुषाणां तुल्य स्नेहेन नीचानां ।        ॥ २ ॥

[दुष्ट दुर्जन मनुष्यात स्नेहमैत्री आणि सज्जन सत्पुरुषात क्रोध दिसणार नाहीत. दिसले तरी ते क्षणिक असतात. दोन्ही शक्य झाले तर शेवटी दिसणार नाहीत.]

राजन्, दुधुक्षसि यदि क्षिति धेनु मेतां
तेनाद्य वत्स मिव लोक ममुं पुषाण,
तस्मिश्च सम्य गनिशं परिपुष्यमाणे
नानाफलं फलति कल्पलतेव भूमि: ।        ॥ ३ ॥

[हे राजा! भूमि रूपी गाईला दुहणे झाल्यास वासराचे पोषण रक्षण होते तसे प्रजेचे पालन पोषण कर. प्रजेचे पालन पोषण चांगले झाले तर भूमि कल्पवृक्षासारखी अनेक प्रकारची फळे देईल.]



# अशिक्षित मंत्री

फार पूर्वी एका गावी एक गरीब शेतकरी रहात असे. त्याच्याजवळ फक्त एक गाय होती. ती शेताच्या बांधावरचे गवत चरत असे आणि तेवढ्यावर तिचे पोट भरे.

एकदा ती गाय जमिनदाराच्या शेता-नजीक चरत होती. शेत हिरवेगार होते. ते पाहून तिला मोह आवरला नाही व ती शेतात शिरून चरू लागली. जमिनदाराच्या नोकरांनी खूप बडविले. म्हणून गाय जागच्या जागी मेली.

गाय मेल्याने गरीब शेतकऱ्याला व त्याच्या बायकोला फार वाईट वाटले. त्याने जमिनदाराकडे जाऊन नुकसानभरपाई मागितली. जमिनदाराने नुकसान भरपाई देण्याचे तर दूरच, त्या बिचाऱ्याला नोकरा-करवी खूप बडवून हाकलून लावले.

शेतकऱ्याने घरी गेल्यावर ती गोष्ट आपल्या बायकोला सांगितली. ती म्हणाली– "जमिनदार असा अन्याय व अत्याचार करतो आहे तर आपण आपले गाऱ्हाणे राजाच्या दरबारात नेले पाहिजे. राजा प्रजावत्सल म्हणून प्रसिद्ध आहे. तो आपले गाऱ्हाणे नक्कीच ऐकेल.

परंतु गाऱ्हाणे राजाकडे कसे पोचवा-बयाचे? ती दोघं अशिक्षित होती. म्हणून त्यांनी एका फळीवर आपल्या झोपडीचे आणि जमिनदाराचा वाडा, जमिनदाराचे शेत, नोकरांनी मारहाण केल्याने मेलेली गाय वगैरेचे चित्र कोळशाने काढून शेवटी जमिनदाराने त्याला कोरडे मारवले होते त्यांचे चिन्ह म्हणून उभ्या रेषा काढल्या. अशातऱ्हेने फिर्यादीचा अर्ज तयार झाला.

ती फळी घेऊन शेतकरी राजधानीच्या वाटेने निघाला. वाटेत त्याला एक शिकारी भेटला. शिकाऱ्याने त्याला विचारले–"कोठे रे निघालास एवढी मोठी फळी घेऊन?"











"राजाकडे एक फिर्याद नोंदवायला. माझ्या पाठीवर पहा ती बांधलेली आहे." शिकारी म्हणाली.

"कसली फिर्याद आहे बुवा?" शिकाऱ्याने चकित होऊन विचारले. शेतकरी म्हणाला–"अहो, काय सांगू? माझी एक चांगली गाय होती. तिला ठार केलं हो!" असे सांगून शेतकऱ्याने पाठीवरची फळी जमिनीवर ठेवून सर्व चित्रांचे वर्णन करून सांगितले.

शेतकऱ्याकडून त्याचे सर्व गाऱ्हाणे ऐकून घेऊन शिकारी म्हणाला–"तुझे गाऱ्हाणे बरोबर आहे. ही फिर्याद राजाकडे घेऊन गेलास तर राजा तुला बरोबर न्याय देईल." असे सांगून शिकारी निघून गेला.

तो शिकारीच त्या देशाचा राजा होता. पण ती गोष्ट शिकाऱ्याला माहीत नव्हती.

शेतकरी जंगल पार करून राजधानीत पोचला. त्याला राजवाड्यात जायला परवानगी मिळाली. तो सरळ राजाच्या सिंहासनाजवळ गेला. राजासमोर त्याचे मंत्री बसलेले होते. त्यावेळी राजा आपला दरबारी पोशाख करून बसलेला होता. म्हणून शेतकरी त्याला ओळखू शकला नाही. त्याने आपल्या जवळची फिर्यादीची फळी एका मंत्र्याच्या हातात दिली व म्हणाला–



"महाराज! ही माझी फिर्याद आहे. सर्व याच्यात लिहिले आहे."

मंत्री ती फळी पाहून चकित झाला. म्हणाला–"ही कसली फिर्याद? मला नाही कळले, हे सर्व काय आहे?" असे म्हणत त्याने आपल्या शेजारच्या दुसऱ्या मंत्र्याच्या हातात ती फळी दिली. एकामागून एक सर्व मंत्र्यांनी ती फळी पाहिली, पण ती फिर्याद काय आहे, हे कोणाला कळले नाही.

"हा कोणीतरी वेडापीर दिसतो आहे. याला बाहेर हाकलून लावा." सर्व मंत्री म्हणाले. राजाने त्यांना जरा थांबायला सांगून फळी आपल्या हातात घेतली आणि शेतकऱ्याला जवळ बोलावून म्हणाला–"हे चित्र तुझ्या झोपडीचे आहे ना?"

"होय महाराज!" शेतकरी म्हणाला.

"हा जमिनदाराचा वाडा आहे, नाही का?" फळीवरच्या दुसऱ्या चित्राकडे बोट दाखवून राजाने विचारले.

"होय महाराज! आपण बरोबर म्हणालात!" शेतकरी आनंदाने म्हणाला.

"शेताचे कुंपण येथे तुटले नाही का?" राजाने पुन्हा विचारले.

"होय महाराज!" शेतकरी म्हणाला.

"येथून तुझी गाय आत शिरली आणि जमिनदाराच्या नोकरांनी मारहाण






















केल्यामुळें मेली. होय ना?" राजाने विचारले.

"होय महाराज! त्यामुळे माझे जे नुकसान झाले ते आता मी काय सांगू?" शेतकरी मोठ्या कष्टाने म्हणाला.

"या रेषा म्हणजे जमिनदाराने तुला फटके मारले ते आहेत नाही का?" राजाने विचारले.

शेतकऱ्याला राजाने आपले गाऱ्हाणे बरोबर समजून घेतल्याबद्दल परमानंद झाला आणि म्हणाला—"महाराज! आपल्या हुशारीची मी आता कोणत्या शब्दात स्तुती करू? या सर्वांना तर काहीच कळले नाही." शेतकरी म्हणाला ते ऐकून सर्व मंत्री मोठमोठ्याने हसू लागले.

परंतु राजा म्हणाला—"बरे तर जा आता घरी आणि बायकोला सांग की गाऱ्हाणे राजाच्या दरबारी दाखल झाले आहे व राजा न्याय करणार आहे."

शेतकरी राजाचे आभार मानून व त्याचा निरोप घेऊन आपल्या घरी परतला. त्याच्या पाठोपाठ जमिनदाराला राजाचा हुकूम मिळाला.

जमिनदार स्वतः शेतकऱ्याच्या झोपडीत आला व त्याने स्वतः शेतकऱ्याजवळ माफी मागून राजाज्ञेप्रमाणे शेतकऱ्याला एक झोपडी व एक गोठा बांधून दिला. त्याशिवाय सात दुभत्या गाई देऊन साठ एकर पडीत जमीन शेतकऱ्याच्या नावी लिहून दिली आणि अशातऱ्हेने अन्याय केल्याबद्दल शेतकऱ्याची नुकसान भरपाई करून दिली.

शेतकरी व त्याची बायको त्यापुढे आनंदाने राहू लागले. तेव्हांपासून राजाच्या धर्मबुद्धीची शेतकरी वाखाणणी करू लागला. तो म्हणे—"अशा हुशार राजाने मोठमोठे पगार देऊन त्या अशिक्षित गावंढळांना मंत्री कां नेमले आहे?"







# कुंकवाची डबी

प्राचीन काळी कुंतल नांवाच्या गावी चित्रद्रव नावाचा राजा राज्य करीत असे. त्याला तारामती नावाची एकच एक मुलगी होती. ती लग्नाला योग्य झाली तेव्हां एक विचित्र गोष्ट घडली. तारामती एक दिवशी चंद्रवर्मा नावाच्या एका सैनिकाबरोबर देवीच्या दर्शनाला निघाली. एका जागी तिला लोकांची गर्दी दिसली. गर्दी कां जमली आहे याची चवकशी करून यायला तिने आपल्या नोकराला पाठविले. चंद्रवर्मा परत येऊन म्हणाला—"कोणीतरी ज्योतिषी आहे, तो सर्वांचे भविष्य सांगत आहे."

"तर मग त्याला माझा विवाह कोणाशी होईल हे विचारून ये." तारामतीने असे सांगून नोकराला पुन्हां पाठविले.

तेव्हां चंद्रवर्मा म्हणाला—"राजकन्या! हे ज्योतिषी आपले पोट भरण्यासाठी लोकांना काय वाटेल ते सांगतात.

"मी तुला हुकूम दिला आहे, त्या हुकुमाचे पालन कर." राजकन्या रागाने म्हणाली.

चंद्रवर्मा आज्ञेप्रमाणे ज्योतिष्याला विचारून आला व म्हणाला—"राजकन्या! मी पूर्वी सांगितले होते ना, ज्योतिष्यांच्या गप्पांकडे लक्ष द्यावयाचे नसते.

"बटबट बंद कर. तो काय म्हणाला ते मला सांग." तारामती म्हणाली.

"तो म्हणतो की आपले लग्न माझ्याशी होणार आहे?" नोकराने सांगितले.

ते ऐकून तारामतीला जास्तच राग आला. तिने कुंकवाचा करंडा नोकराच्या तोंडावर फेकला आणि म्हणाली—"दुष्टा! तू माझ्याशी लग्न करणार काय? आताच्या आता आमच्या राज्याच्या बाहेर निघून जा, नाहीतर तुझे डोके उडवीन." असे सांगून राजकन्या पुढे निघून गेली.











चंद्रवर्माच्या कपाळाला एक जखम झाली. त्याने आपल्या फेट्याच्या टोकाने रक्त पुसले, कुंकवाचा करंडा उचलला आणि राज्याबाहेर निघून गेला.

कुंतल देश सोडून चंद्रवर्मा मालव नावाच्या राज्यात आला. त्यावेळी त्या देशाचा राजा मरण पावला होता. त्या देशाच्या रीतीप्रमाणे नव्या राजाची निवड होणार होती. एका हत्तीला सोंडेत एक माळ देऊन चंद्रवर्मा मालव देशाच्या राजधानीत पोचला त्याच दिवशी सोडण्यात आले होते. चंद्रवर्मा गर्दीत उभा होता आणि गंमत अशी की हत्तीने नेमकी त्याच्याच गळ्यात माळ घातली. प्रजेने त्याला हत्तीवर बसविले आणि त्याला आदरपूर्वक राजवाड्यात नेऊन त्याचा राज्याभिषेक करविला.

चंद्रवर्माने गादीवर बसल्यावर आपले नाव चंद्रसेन असे ठेवून घेतले. त्याने राजाला योग्य त्या सर्व विद्या व कला शिकून घेतल्या. मंत्र्याने त्याला विवाह करून घेण्याचा सल्ला दिला. अनेक देशांच्या राजकन्यांच्या तसबिरी आल्या. त्यात तारामतीचे चित्रपण होते. त्याला देवीच्या दर्शनाच्या वेळी घडलेली गोष्ट आठवली. त्याने तारामतीशीच विवाह करण्याचे ठरविले. तारामतीच्या वडिलांना मालव देशाच्या राजाशी आपल्या कन्येचा विवाह होणार या विचाराने परमानंद झाला.

चंद्रसेन आणि तारामतीचा विवाह थाटामाटाने झाला. तारामतीने आपल्या पतीला पाहिले आणि विचारले—"आपल्या कपाळावर हा व्रण कसला?"

चंद्रसेनने कुंकवाचा करंडा काढून दाखविला. तारामतीला देवीच्या दर्शनाला जात असता घडलेला प्रसंग आठवला व लाजेने मान खाली करून तिने जणुंकाही आपल्या चुकीची माफी मागितली.





# पडकें देऊळ

[ ३२ ]

[ अजगराच्या घशातून पुजाऱ्याला शिखीमुख व त्याच्या साथीदारांनी वाचविले. शिखीमुख आपल्या अनुयायांच्या मदतीने पडक्या देवळाच्या शिखराच्या चारीबाजूची जमीन व दगडधोंडे खणून काढण्याचा उपक्रम करू लागला. त्याच वेळी मोठमोठे त्रिशूलधारी अघोरी हत्तीवर बसून आले आणि त्यांनी त्यांना घेरले. पुढे— ]

समोर दिसणाऱ्या चार अघोरींच्या तोंडी आणखी शंभर अघोरी हत्तींवर चढून त्यांच्यावर चालून यायला तयार असल्याचे ऐकून शिखीमुख व विक्रमकेसरीबरोबर आलेले सर्व लोक घाबरून गेले. युद्ध केल्याशिवाय शत्रूच्या हातून पराभव मान्य करणे अपमानास्पद होते, त्याच बरोबर शत्रूचे आव्हान स्वीकारून युद्ध करण्यात ही आत्महत्या करून घेण्यासारखे होते. म्हणून सर्व किंकर्तव्यविमूढ होऊन जागच्या जागी उभे राहिले.

विक्रमकेसरीला तर काय करावे, काहीच सुचले नाही. शिखीमुख मात्र ओरडला—"अजित व वीरभद्र! अरे, धावा पुढे आणि वृश्चिक नायक व नागसोम यांना धरून पाठीमागे ओढून आणा. हत्तीवर बसून येणाऱ्या त्या अघोरींशी ते दोघे काय लढणार? आपला जीव घालवून बसतील."



लगेच अजित व वीरभद्र पुढे धावले. नागसोम व वृश्चिक नायकाला त्यांनी त्यांचे दंड धरून थांबविले आणि शिखीमुखाची आज्ञा त्यांना सांगितली. ते दोघे रागारागाने आपली आयुधे अघोरींना दाखवून हलवीत खाली माना घालून अगदी नाइलाज झाल्यासारखे परतले.

शिखीमुखने दगड व माती खणून काढण्याचे काम थांबविले आणि मोठ्याने ओरडून म्हणाला—"हे अघोरी आपले मित्र आहेत. आपले काही एक नुकसान करणार नाहीत. गोलभरा गावाच्या वाटेवर जंगलांत आम्ही यांच्या काही लोकांना भेटलो होतो. मला असे वाटते की हे आपल्याला मदतच करतील."

"होय, होय! यांना आपण भेटलो होतो खरे, पण हे लोक क्रूर आहेत." लंगडा जांगला म्हणाला.

"ते खरे असो वा नसो, त्यांचा नायक घोरचित्त याने आपल्याला अभयदान दिले आहे. ही, पहा, त्याने स्वतः ही रुद्राक्षमाला माझ्या हातात बांधली आहे." असे म्हणत शिखीमुखने आपल्या दंडातली ती रुद्राक्षमाळा सर्वांना दिसेल अशा तऱ्हेने धरून हात वर उचलला.

विक्रमकेसरीला ब्रह्मपुत्र नदीच्या खोऱ्यातली ती गोष्ट आठवली. तो स्मित करून शिखीमुखला म्हणाला—"शिखी! तू म्हणतोस ते बरोबर आहे. हे लोक आपल्याला कोणत्याही प्रकारे त्रास देणार नाहीत. उलट त्यांच्या हत्तींच्या मदतीने हे खडक बाजूला सारणे सोपे होईल."

"मला पण तेच वाटते आहे. पण समजा हे घोरचित्ताचे शिष्य नसले तर आपणांवर संकट येईल. याशिवाय हे लोक घोरचित्ताचे शिष्य आहेत की नाहीत हे कळायचे तरी कसे?" शिखीमुख म्हणाला.



"हे लोक महाकाळाचे भक्त आहेत. म्हणून महाकाळाची आराधना करणारांचे हे मुळीच नुकसान करणार नाहीत." जांगला म्हणाला.

"हे बरोबर म्हणाला हा, धनी!" नागसोम म्हणाला.

"वृश्चिक मातेहून मोठा देव किंवा देवी नाही. कोठला काळकास हा महाकाळ? आम्ही वृश्चिक जातीचे लोक या अघोरींच्या महाकाळाला मुळीच मान देणार नाही." असे म्हणत वृश्चिक नायकाने आपली दगडी कुऱ्हाड बंडखोर वृत्तीने उचलली आणि आपल्या जातीच्या लोकांना जवळ येण्यास खुणावले.

शिखीमुखला वृश्चिक नायकाच्या त्या हट्टी स्वभावाची व मूर्खपणाची कल्पना होती. व्यर्थ रक्तपात होणार हे त्याने ओळखले. म्हणून थोड्या नरम शब्दात म्हणाला—"वृश्चिक नायका! तुम्हाला काय करायचे आहे या अघोरी लोकांशी? तुम्ही फक्त, आम्ही काय करतो ते पहात उभे रहा. आम्ही सभाळून घेऊ या अघोरींना." असे सांगून रुद्राक्षमाळा वर करून तो जोराने ओरडून म्हणाला—"घोरचित्त की जय! महाकाळ की जय!"



शिखीमुखाच्या तोंडचे ते जयघोष ऐकून हत्तीवर बसलेल्या चार ही अघोरींनी आपले त्रिशूल खाली केले व "महाकाळ की जय!" असा त्यांनी पण जयजयकार केला. त्यानंतर शिखीमुख निर्धास्त होऊन त्यांच्या जवळ गेला. अघोरींपैकी एकाने शिखीमुख व विक्रमकेसरी यांच्याकडे थोड्या सशंकपणे पाहून विचारले—"यात काही लबाडी तर नाही? तुमचा नायक पुजारी फार वस्ताद आहे. कोठे आहे तो? तुम्हाला घोरचित्ताचे नाव कसे कळले?"

शिखीमुखने अघोरींना प्रणाम केला व म्हणाला—"आम्ही पडक्या देवळाच्या पुजाऱ्याचे अनुयायी नाही. तो आमचा शत्रू



आहे. ही पहा, रुद्राक्षमाळा, घोरचित्ताने स्वत: माझ्या हातात बांधली आहे." असे म्हणत शिखीमुखने आपल्या हातात बांधलेली माळा दाखविली.

अघोरी चकित होऊन परस्परांकडे पाहू लागले. एक जण आपल्या साथीदारांना म्हणाला–"आश्चर्य आहे बुवा! आपण आपल्या शत्रूला ठार करायला आलो आणि हे लोक स्वत:ला आपले मित्र असल्याचे सांगत आहेत. रुद्राक्षमाळेवर विश्वास करावयाचा का?"

दुसरा अघोरी कपाळावर हात आपटीत म्हणाला–"या शंका काढीत आपण फुकट वेळ घालवीत आहो. मी जाऊन लवकर आपल्या गुरुवर्यांना बोलावून घेऊन येतो." तो धावतच जवळच्या टेकडीच्या टोकाला गेला आणि तेथे उभा राहून जोरजोराने हात हलवीत हाक मारू लागला.

चार पांच मिनिटांनी एका मोठ्या हत्तीवर बसून एक म्हातारा तेथे येऊन पोचला. त्याच्या पाठीमागून आणखी काही अघोरी व इभ्यु जातीचे लोक पायी चालत येत असलेले दिसले.

दुरूनच हत्तीवर बसलेल्या म्हाताऱ्यास ओळखून शिखीमुख आनंदाने ओरडला–"घोरचित्त की जय!"

घोरचित्त हळूहळू शिखीमुख व त्याचे साथीदार होते तेथे आले. एकदां सर्वांना लक्षपूर्वक पाहिले. काही बोलल्याशिवाय हत्तीवरून खाली उतरला व शिखीमुखजवळ जाऊन त्याला प्रेमाने भेटला. तेव्हां विक्रमकेसरीला फार आनंद झाला. आपली सर्व संकटे आता दूर झाली, आता आपले सर्व श्रम व कष्ट यशस्वी होणार असा आत्मविश्वास त्याला वाटू लागला. तो देखील आनंदाने घोरचित्ताचा जयजयकार करू लागला. त्यांच्या सर्व अनुयायांनी पण जयजयकार केला.



घोरचित्त हसत विक्रमसिंहाजवळ आला व म्हणाला–"विक्रम! तुझे आजोबा विक्रमकेसरी आमचे गुरु होते. त्यांनी आमच्यावर जे उपकार केले त्यांची फेड करण्यास आज मला संधी मिळत आहे. त्याबद्दल मला फार आनंद होत आहे. त्यांना जे पडके देऊळ पाहण्याची इच्छा होती त्या देवळापर्यंत तू येऊ शकलास ही किती समाधानाची गोष्ट आहे. या देवळाच्या आवारात शिल्पकलेचे जे वैभव आहे त्या सर्वांचा तूच मालक आहेस. पहा, या 'भद्रकाली'वर चढून पहा. हे सर्व वैभव उचलून नेण्यासाठी आणखी काही इम्यु जातीचे लोक आले आहेत." असे सांगून घोरचित्ताने आपल्या हत्तिणीवर विक्रमला सहजी बसविले.

हत्तीवर चढून विक्रमने एकदा चारी-बाजूचा प्रदेश कौतुक करीत पाहिला. एका उंच टेकाडामागून इम्यु जातीचे लोक काही अघोरी लोकांसह येत असलेले दिसले. इतक्या इम्यु जातीच्या लोकांना घोरचित्ताने आपले अनुयायी कसे करून घेतले हे विक्रमला एक आश्चर्यच होते.

विक्रमने हत्तीवरून उतरून घोरचित्ताचे आभार मानले आणि शिखीमुख व नांगसोम यांना त्याने जे पाहिले होते ते सांगितले. शिखीमुखने चकित होऊन घोरचित्ताला विचारलेच–"हे सर्व कसे झाले?"

"ही सर्व त्या महाकाळाची कृपा आहे!" असे म्हणत घोरचित्ताने एकदा आकाशाकडे पाहून नमस्कार केला आणि पुढे म्हणाला–"त्या भयंकर जंगलात तुम्हांला भेटल्या-नंतर मी पडक्या देवळाच्या पुजाऱ्याविषयी सर्व माहिती चवकशी करून काढली. त्याच बरोबर इम्यु जातीच्या एका वृद्ध माणसा-कडून या बेटावरच्या पडक्या देवळाविषयी माहिती पण विचारून घेतली. तो पुजारी एक पाताळयंत्री दुष्ट माणूस आहे. मला, तुम्ही सुद्धा त्या पडक्या देवळाच्या शोधार्थ गेल्याचे कळले तेव्हां मी तुम्हांला त्याच्या हातांतून वाचविण्यासाठी दुसऱ्या एका नावेतून निघालो. वाटेत मला तुमच्याबरोबर निघालेले, पण मागे राहलेले इम्यु लोक भेटले. त्यांना घेऊन आम्ही सर्व मिळून या वृश्चिक द्वीपावर येऊन पोचलो."

"तुमच्या या मदतीबद्दल आम्ही सर्व तुमचे फार फार आभारी आहो. येथे जे पडके देऊळ आम्हांला आढळले आहे ते खरोखरच महाराज विक्रमसिंहांच्या कल्पनेतले पडके देऊळ असेल तर ज्या दगडा मातीखाली पडके देऊळ झाकलेले आहे ते दगड व माती आपण खणून काढले पाहिजे." शिखीमुख म्हणाला.

"ते काही मोठे काम नाही. माझ्याकडे पुष्कळ हत्ती आहेत व त्यांच्याकडून कामे करवून घ्यायला इम्यु जातीचे लोक पण आहेत." घोरचित्त म्हणाला.

त्याच सुमारास घोरचित्ताबरोबर आलेले इम्यु जातीचे लोकपण तेथे येऊन पोचले. त्यांनी विक्रम व शिखी दोघांना आणि नांगसोमला ओळखले. सर्वांना आनंद झाला व सर्व आनंदाने नाचू लागले.

त्या गर्दीतून घोरचित्ताने शिखीमुख व विक्रमला जरा बाजूला नेऊन विचारले–



"तो दुष्ट पुजारी कोठे आहे? या बेटावरच आम्ही त्याच्या तिघां शिष्यांना धरले आहे. ते आमच्या कैदेत आहेत."

"आतांपर्यंत आम्ही त्या पुजाऱ्याविषयी सांगायला पार विसरूनच गेलो होतो. आपल्या कैदेत असलेले तिघे त्या पुजाऱ्याचे शिष्य नसून आमच्याकडच्या जंगलातले अट्टल चोर आहेत. धनलोभ दाखवून तो पुजारी त्यांना येथपर्यंत घेऊन आला. पण ते आता उघडे पडले आहेत. कारण तो पुजारी यावेळी मृत्यूच्या दारात उभा आहे." असे सांगून दोघांनी घोरचित्ताला झाडीपलीकडे नेऊन झाडाच्या फांद्यांना










टांगलेल्या झोपाळचात बसवलेल्या पुजाऱ्याला दाखविले.

पुजाऱ्याचे दोन्ही डोळे उघडे होते. पण तो निश्चेष्ट पडला होता. अजगराच्या तोंडातून वांचल्यावरदेखील तो मृत्यूची वाट पहात पडून होता. तो जिवंत होता खरा, पण त्याच्या चारीबाजूला जे होत होते ते मात्र त्याला कळत नव्हते. त्याचा देह व बुद्धि बधिर झाले होते.

शिखीमुखने थोडक्यात वृश्चिक बेटावरची माहिती सांगितली व म्हणाला–"त्या अजगराच्या घशातून मी या पुजाऱ्याला वांचविले नसते तर तो आतांपर्यंत या जगात राहाला नसता. त्या अजगराने त्याला गट्ट केले असते."

त्याच वेळी पुजारी शुद्धीवर आला. त्याने दोन्ही हात जोडून घोरचित्ताला नमस्कार केला व म्हणाला–"तू महाकाळाचा भक्त आहेस. मी शिथिलेश्वरीचा पुजारी आहे. मी जास्त दिवस जगेनसे दिसत नाही. दगडा मातीखाली झांकून गेलेले हे पडके देऊळ लवकर बाहेर काढ. मी आपल्या देवीचे दर्शन करून डोळे मिटणार आहे." असे म्हणत असतां पुजाऱ्याच्या डोळ्यातून घळघळा अश्रू वाहू लागले.

घोरचित्त चार पांच मिनिटे पुजाऱ्याकडे पहात उभा राहला. त्याच्या अंगावर शहारे उभे झाल्यासारखे झाले. तो म्हणाला–"हा दुष्ट आहे, पण मोठा भक्तपण आहे. यात शंका नाही." असे म्हणत तो मागे फिरला व आपल्या शिष्यांना म्हणाला–"हत्तींना घेऊन या. देवळावर पडलेले हे खडक बाजूला सारले पाहिजेत."

गुरूची आज्ञा होताच सर्व शिष्य व त्यांच्या बरोबर आलेले इभ्यु जातीचे लोक हत्तीवर चढून पडक्या देवळाकडे निघाले.

(पुढील अंकी संपूर्ण)



# मंत्र्याचा मुलगा

**वि**क्रमादित्याने हट्ट सोडला नाही. तो झाडाजवळ परत आला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौनपणे स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला बेताळ त्याला म्हणाला–"राजा! तू आपल्या एकाद्या मित्रासाठी इतके कष्ट करीत असशील तर संभाळून रहा. कारण मनुष्य स्वार्थसिद्धीसाठी मैत्री व सख्य असल्या गोष्टींची कधी पर्वा करीत नाही. याचे उदाहरण म्हणून मी तुला महाराज महेंद्र यांची गोष्ट सांगतो." असे सांगून बेताळ गोष्ट सांगू लागला.

अवंतीपुर येथे महेंद्र नांवाचा एक राजा राज्य करीत असे. त्याच्या मंत्र्याचे नाव वीर भूपति असे होते. दोघांचे परस्परसंबंध राजा व मंत्री असे नसून सखा किंवा मित्र असे होते. बरेच दिवस त्यांना मूलबाळ काही झाले नाही. एक दिवशी राजाला



एक स्वप्न पडले. स्वप्नात एक ऋषी राजाला दर्शन देऊन म्हणाले–"तुझ्या राजधानीच्या दक्षिणेकडील जंगलात एक संतति वृक्ष आहे. तू त्या झाडाचे फळ तोडून आपल्या राणीला खायला दिलेस तर तुला मुलगा होईल." असे सांगून ऋषी अंतर्धान पावले.

राजाची झोप मोडली. त्याने झोपण्याचा पुष्कळ प्रयत्न करून पाहिला. पण त्याला झोप येईना. कारण त्याला ते स्वप्न खरे वाटले. उजाडल्याबरोबर तो दक्षिणेकडील जंगलात गेला. तेथे एका झाडाखाली त्याला एक मूर्त दिसली. ती स्वप्नांत दर्शन देणाऱ्या मुनीसारखी होती. त्या झाडाला दोनच दोन फळे होती. ती फळे पाहून राजाला वाटले की ती दोन फळे राणीने खाल्ली तर दोन मुलगे होतील. त्याच वेळी त्याला त्याच्या मित्राची आठवण झाली. मंत्र्याला पण मूलबाळ काही नव्हते. याशिवाय राजाने विचार केला की त्याला दोन मुलगे झाले तर ते राज्यासाठी आपसात भांडतील. त्या पेक्षा आपल्याला एक व मंत्र्याला एक मुलगा झाला तर ते राजा व मंत्री म्हणून परस्परांना मदतच करतील. प्रजा पण सुखी होईल.

असा विचार करून राजा झाडावरची दोन्ही फळे तोडून घेऊन आला आणि एक फळ राणीला खायला दिले आणि दुसरे फळ मंत्र्याला देऊन ते त्याने आपल्या बायकोला खायला द्यावे, असे त्याला समजावून सांगितले. त्या प्रमाणे राणीने व मंत्र्याच्या बायकोने एक एक फळ खाल्ले व यथा समयी दोघींना एक एक मुलगा झाला. राजपुत्राचे नांव विजय व मंत्र्याच्या मुलाचे नाव विमल ठेवण्यात आले.

एक दिवशी ज्योतिष्याने मंत्र्याला त्याचा मुलगा राज्य करील असे भविष्य सांगितले. परंतु मंत्र्याने त्याच्याकडे दुर्लक्ष केले.





मुलांना पांचवे वर्ष लागल्यावर दोघांना शिकविण्यासाठी एका गुरुजींना नेमण्यात आले. विद्याभ्यासात दोघे मुलगे हुशार निघाले. परंतु विमल राजपुत्र विजय याच्याहून प्रत्येक विषयात कांकणभर पुढेच असे. तरी राजपुत्र विजयच्या मनात विमलचा मत्सर किंवा द्वेष उत्पन्न झाला नाही. उलट त्याला आपला मित्र हुशार असल्याचा अभिमान वाटे. राजा व मंत्री दोघांची परस्परांशी जशी घनिष्ट मैत्री होती तशीच विजय व विमल यांची पण परस्परांशी मैत्री होती.

मुलांचा विद्याभ्यास पुरा होत आला. राजाने मृत्युसमयी राज्यकारभाराचा सर्व भार आपल्या मंत्र्यावर टाकला होता. दोघे मुलगे विद्याभ्यास पूर्ण झाल्यावर घरी परत आले. राजकुमार विजय अद्याप लहानच होता. दोघां मुलांना मंत्र्याने एक वर्षभर देशाटनास जाण्यास सांगितले. त्याने परत आल्यावर राज्याभिषेक करू असे पण समजावून सांगितले.

मंत्र्याने ती गोष्ट सांगितली त्यावेळी त्याच्या मनात दुसराच हेतू होता. राज-कुमाराहून आपला मुलगाच सर्व तऱ्हेने जास्त योग्य आहे, असे त्याला वाटू लागले होते. ज्योतिष्याने पण तो एक उत्तम राज्यकर्ता होणार असे भविष्य वर्तवले होते. विमल मंत्र्याचा मुलगा म्हणून जन्मल्या मुळेच नाहीं का मंत्री बनणार? परंतु तो सर्व तऱ्हेने योग्य असूनही त्याला राज्यपद न मिळतां मंत्रित्व कां मिळावे? म्हणून विजयचा कांटा दूर करून विमललाच गादीवर बसवावे. तो अधिकार आपल्याला आहेच. असा विचार करून विजयचा वध करण्यासाठी मंत्र्याने दोघां जणांना नेमले. विजय व विमल देशाटनाला निघाले तेव्हां त्यांच्या पाठोपाठ दोघे मारेकरीपण निघाले.












दोघे मारेकरी लागोपाठ दहा दिवस गुप्तपणे जात होते. सर्व एका जंगलात पोचले. विजय दमला होता, म्हणून विश्रांतीसाठी एका झाडाखाली बसला आणि विमल पाणी आणायला गेला.

विमलची तिकडे पाठ वळली व तो दृष्टीआड झाला असेल नसेल, एका मारेकऱ्याने तलवार उपसून विजयवर हल्ला केला. विजय पण आपली तलवार उपसून आत्मरक्षण करु लागला. तलवारींचा खणखणाट ऐकून विमल परतला आणि त्याने त्या मारेकऱ्याच्या हातातली तलवार हिसकावून घेतली. मारेकरी विमलचे पाय धरून माफी मागत, स्वत: मंत्र्यानेच त्याला त्या कामावर नेमल्याचे सांगू लागला.

विमलची मान शरमेने खाली वाकली. विजयच्या चेहऱ्यावर मारेकऱ्याच्या म्हणण्याचा काय परिणाम झाला, हेदेखील त्याला दिसले नाही. राजकुमार विमलचे सांत्वन करीत म्हणाला–"विमल ! तू याबद्दल थोडेदेखील मनाला लावून घेऊ नकोस. थोरामोठ्यांच्या मनातदेखील कधी कधी असले वाईट विचार येतात. परंतु त्यामुळे आपल्या मैत्रीत अंतर येण्याचे कारण नाही."

दोघे देशाटन करण्याचा विचार सोडून राजधानीला परत आले. मंत्र्याने राजकुमाराचे मोठ्या आनंदाने स्वागत केले, जणुंकाही जे झाले त्याच्याशी त्याचा काहीच संबंध नव्हता. तो राजकुमाराला असेदेखील म्हणाला–"राज्याभिषेकाचा मुहूर्त लवकरच ठरवून टाकतो."

"राज्याभिषेकापूर्वी राज्याचे दोन भाग करावेत आणि एका राज्याच्या गादीवर मला व दुसऱ्या राज्याच्या गादीवर विमलला बसवावे." विजय म्हणाला. मंत्र्याने राजकुमाराच्या इच्छेप्रमाणे व्यवस्था केली. थोडादेखील विरोध दर्शविला नाही.



येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला– "राजा ! मला एका गोष्टीची शंका वाटते. विजयने मंत्र्यावर सूड कां नाही उगवला ? या उलट त्याने मारेकरी नेमणाऱ्या मंत्र्याच्या मुलाला अर्धे राज्य कां देवविले ? मंत्री पुन्हां त्याचा वध करील.या भीतीने ? अर्धे राज्य देऊन टाकले की तो धोका राहणार म्हणून ? या शंकेचे समाधानकारक उत्तर माहीत असून तू दिले नाहीस तर परिणाम तुला माहितच आहे, तुझ्या डोक्याची शंभर छकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील."

ते ऐकून विक्रमादित्य म्हणाला–"राजकुमाराने स्वत:ची व मंत्र्याच्या मुलाची जी मैत्री होती तिला जास्त महत्व दिले. मंत्र्याच्या मुलाला, बापाने राजकुमाराचा वध करण्यासाठी मारेकरी नेमल्याची गोष्ट माहीत झाली तेव्हां लज्जेने त्याची मान खाली झाली व तो राजकुमाराच्या नजरेला नजर भिडवायला देखील लाजला होता. ही गोष्ट राजकुमाराने प्रत्यक्ष पाहिली होती. अशा परिस्थितीत मंत्र्याला राजद्रोही ठरवून शिक्षा केली तर त्याच्या मुलाशी असलेल्या मैत्रीत विघ्न आले असते. मैत्री बरोबरीच्या व्यक्तीत होऊ शकते, हे राजकुमाराला माहीत होते. मयत महाराज व मंत्री यांची परस्परांशी मैत्री होती. परंतु एक राजा होता व दुसरा मंत्री. म्हणून त्यांची मैत्री कायम राहू शकली नाही. म्हणून राजकुमार व मंत्रीकुमार पुढे अनुक्रमे राजा व मंत्री झाले तर त्यांची मैत्री कायम राहणे शक्य नव्हते हे ओळखून राजकुमाराने मंत्र्याच्या मुलाला अर्धे राज्य देऊन स्वत:च्या बरोबरीचा राजा करण्यास सांगितले आणि परस्परांच्या मैत्रीचा पाया बळकट केला."

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेताबरोबर नाहीसा झाला व झाडाला जाऊन लोंबकळू लागला. (कल्पित)












# निरुद्योगी माणसाचे जीवित

जगद्गुरु शंकराचार्यांकडे एकदां एक कापालिक आला आणि त्याने त्यांना विचारले–

"सर्व जण आपण एक थोर पुरुष आहां असे म्हणतात. मग माझ्याशी पैज करायला तुम्ही तयार आहांत का?"

"तू आपले कसब काय ते दाखव." शंकराचार्य म्हणाले.

"मी आकाशात अधांतरी उडू शकतो." असे सांगून तो कापालिक आकाशात उडू लागला. बराच वेळ उडत राहिल्यावर तो खाली उतरला.

"ही विद्या अवगत करून घ्यायला तुला किती दिवस लागले?" शंकराचार्यांनी त्या कापालिकाला विचारले.

"सुमारे चाळीस वर्षे मी या विद्येचा अभ्यास केला आहे." कापालिक म्हणाला.

"या क्षुल्लक कामासाठी तू चाळीस वर्षांचे आयुष्य फुकट घालविलेस. कावळ्याचा जन्म घेऊन आयुष्यभर आकाशात उडत राहिला असतास तर?" शंकराचार्य म्हणाले.

ते उत्तर ऐकून कापालिकाची मान लज्जेने लवली.





# आवडती

एका गावी गोपू नावाचा एक शेतकरी रहात असे. त्याच्याजवळ शेत होते व दोन गायी पण होत्या.

एकदा त्याची बायको त्याला म्हणाली– "आपल्याला एक गाय पुरे नाही का? दुसरी गाय कशाला? तिला आठवडयाच्या बाजरात विकून टाका."

गोपूला बायकोचा सल्ला पसंत पडला. तो गाईला घेऊन बाजारात गेला. पण मनासारखे गिऱ्हाईक मिळाले नाही म्हणून तो गाईला घेऊन घरी निघाला.

वाटेत गोपूला एक मनुष्य भेटला. त्याच्याजवळ एक घोडा होता. गाय विकायची असल्याचे कळले तेव्हां घोडेवाल्याने आपला घोडा देऊन गोपूची गाय घेतली. गोपू घोडयाला घेऊन घरी येत असतां त्याला एक बकरीवाला भेटला. गोपूने त्याला घोडा देऊन बकरी मागून घेतली. थोडे चालून गेल्यावर एक बदकवाला भेटला. त्याला बकरी देऊन गोपूने बदक घेतले. आणखी थोडया अंतरावर एक कोंबडीवाला भेटला. त्याला बदक देऊन गोपूने कोंबडा मागून घेतला.

गोपूला तोंपर्यंत खूप भूक लागली होती. म्हणून गोपूने तो कोंबडा वाटेतल्या एका गावात विकला व जे पैसे मिळाले त्यावर आपली भूक भागविली. काळोख पडण्याच्या सुमारास तो घरी येऊन पोचला. गोपूला घरी आलेला पाहून त्याचा शेजारी लखू आला आणि विचारले–"काय रे, गाय कितीला विकलीस?"

"गाय चांगल्या किमतीला विकली गेली नाही, तेव्हां एकाकडून घोडा घेऊन त्याला गाय दिली." गोपू म्हणाला.

"मग घोडा कोठे आहे रे?" लखूने विचारले.













"त्याच्या बदली बकरी घेतली." असे सांगून त्यानंतर त्याने जी अदलाबदल केली ते सर्व सांगितले. लखू चकित होऊन म्हणाला–"अरे काय पण खुळा आहेस तू? एका वेळच्या जेवणासाठी तू चांगली दूध देणारी गाय विकलीस आणि रिकाम्या हातांनी घरी परत आलास? बायकोच्या शिव्या खायला तयार रहा."

"माझी बायको, मी काय वाटेल ते केले तरी रागावत नाही." गोपू म्हणाला.

"आज तू जो मूर्खपणा केला आहेस, त्याबद्दल तुझी बायको तुला मुळीच सोडणार नाही. मी म्हणतो ते तुला खरे वाटत नसेल तर पैज लाव." लखू म्हणाला.

"माझ्याजवळ शंभर रुपये आहेत. शंभर रुपयांची पैज." गोपू म्हणाला.

"मी तयार आहे." लखू म्हणाला आणि बाहेरच्या खोलीत उभा राहिला आणि गोपू आंत गेला.

"गाय विकलीत का?" गोपूला बायकोने विचारले.

"गाय विकत घ्यायला कोणी तयारच होईना, तेव्हां घोडा घेऊन एकाला गाय दिली." गोपू म्हणाला.

"गाईपेक्षां घोडा चांगलाच, नाही का?" बायको म्हणाली.

"थोडे अंतर चालून गेल्यावर मी घोडा देऊन एकाकडून बकरी घेतली. बकरी देऊन आणखी एकाकडून बदक घेतले आणि नंतर आणखी एकाकडून बदक देऊन कोंबडा घेतला. भूक लागली होती म्हणून कोंबडा विकून पोटभर खाऊन घेतले." गोपूने बायकोला जसेच्या तसे सांगितले.

"बरोबर केलेत. आपल्याला कोंबडा कोठे हवा होता?" बायको म्हणाली.

नवरा बायकोचे बोलणे ऐकून लखूने हार मानली आणि घरी जाऊन शंभर रुपये आणून गोपूला दिले.





# सैनिकाचे प्रसंगावधान

हंगेरीच्या सैनिकांना हुजार म्हणतात. सैन्यात प्रवेश केल्यावर त्यांना राजाच्या सेवेत कमीत कमी बारा वर्षे रहावे लागते. हंगेरीच्या गादीवर मात्यास नावाचा राजा बसला तेव्हां त्याचे सैनिक दारू पितात हे त्याला आढळून आले. सैनिकांना दर आठवड्याला चार दीनार प्रमाणे पगार मिळत असे. तेवढ्या पगारात सैनिकांना दारू प्यायला पैसे कसे पुरतात हे राजाला कळेना. राजाने सैन्याच्या प्रमुख अधिकाऱ्यांजवळ याविषयी चवकशी केली. परंतु त्यांनी देखील समाधानकारक असे काहीच उत्तर दिले नाही.

सैनिकांचे हे गुपित कळावे यासाठी राजाने स्वतः वेष पालटून सैन्यात रहायचे ठरविले. राजा खिशात फक्त चार दीनार ठेवून राजधानीबाहेरच्या एका दारूच्या दुकानात गेला. दुकानात त्याला आंतून हसण्याखिदळण्याचा आवाज ऐकू आला. आपल्या जवळच्या चार दीनारांवर मौज करायला ही जागा बरी दिसते आहे, असा विचार करून राजाने आंत पाऊल टाकले.

आंत चार जुने हुजार होते. त्यांपैकी एकाने प्रवेश केल्यावर नव्या हुजाराचा कान धरून विचारले–"काय रे पोरा! तू केव्हां रे सैन्यात भर्ती झालास?"

"आठवड्यापूर्वी!" राजा म्हणाला.

तो जुना हुजार राजाचा खांदा हलवून म्हणाला–"तरमग तुला बारा वर्षे कष्ट सहन करावे लागणार! त्याची काळजी आतापासून करू नकोस. दोन दीनारांची 'ब्रांडी' (एक तऱ्हेची दारू) विकत घे, मौज करू या."

"माझ्याजवळ पैसे नाहीत. आम्ही फार गरीब आहो." राजा म्हणाला.

"ठीक, पण काय रे तुला कालच पगार मिळाला असेल नाही का? कमीत कमी



एका दीनाराची दारू मला पिऊ देशील की नाही ?" जुना हुजार म्हणाला.

राजाला ती गोष्ट मान्य करावी लागली. त्याने एका दीनाराची दारू त्याला पाजली. त्यानंतर इतर तिघां हुजारांनापण एकेका दीनाराची दारू राजाला पाजावी लागली. अशातऱ्हेने राजाचा खिसा रिकामा झाला.

परंतु त्या सैनिकांना ती दारू पुरली नाही. त्यांच्यापैकी योष्का नावाच्या सैनिकाने दारूवाल्याला जाऊन विचारले—"काय हो, एका दीनाराची दारू उधार देता का ? पुढल्या आठवड्यात पैसे देईन."

दुकानदाराने नकार दिला. योष्काने दुकानदाराला शिव्या दिल्या आणि म्हणाला—"तरमग, माझी ही तलवार गहाण ठेवून घे आणि मला एका दीनाराची ब्रांडी दे."

दुकानदाराने ती तलवार ठेवून घेतली आणि सर्व जुन्या हुजारांना दारू प्यायला देऊन दुकान बंद करायची वेळ झाल्याचे सांगितले.

रात्रीचे नऊ वाजण्याचा सुमार होता. सर्व सैनिक बाहेर निघून आले. परंतु ते स्वस्थ बसले नाहीत. त्या दुकानाच्या खाली एक तळघर होते. त्यात खाण्यापिण्याचे पदार्थ व दारू ठेवलेली असे. ही गोष्ट हुजारांना माहीत होती. काही दिवसांपूर्वी हुजारांनी त्या तळघरातला माल लुटला होता. त्या हुजारांनी ती चोरवाट शोधून काढली आणि त्या वाटेने जाऊन खाद्यपदार्थ व दारू घेऊन यायला राजावर बळजबरी करू लागले. राजाला ती गोष्ट पण मान्य करावी लागली. कारण तसे केले नाही तर सैनिक ठार करतील अशी राजाला भीती वाटली. हुजार लोक असले अत्याचार करतात हे प्रसिद्धच होते.

तळघरातून राजाने आणून दिलेले खाद्यपदार्थ व दारू खाऊन पिऊन सैनिक बरॅकीत निघून गेले. उशिरा पोचल्या-बद्दल पाहरेकऱ्यांनी त्यांना काही विचारले देखील नाही.

जुन्या हुजारांना झोपण्यासाठी खोल्या होत्या, पण राजाकरिता खोली नव्हती. योष्काने एक कांबळे जमिनीवर टाकून राजाला त्यावर झोपण्यास सांगितले.

राजाला झोप लागली नाही. त्याला हुजारांचा फार राग आला होता. या हुजारांनी त्याच्या जवळचे सर्व पैसे दारूत उडवून टाकले आणि त्याच्याकडून चोरी सुद्धा करविली होती. त्याला शिव्या दिल्या होत्या. योष्काची खोड मोडली पाहिजे, असा विचार करून राजा पहाटेच उठून आपल्या राजवाड्यात निघून गेला.

सकाळी उजाडतांच सर्व हुजारांना आज्ञा झाली की सर्वांनी आपापल्या तलवारी घेऊन कवायतीला हजर झाले पाहिजे. सर्व हुजार आपापल्या तलवारी घेऊन कवायतीला हजर झाले. योष्काजवळ तलवार नव्हती. त्याने कोणाकडे एखादी फालतू तलवार आहे का, चवकशी करून पाहिली. शेवटी त्याने एका सुताराकडून एक लाकडी तलवार करवून घेऊन ती म्यानेत ठेवून कवायतीला हजर होण्यास निघाला. कवायतीला हजर असलेल्या सैनिकात राजाने योष्काला



ओळखले आणि त्याच्या कंबरेला तलवार आहे की नाही, पाहिले. त्याच्या कंबरेला म्यान होती. पण म्यानेत तलवार नाही हे दाखवून योष्काला शिक्षा करावयाची असा राजाचा विचार होता.

त्यापूर्वी एका सैनिकाला त्याच्या एका अपराधाबद्दल मृत्युदंड सुनावण्यात आला होता. तो सैनिक तोपर्यंत कैदेतच होता. त्याला बोलावून आणण्यास राजाने पाठविले. त्या सैनिकाला आणून राजाने सर्वांसमक्ष उभे केले आणि राजाने योष्काला समोर पुढे यायला सांगून तलवारीने त्या सैनिकाचा शिरच्छेद करण्यास सांगितले.

योष्का थरथर कापू लागला. कारण लाकडी तलवारीने शिरच्छेद कसा काय होणार? म्हणून तो नम्रपणे म्हणाला—"महाराज! रक्तपात करणे मला इष्ट वाटत नाही, त्यापेक्षा मला आणखी चार वर्षे हुजाराचे काम दिल्यास ते करण्याची माझी तयारी आहे. म्हणून शिरच्छेद करण्याचे काम मला देण्यात येऊ नये."

राजा रागाने म्हणाला—"हुकूम बजाव!"

"महाराज! हुकूम बजावण्यापूर्वी मला देवाची प्रार्थना करण्यास परवानगी द्यावी." योष्काने राजाजवळ विनंति केली.

राजाने त्याची विनंती मान्य केली.

योष्का आकाशाकडे पाहून व हात जोडून देवाला म्हणाला—"हे परमेश्वरा! या हुजारावर दया कर! तू माझी तलवार लाकडी करून टाक, म्हणजे माझ्या एका सहकारी हुजाराचा जीव घेतल्याचे पाप मला लागणार नाही." असे प्रार्थनेचे सोंग करून त्याने म्यानेतून तलवार उपसली आणि ती राजाला दाखवून म्हणाला—"महाराज! ही पहा तलवार! देवाने माझी प्रार्थना ऐकली."

राजा योष्काचे प्रसंगावधान पाहून थक्क झाला व त्याने त्याच्या हुशारीबद्दल त्याला माफ केले.





# चलाख लाकूडफोड्या

फार पूर्वी मगध देशावर सोमदत्त नावाच्या एका राजाचे राज्य होते. त्याला चंद्रलेखा नावाची एक मुलगी होती. ती रूपाने फार सुंदर होती. ते ऐकून कलिंग देशाचा राजा शूरसेन याने त्याच्याकडे दूत पाठवून कळविले की आपल्या मुलीशी मी विवाह करणार आहे, तेव्हां लग्न समारंभाची तयारी ठेवावी.

शूरसेन विलासी, दुष्ट व एक क्रूर राजा होता आणि सोमदत्तहून जास्त शक्तिशाली होता. म्हणून सोमदत्तने त्या दूताकरवी शूरसेनला कळविले की माझी मुलगी अजून लग्नायोग्य झाली नाही, लहान आहे. तिचे लग्न होईल तेव्हां स्वयंवराचीच व्यवस्था करण्यात येईल."

तो निरोप म्हणजे आपला अपमान आहे, असे शूरसेनाला वाटले. मगध राज्य बळकावण्याची पण त्याच्या मनात इच्छा होती. परंतु चंद्रलेखेबरोबर लग्न झाले की युद्धाविना आपल्याला मगध राज्य मिळेल असा त्याने पूर्वी विचार केला होता. पण त्याचा तो बेत फसला. म्हणून त्याने मगध देशावर स्वारी करून मगधचे राज्य स्वाधीन करून घ्यायचे आणि त्यानंतर चंद्रलेखेशी विवाह करावयाचे ठरविले.

सोमदत्तला शूरसेन स्वारी करण्याच्या तयारीत असल्याचे कळले. त्याने आपल्या मंत्र्यांचा सल्ला घेतला. एका मंत्र्याने, चंद्रलेखेचा विवाह शूरसेनाशी करून द्यायचे मान्य करून युद्धाचे संकट टाळावे असा सल्ला दिला. दुसऱ्याने चंद्रलेखेचा विवाह दुसऱ्या एका बलिष्ठ राजाशी करून देऊन त्याच्या मदतीने शूरसेनाची खोड मोडावी असे सुचविले. आणखी एकाने, शूरसेनाला धनलोभ दाखवून शांत करावे असा सल्ला दिला.

चि. न. चितळे



परंतु त्यापैकी एकदेखील सल्ला सोमदत्ताला पसंत पडला नाही. युद्ध टळणे अशक्य होते व युद्धाचा परिणाम पराभव व सर्वनाश हेदेखील स्पष्ट दिसत होते.

सोमदत्त म्हणूनच भीत होता. परंतु एक तरुण युवक येऊन राजाला म्हणाला– "महाराज! शत्रू आपल्या राज्यावर स्वारी करीत असल्याचे ऐकतो. मी एक युक्ति सुचवावी, म्हणतो. युद्धाशिवाय शत्रुसैन्य परत पाठविणे शक्य आहे. ही युक्ति करण्यासाठी मला एक धनुष्य व एक हजार बाण द्यावेत."

"तू कोण? धनुर्धारी आहेस का? तू एकटा शत्रूशी युद्ध करणार?" राजाने विचारले.

"मी एक सामान्य लाकूडफोड्या आहे, महाराज! मी धनुर्धारी लोकांना पाहिले आहे, परंतु कधी हातात धनुष्य धरले नाही. युद्धाशिवाय शत्रूला परत फिरविणे शक्य आहे असे मला वाटते." तो म्हणाला.

राजाला ती एक थट्टा वाटली. त्याने लाकूडफोड्याला रागाने विचारले–"युद्धाविना शत्रूला परत फिरविणे म्हणजे तुला थट्टा वाटली होय? अशी थट्टा या कठीण परिस्थितीच्या वेळी मला खपणार नाही."

"माझा प्रयत्न फसला तर शत्रूच माझे डोके उडवील. महाराजांनी मला शिक्षा करण्याची गरजच उरणार नाही. मी आपणांकडे फक्त एक धनुष्य व हजार बाण मागितले आहेत. त्यात विशेष खर्च पण नाही. माझी एवढी विनंती मान्य करावी, महाराज!" लाकूडफोड्या तरुण म्हणाला.

त्या तरुण युवकाच्या बोलण्यात आत्मविश्वास दिसत होता. राजाने एक धनुष्य व एक हजार बाण देवविले.



त्याच दिवशी शत्रुसैन्य मगधावर चालून आल्याची वार्ता राजाला कळली.

राजाचा निरोप घेऊन लाकूडफोड्या जंगलात गेला होता. त्याने, कलिंग देशाचे सैन्य ज्या वाटेने येणार होते त्या वाटेवर उंच उंच झाडांवर बाण रोवून प्रत्येक बाणाच्या चारीबाजूला वृत्ताकार आकृत्या करून ठेवल्या होत्या.

कलिंग देशाचे सैन्य जंगलापलीकडे पडाव टाकून विश्रांती घेत होते. काही सैनिक गमती खातर जंगलात फिरत होते. त्यांना दुरून झाडांवर बाण दिसले. कोणी तरी नेम मारण्याचा अभ्यास करीत असावा असे त्यांना वाटले. झाडांवर नेम मारलेले बाण पहात कलिंग देशाचे सैनिक एका तळ्याजवळ आले. तेथे एक तरुण युवक त्यांना दिसला. तो खायला बसला होता. त्याच्या शेजारी एक धनुष्य व काही बाण त्यांना दिसले. ते बाण झाडाला मारलेल्या बाणांसारखेच होते.

"तूच मारलेस का हे झाडावरचे सर्व बाण!" सैनिकांनी त्या तरुण युवकाला विचारले.

"होय! कां?" त्या तरुण युवकाने त्यांना विचारले.



"म्हणजे तुला चांगलाच नेम धरता येतो, म्हणावयाचा!" सैनिक त्याची वाखाणणी करु लागले. "नाही, मी अजून अभ्यासच करतो आहे." तो तरुण युवक म्हणाला.

सैनिक त्या तरुण लाकूडफोड्याला एक हुशार धनुर्धारी समजून आपल्या सेनापतीकडे बोलावून घेऊन गेले. तो देखील काही बोलल्याशिवाय त्यांच्याबरोबर निघाला.

शूरसेन व त्याचा सेनापति एका तंबूत युद्धाच्या डावपेचांसंबंधी काही बोलत होते. त्याच वेळी तरुण युवकाला घेऊन सैनिक त्यांच्याजवळ आले आणि त्याच्या धनुर्विद्येची त्यांनी प्रशंसा केली.

"तू आमचे हे अफाट सैन्य पाहतो आहेस ना? तुझे महाराज आमच्याशी युद्धाला अजून तयार नाहीत ना?" सेनापतीने विचारले.

"आमचे महाराज युद्धाला केव्हांपासून तयार आहेत!" तरुण युवक म्हणाला.

"मग तू कां नाही सैन्यात भर्ती झालास? येथे जंगलात बसून काय करतो आहेस?" शूरसेनाने विचारले.

"मी धनुर्विद्येचा अभ्यास करीत आहे. माझ्या सारख्या नवशिक्याला महाराज सैन्यात घेत नाहीत. माझ्याहून धनुर्विद्येत निष्णात असे पाच हजार सैनिक महाराजांच्या सैन्यात आहेत. सैन्यात भर्ती व्हायला पुरेशी योग्यता यावी म्हणून मी अभ्यास करीत आहे." तरुण युवक म्हणाला.

"आमच्याशी युद्ध होईल त्यात तुमचे महाराज जिंकतील की हारतील?" शूरसेनाने विचारले.

"युद्ध करून पहावे! आपल्याला प्रत्यक्षच कळेल! मी काय सांगू?" तरुण युवक म्हणाला. शूरसेनाने त्या तरुण युवकाला निरोप दिला. त्यानंतर बराच वेळ तो सेनापतींशी त्या संबंधी बोलत राहला आणि शेवटी सैन्य घेऊन परत जाण्याचा त्याने निश्चय केला. तिकडे सोमदत्तला जेव्हां कळले की शूरसेन ससैन्य राजधानीच्या हद्दीपर्यंत येऊन युद्ध केल्याशिवाय परतला, तेव्हां त्याला आश्चर्यच वाटले. त्याने लाकूडफोड्या तरुणाला बोलावून शत्रू युद्ध केल्याशिवाय कसा काय परतला, विचारले?

तरुण लाकूडफोड्याने जी युक्ति केली होती थोडक्यात वर्णन करून सांगितली. राजाने त्याच्या चातुर्याची वाखाणणी करून त्याला आपल्या दरबारी चांगल्या हुद्यावर नोकरी दिली. राजाने दोन वर्षेपर्यंत त्याला अनेक विद्या शिकवून शेवटी त्याच्याशीच आपल्या मुलीचे लग्न करून दिले.





# धूर्त म्हातारी

[ ३ ]

खालिदने दिलैलाजवळ तिने केलेल्या चोऱ्या व फसवेगिरीची कामे यांची सविस्तर चवकशी केली तेव्हां ती म्हणाली—"तुम्ही काय विचारता आहां हेच मला कळत नाही. मी आपल्या आयुष्यात कधी चोरी केली नाही."

संध्याकाळची वेळ होती म्हणून दिलैलाच्या चोरीविषयी जास्त चवकशी करायला पुरेसा वेळ नव्हता. म्हणून खालिदने दिलैलाला रात्रभर कैदेत ठेवून दुसऱ्या दिवशी पुढची चवकशी करून निर्णय द्यायचे ठरविले.

परंतु तुरुंगाच्या अधिकाऱ्याने तिला तुरुंगात ठेवून घेण्यास नकार दिला. म्हणाला—"ही म्हातारी वस्ताद आहे. पाहरेकऱ्यांच्या डोळ्यात धूळ फेकून ही पळाली तर माझी नोकरी जाईल."

"तू म्हणतोस तेदेखील बरोबर आहे. म्हणून पुरी चवकशी होईपर्यंत चार लोकांची नजर राहील अशा जागी हिला ठेवून हिच्यावर पाहऱ्याची व्यवस्था करणे ठीक होईल." खालिद म्हणाला.

खालिद घोड्यावर बसून निघाला व त्याच्या पाठीमागून पांच फिर्यादी दिलैलाला धरून ओढीत नगराबाहेर घेऊन गेले. तेथे मैदानात एका खांबाला दिलैलाला बांधून ठेवून पांच जणांना तिच्यावर पाहऱ्यासाठी नेमले आणि खालिद घरी निघून गेला.

पांचही फिर्यादी दिलैलाच्या चारीबाजूला बसले. तिच्यावर शिव्यांची लाखोली वाहून त्यांनी तिच्यावर त्यांचा जेवढा राग होता तो काढला. खाणेपिणे झाल्यावर त्यांना झोप आली. बिचाऱ्यांना तीन दिवस झोप मिळाली नव्हती.



मध्यरात्र उलटली होती. दोन वाटसरू विरुद्ध दिशेने आले आणि त्या जागी भेटले. एक गावातून बाहेर आणि एक बाहेरून गावात जात होता. त्यांचे संभाषण दिलैलाला छान ऐकू येत होते.

"बगदादला कोणती वस्तु चांगली घेण्यासारखी मिळते?" बाहेरून येणाऱ्याने विचारले.

"साय लावलेली मध घातलेली बगदादची रसरोटी फार प्रसिद्ध आहे. मी तीन दिवस या गावात होतो. पण मन भरले नाही, अाणखी खाण्याची इच्छा आहे." बाहेर जाणारा म्हणाला.

"तरमग मी या गावात राहीन तितके दिवस रसरोटीच खाईन." बाहेरून येणारा म्हणाला.

नगराबाहेर जाणारा मनुष्य पुढे निघाला. बाहेरून येणारा दिलैलाजवळ आला.

मध्यंतरी दिलैला त्यांचे संभाषण लक्ष देऊन ऐकत होती आणि तिने एक युक्ति योजली. तिच्यावर पाहरा ठेवणाऱ्यांच्या हातावर तुरी देऊन पळून जायला तिला ती सर्वात चांगली युक्ति वाटली. तो मनुष्य तिच्याजवळ आला त्या पूर्वी दिलैला ओरडत होती–"मला नको! मला नको! मी नाही खाणार!"

त्या मनुष्याने जवळ आल्यावर तिला विचारले–"कोण तू? तुला असे खांबाला कां बांधून ठेवलं आहे? आणि तू काय खाणार नाही म्हणतेस?"

"अहो दादा, काय सांगू तुम्हांला? माझ्या नवऱ्याने रसरोटीवर साय लावून लावून लक्षावधि रुपये मिळविले. मला काही दिवस ती रसरोटी फार आवडे. मी पुष्कळ खात असे. पण हळूहळू मला तिचा वीट येऊ लागला, इतका की रसरोटी समोर आली की मला ओकाऱ्या येऊ लागत. परवाच आमच्या दुकानात एक श्रीमंत गिऱ्हाईक कोणी एकजण आले. त्या वेळी माझ्या नवऱ्याने मलासुद्धा एक रसरोटी खायला आग्रह केला. मला ती नको होती आणि ओकारी येणार असे वाटू लागले. ते पाहून त्या श्रीमंत माणसाला रसरोटीत काही तरी घातलं आहे असा संशय आला. त्याने समोरची रसरोटी तशीच टाकली आणि निघून गेला. माझ्या नवऱ्याचं नुकसान झालं. त्याने त्या दिवशी तयार केलेल्या सर्व रोट्या फुकट गेल्या. पण चूक होती माझ्या नवऱ्याचीच, त्याने तरी मी ती खावी म्हणून माझ्यावर बळजबरी कां करावी? त्याने सर्व आरोप माझ्यावर लावला आणि माझ्यामुळेच त्याचा सर्व व्यापार बुडाला अशी माझ्याविरुद्ध फिर्याद केली. न्यायाधिशाने मलाच त्या सर्व रोट्या खायला घालायची शिक्षा दिली आणि या खांबाला बांधून ठेवविले. उद्या सकाळपर्यंत सर्व रोट्या आणवून त्या माझ्या समोर ठेवणार आहेत. तोंपर्यंत मला दुसरे काही खायला मिळणार नाही. मी काल संध्याकाळपासून आतांपर्यंत काही खाल्ले नाही." दिलैलाने ही कपोलकल्पित गोष्ट सांगितली.

"तुझ्याच नशिबी कां ही पीडा यावी? मला ही शिक्षा झाली असती तर मी आनंदाने भोगली असती." तो परदेशी म्हणाला.





"त्यात काय, मला सोडून द्या व तुम्ही या जागी उभे रहा. मी तुम्हांला बांधून ठेवते आणि तुमच्या तोंडावर बुरखा घालून ठेवते. थोड्या वेळाने राजाचे शिपाई रसरोटचा घेऊन येतील. तुम्हांला पाहून मीच खांबाला बांधलेली आहे असे समजून रोट्या तुमच्या समोर ठेवतील." दिलैला म्हणाली.

दिलैलाच्या थापेवर विश्वास करून त्या माणसाने तिला सोडले आणि दिलैलाने त्या परदेश्याला त्या खांबाला बांधून ठेवून त्याच्या तोंडावरुन बुरखा घातला आणि त्याच्या घोड्यावर बसून गावात निघून गेली.

पांच फिर्यादी झोप मोडल्यावर खांबाला बांधलेल्या परदेश्याला न ओळखून व ती दिलैलाच आहे असे समजून शिव्या देऊ लागले. थोडा वेळ ऐकत राहल्यावर तो परदेशी विचारू लागला—"अजून रसरोटचा कां येत नाहीत ?"

परदेश्याचा पुरुषी आवाज ऐकून पांचही जण चकित झाले. त्यांनी त्याच्या तोंडावरचा बुरखा बाजूला सारून पाहिले व दिलैलाने पुन्हा त्यांना फसवून त्यांच्या हातातून निसटून गेल्याचे त्यांना कळले.

थोड्या वेळाने. छान उजाडले व खालिद स्वतः तेथे आला. त्याला दिलैलाने केलेली लबाडी कळली. तिला आता दंड देवविणे कठीण आहे असे वाटले त्याला. म्हणून तो सर्व फिर्यादींना बरोबर घेऊन खलीफांकडे गेला.

खलीफांनी सर्व फिर्याद शांतपणे ऐकून घेतली आणि सर्व फिर्यादींना त्यांचे नुकसान भरून देण्याचे वचन दिले. तरी दिलैलाला कैद करणे आवश्यक होतेच. त्या कामाची जबाबदारी त्यांनी खालिद व मुस्तफा दोघां-वर टाकली.

"माझ्याकडून हे काम होणार नाही, सरकार!" खालिद माफी मागत म्हणाला.

"तरमग तिला कैद करून आणणाऱ्या दुसऱ्या कोणाचे तरी नाव सुचव." खलीफा म्हणाला.

"नवे कोतवाल साहेब अहमदमियां असताना दुसऱ्या कोणाची गरजच काय? त्या पदावर त्यांची नेमणूक झाली तेव्हां-पासून त्यांनी एका चोराला तरी कैद केले आहे का? म्हणून त्यांच्यावरच ही जबाबदारी टाकावी." खालिद म्हणाला.

खलीफांनी अहमदला बोलावून दिलैलाच्या विरुद्ध आलेल्या सर्व फिर्यादींचे वर्णन करून तिला कैद करून आणण्याचें काम त्याला सोपविले.

अहमद आपल्या चाळीस शिपायांसह दिलैलाच्या शोधार्थ निघाला. त्या चाळीस शिपायांचा हवालदार गूनी अली नावाचा एक मनुष्य होता. तो आपला अधिकारी अहमद याला म्हणाला—"मालक! दिलैलाला पकडण्याच्या कामी हसन साहेबांची सुद्धा मदत घेतली तर बरोबर होईल, असे मला वाटते."

"अरे पण आपल्याला इतर कोणाच्या मदतीची गरजच काय? आपण काय अगदीच कुचकामाचे आहो? पुन्हा असं कधी बोललास तर पहा, तुझी बत्तीशीच



काढवीन." अहमद थोडा मोठ्यानेच बोलला त्याचा हेतु हसनला पण ते ऐकू जावे हा होता.

दिलैलाला धरून आणण्याचे काम खलीफांनी अहमदवर टाकले होते. ते ऐकून हसन थोडा निराश झाला होता. अहमद म्हणाला ते ऐकून तो तर हताशच झाला. माझ्या मदती शिवाय अहमद दिलैलाला कसा काय पकडतो, मी सुद्धां पाहतो. असा उलटा विचार त्याच्या मनात आला.

अहमदने आपल्या चाळीस शिपायांना राजमहालाच्या बाहेर मैदानात उभे केले व म्हणाला—"माझ्या तरुण वीर साथी मित्र












हो! तुम्ही आपले चार गट करून बगदाद शहरातल्या चार दिशांना जा आणि सारे शहर चाळून काढा. उद्या दुपारी सर्व मुस्ताफा गल्लीच्या टोकाला जी सराय आहे तेथे या. मी तेथे तुम्हां सर्वांना भेटेन."

अहमदच्या हुकमाप्रमाणे त्याचे शिपाई दहादहा जणांचा एकेक गट करून निघाले. अहमद स्वत: एकटा दिलैलाचा शोध काढीत निघाला.

खलीफांनी तिला धरण्याची कामगिरी अहमदला सोपविली असल्याचे दिलैलाला जेव्हां कळले तेव्हां तिने त्याची फिकीरच केली नाही. ती आपल्या मुलीला म्हणाली—

"मला ओळखून कैद करणे एकट्या हसनलाच शक्य आहे. खलीफांनी मला कैद करण्याची कामगिरी त्याला सोपविली नाही, हे आपले नशीबच समज. या अहमदला तू सुद्धा फसवू शकशील, अशी माझी खात्री आहे."

"मग आई मी, जाऊ म्हणतेस त्याची खोड मोडायला?" जीनाबने आपल्या आईला विचारले.

"होय, माझ्या मनातली गोष्ट तू ओळखलीस! तर मग तूच जा!" दिलैला म्हणाली.

जीनाब तरुण होती व सुंदर पण होतीच. खूप नटून तिने तोंडावर एक पातळ बुरखा टाकला आणि मुस्ताफा गल्लीच्या टोकावर हज करीमची सराय होती तेथे आली. तिने मोठ्या अदबीने हज करीमला सलाम केला व म्हणाली—"आमची काही नातेवाईक मंडळी आज येथे येणार आहेत. त्यांना उतरण्यासाठी एक मोठी खोली पाहिजे. मी पाच दीनार भाडे देईन."

हज करीम जीनाबचे सौंदर्य व तारुण्य पाहूनच खूष झाला होता. म्हणाला—"भाड्या बिड्याची गरजच काय. येथे राहतील तेव्हां माझ्याच कडची दारू विकत घेऊन नाही का पिणार?"



बरोबर सांगितले. सर्व एकाहून एक दारू पिणारे आहेत." जीनाब म्हणाली.

जीनाबने घरी जाऊन गालिचे, लोड तक्के मोठमोठ्या थाळ्या व दारू पिण्यासाठी सुंदर सुंदर प्याले आणून सर्व खोली छान सजवून ठेवली आणि स्वत: सरायीच्या दारावर जाऊन उभी राहली.

सर्वात प्रथम गूनी अली आपल्या गटातल्या शिपायांबरोबर आला. त्याला पाहून तिने विचारले—"अहमद आपणच का?"

"नाही नाही, माझे नाव गूनी अली आहे." तिच्याकडे पाहात स्मित करून गूनी अली म्हणाला.

"अस्सं, अस्सं! आपल्या सर्वांच्या स्वागतासाठीच मला येथे नेमले आहे." असे सांगून जीनाब त्या सर्वांना सजवून ठेवलेल्या खोलीत घेऊन गेली.

पहिल्या गटातले दहाजण दारूच्या पिपाच्या चारीबाजूला घोळका करून उभे राहले आणि त्यांनी मनसोक्त दारू पिऊन घेतली. त्या दारूत जीनाबने भांग घालून ठेवली होती. म्हणून दारू प्याल्याबरोबर सर्व छान झिंगून बेशुद्ध होऊन पडले.

जीनाब त्या सर्वांना पाय धरून फरपटत ओढत मागच्या बाजूला परसात घेऊन गेली



आणि एकावर एकाला ओणक्यासारखे रचून ठेवले. शेवटी त्यांच्यावर एक चादर घालून त्यांना झाकून ठेवले. नंतर पुन्हां खोली साफ करून ठेवून सरायीच्या दारावर येऊन उभी राहली.

थोडया वेळाने दुसऱ्या गटातले शिपाई आले. त्यांची व त्यांच्या मागाहून तिसऱ्या व चवथ्या गटातल्या शिपायांची तीच गत झाली. शेवटी अहमद घोडयावर बसून आला. तिने दरवाज्यात जीनाबला उभी पाहून विचारले–"ए पोरी माझे शिपाई इकडे आले नाहीत का?"

"कोतवाल अहमदसाहेब आपणच नव्हे का? तर मग ऐका, या गल्लीच्या तोंडावर त्यांना कोणती तरी म्हातारी भेटली तिला कैद करून आणण्यासाठी गेल्याचे आपल्याला सांगायला त्यांनी मला सांगितले आहे. ते येईपर्यंत आपण आत बसावे." जीनाब म्हणाली.

अहमद [illegible] त्या गोष्टीस कबूल झाला. आत जाऊन त्याने मनसोक्त दारू पिऊन घेतली आणि तो सुद्धा बेशुद्ध होऊन जमिनीवर लोळू लागला. जीनाबने त्याच्या अंगावरचे सर्व कपडे उतरवून नंतर सर्व शिपायांचे गणवेष काढून टाकले आणि अहमदच्या घोडयावर बसून घरी निघून गेली.

अहमद व त्याचे शिपाई दोन दिवस बेशुद्ध स्थितीत झोपून राहल्यावर तिसऱ्या दिवशी जागे झाले तेव्हां त्यांना ते कोठे आहेत व तेथे कसे आले हे कळले नाही. परंतु हळू हळू त्या पोरीने सर्वांना फसविल्याचे त्यांच्या लक्षात आले. अंगावर चड्डी व बनियनशिवाय दुसरे कपडे नव्हते. म्हणून त्यांना बाहेर पडण्यातदेखील शरम वाटली. परंतु त्या शिवाय दुसरा उपायच नव्हता. माना खाली घालून सर्व गल्लीत शिरले.

(चालू)





# साहसी योद्धा

धरणीकोट येथे शूरवर्मा नावाचा एक कुलीन क्षत्रियवंशी मनुष्य रहात असे. त्याला एक सुंदर मुलगी होती. तिचे नाव मालिनी असे होते. मालिनी रूप लावण्याबरोबर एका मोठ्या दौलतीला वारसदार पण होती. म्हणून तिच्याशी लग्नाची इच्छा असणारे अनेक तरुण होते. परंतु त्यांच्यापैकी एकालाही यश मिळाले नाही. कारण, एकाद्या शूर साहसी योद्ध्याबरोबरच आपल्या मुलीचे लग्न करून द्यायचे शूरवर्म्याने ठरविले होते.

धरणीकोट येथेच कीर्तिसिंह नावाचा एक सुंदर तरुण युवक रहात असे. त्याच्या वाडवडिलांनी मोठमोठ्या लढाया लढून सत्ता गाजविली होती. परंतु कीर्तिसिंह जन्मण्यापूर्वीच त्या घराण्याचे सर्व वैभव नाहीसे झाले होते. कीर्तिसिंहाच्या मालकीचा उरला होता तो फक्त एक घोडा व एक तलवार. म्हणून तो सैन्यात एक सामान्य सैनिक म्हणून नोकरी करीत असे. तो महापराक्रमी व शूर होता. पण त्याला आपले शौर्य व साहस दाखविण्यास कधी संधीच मिळाली नाही.

एक दिवशी कीर्तिसिंह दूरवर प्रवास करून घरी परत येत होता. गावाबाहेर शूरवर्म्याचा वाडा पाहून त्याने आपला घोडा थांबविला. त्याला फार तहान लागली होती. त्याला व त्याच्या घोडयाला प्यायला पाणी मिळेल या आशेने तो त्या वाडयाजवळ आला.

वाडयासमोर एक सुंदर उद्यान होते. मध्यभागी एक सुंदर कुंड होते व त्यात कमळे उमललेली होती. काठावर मालिनी बसली होती. कोणी येत असल्याचा आवाज ऐकून तिने वळून पाहिले आणि "कोण



आपण, काय पाहिजे आपल्याला?" असे विचारले.

मालिनीचे रूप पाहून कीर्तिसिंह चकितच झाला. मालिनी पण कीर्तिसिंहाचे सौंदर्य पाहून आश्चर्य चकित झाली होती.

"मी फार दुरून येतो आहे, मला व माझ्या घोड्याला तहान लागली आहे. आम्हांला प्यायला पाणी मिळेल का?" कीर्तिसिंहाने विचारले.

मालिनीने टाळी वाजविल्याबरोबर एक नोकर आला. त्याला तिने प्यायला पाणी घेऊन यायला सांगितले आणि म्हणाली— "घोड्याला पण पाणी पाजून घेऊन ये."

त्या प्रमाणे नोकर कीर्तिसिंहाला पाणी प्यायला देऊन घोड्याला पाणी पाजायला घेऊन गेला.

पाणी प्याल्यावर कीर्तिसिंहाला हुशारी वाटली. त्याने चारीबाजूला एकदा पाहून मालिनीला विचारले—"ही बाग किती सुंदर आहे, पण आपण अशा उदास कां?"

मालिनी आपल्या मनाची व्यथा कशी सांगावयाची या विचाराने निराशासूचक स्मित करून म्हणाली—"मी उदास कां विचारतां? आपापले नशीब, आणखी काय? जगात कोठे अर्जुन किंवा भीम आहे का जांवई करून घ्यायला माझे बाबा शोधत आहेत. आणखी काय?"

"मग आमच्या सारख्या सामान्य सैनिकाने अशी महत्वाकांक्षा करणे म्हणजे मूर्खपणाच ठरेल. आपल्या वंशाचा व उच्चकुळाचा अभिमान असला तरी उपयोग काय? आतां माझ्याजवळ उरली आहे ती ही एक तलवार आणि हा घोडा. आपला पराक्रम दाखवायला संधी तरी कोठून मिळणार? कारण, मी आहे आज सामान्य सैनिक!" कीर्तिसिंह म्हणाला.

"तुमच्या सारख्या शूर पुरुषाबरोबर गरीबीत संसार करायला कोणती ही स्त्री



आनंदाने तयार होईल. पण वडिलांना ते पटले पाहिजे!" मालिनी म्हणाली.

दोघे बोलतच होते, नोकर घोड्याला पाणी पाजून घेऊन आला. "आतां या तुम्ही, परक्या पुरुषाशी बोललेले, वडिलांना आवडत नाही." मालिनी म्हणाली.

कीर्तिसिंह आपल्या घोड्यावर बसून घरी परतला. किती प्रयत्न केला तरी तो मालिनीला विसरू शकला नाही. मालिनी स्वतंत्र नव्हती. तिच्या मनात आले असते तरी त्याच्याशी तिला विवाह करून घेणे शक्य नव्हते. कीर्तिसिंहाला हे कळत होते व तो त्याच विचारात निराश होऊन रानावनात हिंडत असे.

एकदा तो असाच डोंगरात फिरत असता त्याला एका जागी एक झोपडी दिसली. त्या झोपडीच्या समोर एक म्हातारी उभी होती. तिने कीर्तिसिंहाचा उदास चेहरा पाहून त्याला त्याचे कारण विचारले.

त्या म्हातारीला सर्व सांगून टाकावे, असे कीर्तिसिंहाला वाटले आणि त्याने सांगून पण टाकले. सर्व ऐकून घेऊन म्हातारी झोपडीत गेली आणि डबी घेऊन बाहेर येऊन म्हणाली— "या डबीत एक लहानशी अळी आहे. ही जमिनीवर पडली तर एक मोठा साप होईल.



तू त्याला ठार केलेस तर तुला एक शूर साहसी योद्धा म्हणून सर्व ओळखू लागतील. प्रयत्न करून पहा, तुला त्यात यश येईल व तुझी इच्छापण पुरी होईल." असे सांगून म्हातारीने ती डबी कीर्तिसिंहाला दिली.

दुसऱ्या दिवशी कीर्तिसिंह ती डबी आपल्या अंगरख्यात काळजीपूर्वक ठेवून देऊन शूरवर्म्याच्या घरी गेला. शूरवर्म्याने त्याला येण्याचे कारण विचारले.

तो म्हणाला—"एका कुलीन क्षत्रिय वंशात माझा जन्म झाला आहे. माझ्या वाडवडिलांनी मोठमोठ्या लढाया लढून राज्ये मिळविली आणि चालविली. म्हणून











आज मी एक सामान्य सैनिक म्हणून आपल्या पदरी काम करीत आहे. तरी आपल्या मुलीशी लग्न करण्याच्या विचाराने मी आपणांकडे त्याविषयी बोलण्यासाठी आलो आहे." कीर्तिसिंह म्हणाला.

शूरवर्मा कीर्तिसिंहाकडे लक्षपूर्वक पाहून त्याला म्हणाला–"इतर सर्व गोष्टी मागाहून पाहू. प्रथम तू, कोणकोणती साहसाची कामे केलीस ती सांग."

"मी एक सामान्य सैनिक आहे. एक दोन लहानसहान युद्धात भाग घ्यायला मला संधी मिळाली आहे. पण मोठ्या लढाईत भाग घेण्याची व शौर्य पराक्रम गाजविण्याची संधी मला अद्याप मिळालेली नाही. तरी तशी संधी मिळाल्यास मी आपल्या शौर्य व साहसाचा परिचय देऊ शकेन." कीर्तिसिंह म्हणाला.

"तरमग काहीतरी असामान्य साहसाची कामगिरी करून दाखविल्यावर तू माझ्याकडे ये." शूरवर्म्याने त्याला या कठोर स्वरात उत्तर देऊन निरोप दिला.

कीर्तिसिंह मान खाली करून निराश मनाने बाहेर गेला. बाहेर आल्याबरोबर त्याने डबी काढून अळी जमिनीवर टाकली. दुसऱ्या क्षणाला बाहेरून मोठा आरडा ओरडा ऐकू आला तेव्हां शूरवर्मा बाहेर आला. एक भयंकर मोठा साप फूत्कार सोडीत सर्वांना जणुंकाही गिळण्यासाठी फडा वर करून उभा होता.

"अरे पाहात उभे काय करता? ठार करा त्या सापाला!" शूरवर्मा ओरडून म्हणाला. परंतु कोणी जागचा हलला देखील नाही, उलट सर्व दूर दूर पळाले.

"महाराज! या सापाला ठार करणे सोपे नाही." सर्व हात जोडून म्हणाले.

"थांबा, मागे व्हा! मी त्या सापाचा समाचार घेतो." असे म्हणत कीर्तिसिंह म्यानेतून तलवार उपसून त्या सापावर धावला. साप आपल्या शेपटीने कीर्तिसिंहाला पकडून आवळण्याचा प्रयत्न करू लागला. परंतु कीर्तिसिंह त्याची शेपटी व डोके छाटून टाकण्याचा प्रयत्न करू लागला. साप चपळाईने स्वतःचा बचाव करून कीर्तिसिंहावर धावून येऊ लागला.

अशातऱ्हेने कीर्तिसिंह व सापाचे द्वंद्व सुरू झाले. सापाने आपल्या चपळाईची शिकस्त करून कीर्तिसिंहाला तोंडाने किंवा शेपटीने धरण्याचा प्रयत्न करून पाहिला. परंतु कीर्तिसिंहाने तितक्याच चातुर्याने सापाचे सर्व प्रयत्न निष्फळ केले. शेवटी कीर्तिसिंह सापाची शेवटी कापण्यात यशस्वी झाला आणि त्यानंतर त्याने सापावर तलवारीचे सपासप वार करून त्या सापाची गुर्मी उतरविली आणि एक मर्मी वार करून सापाची मुंडी छाटून टाकली.

ते भयंकर युद्ध दुरून पाहणाऱ्यांच्या अंगाला घामच सुटला. शूरवर्मा कीर्तिसिंहाचा पराक्रम पाहून खूष झाला. त्याने जवळ जाऊन त्याची पाठ थोपटली आणि म्हणाला–"शाबास! तू खरोखरच शूर साहसी आहेस."

त्यानंतर शूरवर्म्याने कीर्तिसिंहाच्या स्नानादीची व्यवस्था करण्यास सांगून राजपुरोहितांकडे निरोप पाठविला.

त्यानंतर मालिनी व कीर्तिसिंह यांचा विवाह थाटामाटाने पार पडला. काही दिवसांनी कीर्तिसिंह ती डबी व एक पिशवी घेऊन त्या डोंगराळ प्रदेशात गेला. तेथे त्या म्हातारीला भेटून तिचे आभार मानले आणि तिला पिशवी व डबी देत म्हणाला–"आजी! तुमची ही डबी व ही तुमच्या प्रेमाची खूण म्हणून पिशवी ठेवून घ्या."

म्हातारीने पिशवीत काय आहे पाहिले. सोन्याची नाणी होती आणि डबीत अळी होती. तिने कीर्तिहिला आशीर्वाद देऊन निरोप दिला.



# शेरास सव्वा शेर

एका गावी एक श्रीमंत मनुष्य भोळ्या भावड्या लोकांना फसवून पैसे मिळविण्याचा धंदा करीत असे. त्याच गावी एक लबाड मनुष्य श्रीमंत लोकांना फसवून पोट भरण्याचा धंदा करीत असे. एकदां त्याने त्या श्रीमंत माणसाला फसविण्याचे ठरविले. त्याने एक दागिना त्या श्रीमंत गृहस्थाकडे गहाण ठेवून शंभर रुपये घेऊन गेला. चार दिवसानंतर त्या श्रीमंताला रुपये परत देऊन म्हणाला–"आपल्याला विना कारण कष्ट दिला. आपल्या कडून नेलेल्या रुपयांची गरजच पडली नाही." श्रीमंताने रुपये मोजून पाहिले, एकशेवीस होते.

"व्याजाचे वीस रुपये दिलेस? मी इतका लोभी आहे का?" श्रीमंताने विचारले.

"नाही, मी तुमचे रुपयेच तुम्हांला दिले. त्यांना मुले झाली!" तो लबाड मनुष्य म्हणाला. श्रीमंत मनुष्याने रुपये ठेवून घेऊन गहाण ठेवलेला दागिना परत केला.

आणखी काही दिवस लोटले. त्या लबाड माणसाने मुलीचे लग्न असल्याचे सांगून त्या श्रीमंताकडून एक हजार रुपये मागून घेतले आणि चार महिन्यांनी परत करण्याचे वचन दिले. त्या श्रीमंत मनुष्याने त्याला जास्त विचारपूस केल्याशिवाय एक हजार रुपये दिले.

चार महिने होऊन गेले, पाचवा महिना पण लोटला. तेव्हां त्या श्रीमंत माणसाने लबाड माणसाला बोलावून रुपये परत द्यायला सांगितले. तेव्हां तो कोणी जवळचा नातेवाईक मेल्यासारखा दुःख प्रगट करीत म्हणाला–"मालक! काय सांगू? माझ्या मुलीचे लग्न व्हायच्या आधीच आपले सर्व रुपये मरून गेले हो! मी त्यांची अन्त्येष्टी केली आणि आतां मुलीचे लग्न कसे करावयाचे हा प्रश्न आहे."

श्रीमंत मनुष्य रागाने म्हणाला–"रुपये मरून गेले? ही काय लबाडी?"

"मालक! ज्या रुपयांना मुले होतात ते मरतात पण! पाहिजे तर कोणाला विचारून पहा!" लबाड मनुष्य म्हणाला.





# आरसा

फार प्राचीन काळातील गोष्ट आहे. एक लहानशा गावी वांग नावाचा एक तरुण युवक रहात असे. सर्व गावकरी भोळेभाबडे होते. सर्वांत जास्त भोळा होता तो वांगच.

एकदा वांग एका कावडीत कोळसे घालून शहरात जायला निघाला. वांग पूर्वी त्या शहरात कधी गेला नव्हता.

वांगची बायको गावाच्या टोकापर्यंत नवऱ्याला पोचवायला आली आणि त्याला निरोप देऊन म्हणाली–"या, लवकर परत या! बरोबर बरकत करून घेऊन या. परत येतांना माझ्यासाठी एक कंगवा घेऊन या."

"कंगवा?" वांगने आश्चर्य चकित होऊन विचारले. त्याने त्या पूर्वी कंगवा हा शब्द ऐकला नव्हता. त्या काळात चीन देशातल्या स्त्रिया लाकडी फण्या आपल्या केसात खोचून ठेवीत असत. त्या फण्या विळ्यासारख्या वांकड्या असत.

"ठीक असा असतो कंगवा असे सांगून आकाशात चंद्राची पुसट कोर दिसत होती तिने ती वांगला दाखविली. कित्येक दिवसांनी वांग शहरात येऊन पोचला. कोळशांची किंमत त्याला बरी मिळाली.

त्या दिवशी संध्याकाळी तो शहरातल्या गर्दीतून चालत असतां त्याला बायकोने काही तरी आणायला सांगितल्याचे आठवले. पण त्या वस्तूचे नाव त्याला आठवले नाही. तशी वस्तु आकाशात दिसेल असे समजून त्याने आकाशाकडे पाहिले. तेथे त्याला पूर्ण चंद्र दिसला. तो कोणती तरी गोल वस्तु बायकोला हवी असेल असे समजून एका दुकानात एक गोल वस्तु दिसली ती घेण्यासाठी दुकानात गेला. ती वस्तु घेऊन तो घरी परतला.

परत येते वेळी सुद्धां वांगला बरेच दिवस वाटेत लागले. त्याने शहरात विकत